# श्रीरामायण-समालोचना

अथवा

# रामायणाच्या उपसंहार.

## प्रथम खंड-भाग १ ते ७.

लेखक--" महाराष्ट्रीय "

( " तुल्यं तु दर्शनम् अथवा गीतारहस्यनिर्णय "
" संक्षिप्त ब्रह्मसूत्र शांकरभाष्य "
" संस्कृत व्याकरणकारिका " या ग्रंथांचा व
" उष:सूक्तावलि " " विश्वगुणादर्श "
इत्यादि काव्यांचा कर्ता )

यांनीं हा ग्रंथ चिपळूणकर मंडळीकरितां लिहिला.

प्रकाशक

बाळकृष्ण पांडुरंग ठकार,

मालक व व्यवस्थापक-गणेश विष्णु चिपळूणकर आणि मंडळी, पुणें.

मुद्रक

त्र्यंबक हरी आवटे-मालक इंदिरा प्रेस, पुणें.

शके १८४९-सन १९२७.

हा ग्रंथ गणेश विष्णु चिपळूणकर आणि मंडळींचे व्यवस्थापक व मालक
बाळकृष्ण पांडुरंग ठकार, यांनीं पुणें पेठ सदाशिव, घरनंबर २७०
येथील रा. रा. त्र्यंबक हरी आवटे यांच्या इंदिरा छापखान्यांत
छापवून घरनंबर १७२ पुणें पेठ बुधवार येथें प्रसिद्ध केला.

---

# अर्पणपत्रिका.



**नमो भगवते सशक्तिक श्रीराजारामचंद्राय**

ज्या अखिल ब्रह्मांडनायकाच्या कृपेनें सृष्टींतील यच्चयावत्कार्यें घडतात, ज्याच्या कृपेनें ह्या अनिवार्य मायामोहाचें निरसन करितां येतें व जो किंचिज्ज्ञ जीवांना परमपद प्राप्त करून घेण्याकरितां बुद्धि-सामर्थ्य देतो त्या परमकारुणिक श्रीरामचंद्राच्या कृपेनें आणि त्याच्याच प्रेरणेनें

**श्रीमंत सरकार पंडित रघुनाथराव शंकरराव ऊर्फ**

**बाबासाहेब पंतसचीव चीफ ऑफ भोर,**

यांनीं उदार आश्रय दिल्यानें तयार झालेला

**हा ग्रंथ**

प्रथम सशक्तिक श्रीराजारामचंद्राच्या चरणीं महापूजेदाखल अर्पण करून त्या भगवंताचा महाप्रसाद म्हणून तोच श्रीमंत सरकारच्या परवानगीनें त्यांचे प्रथम कुटुंब कै० श्रीमती सौभाग्यवती

अखंडवज्रचुडेमंडित

**गंगूताई साहेब**

यांच्या श्रीसीतारामचरणीं स्थिर झालेल्या आत्म्यास हें त्यांचें वाङ्मयात्मक स्मारक म्हणून प्रकाशकांनीं अत्यंत भक्तीनें

**समर्पण केला आहे.**

शुभं भूयात्.

प्रकाशक.

॥ सशक्तिक श्री रामचंद्राय नमः ॥

# प्रकाशकाचे चार शब्द.

आपदामपहर्तारं दातारं सर्व संपदाम् ॥
लोकाभिरामं श्रीरामं भूयोभूयो नमाम्यहम् ॥ १ ॥
कूजंतं रामरामेति मधुरं मधुराक्षरम् ॥
आरुह्य कविताशाखां वंदे वाल्मीकि कोकिलम् ॥ २ ॥
यत्कृतं यत्करिष्यामि तत्सर्वं न मया कृतम् ॥
त्वया कृतं तु फलभुक्त्वमेव मधुसूदन ॥ ३ ॥

श्री सशक्तिक, षड्गुणैश्वर्यसंपन्न, क्षत्रियकुलावतंस, वर्धिष्णुतेजसाविराजित, अद्वितीय धनुर्धर, षडायतनरूप श्रीरामचंद्राची साष्टांग प्रणिपातयुक्त मानसोपचारांनीं पूजा करून उद्दिष्ट कार्यारंभ करणेंच श्रेयस्कर होय. याप्रमाणें शिष्ट जनांनीं चोखाळिलेल्या मार्गानें गमन करून अखिल जनताजनार्दनाच्या कर्णांत चार शब्द सांगण्यास हा चिरपरिचित अखिल महाराष्ट्रीय बंधुभगिनींचा नम्र सेवक प्रवृत्त झाला आहे. तरी त्याच्या प्रार्थनेकडे सर्वांनीं अवधान देण्याची कृपा करावी, इतकीच या सेवकाची विनंति आहे.

बंधु-भगिनींनो ! सन १९२६ सालांत श्रीदेवी भागवताच्या मराठी भाषांतराचा पहिलाभाग आपल्या सेवेशीं सादर करितांना त्या वेळच्या **प्रकाशकाच्या शब्दांत " श्रीरामायणाच्या उपसंहारासंबंधानें "** जें आपल्याशीं थोडें हितगुज केलें होतें, त्याचेंच दृश्य फल म्हणजे **श्रीरामायण-समालोचना अथवा रामायणाचा उपसंहार** या ग्रंथाचा हा **प्रथम खंड** होय. हेंच उपायन घेऊन आज मी आपल्या सर्वांच्या भेटीस येत आहें. ज्याच्या कृपेनें हा ग्रंथ तयार होऊन तो छापला गेला, त्या सशक्तिक सर्वेश्वर रामचंद्रास प्रथमारंभीं अनन्य प्रेमानें अर्पण करून त्या भगवंताचा हा **महाप्रसाद** म्हणून आपल्या सेवेशीं सादर अर्पण करीत आहें. याचा पुढचा ( दुसरा ) खंड आपल्या सर्वांच्या कृपेनेंच येत्या विजयादशमीपर्यंत छापला जाऊन तोहि ठराविक मुदतींत सर्वांच्या हातांत पडेल.

प्रेमळ बंधुजनहो ! आतांपर्यंत आमच्या संस्थेनें जे महाभारतादि पांच प्रचंड ग्रंथ प्रसिद्ध केले, त्यांपैकीं प्रस्तुतसुद्धां तीन ग्रंथांचे उपसंहार आमच्या संकल्पानुरूप सर्वे-

श्वराच्या कृपेनें ( महाभारत, भागवत व रामायण ) प्रसिद्ध झालेच. बाकी राहिलेल्या दोन ग्रंथांचे ( श्रीयोगवासिष्ठ व देवीभागवत यांचे ) उपसंहार प्रसिद्ध व्हावयाचे राहिले आहेत. ते प्रसिद्ध व्हावे असा ईशसंकल्प असल्यास तसा अनुभव येईलच. ती गोष्ट सिद्ध व्हावी अशी आम्हास प्रबलतम इच्छा आहे व म्हणून तन-मन-धनानें आम्ही तसा उद्योग करीत आहों. पण वयमानानें चित्त साशंक असणें साहजीक आहे. आमची अखेरची आशा कार्य करीत असतांनाच विनायास " **अनायासेन मरणं** " सर्वांचा निरोप घेण्याचा योग यावा अशीच आहे. पहावें सत्य संकल्पाचा दाता सर्वेश्वर काय करितो तें.

वर दिलेल्या श्लोकपादाच्या पुढचा पाद " **विनादैन्येन जीवनम्** " असा आहे. आज आमच्या वयाला ६४ वर्षें पुरीं होत आलीं. परंतु, वरील श्लोकांत ग्रथित केलेल्या प्रमेयाच्या उलट आमचा अनुभव आहे. पण त्याबद्दल खेद करणें अनुचित आहे. कारण, या गोष्टी पूर्वदत्त असतात, म्हणून प्राप्त परिस्थितीचा अनुभव खेदरहित मनानेंच घेणें युक्त होय. प्रस्तुत एकंदर समाजच अशा स्थितींत आहे. त्यांतच आमचा समावेश होत आहे. प्रत्येक नवा उगणारा दिवस गतदिवसापेक्षां हिणकसच ठरत आहे. म्हणून " **आल्या भोगास सादर** " होऊन मान लवविली पाहिजे, दुसरें काय ! " श्रीदेवीभागवत ग्रंथ " प्रसिद्ध झाल्यास पुरें एक वर्ष झालें तरी अजून ५०० वर प्रती खपल्या नाहीत. ही गोष्ट सर्वांपुढें ठेविल्याशिवाय कसें भागेल ? असो.

आमचा अनुभव कसाहि असला तरी **अघटित घटना घटक प्रभूच्या कृपेनें** प्रत्येक नव्या वर्षांत आतांपर्यंत झालेल्या कामास शोभेल असेंच एखादें नवें काम मात्र सर्वेश्वर आमच्या हातानें जनतेच्या सेवेस सादर करून मराठी वाङ्मयांत उपयुक्त वाङ्मयाची भर घालीत आहे, ही त्याच सर्वेश्वराची कृपा होय. " **कालोह्ययंनिरवधिर्विपुला च पृथ्वी** " यावर लक्ष पुरवून काम करावयाचें, हेंच आमचें ध्येय आहे. प्रस्तुत प्रसंगींही आम्ही नाममात्र निमित्तकारण आहों.

## आभारप्रदर्शन.

या ग्रंथाचे लेखक श्रीयुत **महाराष्ट्रीय** हे बंदर राजापूर, जिल्हा रत्नागिरी येथील रहिवासी असून त्यांचे या पूर्वींचें सर्व काम ( **लेख** ) याच नावानें प्रसिद्ध आहे. या महाराष्ट्रीयांनीं आपण होऊन आम्हास पत्रव्यवहारानें आपला परिचय देऊन प्रोत्साहन दिलें व आमच्या ध्येयानुरूप आमच्या संस्थेस " **श्रीरामायण-समालोचना** " हा ग्रंथ लिहून देऊन आमचें उद्दिष्ट सुसाध्य केलें, याबद्दल त्यांना जेवढे धन्यवाद द्यावेत तेवढे थोडेच आहेत. श्रीयुत महाराष्ट्रीय हे वाल्मीकीरामायण ग्रंथाशीं अत्यंत

एकजीव झाले असून त्यांनीं आपलें कार्य अत्यंत काळजीनें व कळकळीनें केल्याचें वाचकांचे अनुभवास येईल, अशीच आमची समजूत आहे.

समालोचना या ग्रंथाच्या पहिल्या खंडाची लेखी प्रत आमच्या हस्तगत होतांच ती घेऊन आम्ही आमच्या संस्थेचे सुरवातीचे साहाय्यक व वारकारी सांप्रदायाचे अध्वर्यु श्रीयुत रा. **त्र्यंबक हरी आवटे मालक इंदिरा प्रेस, पुणें पेठ सदाशिव,** यांच्याकडे जाऊन त्यांना हा ग्रंथ छापून देण्याबद्दल विनंति केली. श्रीयुत आवटे यांनीं उदार चित्तानें पूर्वापरसंबंध ध्यानीं घेऊन व आमचें रामायणाचें भाषांतर त्यांनींच छापिलें होतें, म्हणून हें कार्य सर्व प्रकारें सहाय्य करण्याच्या भावनेनें स्वीकारून करून दिल्यानें त्यांनींहि आम्हास कामयचें ऋणी करून ठेविलें आहे. अशा गृहस्थाचे जेवढे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत.

त्याचप्रमाणें येथील ज्ञानविलास प्रेसचे मालक श्री० रा० रा० **बाळकृष्ण भाऊ-राव जोशी** यांनीं या ग्रंथाचीं प्रुफें तपासण्याचे कामांत–लेखकाकडे तीं पाठविणें अशक्य झाल्यामुळें–जें श्रमपूर्वक सहाय्य केलें ह्याबद्दल आम्ही त्यांचेही अत्यंत आभारी आहों.

येथवर जरूर त्या गोष्टीचा उल्लेख केल्यावर आतां मुख्य कर्तव्य बजाऊन सर्वांची रजा घेतों. प्रस्तुतचा ग्रंथ तयार होऊन तो आमचे हस्तगत झाल्यावर आमच्या पांच वर्षांच्या वहिवाटीप्रमाणें आमचे परम हितचिंतक व आश्रयदाते श्रीमंत सरकार पंडित **रघुनाथ शंकर उर्फ बाबासाहेब पंतसचीव संस्थान भोर** यांना प्रथम भेटून सदर ग्रंथ त्यांच्यापुढें ठेविला व त्याच्या प्रकाशनास आर्थिक मदतीबद्दल प्रार्थना केली. हा ग्रंथ आपल्या उपास्य देवतेच्या चरित्राचा असल्याचें पाहून तो छापण्याकरितां सरकारांनीं आरंभींच एक हजार रुपये देऊन आम्हास प्रोत्साहन दिलें. या त्यांच्या औदार्याबद्दल श्रीमंत पंतसाहेब सचिव यांचें जेवढें स्तुतिस्तोत्र करावें तेवढें थोडेंच आहे. कारण सर्वारंभीं **अर्थप्राप्ती** हाच बिकट प्रश्न असून तो सोडविणारा खरोखरीच प्रशंसेस पात्र असतो. श्रीमंत पंत साहेबांचा राज्यारोहण-समारंभ ता. १८।८।२२ इसवी रोजीं झाला. तेव्हांपासून आतांपर्यंत " **मेसर्स चिपळूणकर आणि मंडळी भोरकर** " ही आपलीच आश्रित संस्था मानून तिच्या प्रत्येक कार्याला **वाङ्मयप्रेमी व उदारचित्त** सरकारांनीं वेळोवेळीं साहाय्य केलेंच आहे. श्रीमंतांचा हा आमच्या संस्थेपुरताच परिपाठ नसून राज्यारोहणापासून आजपावेतों श्रीमंतांनीं अनेक उपयुक्त संस्थांना बहुमोल देणग्या दिलेल्या आहेत. पैसा असून

त्याचा सत्कार्यी व्यय करण्याची सुबुद्धी प्राक्जन्मसंस्कारानेंच होत असते. तशा प्रकारचे जन्मांतरीय संस्कार असल्याशिवाय अशा गोष्टींचें प्रेम असणें शक्य नाहीं. त्यांतून विशेष गोष्ट ही कीं, श्रीमंतांच्या सर्व देणग्या निरपेक्ष असतात.

अशा रीतीनें प्रस्तुत प्रसंगीं श्रीमतांनीं व्यक्त केलेल्या आदार्याचे अंशत: तरी उतराई व्हावें म्हणून आम्ही **स्वयंप्रेरणेनें** श्रीमंत सरकारांची परम सायासानें परवानगी घेऊन या प्रथम खंडानें श्रीमंत सरकारचे प्रथम कुटुंब युवराज्ञी कै. श्रीमती अखंड-वज्रचुडेमंडित सौभाग्यवती, **गंगुताई उर्फ वहिनीसाहेब महाराज** यांचे वाङ्मयात्मक स्मारक म्हणून हा **रामायण-समालोचनेचा प्रथम खंड** आधीं श्रीमंत सरकारचें उपास्य दैवत जे सशक्तिक **श्री राजारामचंद्र** यांस महापूजेदाखल अनन्य प्रेमानें अर्पण करून त्या सर्वव्यापी, सशक्तीक परमेश्वराचा **महाप्रसाद** म्हणून तोच युवराज्ञीच्या दिवंगत आत्म्यास अर्पण करून हें त्यांचें वाङ्मयात्मक **चलस्मारक** करीत आहों. भोर संस्थानच्या प्रजाजनांनींहि **गंगूताई वाचनालयाच्या** रूपानें भोर येथें त्यांचें स्थिर स्मारक केलेंच आहे. भागारंभीं युवराज्ञीचा फोटो देऊन त्यांचें अल्प चरित्रहि दिलेलें आहे. अशा प्रकारचें स्मारक करण्याचें मुख्य कारण युवराज्ञीची वाचनप्रियता हेंच होय. अल्पवयांत त्यांनीं अनेक उपयुक्त ग्रंथांचें वाचन केलें होतें.

येथपर्यंत जरूर तेवढ्या गोष्टींचा उल्लेख झाल्यामुळें पुढील कार्याकरितां सर्वांची रजा घेतांना फिरून श्रीमंत सरकारचे सहपरिवार अभीष्ट चिंतून आणि सर्वांच्या आयुरारोग्यैश्वर्यादिकांची वृद्धी करण्याबद्दल श्रीरामचंद्राची अन्यन प्रेमानें प्रार्थना करून पुरे करितों. इतिशम्.

ता. २।८।१९२७ (नागपंचमी) पुणें.

सर्वांचा नम्र सेवक,
बा. पां. ठकार, प्रकाशक.




**श्री० कै० सौ० युवराज्ञी गंगूताईसाहेब**

**पंतसचीव, संस्थान भोर.**

c. s. p. p.

# युवराज्ञी कै. श्री. सौ. गंगुताई साहेब
# यांचें अल्प चरित्र.



## जनन.

कै. श्री. सौ. गंगूताई साहेब यांचा जन्म सन १८८६ सालीं झाला. यांचे वडिलांचें नांव. सरदार रामराव कृष्णराव ऊर्फ बाळासाहेब विंचूरकर व मातुश्रींचें नांव सौ. वाराणशीबाई साहेब होतें. वाराणशीबाई साहेब या पुण्यांतील बाबा साहेब देशपांडे परळीकर यांची कन्या होत. विंचुरकरांचें हें घराणें इतिहासप्रसिद्ध असून या घराण्यांतील पुरुषांच्या मर्दुमकीविषयीं व मुत्सद्दीगिरीविषयीं महाराष्ट्रांत ख्याति आहे.

## सचिवांच्या घराण्याशीं विंचूरकर घराण्याचा संबंध.

माजीसरकार रावसाहेब सचीव यांचें लग्न सरदार बाळासाहेब विंचूरकर यांचे भगिनीबरोबर झाल्यामुळें विंचूरकर घराण्याचा व सचीव घराण्याचा शरीरसंबंध झालेला होता. सरदार कै. बाळासाहेब विंचूरकर हे श्रीमंत सरकार बाबासाहेब पंतसचीव यांचे मामा होत. सरदार बाळासाहेब विंचूरकर यांचें नांव महाराष्ट्रांत बहुतेकांच्या परिचयांचें आहे. बाळासाहेब यांचा स्वभाव दिलदार असून सरदारी बाण्याचा होता. हे मनाचे फार थोर असून त्यांचा बाणेदारपणा सरदारास शोभण्यासारखाच होता. ते सामान्य लोकांत नेहमीं मिळूनमिसळून वागत असल्यामुळें मध्यम वर्गांतील लोकांच्या स्थितीबद्दल त्यांना पूर्ण जाणीव असे. सौ. वाराणशीबाई याहि फार सुशील, धार्मिक, गृहकार्यकुशल व औदार्यसंपन्न होत्या.

## शिक्षण.

गंगुताईसाहेब या बाळासाहेब यांचें दुसरें अपत्य होय. बाळासाहेब व वाराणशीबाई यांचें गंगुताईवर अत्यंत प्रेम असे. या उभयतां मातापित्यांनीं त्यांची शारिरिक व मानसिक वाढ होण्याची शक्य तितकी काळजी घेतली. गंगूताई यांना घरींच शिक्षक ठेऊन शिक्षण देण्यास सुरवात केली व पुढें त्यांना पुण्यास शाळेंतही घालण्यांत आलें, बाळासाहेब स्वतः त्यांना घरींहि थोडें शिक्षण देत असत. वाराणशीबाईनींहि त्यांना धार्मिक व नैतिक शिक्षण देण्यास सुरवात केली

होती, त्या गंगूताईकडून ईशस्तुतीपर गाणीं, भूपाळ्या, स्तोत्रें वगैरे पाठ करून घेत. गंगूताईची बुद्धि तीव्र असून धारणाशक्ति चांगली होती. यामुळें त्यांना कोणताहि विषय लवकर समजत असे. लहान मुलींचे खेळ खेळण्याची त्यास अत्यंत आवड असे व यामुळें त्यांची प्रकृति निकोप राहून शरीर मजबूत झालें होतें. सरदार बाळासाहेब व वाराणशीबाई यांची राहाणी अगदीं साधी असल्यामुळें गंगुताईंनाही लहानपणापासूनच साधेपणाची संवय लागली होती. त्यांचा जन्म जरी श्रीमंतींत झाला होता तरी श्रीमंतींत वाढलेल्या मुलांचे अंगीं जो एक प्रकारचा परावलंबीपणा उत्पन्न होतो तो यांचे ठिकाणीं मुळींच नव्हता. याचें कारण त्यांना जें गृहशिक्षण मिळत होतें त्याचा हा परिणाम होय. वयाचे ७ वे वर्षी यांना वाटेल तें मराठी पुस्तक अस्खलितपणें वाचतां येत असे. त्यांची पठनशक्तिही दांडगी होती.

हल्लीं मुलांना काय किंवा मुलींना काय गृहशिक्षण मुळींच मिळत नसल्यामुळें धार्मिक व नैतिक शिक्षणाचा बहुतेक अभाव होत चालला आहे. ही अनिष्ट स्थिति विचारी लोकांचे लक्षांत येऊन बॉयस्काउट व गर्लगाईड सारख्या परदेशस्थ संस्था येथें निर्माण करून त्यांचे द्वारें धार्मिक, नैतिक व शारीरिक शिक्षण देण्याची आवश्यकता भासूं लागली आहे. तथापि अशा उसन्या चळवळीनें गृहशिक्षणाच्या अभावीं जें नुकसान होत आहे तें कधींहि भरून निघावयाचें नाहीं. लहानपणीं आईबापांनींच मुलांच्या शिक्षणाची काळजी घेतली तरच त्यांना योग्य वळण लागेल. सरदार बाळासाहेब व वाराणशीबाई यांना गृहशिक्षणाचें महत्त्व पूर्णपणें माहीत असल्यामुळेंच त्यांनीं गंगुताईविषयीं योग्य काळजी घेतली होती.

## विवाहयोग.

श्रीमंत सरकार बाबासाहेब सचीव यांना १५ वें वर्ष लागलें, तेव्हां त्यांचे वडील शंकरराव यांनीं श्रीमंत बाबासाहेब यांचें लग्न करण्याचा विचार ठरविला. व वधूशोधनास सुरुवात केली. विंचूरकर घराण्याचा व सचीव घराण्याचा संबंध अगोदरच झाला होता. तोच संबंध वाढवावा या हेतूनें सरदार बाळासाहेब यांनीं गंगूताईस श्रीमंत बाबासाहेब यांना देण्याचा आपला मनोदय शंकरराव यांना कळविला. मातुल कन्येशीं विवाह शास्त्रसंमत असल्यामुळें शंकरराव यांना तें म्हणणें पटून त्यांनीं आपली संमति दिली व गंगूताईबरोबर श्रीमंत बाबासाहेब यांचा विवाह करण्याचें निश्चित केलें. हा विवाहसमारंभ भोर येथें सन १८९३ जून

महिन्यांत मोठ्या थाटानें झाला. गंगूताईसाहेब ह्या इतके दिवस श्रीमंत बाबासाहेब यांच्या मामेबहीण होत्या, त्या आतां त्यांच्या पत्नी झाल्या. या वेळीं गंगूताई यांचें वय अवघें ७ वर्षांचें होतें.

लग्न झाल्यानंतर गंगूताई कांहीं दिवस सासरीं व कांहीं दिवस माहेरीं राहात असत. श्रीमंत बाबासाहेब यांच्या परमपूज्य मातोश्री कै० सौ० जिजीसाहेब यांचें गंगूताईशीं सासूपेक्षां आतेचेंच नातें जास्ती होतें. यामुळें गंगुताईस सासर म्हणजे माहेराप्रमाणेंच वाटत होतें. जिजीसाहेब ह्या एक आदर्शभूत स्त्री होऊन गेल्या. त्यांचें उदाहरण गंगूताईंचे डोळ्यासमोर असल्यामुळें त्या आपल्या प्रिय सासूचाच कित्ता गिरवूं लागल्या व धर्माकडे त्यांची जास्तजास्त प्रवृत्ति होऊं लागली. श्रीमंत बाबासाहेब यांचेंही आपले पत्नीविषयींचें प्रेम दिवसानुदिवस वृद्धिंगत होऊं लागलें.

## दिनचर्या.

गंगूताईसाहेब नित्यानियमानें भोरेश्वरास जात असत व रोज देवतार्चनांत त्यांचा तास दीड तास जात असे. स्वभावत:च त्यांचें सौंदर्य अलौकिक होतें. त्यांतच धार्मिक बुद्धीचें व पातिव्रत्याचें तेज त्यांचे चेहऱ्यावर विलसत असे. त्यांचें शरीर भव्य असून मुद्रा नेहमीं आनंदी व शांत दिसत असे. त्यांचेकडे पहाणाराचे मनांत त्यांचे विषयीं आदर व पूज्यबुद्धि उत्पन्न झाल्यावांचून राहात नसे.

## संततीयोग.

गंगूताईंना सन १८९९ सालीं कन्यारत्न झालें व त्या कन्येचें नांव काशीताईसाहेब असें ठेविलें होतें. पुढें सन १९०२ सालीं दुसरें कन्यारत्न झालें. त्यांचें नांव भागीरथीबाई असें होतें. पुढें सन १९०४ सालीं त्यांना पुत्ररत्न झालें. त्यांचें नांव **सदाशिवराव** उर्फ भाऊसाहेब असें ठेवण्यांत आलें. हेच हल्लींचे युवराज आहेत. ह्यांच्या जन्मामुळें उभय घराण्यास जो आनंद झाला तो वर्णन करून सांगतां येणें शक्य नाहीं.

## शेवट.

सन १९०७ सालीं गंगूताई साहेब गरोदर असून त्यांची प्रकृति बरोबर नसल्यामुळें श्रीमंत बाबासाहेब त्यांना घेऊन मुंबईस गेले. तेथें त्या प्रसूत होऊन मुलगी झाली. ती मुलगी दुसरे दिवशींच गेली. गंगूताई साहेब आजारीच होत्या,

तोच आजार वाढत जाऊन बाळांत झाल्यापासून १८ दिवसांनींच वात होऊन ता. २८ नोव्हेंबर १९०७ इ. रोजीं त्या कैलासवासी झाल्या. प्रयाणसमयीं त्यांचें वय अवघें २१ वर्षांचें होतें. त्यांचे निधनामुळें श्रीमंत बाबासाहेब यांना किती दुःख झालें तें सांगतां येणें कठीण आहे. श्रीमंत बाबासाहेब व गंगूताई-साहेब यांचें परस्परांवरील प्रेम अवर्णनीय होतें. दोघेही आनंदांत काळ घालवीत असत. परंतु निर्घृणकाळास त्यांचें सुख पाहवलें नाहीं व त्यानें गंगूताईवर अल्प-वयांतच झडप घालून सर्वांना शोकसागरांत ढकलून दिलें. त्यामुळें श्रीमंत बाबा-साहेब यांचे मनास जो जबर धक्का बसला त्याचा परिणाम त्यांचे प्रकृती-वर झाल्यावांचून राहिला नाहीं. श्री. बाबासाहेब यांचें श्री. सौ. गंगूताईवर इतकें प्रेम होतें कीं, त्यांचा पाहिल्याप्रथम पुन्हाः लग्न न करण्याचा निश्चय होता. परंतु पुढें आईबापांनीं आग्रह केल्यामुळें त्यांनीं दुसऱ्या लग्नास संमति दिली.

## उपसंहार.

गंगूताईसाहेबांचा स्वभाव अत्यंत शांत होता. राग कसा असतो हें त्यांना मुळींच माहीत नव्हतें. त्यांचें वय जरी लहान होतें तरी त्यांचे ठिकाणीं उच्छृंखलपणाचा पूर्ण अभाव असून त्यांचे विचार फार उदात्त व वर्तन पोक्तपणाचें असे. हाताखाल-च्या नोकरांना त्या मातेप्रमाणें वाटत. श्रीमंत बाबासाहेब यांचेवर त्यांचें बरेंच वजन असे व यास त्यांचे अंगचे गुणच कारणीभूत होते. धर्मावर त्यांची अढळ श्रद्धा होती व त्यामुळें त्यांची वृत्ति सात्त्विक बनली होती. त्यांनीं आपल्या अंगच्या सौजन्यामुळें सर्वांचीं मनें आपलेकडे आकर्षून घेतलीं होतीं.

गंगूताईसाहेब यांना वाचनाचा फार नाद असे. त्या नेहमीं गीता वाचीत असत. कधीं कधीं आपल्या पतीजवळ बसून वाचकाचें काम करीत. वर्तमान-पत्रें व मासिकें तासचे तास वाचून दाखवीत. खाजगी रीतीनें त्यांनीं इंग्रजी-चेंहि साधारण ज्ञान संपादन केलें होतें. पुराण-वाचनांत व श्रवणांतही त्यांचा बराच काळ जाई. त्यांना स्वयंपाक चांगला करतां येत असून नाना तऱ्हेचे पदार्थ करण्यांत त्या फारच कुशल होत्या. स्वतः स्वयंपाक करून पतीला वाढण्यांत त्यांना फार भूषण वाटे व त्याप्रमाणें फराळाचे वगैरे स्वतः करून आपल्या प्रिय पतीस देत असंत.

डामडौल करण्याचा त्यांना फार तिटकारा असे. साधेपणा हा त्यांचा विशेष गुण होता. वरचेवर हाताखालचे नोकरांना बक्षिसें देऊन त्यांना त्या संतोषवीत असत.

त्यांचे अंगीं अनेक गुण होते; परंतु त्यांचा पूर्ण विकास होऊन त्याचें फळ मिळणें प्रजेचे दैवीं नव्हतें.

भोरचे प्रजाजनांस त्यांचें नेहमीं स्मरण राहावें म्हणून भोरशहरवासियांनीं सार्वजनिक वाचनालय स्थापन करून त्या संस्थेस **कै. श्री. सौ. गंगूताईसाहेब पंतसचीव वाचनालय** हें नांव देण्याचें ठरवून त्याप्रमाणें परवानगी मिळण्याबद्दल श्रीमंत बाबासाहेब यांना विनंति करण्यांत आली. श्रीमंत बाबासाहेब यांचे मनांतहि आपल्या प्रिय पत्नीचें कांहीं तरी स्मारक असावें असें होतें. वरील कल्पना त्यांना पसंत पडून त्यांनीं तावडतोब संमति दिली व संस्थेस मदत म्हणून सुमारें २००० रुपये किमतीचीं पुस्तकें, कांहीं कपाटें व वार्षिक १०० रुपये देण्याचें कबूल केलें. याप्रमाणें सिद्धता झाल्यावर संस्था स्थापन होऊन तिचा उद्घाटन समारंभ श्रीमंत बाबासाहेब यांचे हस्तें सन १९१८ इ. सालीं झाला. त्यावेळीं वाड्यानजीकचे बागेंतील बंगल्यांत सभा भरली होती. तेव्हां श्रीमंत बाबासाहेब यांनीं भाषण केलें. भाषणसमयीं आपल्या प्रियपत्नीचा उल्लेख करतांना त्यांचा कंठ सद्गदीत होऊन भरून आला. ते म्हणाले–आमचा संबंध कसा होता हें थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे " गृहिणी सचिवो मिथः सखा " या कविवचनाप्रमाणें होता. पुढें त्यांच्यानें कांहींच बोलवेना. ठरल्याप्रमाणें त्यांनीं पुस्तकें व कपाटें देऊन दरसाल १०० रुपये देत असतात. त्यांच्या राज्यारोहणानंतर यांनीं वाचनालयाच्या इमारतीकरितां पांच हजार रुपयांची मदत म्हणून देणगी दिली आहे. हल्लीं ही संस्था श्रीमंताचे आश्रयाखालीं चांगल्या रीतीनें चालली आहे. इमारत लवकरच बांधण्यांत येणार आहे. गंगूताई साहेबांना विद्येची अभिरुचि होती. त्यांस अनुसरून त्यांचे नांवचें वाचनालय सुरू झालें हें योग्य स्मारक झालें आहे.



# अनुक्रमणिका.

--✥--

## प्रथम-खंड

### भाग १ ला. रामायणाची योग्यता. पृ० १-४८.



### भाग २ रा. रामायणकालीन लोकस्थिति. पृ० ४९-१५५.



### भाग ३ रा. रामायणांतील राक्षस पृ० १५६-१९९

**भाग ४ था. रामायणांतील वानर. पृ. २००–२३८.**



**भाग ५ वा. दंतकथा आणि रामायण–पृ० २३९–२६३**



**भाग ६ वा. संदिग्ध परामर्श. पृ० २६४–२८८.**



**भाग ७ वा. रामायणांतील प्रक्षिप्त भाग २८९–३७०**

# ग्रंथकर्त्याचें आत्मनिवेदन.



सुमारें तेतीस वर्षांपूर्वीची गोष्ट; मी लहानपणीं सहासात वर्षांचा असतां आजीबाईबरोबर देवालयांत पुराण ऐकावयाला जात असें. या वेळीं रामायणाची गोड कथा प्रथम मला ऐकावयास मिळाली. गोष्टी ऐकण्याकडे मुलांची स्वाभाविक प्रवृत्ति असते व तिला अनुसरूनच त्या वेळीं मीं रामायणांतील कथा ऐकावयास गेलों. सर्व रामायण त्या वेळीं माझ्या कानांवरून गेलें असें मला आतां आठवत नाहीं; तथापि त्या चरित्राची गोडी त्या वेळीं माझ्या मनाला वाटली, इतकें आज मला निश्चयानें सांगतां येतें. पुढें रामचरित्रांतल्या मधीलमधील कथा मीं कधीं कोणाचे तोंडून ऐकल्या तर कधीं मराठी प्राचीन कवींच्या काव्यांतून वाचल्या, तथापि समग्र चरित्र ऐकण्याचा अथवा वाचण्याचा योग बरेच दिवसपर्यंत आला नाहीं. शाळेंत जाऊन विद्यार्जन करण्याचा योग मला माझ्या दुर्दैवानें फार दिवस लाभला नाहीं. घरगुती अडचणींमुळें वयाचे पंधरावे वर्षींच मला शाळा सोडून पोटाचा व्यवसाय पत्करावा लागला. त्यांतल्या त्यांत सुदैव इतकें कीं, प्रपंचाचा भार मजवर नसल्यामुळें शाळेंत असतांना ज्याप्रमाणें नित्याचा अभ्यास आटोपल्यावर मीं आपला ग्रंथवाचनाचा आवडता व्यवसाय चालू ठेवीत असें, त्याप्रमाणें यापुढेंहि मला नित्याचें काम आटोपल्यावर तो "पुढें चालू" करितां आला. शाळा सोडल्यावर सुमारें एकदोन वर्षांनीं मीं वाल्मीकिरामायण सर्व वाचून पाहिलें. या वेळीं अर्थात् मीं मूळ ग्रंथ न वाचतां कै. लेलेशास्त्री यांनीं केलेलें भाषांतर वाचलें. याच सुमारास रा. ब. चिंतामणराव वैद्य यांच्या "Riddle of the रामायण" या ग्रंथाची प्रत माझे हातीं आली व ती मीं अवकाशानुसार वाचीत असें. रामायण वाचीत असतां रा. ब. वैद्य यांच्या ग्रंथांतील प्रतिपादन पडताळून पाहाण्याची बुद्धि मला साहजिक होत असे. यामुळें रामायण वाचावयाचें तें कथा म्हणून न वाचतां त्यांतील उल्लेख सूक्ष्मदृष्टीनें पाहाण्याकडे माझ्या

अ

मनाची प्रवृत्ति झाली. रामचरित्रांतील पुष्कळ कथा मला ऐकून माहीत होत्या. या दंतकथा व रामायणांतील मूळकथा यांतील भेद प्रथम माझ्या लक्षांत येऊं लागले व या दृष्टीनें त्या त्या स्थळीं आणि इतर कांहीं महत्त्वाच्या स्थळीं रामायण वाचीत असतां मी खुणा करून ठेवीत असें. रामायणाचें हें वाचन मी रात्रीं विश्रांतीचे वेळीं पण नियमानें करीत असें. फावल्या वेळांत काम करण्याच्या या पद्धतीमुळें हें वाचन फार थोडें होत असे. अशा रीतीनें माझ्या वाचनाला दीर्घकाल लागला तरी चिकित्सापूर्वक वाचनाकडे असलेल्या प्रवृत्तीमुळें रामायणाचें वाचन समाप्त झालें. त्या वेळीं रामायणाविषयीं आपण कांहीं तरी लिहावें असें मनांत येऊं लागलें व हाच प्रस्तुत ग्रंथाचा पाया होय.

रामायणाविषयीं परीक्षणात्मक लेख लिहिण्याची कल्पना अंतःकरणांत उद्भवली तरी तसा लेख स्वतंत्रपणें आपणास लिहितां येईल असा मला भरंवसा वाटत नव्हता व यासाठीं रा. ब. वैद्य यांच्या इंग्रजी ग्रंथाचें मराठींत रूपांतर करावें आणि शंका, मतभेद अथवा पोषक प्रमाणें आपणाला आढळल्या असतील तीं त्या त्या स्थलीं नमूद करावीं असा मनाशीं विचार करून मीं त्या दिशेनें प्रयत्न करूं लागलों. शके १८२९ च्या आषाढमासीं भाषांतराचें काम मीं हातीं घेतलें व कित्येक टांचणें लिहूनहि काढलीं. हीं टांचणें लिहूं लागल्यावर, आपण निरनिराळ्या स्थलीं द्यावयाच्या टीपांविषयीं मी विचार करीत असतां, मला माझ्या या टीपांमुळें ग्रंथाला शोभा न येतां ग्रंथ बोजड होईल असें आढळून आलें आणि शेवटीं तो विचार मीं तेव्हांच रहित केला. या वेळीं भाषांतराकरितां म्हणून केलेलीं टांचणें मजपाशीं अद्यापि पडून आहेत.

भाषांतराचा विचार रहित केला त्याच वेळीं स्वतंत्रपणें लेख लिहिण्याची कल्पना माझ्या मनांत आली, हें सांगावयास नको; तथापि लागलींच लेखनाला प्रारंभ मीं केला असें मात्र नव्हे. रामायण वाचीत असतां जीं महत्त्वाचीं स्थलें मला आढळलीं होतीं व ज्यांवर खुणा करून ठेवीत असल्याचें मीं प्रारंभीं सांगितलें आहे त्यांचें मूळ ग्रंथावरून टांचण करण्याला मीं प्रारंभ केला. हें टांचण शके १८२९ च्या कार्तिकमासीं मीं लिहूं लागलों. हें काम पुरें झाल्यावर पुढील कामाविषयीं विचार करूं

लागलों. वाल्मिकिरामायणांत प्रक्षिप्त भाग बराच आहे असें मला तोंपर्यंत केलेल्या प्रयत्नावरून कळून चुकलें होतें. तेव्हां रामायणांतील कोणत्याहि उल्लेखावरून अनुमान करावयाचें तर त्या उल्लेखाची खरी पात्रता किती आहे हें प्रथम पाहिलें पाहिजे व ती पहावयाची म्हणजे प्रक्षिप्त भागाची निवड करून मूळ ग्रंथ कोणता हें ठरविलें पाहिजे, असा विचार मनांत आला आणि हें काम मीं प्रथम हातीं घेतलें. रामायणांतील एकाद्या उल्लेखावरून मीं एकादें अनुमान केलें आणि जर तो उल्लेख वाल्मीकींच्या मूळ ग्रंथांतील नसून प्रक्षिप्त भागांतील आहे असें मागाहून मला आढळून आलें तर पूर्वीचें माझें अनुमान व्यर्थ व्हावयाचें, अशी सकारण भीति मला वाटूं लागली व ती त्या दृष्टीनें माझा प्रयत्न होण्यास कारण झाली. अर्थात् " रामायणांतील प्रक्षिप्त भाग " लिहिण्याला मीं प्रारंभ केला व हाच प्रस्तुत ग्रंथाचा खरा प्रारंभ होय. हा भाग प्रथम-खंडाचा सातवा भाग म्हणून छापिलेला असून त्यांतील उपक्रम चैत्र शुद्ध गुरुवार शके १८३९ या दिवशीं लिहिला आहे. मागील भाग यानंतर लिहिण्यांत आले असून त्यांचा क्रम सांगण्यांत तादृश महत्त्व नाहीं, यासाठीं ते येथें सांगत नाहीं. लेखनाचें काम मीं नियमितपणें पण फावल्या वेळीं करीत असें, हें सांगण्याची आवश्यकता आहे असें नाहीं. मात्र अशी वेळ प्रत्यहीं मिळत असे, असें नाहीं; व यामुळें एकाच पृष्ठावर एकत्र छापिलेल्या दोन वाक्यांमध्यें कोठें एका दिवसाचें तर कोठें महिना पंधरा दिवसांचेंहि अंतर पडलेलें आहे, हें मीं येथें प्रांजलपणें सांगून ठेवितों. ग्रंथाची कच्ची प्रत मजपाशीं अद्यापि जपून ठेविलेली आहे व तींत लेखनाचें काम आटोपल्यावर त्या त्या दिवशींची मिति समासांत लिहिलेली आहे, तीवरून वरील सर्व माहिती मला देतां आली, हें उघड आहे.

कच्ची प्रत लिहून पुरी झाल्यावर तीवरून पक्की प्रत मीं लिहून काढिली व हें कामहि वरील पद्धतीनेंच मीं केलें. यानंतर ग्रंथ विद्वान् मंडळींना कसा काय आवडतो हें पहावें व त्यांचें अनुकूल मत पडेल तर प्रकाशनाच्या कामास लागावें असा विचार करून ही हस्तलिखित प्रत मीं मुंबई येथें माझ्या-

स्नेह्यांकडे पाठविली. हस्तलिखित प्रत वाचण्याचें काम खरोखर कंटाळवाणें असतें, यामुळें छापून झाल्यावर अभिप्राय देऊं असें कोणी कोणी सांगूं लागले; पण विद्वज्जनांचें अनुकूल मत मिळाल्यावांचून पुढील उद्योग करावयाचा नाहीं असा माझा निश्चय होता. प्रकाशनाचें कार्यहि स्वतांला करितां येणें शक्य नव्हतें. अर्थात् त्यासाठीं कोणी तरी प्रकाशक पहावयाचा, तर तोहि विद्वज्जनांच्या अभिप्रायांवर विसंबून राहणार. तेव्हां या दृष्टीनेंहि अशा अभिप्रायांची मला आवश्यकता वाटत होती. हस्तलिखित प्रत वाचून तीवर प्रथमच रा. ब. चिंतामणराव वैद्य यांनीं अनुकूल अभिप्राय दिला. हा अभिप्राय त्यांनीं ता. १२ जुलै सन १९१० या दिवशीं दिला. यानंतर ती प्रत कै. रा. दत्तात्रेय गोपाळ लिमये—केसरीचे सहसंपादक, श्री. रा. रा. गणेश श्रीकृष्ण ऊर्फ दादासाहेब खापर्डे, प्रो. चिंतामण गंगाधर भानू यांनीं क्रमानें वाचून पाहिली व आपापले अनुकूल अभिप्राय दिले. आणखीहि कित्येक विद्वान् गृहस्थांनीं प्रत वाचून पाहिली व अभिप्राय दिले; तथापि ते "पोंचवजा" अभिप्राय असल्यामुळें मीं येथें त्यांचा निर्देश केला नाहीं आणि गणना करूं लागल्यास ते हाताच्या बोटांइतकेहि होणार नाहींत.

रा. ब. नानासाहेब वैद्यांचा अनुकूल अभिप्राय मिळाला, तेव्हांपासून ग्रंथ प्रकाशनाला पात्र असल्याचें मला वाटून त्या दिशेनें मीं प्रयत्न करूं लागलों. बोलूनचालून हा चर्चात्मक निबंध; अर्थात् सामान्य जनतेंत त्याचा प्रसार होण्यासारखा नसल्यामुळें कोणी प्रकाशक हें काम हातीं घेण्यास धजेना. कादंबऱ्या किंवा नाटकें यांना जनतेकडून मागणी असल्यामुळें त्यांचा जसा खप होतो तसा शास्त्रीय ग्रंथांचा होत नाहीं; व यामुळें त्यांनीं तसें करणें साहजिक आहे. शेवटीं एका प्रकाशकाशीं माझी गांठ पडली; म्हणजे त्यांच्याशीं माझा पत्रव्यवहार चालू झाला. कारण मला आपल्या पोटाच्या व्यवसायामुळें बाहेरगांवीं जातां येत नव्हतें व अजूनहि येत नाहीं. अर्थात् हा व्यवहार त्यांनीं कांहीं ग्रंथ प्रकाशित केले असल्याचें कळल्यावरून मीं केला. त्यांनीं प्रकाशनाचें आश्वासन देऊन प्रत आपल्याशीं ठेवून घेतली. त्यांचें आश्वासन मोघम असून त्याला कालाची मर्यादा नव्हती. चालू काम आटोपल्यावर हा

ग्रंथ प्रकाशित करूं असें त्यांनीं कळविलें होतें व त्यावर मीं स्वस्थ राहिलों. त्यांचें " चालू काम " आटोपण्यासाठीं जवळजवळ संबंध एक वर्ष मीं वाट पाहिली व अजूनहि त्यांचें काम आटोपत नाहीं असें पाहून मला शंका आली व बाहेरून मीं शोध केला. तेव्हां मला कळून आलें कीं, ग्रंथाची प्रत त्या गृहस्थांपाशीं नसून त्यांचे देण्यांत छापखानेवाल्याकडे अडकून पडली आहे. या छापखानेवाल्यांचें नांव कळल्यावरून मीं त्यांजकडे पत्र पाठवून विचारिलें. अशा रीतीनें परभारें त्यांच्याशीं व्यवहार करणें हा खुळेपणा होता, हें मला कळत नव्हतें असें नाहीं; पण मनुष्याची आशा अमर असते असें म्हणतात, त्यास अनुसरून मीं हा यत्न केला. शेवटीं त्यांजकडून उत्तर यावयाचें तसें आलें व मग मात्र मीं त्या प्रतीची आशा सोडून दिली. कच्ची प्रत मजपाशीं होती, तीवरून दुसरी प्रत पुनः लिहून काढिली. दुसरी प्रत लिहावयासहि दीर्घ काल लागला, हें उघड आहे. ही प्रत लिहून पुरी झाल्यावर मग पहिली प्रत ऋणमुक्त होत्साती मजकडे परत आली. मला या कामीं श्रम पडले हें खरें; तथापि यामुळें जगांतील वागणुकीचा मला एक धडा मिळाला व त्याबरोबर एका गृहस्थाला ऋणमुक्त करण्याचें—पण मला वाटतें यापेक्षां छापखानेवाल्या गृहस्थांचे पैसे वसूल करून देण्याचें असें म्हणणें अधिक सरळ होईल—श्रेय मला मिळालें हें मीं दुर्दैवांतहि सुदैव समजतों.

मधील काळांत—शके १८३३ या वर्षीं—कै. जनार्दन विनायक ऊर्फ नानासाहेब ओक यांशीं परिचय होऊन " गीर्वाणलघुकोशाचे "—कामानिमित्त तो दृढ होत गेला. ग्रंथाची एक हस्तलिखित प्रत त्यांजकडे देऊन ठेविली होती. प्रकाशनाचें कार्य कोणी प्रकाशक मिळेल तर करावयाचें आहे असें मीं माझ्या कित्येक स्नेही मंडळींना सांगून ठेविलें होतें; तथापि त्या कामीं यानंतर याहून अधिक प्रयत्न मीं केला नाहीं व तसा करण्याइतकी मनाला स्वस्थताहि त्या कालांत मला लाभली नाहीं. यानंतर कै० ओक यांनीं " लोकशिक्षण " हें मासिक चालू केलें; तेव्हां त्यांना आपल्या मासिकांतून ग्रंथ प्रसिद्ध करण्याविषयीं मीं विनंति केली. कै. ओक यांनीं माझ्या विनंतीला संमति दिली व शके १८३९ च्या विजयादशमीच्या अंकापासून ग्रंथ क्रमशः प्रसिद्ध

होऊं लागला. येथें हें सांगितलें पाहिजे कीं, तो महायुद्धाचा काळ असल्यामुळें छपाईचें काम सर्व प्रकारें कठीण होऊन " लोकशिक्षणा " चे अंक दोन महिन्यांनीं एकदां निघूं लागले होते. अर्थात् त्या वेळीं वर्षाचे सहा अंक निघत असत. अशा अडचणीमुळें छपाईचें काम करतांना कित्येक स्थलीं अवतरणांचे केवळ अर्थ देऊन, कित्येक स्थलीं अवतरणांचा निर्देश करून व कित्येक सामान्य स्थलीं थोडी छाटाछाट करून कै. ओक यांना काटकसर साधावी लागली. ग्रंथ अर्धाअधिक प्रकाशित झाला नाहीं तोच कै. ओक हे अकालीं मृत्युमुखीं पडले. यानंतर " लोकशिक्षणा " चे त्या वर्षाचे राहिलेले अंक निघून त्यांतून ग्रंथाचा राहिलेला भाग येऊं लागला; पण पुढें हें मासिक शेवटचा भाग प्रकाशित होण्यापूर्वीं बंद पडून तेथेंच सर्व ग्रंथ आटोपला !

सध्यां प्रसिद्ध होत असलेला ग्रंथच त्या वेळीं " लोकशिक्षणां " तून क्रमशः प्रसिद्ध झाला होता असें नव्हे, हें येथें सांगणें अवश्य आहे. प्रारंभीं या ग्रंथाचे सात भाग होते; प्रस्तुत ग्रंथाचे भाग अकरा आहेत. पूर्वीं " रामायणांतील राक्षस व वानर " हा एकच भाग होता, त्याचे स्वतंत्र दोन भाग केल्यामुळें एक भाग वाढला व शेवटचे तीन भाग नवीन लिहिले; मिळून अकरा भाग झाले आहेत. शेवटचे तीन भाग नवीन लिहिलेले म्हणून येथें सांगितलें असलें तरी इतर सर्व भागांत नवीन भर पडून पूर्वीचा भाग कोणता व नवीन कोणता हें सांगूं गेलें तर तोच एक स्वतंत्र भाग होऊं लागेल. यासाठीं त्या भानगडींत मी पडत नाहीं. तथापि " लोकशिक्षणां "तून प्रसिद्ध झालेला बहुतेक भाग प्रथम खंडांत आला असून द्वितीय खंडांतील बहुतेक भाग नवीन आहे असा विवेक सामान्यतः करण्यास अडचण नाहीं, हें मी येथें सांगून ठेवितों.

पूर्वीं लिहिलेले सर्व सात भाग " लोकशिक्षणां " तून प्रसिद्ध होऊं शकले नाहींत, हें मीं वर सांगितलेंच आहे. सातवा भाग व एक परिशिष्ट अशीं अप्रकाशित म्हणून मजपाशीं पडून होतीं व त्यानंतर बरेच दिवसपर्यंत या संबंधानें मीं प्रयत्न केलाहि नाहीं. राहिलेला भाग स्वतंत्र लेख म्हणून कोठें तरी प्रसिद्ध करावा असें एकदां मला सहाजिक वाटलें व माझ्या कल्पनेला

"विविधज्ञानविस्तार" चे संपादकांची संमति मिळून तो सन १९२५ मधील मार्च व जून या दोन अंकांत प्रसिद्ध झाला.

स्वतंत्र पुस्तकरूपानें वरील सर्व भाग प्रकाशित करण्याच्या कल्पनेनें यानंतर पुनः उचल खाल्ली व कोणी एका गृहस्थानें सुचविल्यावरून पुण्यांतील रा. रा. गणेश विष्णु चिपळूणकर आणि मंडळीचे मालक रा. रा. बाळकृष्ण पांडुरंग ठकार यांजकडे पृच्छा केली. त्यांना मार्गशीर्ष शु. ६ शके १८४७ या दिवशीं मीं प्रथम पत्र पाठविलें व त्यांजकडून संमति मिळून पुढील उद्योग चालू झाला. पुढील उद्योग म्हणजे प्रस्तुत ग्रंथाची पहिली आवृत्ति होय. पूर्वीचा ग्रंथ अपूर्ण होता—म्हणजे प्रस्तुत ग्रंथ सर्वांगपूर्ण झाला आहे असें मीं समजतों, असें मात्र नव्हे; तर त्यांत कित्येक आवश्यक बाबींविषयीं चर्चा केलेली नव्हती, यासाठीं तो अपूर्ण होता-आणि या दृष्टीनें तो पूर्ण करण्याचें काम मीं यानंतर हातीं घेतलें. हें काम मला केव्हां तरी करावयाचें होतें, तथापि तें याच वेळीं केलें असतें असें नाहीं. रा. रा. ठकार यांनीं प्रकाशनाचें आश्वासन देऊन हें काम आधीं करण्याविषयीं आग्रहानें सांगितलें; आणि प्रकाशनाचें काम अगत्य हातीं घेण्यास त्यांना तितका अवकाश होता. रामायण हा ग्रंथ महाभारताच्या मानानें फार लहान व यासाठीं त्यांतील अवशिष्ट बाबींविषयीं आणखी विवेचन केलें तरी तें शंभर पृष्ठांहून अधिक होणार नाहीं, असें माझें अनुमान होतें व तसें मीं त्यांना कळविलेंहि होतें; पण साधनांची सामग्री मिळत गेली तसें काम वाढत गेलें. कोणतीं साधनें केव्हां मिळतील याचा नियम नसतो व यामुळें कामाविषयींचा तर्क आधीं कांहीं करितां येत नाहीं. आठव्या भागांतील "कालपरामर्श—" विषयींचें कांहीं विवेचन गेल्या आश्विन मासीं मीं त्यांजकडे पाठविलें व एक परिशिष्ट तर चालू महिन्याचे प्रारंभीं त्यांजकडे गेलें. यावरून साधनांच्या या अनिश्चिततेविषयीं वाचकांस कल्पना येईल. रा. ठकार यांनीं मुदतीची अथवा ग्रंथाचे मर्यादेविषयींची अट कडकपणें न पाळतां मला सौजन्यानें वागविलें व यामुळें मला हें करितां आलें, हें उघड आहे. दोनहि मर्यादा सांभाळावयाच्या हेतूनें ग्रंथाची प्रत पुरी करून मीं त्यांजकडे मुद्रणार्थ पाठविली व साधनांची जी

जुळवाजुळव तोंपर्यंत झाली होती तीवरून लेखनाची मर्यादा वाढवावी लागेल, असें त्यांना कळविलें. या वेळीं त्यांनीं पुढील काम करून ग्रंथ लवकर पुरा करून पाठविण्यास सांगितलें व मग पुढील उद्योगास मीं प्रारंभ केला. नवीन भाग लिहिण्याचें सर्व काम पूर्वींप्रमाणेंच मला आपला व्यवसाय आटोपल्यावर विश्रांतीच्या वेळीं करावयाचें असे, हें उघड आहे. तथापि पूर्वींप्रमाणें पक्की प्रतहि स्वतां लिहिण्याइतकी सवड मला सध्यां नव्हती. कच्ची प्रत जशी-जशी लिहून होत असे तशी तशी तिच्यावरून पक्की प्रत लिहून काढण्याचें काम रा. सदाशिव लक्ष्मण व नीलकंठ लक्ष्मण प्रभु देसाई या दोघां तरुण विद्यार्थ्यांनीं आपल्या अंगावर घेऊन त्याप्रमाणें पुरें करून दिलें. माझा वक्तशी-रपणा, त्यांनीं साहाय्य केल्यामुळें मला साधितां आला, हें उघड आहे.

दुसरें महत्त्वाचें साहाय्य म्हटलें म्हणजे रा. सा. नारायण गोविंद ऊर्फ नानासाहेब चांपेकर यांचें होय. ते आमचे गांवीं न्यायाधीशाचें काम करीत असतां त्यांच्याशीं माझा परिचय होता असें नाहीं; तथापि ओळख होती असें म्हणतां येईल. “ तुर्यं तु दर्शनम् ” अथवा “ गीतारहस्यनिर्णय ” या पुस्तकाची हस्तलिखित प्रत त्यांजकडे मीं पाठविली, त्या वेळीं त्यांनीं आपला अनुकूल अभिप्राय देऊन ती प्रकाशनास योग्य असल्याचें कळविलें; व तेव्हां-पासून त्यांच्याशीं परिचय दृढ झाला. या वेळीं प्रस्तुतचें काम हातीं घेतल्याचें मीं त्यांना कळविलें. तेव्हां त्यांनीं उत्तेजन देऊन साहाय्य करण्याचें अभिवचन दिलें. “ रामायणांतील स्थलनिर्णय ” या भागांतील पंचवटी, किष्किंधा व लंका या वादग्रस्त स्थलांविषयींचें, तसेंच रामायणकालाविषयींचें विवेचन त्यांनीं वाचून पाहून कित्येक सूचना केल्या व कांहीं माहिती कळविली. त्याचा मला फार उपयोग झाला.

केसरीचे सहसंपादक रा. रा. जनार्दन सखाराम ऊर्फ तात्यासाहेब करंदी-कर यांनींहि कांहीं ग्रंथांची माहिती कळवून ग्रंथांतील महत्त्वाचे भाग हस्तलि-खित प्रतीवरून वाचून पाहिले. त्यांच्याशीं माझा परिचय कै. ओक-“ लोक-

शिक्षणा " चे संपादक यांच्या द्वारा झालेला, अर्थात् अल्प, तथापि त्यांनीं हें काम आपलेपणानें केलें, हें विशेष होय. शिवाय प्रस्तुत ग्रंथाचा " परिचय " मराठी वाचकांस करून देण्याचें काम प्रकाशकांनीं त्यांजकडे सोंपविलें असून तें त्यांनीं पत्करिलें आहे. त्यांची लेखणी " केसरीच्या " द्वारा आधीं लोकमान्यता पावली असल्यामुळें प्रस्तुत ग्रंथाचा परिचय वाचकांना करून देण्याची कामगिरी त्यांजकडे सोंपविण्याची योजना प्रकाशकांनीं दूरदर्शीपणानें केली आहे यांत शंका नाहीं. अशा रीतीनें ही कामगिरी त्यांनीं प्रकाशकांकरितां म्हणून पत्करिली असली तरी ती मलाच उपकारक होणारी आहे.

श्रीमंत सरदार माधवराव विनायक किबेसाहेब यांचें लंकेच्या स्थानाविषयींचें मत प्रसिद्ध आहे. त्यांच्या मताविषयीं प्रस्तुत ग्रंथांत चर्चा केलेली आहे; पण या कामीं आपले लेख त्यांनीं मला प्रकाशकांचे मार्फत पाठवून दिले व यामुळेंच त्यांच्या मताविषयीं मला चर्चा करितां आली हें उघड आहे. त्यांचें मत कळण्यासाठीं नकाशाची आवश्यकता होती व ही उणीव नकाशा काढून देऊन त्यांनीं दूर केली आहे. सन १९२५ सालीं मद्रास येथें भरलेल्या "ओरिएन्टल कॉन्फरन्स" पुढें त्यांचा जो निबंध वाचण्यांत आला, त्यास अनुसरून हा नकाशा काढिलेला आहे. त्यांच्या प्रथमच्या निबंधांत उल्लेखिलेलीं कित्येक स्थलें त्यांत आलेलीं नाहींत; तथापि मध्यहिंदुस्थानचा नकाशा पाहिला असतां वाचकांस ही माहिती मिळवितां येण्यासारखी आहे. आपले लेख पाठविण्यांत व नकाशा काढून देण्यांत त्यांनीं जें सौजन्य दाखविलें त्याबद्दल त्यांचे आभार मानावे तितके थोडे आहेत. असो.

कोल्हापूर येथील इतिहाससंशोधक रा. रा. गोविंद सखाराम सरदेसाई यांनीं कै. वामन दाजी ओक यांचा काव्यसंग्रहाबरोबर परिशिष्टरूपानें आलेला पंचवटीविषयींचा लेख मजकडे पाठवून कित्येक दिवस वाटत असलेली उणीव दूर केली. कै. श्री. बापूसाहेब कुरुंदवाडकर यांनीं प्रकाशिलेला " पंचवटीस्थलनिर्णय " मिळण्याकरितां मधील काळांत पत्रद्वारा मीं फार खटपट केली;

पण ती सर्व निष्फल ठरली. या निर्णयांत कै. ओक यांचा लेख श्रीमंतांनीं देऊन त्यावर आपलें उत्तर दिलें होतें. श्रीमंतांचें उत्तर मला वाचावयास मिळालें नाहीं हें उघड आहे; तथापि एक महत्त्वाची बाजू कळली, ही त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट होय.

रामायण हा फार प्राचीन कालचा ग्रंथ; तेव्हां त्यांतील बाबींविषयीं विवेचन करावयाचें म्हणजे कित्येक प्राचीन ग्रंथ, तसेंच त्याविषयीं आधुनिककालीं लिहिलेले कित्येक चर्चात्मक निबंध प्रत्यंतरासाठीं वारंवार पहावे लागतात. प्रस्तुत ग्रंथ लिहिते वेळीं ही उणीव मला पदोपदीं भासत होती. पंचवटीस्थलनिर्णयाविषयींचा माझा खटाटोप मीं वर नमुन्याकरितां सांगितला आहे. स्थलनिर्णयाकरितां आवश्यक असलेले कित्येक ग्रंथ मला पहावयाला मिळाले नाहींत. आणखीहि इतर कित्येक ग्रंथांविषयीं असाच प्रकार झाला आहे. गॉरिशिओनें प्रसिद्ध केलेल्या रामायणाची प्रत पुणें व मुंबई येथील ग्रंथसंग्रहालयांत आहे व ती पाहण्यापुरती मिळावी म्हणून दोनहि स्थलीं मीं स्वतां व स्नेह्यांचे द्वारा खटपट करून पाहिली, पण उपयोग झाला नाहीं. ग्रंथसंग्रहालयांत येऊन ग्रंथ पहावा असें दोनहि स्थलांकडून मला उत्तर मिळालें. ग्रंथावलोकन अल्पकालांत होण्यासारखें नव्हतें आणि काल अल्प असता तरी मला बाहेर गांवीं जाण्यास केव्हांच सवड नसते असें म्हटल्यास चालेल. यामुळें त्यांनीं दाखविलेल्या तेवढयाहि सौजन्याचा लाभ मला घेतां येण्यासारखा नव्हता. कित्येक स्थलें दृष्टीनें पाहण्याची आवश्यकता असतां यामुळेंच मला पाहतां आलीं नाहींत. अर्थात् यामुळें ग्रंथांत न्यूनता असणार हें मला कळत आहे, पण त्याचें कारण काय हें वाचकांस कळावें म्हणून तें मीं येथें उघडपणें सांगितलें आहे.

छपाईचें काम ग्रंथकाराचे देखरेखीखालीं होणें शुद्धीकरणादि कामाच्या दृष्टीनें आवश्यक असतें; आणि यासाठीं खिळे जुळविल्यावर निघणारी कच्ची प्रत मजकडे पाठवावी असें प्रकाशकांना मीं कळविलें होतें व त्यांनीं तें मान्यहि केलें होतें. पण टपालमार्गें प्रत मजकडे येऊन परत जावयाची म्हणजे काम आटो-

पण्यास दीर्घकाल लागणार आणि खिळे अडकून पडणार, अशी अडचण भासूं लागली. तेव्हां रा. ठकार यांनीं शुद्धीकरणाचें काम तेथेंच करून घेण्याची व्यवस्था केली आणि तसें मला कळविलें. त्या वेळीं मीं निरुपाय म्हणून संमति दिली; तथापि पुढें झालेलें काम हातीं आल्यावर माझी भीति निराधार असल्याचा मला प्रत्यय आला. आतां कांहीं स्थळीं दोष अथवा न्यूनता असेल, किंबहुना आहे; तथापि वाचकांनीं रुष्ट होण्यासारखी ती नाहीं हें निर्विवाद आहे.

आतां विशेष सांगावयाचें म्हणजे ग्रंथाचे नांवासंबंधीं होय. ज्याप्रमाणें द्विजकुलोत्पन्न पुरुषाचें नामकरण जातकर्माचे वेळीं आणि उपनयनाचे वेळीं याप्रमाणें दोनदां होत असतें, तसा प्रकार या ग्रंथाचे बाबींत झाला आहे. शके १८३० सालीं ज्या वेळीं मीं या ग्रंथाचे लेखनाला प्रारंभ केला, त्यां वेळीं त्याला मीं "श्रीमद्वाल्मीकिरामायणपरीक्षण" असें नांव दिलें होतें; आणि या ग्रंथांतील जे भाग "लोकशिक्षण" मासिकांत आले ते याच नांवानें प्रसिद्ध झाले आहेत. कित्येक विद्वान् गृहस्थांचे जे अभिप्राय मिळाल्याचें मीं पूर्वीं सांगितलें आहे, त्यांत याच नांवाचा त्यांनीं उल्लेख केला आहे. मध्यंतरीं रा. ब. वैद्य यांच्या "Riddle of the रामायण" या ग्रंथाचें भाषांतर याच नांवानें प्रसिद्ध झालें असून तें वाचकांपुढें आहे. तेव्हां प्रस्तुत ग्रंथ पूर्वींच्या नांवानें प्रसिद्ध केल्यास उपर्युक्त भाषांतर कोणतें व स्वतंत्र ग्रंथ कोणता, याचा विवेक वाचकांना नांवावरून करतां येणार नाहीं असें मनांत आणून प्रस्तुतचें नांव त्याला दिलें आहे. नामकरणाच्या या कथेचें तादृश महत्त्व नाहीं; तथापि "लोकशिक्षणा"च्या वाचकांनीं पूर्वींच्या नांवानें त्यांत प्रसिद्ध झालेले लेख वाचले आहेत, तेव्हां त्यांना नामांतरास्तव द्वैतभाव वाटूं नये म्हणून ती सांगावी लागली आहे.

ग्रंथलेखनाचे कामीं ज्यांचें साहाय्य झालें त्यांचीं नांवें वरील निवेदनांत ओघाबरोबर आलीं आहेत; पण साहाय्य करणाऱ्या सर्व गृहस्थांचीं नांवें त्यांत आलेलीं नाहींत, हें येथें सांगणें अवश्य आहे. इतर अनेक सज्जनांचें मला या कामीं साहाय्य झालें आहे; तथापि कोणी कोणत्या प्रकारचें साहाय्य केलें हें

सविस्तर सांगून आधींच लांबलेलें हें पुराण मी आणखी लांबवीत नाहीं; आणि तें कळून त्याचा उपयोग वाचकांना नाहीं; यासाठीं त्यांचा नामनिर्देश करून मी आटोपतें घेतों. काम दीर्घकालांतील असल्यामुळें कित्येक सज्जनांच्या नांवांचा निर्देश त्यांत चुकीनें राहाण्याचा संभव आहे; तथापि त्याकरितां ते मजवर रुष्ट होणार नाहींत, असा माझा पूर्ण भरंवसा आहे.

वै. वा. पू. पा. दत्तात्रेय वासुदेवशास्त्री निगुडकर (विद्यारत्न); पू. पा. जनार्दन वासुदेवशास्त्री निगुडकर; डॉ. नरहर गोपाळ सरदेसाई; रा. रा. वासुदेव गोविंद आपटे; रा. रा. बाळकृष्ण भाऊ जोशी; रा. रा. नारायण कृष्ण गद्रे; रा. रा. गोविंद नारायण दातारशास्त्री; वे. शा. सं. वामनशास्त्री किंजवडेकर; वे. शा. सं. पांडुरंग सदाशिव आठल्ये; रा. रा. सीताराम महेश्वर रायकर; कै. वा. आत्माराम विनायक रायकर; रा. रा. कृष्णाजी रामचंद्र लेले; ती. रा. रा. रघुनाथ कृष्ण पाटणकर; रा. रा. सदाशिव रंगनाथ सरवटे या आणि पूर्वी सांगितलेल्या सज्जनांनीं मला मनोभावानें साहाय्य केलें व म्हणून मला हें काम हातीं घेतल्यावर पुरें करितां आलें. तेव्हां त्याचें सारें श्रेय त्यांना आहे हें मीं येथें प्रांजलपणें सांगून ठेवितों.

लेखनाचें कार्य कशा प्रकारें केलें, हें मीं पूर्वी सांगितलें आहे. लेखनाच्या या पद्धतीमुळें त्यांत कित्येक दोष अपरिहार्य आहेत हें वाचकांच्या लक्षांत यावें, यासाठीं प्रस्तुतचें निवेदन मीं सविस्तर निरूपिलें आहे. तथापि दोष असतील ते सुधारतां यावे अशी माझी इच्छा आहे व यासाठीं वाचकांनीं त्यांविषयीं आपणांस जें कांहीं सुचवावें असें वाटेल तें प्रकाशकांकडे कळवावें अशी त्यांस विनंति आहे. म्हणजे पुढील आवृत्तीचा योग येईल त्या वेळीं त्याचा विचार करितां येईल. मात्र या दोषांस्तव त्यांनीं मजवर रोष करूं नये, इतकी त्यांना माझी नम्र प्रार्थना आहे.

मुखपृष्ठावर ग्रंथकाराविषयीं माहिती देतांना कांहीं ग्रंथांचा निर्देश केलेला आहे. त्यांतील " तुल्यं तु दर्शनम् " अथवा " गीतारहस्यनिर्णय " हा निबंध यापूर्वी प्रसिद्ध ला आहे व तो स्वतंत्रपणें मिळूं शकेल; पण काव्यें

" विविधज्ञानविस्तारां " तून आलीं असलीं तरी स्वतंत्रपणें अद्यापि प्रकाशि-लेलीं नाहींत व " संस्कृत व्याकरणकारिका " आणि " संक्षिप्त ब्रह्मसूत्र-शांकरभाष्यम् " हे दोन ग्रंथ अद्यापि अप्रकाशित आहेत. हें सर्व लवकर प्रकाशित करावयाचा विचार आहे. तथापि त्याचा निश्चित काल सांगतां येत नाहीं.

तुका म्हणे नाहीं चालत तांतडी । प्राप्तकालघडी आल्यावीण ॥

या अभंगांतील बोधाचा अनुभव अजूनपर्यंत मला पदोपदीं मिळाला आहे. तेव्हां त्यांच्या प्रकाशनाची " प्राप्तकालघडी " कधीं नेमिलेली आहे हें कसें सांगावें ? ग्रंथ प्रकाशित झाल्यावर वाचकांस कळण्यास अवकाश लागणार नाहीं; तरी तोंपर्यंत वाचकांनीं त्यांविषयीं प्रस्तुत ग्रंथाचे प्रकाशक यांजकडे पृच्छा करून पत्रव्यवहार वाढवूं नये इतकी त्यांस सूचना आहे.

झालें. रामायणाचें जें इतका दीर्घकालपर्यंत मीं अध्ययन केलें त्याचें ग्रंथरूपी फळ आज वाचकांपुढें येत आहे व यासाठीं मला एक प्रकारें समाधान वाटत आहे; तर इतका दीर्घकाल चालविलेला हा व्यासंग आतां थांबणार यानिमित्त खेद होत आहे. कारण माझा हा सर्व काल महर्षि वाल्मीकींच्या आश्रमामध्यें त्यांच्या सांनिध्यांत गेला; त्यानिमित्त राजा दशरथानें अयोध्येमध्यें केलेला पुत्रोत्सव मला पाहतां आला; विश्वामित्रांबरोबर मखरक्षणार्थ रामलक्ष्मण गेले असतां यज्ञसमारंभाकरितां आलेल्या निमंत्रित मंडळींत मला बसतां आलें; मिथिलेंत राम धनुष्याची प्रत्यंचा चढवूं लागले असतां त भंग पावून त्यानिमित्त झालेल्या विवाहोत्सवांत मला भाग घेतां आला; यौवराज्याभिषेकाचा विचार निश्चित करण्यासाठीं राजानें जो दरबार भरविला, त्यांत अयोध्येंतील नागरिकांबरोबर मला आसन मिळून राजाचें गंभीर भाषण मला श्रवण करितां आलें, राम वनवासाला निघाले असतां समागमें जाण्याचा मीं निश्चय केला, पण अयोध्येंतील नागरिकांबरोबर, त्यांना राम चुकवून पुढें गेले असतां, मला परतावें लागलें नाहीं; दंडकारण्यांत प्रवेश करून त्यांचेबरोबर सर्व प्रवास पायीं करावा लागूनहि पायांत काटे रुतले नाहींत, शीतोष्णाची बाधा झाली नाहीं; मायामृगाचें

रूप पाहून सीतेप्रमाणें मला मोह आवरेनासा झाला नाहीं; सीतापहाराचे वेळीं माझ्या अंगाचा संताप झाला, पण जटायूप्रमाणें मीं निश्चेष्ट होऊन पडलों नाहीं; सीताशुद्ध्यर्थ राम पुढें चालले असतां पुढील प्रवास त्यांच्याबरोबर पर्वत, नद्या, व अरण्यें यांतून केला. किष्किंधेंत जाऊन तेथून मारुतीचे समागमें लंकेमध्यें माझा प्रवेश होऊन सीतादेवीचें मला दर्शन घडलें. मारुतीबरोबर परत येऊन पुनः वानरांच्या सैन्यासह लंकेपर्यंत मीं येऊन पोंचलों; सेतूवरून लंकेंत गेल्यावर तेथें झालेली युद्धाची धुमश्चक्री मला पाहतां आली; त्यासाठीं मला कोणत्याहि राजाचें संमतिपत्र घ्यावें लागलें नाहीं किंवा कोणत्याहि पक्षानें गुप्त हेर म्हणून मला पकडलें नाहीं; युद्धानंतर सर्व मंडळी पुष्पकविमानांतून अयोध्येला आली, त्यांबरोबर विमानांतून संचार करितां आला; सीतात्यागानंतर कुशलवांनीं रामाचे दरबारांत रामायणाचें गायन केलें, तें श्रवण करण्याचा लाभ घडला. अशा प्रकारें रामराज्यांत राहून रामादिकांच्या समागमें मला जी कालक्रमणा करितां आली तें सुख मला अंतरणार, याचें वाईट वाटत आहे! कन्यादानाचे प्रसंगीं कन्येला चांगला वर मिळून आपण एका कर्तव्यांतून पार पडलों म्हणून पित्याला इकडे आनंद होत असतो, तर तिकडे कन्येचा वियोग घडणार म्हणून खेद होत असतो. तसाच प्रकार माझा झाला आहे. तथापि कन्या पतिगृहीं चांगली नांदत असल्याचें श्रवण केल्यावर पित्याला विरहांतहि जें समाधान वाटत असतें व तिची मधून मधून भेट होऊन जो आनंद होत असतो, तसेंच समाधान व आनंद यांची अपेक्षा मीं यापुढें करावयाची, दुसरें काय?

अंगीं कोणतीहि विद्या नसतां प्रस्तुत ग्रंथ लिहिण्याला मीं प्रारंभ केला, हें त्या वेळीं मीं धाडस केलें व सध्यां तो विद्वज्जनांपुढें ठेवण्याचा मी प्रयत्न करीत आहें हें माझें धाडस आहे, हें मी जाणून आहें. तुकारामांनीं

काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें।
परी त्या विश्वंभरें बोलविलें॥

असें म्हटलें आहे; परंतु त्यांच्या अधिकाराकडे पाहिलें तर तो त्यांचा विनय आहे, हें कोणालाहि कळण्यासारखें आहे. पण माझ्या बाबींत वस्तुस्थिति तशी आहे; तेव्हां या धाडसाला ज्या जगन्नियंत्याचें स्मरण करून मीं प्रवृत्त झालों व ज्यानें त्यानिमित्त त्या कार्याचा अभिमान धरून नानाविध आधिव्याधींतून माझा सांभाळ केला आणि हें कार्य येथपर्यंत आणून पोंचविलें, त्या भगवंताचे चरणीं अनन्यभावानें शतशः प्रणिपात करून हें निरूपण समर्पण करितों व पुढील प्रार्थना करून लेखणी खालीं ठेवितों——

इति विद्यातपोयोनिरयोनिर्विष्णुरीडितः ।
वाग्यज्ञेनार्चितो देवः प्रीयतां मे जनार्दनः ॥
काले वर्षतु पर्जन्यः पृथिवी सस्यशालिनी ।
देशोऽयं क्षोभरहितो ब्राह्मणाः सन्तु निर्भयाः ॥

शुक्रवार, मार्गशीर्ष वद्य १
( रामायणकालची वर्षप्रतिपद् )
शके १८४९.

"महाराष्ट्रिय."



## श्रीरामायणसमालोचना

# ग्रंथपरिचय.

आदिकाव्य हें रामायण । जें न्व्हतें कोणाचें आख्यान ॥
नानापुराणें माहात्म्यकथन । शास्त्रसिद्धांत रामायणीं ॥ १ ॥
नाना सकाम कथा सृष्टीवरी । रामकथेची न पवती सरी ॥
कां जे आत्माराम चराचरीं । तारक ब्रह्म सर्वत्र हें ॥ २ ॥

रामदास समर्थ श्रीगुरु संतसज्जन तोषले ।
युद्धकांड अखंड वाचित राहें म्हणउनि बोलिले ॥ १ ॥

वेद हा जसा सर्व धर्मग्रंथांत आद्य ग्रंथ म्हणून शोभत आहे, तसेंच रामायण हेंहि आदिकाव्य म्हणून जगांत मिरवत आहे. म्हणूनच समर्थसांप्रदायांतले सुप्रसिद्ध रामदासी गिरिधरस्वामी यांनीं शिरोलेखांत दिलेल्या उताऱ्यांत 'नाना सकाम कथा सृष्टीवरी, रामकथेची न पवती सरी' असें म्हटलें आहे, तें यथार्थ आहे. रामकथेची सर आजवर कोणत्याहि काव्यास आली नाहीं व पुढेंहि येणें संभवनीय नाहीं. अशा या रामकथेचें खरें रहस्य श्रीसमर्थांनींच जाणलें आणि तें रहस्य इतरांच्या मनांत बिंबविण्याकरितांच रामकथेचा प्रसार ब्रह्मांडाच्याहि पलीकडे करावा असें समर्थांनीं सांगितलें आहे. असें हें पवित्र रामचरित्र जितक्या विविध प्रकारांनीं गातां येईल तितकें गावें अशी आर्यकवींच्या मनांत अखंड लालसा वागत असल्यामुळें त्यांनीं रामचरित्र परोपरीनें गाइलें आहे. अशा प्रकारें रामकथेचे पद्यावतार आजवर शेंकडोंशें झाले आहेत; तथापि त्या रामकथेची समालोचना गद्यग्रंथांत करण्याचा प्रयत्न 'महाराष्ट्रीय' यांनींच प्रथम एवढ्या मोठ्या प्रमाणांत केला असून तो अत्यंत सरस असा साधला आहे.

### पौराणिक प्रस्थानत्रयी.

पौराणिक ग्रंथांचा महाराष्ट्रीयांना सुगम रीतीनें लाभ करून देण्याचें पुण्यकारक व्रत चिपळूणकर आणि मंडळीनें गेलीं दोन तपें अखंड चालविलें आहे; आणि त्यांत महाभारत आणि श्रीमद्भागवत या दोन अमोलिक ग्रंथांच्या

उपसंहारानें महाराष्ट्रीय वाचकवर्गाला अखंड ऋणी करून ठेविलें आहे. भारत व भागवत यांच्या उपसंहारांनंतर रामायणाचाहि उपसंहारात्मक ग्रंथ चिपळूणकर आणि मंडळीच्या हातून प्रसिद्ध झाला नसता तर त्यांच्या वाङ्मयसेवेंत मोठेंच व्यंग दिसून आलें असतें. कारण रामायणाच्या उपसंहारावांचून भारत व भागवत यांच्या उपसंहारांला पूर्णता आली नसती. कारण त्या तीनहि ग्रंथांचा परस्परांशीं असाच कांहीं अपूर्व संबंध आहे. वेदांतावरील ग्रंथांत ज्याप्रमाणें दशोपनिषदें, ब्रह्मसूत्रें आणि भगवद्गीता ही वेदांताची प्रस्थानत्रयी मानण्यांत येते आणि ज्याला वेदांताचें खरें तत्त्व समजून घ्यावयाचें असेल त्याला त्या त्रयींतला कोणताहि एकादा ग्रंथ गाळून चालत नाहीं, त्याप्रमाणेंच ज्याला पौराणिक ग्रंथांचें खरें इद्गत पहावयाचें असेल त्यानेंहि भारत, भागवत व रामायण या पौराणिक प्रस्थानत्रयीचें समालोचन केल्यावांचून चालावयाचें नाहीं; आणि तेवढ्याकरितांच भारत व भागवत यांच्या उपसंहारांप्रमाणेंच. रामायणाचाहि उपसंहार प्रसिद्ध होणें जरूरीचें होतें व तें कार्य तडीस नेऊन चिपळूणकर आणि मंडळी या पौराणिक प्रस्थानत्रयीच्या प्रसिद्धीकरणाच्या कर्तव्यांतून आज कृतकार्य होऊन पार पडली आहे.

रामायणाचा हा उपसंहार, किंवा ग्रंथकाराच्या शब्दांत सांगावयाचें झाल्यास ही रामायणसमालोचना लिहिण्यास चिपळूणकर आणि मंडळीला लेखकाचीहि जोड चांगलीच मिळाली. लेखकानें आपलें नांव. या ग्रंथांतहि प्रकट होऊं दिलें नसून ज्याअर्थी तो ' महाराष्ट्रिय ' या संज्ञेनेंच वाचकांपुढें येत आहे त्या अर्थी आपणहि त्याचा रहस्यस्फोट न करितां त्यास ' महाराष्ट्रिय ' याच टोपण नांवानें संबोधणें बरें. या महाराष्ट्रियानें यापूर्वीं ( १ ) तुल्यं तु दर्शनम अथवा गीतारहस्यनिर्णय, ( २ ) संक्षिप्त ब्रह्मसूत्रशांकरभाष्य, ( ३ ) संस्कृत व्याकरणकारिका, ( ४ ) उषःसूक्तावलि, ( ५ ) विश्वगुणादर्श इत्यादि निबंधग्रंथ लिहिले आहेत. यावरून या महाराष्ट्रियांची गति काव्य, व्याकरण व वेदांत या सर्वांत अकुंठित आहे, याविषयीं वाचकांची खात्री होईल. असा अष्टपैलू लेखक रामायणाची समालोचना लिहिण्यास चिपळूणकर आणि मंडळीला लाभला हें त्या मंडळीच्या आजवरच्या वाङ्मयतपाचेंच फल मानलें

पाहिजे. महाराष्ट्रिय यांला रामकथेची आवड फार वर्षांपूर्वींपासूनची आहे. व कै. ज. वि. ओक यांच्या लोकशिक्षण मासिकांत रामायणासंबंधीं समालोचनात्मक लेख लिहून त्या लेखकानें आपली हौस थोडीशी फेडून घेतली होती. पण दुर्दैवानें लोकशिक्षण मासिक बंद पडल्यामुळें महाराष्ट्रियांची स्थिति-" जीर्णमंगे सुभाषितम् " अशी झाली होती; परंतु चिपळूणकर आणि मंडळीच्या उपक्रमामुळें महाराष्ट्रियांच्या मध्यंतरीं नष्टप्राय झालेल्या वाङ्मयाभिरुचीस पुनः टवटवी आली. आणि त्यांच्या हातून हें रामायणाच्या उपसंहाराचें महत्कार्य सिद्धीस पावलें हें महाराष्ट्राचें भाग्यच समजलें पाहिजे.

## रामायणाची योग्यता.

रामायण, महाभारत व भागवत ही पौराणिक ग्रंथांतील प्रस्थानत्रयी आहे, असें पूर्वीं आम्हीं म्हटल आहे; पण वेदांताच्या प्रस्थानत्रयींत जसा सूक्ष्म भेद आहे तसाच तो या प्रस्थानत्रयींतहि आहे. तो भेद कोणता याचें विवेचन केल्यानें रामायणाचें खरें स्वरूप व त्याची योग्यता सुव्यक्त होणार आहे. वेदांताच्या प्रस्थानत्रयींत गीता हा ग्रंथ कर्मयोगपर आहे, उपनिषदांतील कांहीं अपवाद सोडून दिल्यास तीं मुख्यतः कर्मसंन्यासपर आहेत आणि ब्रह्मसूत्रें हीं केवळ तत्त्वज्ञानयुक्त व विवेचनात्मक अशीं आहेत. त्याचप्रमाणें रामायण हा ग्रंथ कर्मयोगपर असून भागवत ग्रंथ कर्मसंन्यासपर आहे. आणि महाभारत हा तत्त्वज्ञानविषयक असून त्यांत प्रवृत्ति-निवृत्तीची भेसळ झाली आहे. या दृष्टीनें पाहिल्यास भागवत ग्रंथ व्यवहारास निरुपयोगी ठरतो. रामायण हा कर्मयोगपर असल्यानें तो व्यवहाराला आदर्शभूत झाला आहे. मात्र त्यांत व्यवहाराबरोबरच त्याचें तत्त्वज्ञान सांगितलेलें नाहीं. ती उणीव महाभारतानें भरून काढली आहे. महाभारतांत सद्गुणी पुरुषांचे आदर्श वाचकांपुढें मांडून व्यवहाराचा उपदेश केला आहे; पण त्याबरोबरच असेंच कां वागावें, निराळ्या प्रकारानें कां वागूं नये याचा उहापोह करून व्यवहाराला शास्त्रप्रामाण्याची व तत्त्वज्ञानाची जोड दिली आहे. पण त्यायोगानें महाभारतांतील तत्त्वज्ञानाला वाजवीहून अधिक महत्त्व येऊन त्याच्या प्रकाशांत व्यक्तींच्या सद्गुणांचा प्रकाश वाचकांच्या मनावर ठसा उमटविण्यास असमर्थ झाला आहे.

रामायण व महाभारत या दोन ग्रंथांच्या उद्देशांत व रचनेंत मुळापासूनच भेद दिसून येतो. वैयक्तिक सद्गुणांचे सर्वोत्कृष्ट आदर्श वाचकांपुढें ठेवणें हेंच वाल्मीकिऋषींचें उद्दिष्ट असल्यामुळें त्यांनीं रामायणांतील एकएक व्यक्ति ही एकेका सद्गुणाची अत्यंत पराकाष्ठा दर्शविणारी असल्याचें वर्णिलें आहे. रामाचा धीरोदात्त एकवचनीपणा, सीतेची अढळ पतिनिष्ठा, लक्ष्मणाचें अलोट बंधुप्रेम, भरताचा निःसीम स्वार्थत्याग, मारुतीची स्वामिनिष्ठा इत्यादि गुणांची रामायणांत जशी पराकाष्ठा दिसून येते तशी ती महाभारतांतील व्यक्तींच्या अंगीं दिसून येत नाहीं. यावरून धर्माचें धीरोदात्त सत्य, द्रौपदीची पतिनिष्ठा, भीमाचें भ्रातृप्रेम, अर्जुनाचा स्वार्थत्याग आणि नकुलसहदेवांची स्वामिनिष्ठा इत्यादि सद्गुण हिणकस होते, असें मानण्याचें कारण नाहीं. पण या गुणांच्या वर्णनांत रामायणांत व महाभारतांत जें अंतर पडलें आहे त्याचें कारण असें कीं, रामायणांतील प्रत्येक पात्राच्या गुणांचा परिपोष स्वतंत्र व अन्यनिरपेक्ष असा असल्यानें तो परमावधीला पोंचूं शकला, परंतु महाभारतांतील कथेचा हेतुच अन्यनिरपेक्ष व स्वतंत्र वर्णनाचा नसून त्यांतील प्रत्येक व्यक्ति समाजांतील एक घटक असून त्या नात्यानें तिच्या वर्तनाचा आदर्श कवीला दर्शवावयाचा आहे. यामुळें महाभारतांतील पात्रांच्या स्वभावपरिपोषास सापेक्षतेमुळें एक प्रकारची मर्यादा आंखून दिल्याप्रमाणें झाली असून कोणत्याहि सद्गुणाची मजल त्या मर्यादेपलीकडे जाऊं शकत नाहीं. उदाहरणार्थ, रामाचा सत्यवचनीपणा जसा निर्मर्याद आहे तसा धर्माचा नाहीं. कारण, धर्माला ज्याप्रमाणें आपल्या कृतीचा आपल्या संबंधीं जनावर काय परिणाम होईल याचा विचार टाळतां येणें शक्य नव्हतें, तशी रामाची परिस्थिति नव्हती. आपण आपलें वचन खरें करावयाचें, मग त्याचा परिणाम आपला पिता, आपली माता, पत्नी आणि लक्ष्मणासारखा बंधु यांच्यावर कांहींहि होवो, असें रामाचें वर्तन अन्यनिरपेक्ष असें होतें. द्रौपदीची पतिनिष्ठाहि सीतेच्या पतिनिष्ठेपेक्षां कमी दर्जाची होती असा भाग नाहीं; तथापि सीता ज्याप्रमाणें आपलें व्रत आपण पाळावें, इतरांच्या आचरणाशीं किंवा सुखदुःखाशीं त्याचा कांहीं संबंध पहात बसण्याचें प्रयोजन नाहीं, असें मानीत होती, तशी द्रौप-

दीची विचारसरणी नव्हती. ती कितीहि पतिनिष्ठ असली तरी पतींच्या चुकी-मुळें जेव्हां तिजवर दुर्धर प्रसंग ओढवला त्या वेळीं पतींच्या हलगर्जीपणाबद्दल त्यांची हजेरी घेण्यास तिनें कमी केलें नाहीं. असाच फरक कौसल्या आणि कुंती यांच्याहि वर्तनांत दाखवितां येईल.

## रामायण व महाभारत यांतील साम्य व भेद

रामायणांतील पात्रांच्या व भारतांतील तत्समान पात्रांच्या आचरणांत असें अंतर पडण्याचें कारण महर्षि वाल्मीकींला वैयक्तिक सद्गुणांचें जसें उठावदार चित्र रेखाटतां आलें तसें महर्षि व्यासांना रेखाटतां येत नव्हतें असें नाहीं. पण उभयतांच्या हेतूंत व वर्ण्यविषयांत फरक असल्यामुळें स्वभाववर्णनांतहि आपोआपच फरक पडला. वैयक्तिक सद्गुणांचे नमुने जनतेपुढें मांडण्याचें कार्य वाल्मीकींनीं केल्यानंतर व्यासांना त्याचीच पुनरावृत्ति करण्याचें प्रयोजन राहिलें नव्हतें. म्हणूनच त्यांनीं आपल्या काव्यांत आपल्या मनःचक्षूंपुढें वैय-क्तिक सद्गुणांच्या पराकोटीचें वर्णन करण्याचें ध्येय न ठेवतां असा सद्गुणी मनुष्य समाजांतील व कुटुंबांतील घटक या नात्यानें जास्तींत जास्त किती तत्त्वनिष्ठा दर्शवूं शकेल याचें चित्र रंगविण्याचें ध्येय डोळ्यांपुढें ठेविलें आणि महाभारतांतील पात्रांच्या स्वभावांची रचना तदनुसार केली. अर्थात्च धर्माला स्वतःपुरतें सात्त्विक गुणांचें आणि सत्यनिष्ठेचें कितीहि प्रेम असलें तरी माझ्या या कृतीचा परिणाम माता कुंती, भ्राते भीमार्जुन, पत्नी द्रौपदी आणि पुत्र यांच्यावर काय होईल याचा विचार टाळणें अशक्य असल्यामुळें त्याच्या वर्तनाला स्वाभाविकपणेंच मर्यादा येऊन बसली. समाजांत वावरणाऱ्या व्यक्तीस असली मर्यादा उल्लंघून जाणें अशक्य नसलें तरी अशक्य-प्राय होतें. आणि व्यवहारांतील हीं बंधनें अपरिहार्य असल्यामुळें तीं बंधनें पाळून आपला व्यवहार शक्य तितका नमुनेदार व उच्च कोटीचा कसा करावा याचेंच चित्र समाजापुढें मांडण्यासाठीं महाभारत ग्रंथ लिहिला गेल्यामुळें त्यांतील पात्रांची रामायणांतील पात्रांशीं तुलनाच होऊं शकत नाहीं.

थोडक्यांत सांगावयाचें झाल्यास महाभारत ग्रंथ राजनीति व समाजनीति यांचा

बोध करणारा असल्यामुळें त्यांत असेच प्रसंग वर्णिले आहेत कीं, त्या वेळीं एका कर्तव्याचा दुसऱ्या कर्तव्याशीं विरोध यावा आणि त्यामुळें कार्याकार्यव्यवस्थिती-विषयीं संशय उपस्थित व्हावा; आणि तशा प्रसंगांत व्यक्तीच्या हातून घडलेलें आचरण कोणत्या तरी एका दृष्टीनें सदोष वाटावें. रामायण हा ग्रंथ व्यक्तिधर्माचाच आदर्श म्हणून लिहिला गेल्यानें त्यांत कर्तव्याचा असा झगडा शक्य तोंवर उपस्थित होऊं दिलाच नाहीं. त्यामुळें रामायणांतील पात्रांच्या आंगच्या सद्गुणांना गालबोटदेखील लागलेलें सहसा आढळत नाहीं. पण याला बहुतांशीं कवीचें रचनाकौशल्यच कारणीभूत आहे; तथापि ज्या ज्या ठिकाणीं कर्तव्याकर्तव्यांत विरोधाचा प्रसंग उद्भवला तेथें 'सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः' असाच अनुभव येतो. उदाहरणार्थ, रामानें लक्ष्मणाला सीतेचें रक्षण करण्याची आज्ञा केली असतां सीतेनें जेव्हां त्याजवर वाक्बाण सोडले व भलताच संशय दर्शविला त्या वेळीं लक्ष्मणाच्या हातून रामाच्या आज्ञेचें उल्लंघन झालेंच. त्याचप्रमाणें सिंहासनारूढ होऊन रामानें राजधर्माची दीक्षा घेतल्यावर प्रजेच्या संतोषाकरितां व समजुतीकरितां त्याला स्वतःच्या इच्छेविरुद्ध व दांपत्यधर्माविरुद्ध वर्तन करून सीतेचा त्याग करावा लागला. पण असले प्रसंग रामायणांत क्वचित् आलेले असून महाभारतांत मात्र आरंभापासून अखेरपर्यंत असल्या झगड्यांचेंच वर्णन आलेलें आहे आणि व्यक्तिधर्माला गौणत्व देऊन समाजधर्माचा किंवा राष्ट्रधर्माचा उपदेश करितांना असला विरोध अपरिहार्य असतो.

येथवर केलेल्या विवेचनावरून रामायणाची रचना कोणत्या हेतूनें व धोरणानें केलेली आहे हें वाचकांच्या लक्ष्यांत आलेंच असेल. रामायणांतील पात्रांच्या गुणावगुणांचें परीक्षण करण्याच्या प्रसंगीं ही दृष्टि अवश्य लक्षांत ठेवावी लागेल; तथापि रामायणाची खरी योग्यता समजून घेण्यालाहि ही दृष्टि जरूर असल्यामुळें या मुद्याचें विवेचन आरंभींच केलें आहे.

## रामायणांतील स्वयंस्फूर्त सद्गुण.

प्रस्तुत समालोचनेचे लेखक 'महाराष्ट्रिय' यांनीं पहिल्याच प्रकरणांत रामायणाची योग्यता इतर अनेक रीतींनीं समर्पकपणें वर्णिली आहे व त्यांत

सांगण्यासारखें कांहीं राहिलेलें नाहीं. रामायण हें काव्य नसून इतिहास आहे हा मुद्दा महाराष्ट्रिय यांनीं मोठ्या मार्मिकतेनें व कुशलतेनें सिद्ध केला आहे. रामायणांतील विविध प्रसंगांचें जें वर्णन आहे त्यांत उत्कृष्ट काव्य भरलेलें आहे, तरीपण त्यांत वर्णिलेले बहुतेक सर्व प्रसंग निर्विवाद पुराव्यावरून आणि अविच्छिन्न परंपरेवरून खरे ऐतिहासिक आहेत, याविषयीं संशय रहात नाहीं. ज्या कित्येक कथाभागांविषयीं कांहींसा संशय उद्भवतो ते कथाभाग मूळ वाल्मीकींच्या तोंडचे नसून प्रक्षिप्त आहेत, हें या समालोचनेंत स्पष्टपणें दर्शविलेंच आहे.

रामायण हें केवळ कविकल्पित काव्य नसून तें ऐतिहासिक सत्य आहे हा सिद्धान्त वाचकांच्या मनावर बिंबल्यानें रामायणाकडे पाहाण्याचा वाचकांचा दृष्टिकोन बदलतो व त्या ग्रंथांतील बोध अधिक परिणामकारक होऊं लागतो. कल्पित काव्यांतील वर्णन अतिशयोक्तीनें भरलेलें असावयाचेंच अशी मनाची दृढ समजूत झालेली असल्यानें त्यांतील पात्रांच्या अंगचे सद्गुणहि अत्युक्तिपूर्ण अतएव आपल्या अंगीं आणण्यास अशक्य अशी समजूत होते व तीपासून स्वतःच्या महत्त्वाकांक्षेस प्रोत्साहन मिळत नाहीं; पण कवीनें वर्णिलेल्या व्यक्ति ऐतिहासिक आहेत अशी खात्री पटल्यानें त्या व्यक्तींविषयींचा आदर कमी न होतां उलट दुणावतो आणि वाचकांच्या मनांतहि स्फूर्तीचें बीज रुजूं लागतें. म्हणूनच रामायणांतील कथा हें ऐतिहासिक सत्य आहे असें सिद्ध करण्याचा महाराष्ट्रिय यानें जो खटाटोप केला आहे तो वाजवी असून, तो यशस्वी झाल्यामुळें परिणामकारकहि झाला आहे. पण रामायणांत वर्णिलेल्या व्यक्तींचे सद्गुण नुसते ऐतिहासिक दृष्ट्या सत्य आहेत एवढेंच नव्हे, तर ते स्वयंस्फूर्तीनें प्रगट झाले आहेत हाहि विचार वाचकांच्या मनावर पटविणें आवश्यक आहे. रामायणांतील प्रमुख व्यक्तींच्या अंगच्या सद्गुणांचा विकास केवळ आपद्प्रसंग ओढवल्यामुळें झाला नसून तो केवळ स्वेच्छेनें व स्वयंस्फूर्तीनें झाला आहे. संकटांनीं सगळीकडून घेरलें म्हणजे भित्र्या प्राण्याच्या अंगींहि धैर्य येतें. स्वार्थत्याग केल्यावांचून गत्यंतर नाहीं अशी परिस्थिति प्राप्त झाली असतां कृपणहि कर्णाचे अवतार

बनलेले दिसतात. पूर्वापार अपरिहार्य संबंध जडल्यामुळें जन्मापासून स्वामीनिष्ठेचें बाळकडू पाजलें गेलेले सेवक स्वामिनिष्ठेसाठीं प्राणांवर उदार झालेले आढळतात. पण असले हे सगळे सद्गुण प्रसंगप्राप्त असल्यानें त्यांच्याविषयीं तितकेंसें कौतुक वाटत नाहीं. पण रामायणांतील एकएक व्यक्ति आपण होऊन आपल्यावर संकट ओढवून घेत आहे आणि आपल्या सद्गुणांच्या तेजानें सर्वांस दिपवीत आहे, हें पाहून त्या व्यक्तीविषयीं खरोखरच कौतुकयुक्त आदर वाटूं लागतो.

रामायणांतील प्रमुख नायक श्रीरामचंद्र व नायिका सीतादेवी यांच्यावर आलेलीं संकटें तरी त्यांनीं स्वतः ओढवून घेतलेलीं नाहींत असें कदाचित् कोणास वाटेल; पण त्यांनींहि केवळ पुत्रधर्म आणि पतिव्रताधर्म राखण्याकरितां स्वतःवर आपत्ति ओढवून घेतली. रामाला वनवासास जाण्याविषयीं स्पष्ट आज्ञा दशरथाच्या तोंडून निघालेली नाहीं, हें लक्षांत घेतल्यास वरील विधानाची सत्यता वाचकांस पटेल. ‘ रामा, तूं वनास जा ’ असें दशरथाच्या तोंडून न वदविण्यांत महर्षि वाल्मीकींनीं खरें काव्यकौशल्य प्रकटविलें आहे. दशरथानें तशी स्पष्ट आज्ञा केली असती तर रामाचा स्वार्थत्याग तितका उठावदार दिसला नसता. पण पित्यानें प्रत्यक्ष आज्ञा केली नसतां तो वचनबद्ध आहे एवढें कळून येतांच, वनवासाची निर्घृण आज्ञा उच्चारण्याचा प्रसंग पित्यावर येऊं न देतांच, श्रीरामानें वस्तुस्थितीचा पेंच ओळखून पित्याला वचनमुक्त करण्याकरितां आपखुषीनें राज्यत्याग केला आणि चौदा वर्षांचा दीर्घकालीन खडतर वनवास आपण होऊन स्वीकारिला !

सीतेच्या स्वार्थत्यागाची पायरी याच्याहि वरची ठरते. कारण पित्याला वचनमुक्त करण्यासाठीं स्वतः वनवास पत्करल्याशिवाय रामाला जसें गत्यंतर नव्हतें, तशी कांहीं सीतेची परिस्थिति नव्हती. परंतु पतिव्रताधर्माच्या परमोच्च कल्पनेनें तिनें रामावर आलेला वनवासाचा प्रसंग हा आपणावरच आलेला आहे असें तादात्म्यबुद्धीनें ठरवून अरण्यांत जाण्याची तयारी चालविली. राम वनाला जाणार हें कळल्यानंतर आपण त्याजबरोबर वनांत जावें का न जावें

असल्या शंकेला तिनें क्षणभरहि आपल्या अंतःकरणांत थारा दिला नाहीं. अर्थात्च वनवासाचें संकट तिनें स्वयंप्रेरणेनें आपणावर ओढवून घेतलें.

## स्वयंसेवक लक्ष्मण व मारुती.

लक्ष्मणाचा स्वार्थत्याग तर या दोघांच्याहि स्वार्थत्यागाहून उच्च कोटीचा ठरतो. पित्याचें वचन खरें करून दाखविण्यांत रामाचा साक्षात् संबंध पोंचत होता आणि सीता ही त्याची सहधर्मचारिणी असल्यानें तिच्यावरहि वनवासाचा प्रसंग ओघानेंच प्राप्त झाला. पण लक्ष्मणाचा तसा साक्षात् संबंध आलेला नव्हता; असें असतां केवळ भ्रातृप्रेमानें लक्ष्मण दंडकारण्यास जाण्याला सिद्ध झाला. हें प्रेम व ही त्यागबुद्धि खरोखरच अलौकिक होय. खरी स्वयंप्रेरणा पाहावयाची असेल तर ती लक्ष्मणाच्या आचरणांत दिसून येते. त्यांतूनहि विशेष कौतुकावह गोष्ट ही कीं, चौदा वर्षांच्या दीर्घकालीन अवधींत लक्ष्मणाच्या तोंडून केव्हांहि या त्यागवृत्तीला कमीपणा आणणारे असे उद्गार चुकून देखील निघाले नाहींत. नाहींतर घाईनें, अविचारानें कांहीं तरी निश्चय करावा आणि पुढें जन्मभर त्याविषयीं पश्चात्ताप करीत बसावें, असा प्रकार सामान्य जनांत हरघडी दिसून येत असतो; पण लक्ष्मणानें एकदां जें भ्रातृसेवेचें असिधाराव्रत स्वयंस्फूर्तीनें स्वीकारिलें त्यांत पुढें केव्हांहि चुकून देखील त्यानें पश्चात्तापाचे उद्गार काढले नाहींत.

रामायणांतील चवथा अतुल पराक्रमी स्वयंसेवक श्रीमारुतीराय हा होय. सुग्रीवाच्या साहाय्याकरितां रामलक्ष्मणांशीं मैत्री संपादन करणें आणि रामलक्ष्मणांच्या साहाय्याचा मोबदला म्हणून त्यांची उलट सेवा करणें एवढी कामगिरी यदृच्छाप्राप्त होती. पण एकदां रामाचें सेवकत्व पत्करल्यावर मारुतीरायानें कसल्याहि संकटास पाठ दाखविली नाहीं. सीताशुद्धीकरितां जसे शेंकडों वानर इतस्ततः गेले, त्याप्रमाणें आपणहि आपल्या वांट्यास आलेली कामगिरी यावत्शक्य पार पाडावी आणि सुग्रीवाचा बोल आपणास लागणार नाहीं एवढें तंत्र सांभाळावें असली संकुचित कल्पना मारुतीच्या मनास केव्हांहि स्पर्श करूं शकली नाहीं. दक्षिणसमुद्रतीरापर्यंत सर्वत्र शोध केल्यानंतर शंभर योजनें समुद्रोल्लं-

घेन करून एकट्यानेंच राक्षसांच्या वस्तींत शिरून आपले प्राण संकटांत घालण्याची जबाबदारी कोणीहि त्याजवर लादली नव्हती; तथापि निस्सीम स्वामिभक्तीनें प्रेरित होऊन मारुतीनें हें धाडस केलें. आणि अशोकवनांत असलेल्या सीतेचा शोध लावून तिला आश्वासन देऊन परत निघाल्यावर देखील आपण केलेल्या कामगिरीनें त्याचें मन संतुष्ट न होतां त्यानें स्वयंस्फूर्तीनें नवें धाडस करण्याचा बेत ठरवून तो पार पाडला. त्या वेळची त्याची उक्ति प्रत्येक कार्यकर्त्यानें लक्षांत ठेवण्यासारखी आहे. “ मुख्य कार्य पार पडल्यानंतर पहिल्या कार्याशीं विरोध न येतां जो अनेक कार्यें पार पाडितो तोच हातीं घेतलेलें काम खरें शेवटास नेण्यास समर्थ होतो,” असें म्हणून मारुतीनें अशोक वनाचा विध्वंस आरंभिला आणि राक्षसांच्या मनांत वानरांच्या पराक्रमाविषयींच्या भीतीचें बीजारोपण करून पुढील यशाचा मार्ग सुकर करून ठेविला. हें सर्व कार्य त्यानें केवळ स्वामिनिष्ठेनें केलें. म्हणून स्वतः रामचंद्रानें त्याला सर्व भृत्यवर्गांत अत्यंत श्रेष्ठ अशी पदवी दिली.

भरताचा स्वार्थत्यागहि याच कोटींतला असल्यामुळें त्याचाहि येथें उल्लेख करणें जरूरीचें आहे. किंबहुना त्याच्या स्वार्थत्यागाला दुसऱ्या कोणाचीच उपमा साजणार नाहीं. श्रीरामचंद्रापासून मारुतीरायापर्यंतच्या वरील मालिकेंतील प्रत्येक व्यक्तीवर अप्रत्यक्ष रीतीनें तरी कर्तव्याची जबाबदारी येऊन पडत होती; पण आपल्या मातेनें भयंकर लोकापवाद सोसून पतीच्या प्राणांचीहि पर्वा न करितां त्यास वचनांत गुंतवून जें राज्य मिळविलें त्या राज्याचा क्षणभरहि उपभोग न घेतां भरतानें जें वैराग्य प्रकट केलें, त्यास दुसरीकडे कोठेंहि क्वचित्च तोड सांपडेल. राम, लक्ष्मण, सीता व मारुती यांनीं आपआपलीं कर्तव्यें इतक्या निष्ठेनें बजाविलीं नसतीं तर त्यांत त्यांच्याकडे थोडें तरी गौणत्व आलें असतें; पण तसा कर्तव्यनिष्ठेचा दूरान्वित संबंध देखील नसतां भरतानें जो राज्यलक्ष्मीचा त्याग केला तो खरोखरीच अश्रुतपूर्व होय. अशा रीतीनें रामायणांतील या पांच मुख्य पात्रांच्या स्वभावविशेषाचा विचार केला असतां त्यांचें जें धीरोदात्त वर्तन दिसून येतें त्याचा उगम शुद्ध सात्त्विक स्वयंप्रेरणेंत अस-

त्यामुळें त्याचें तेज खरोखरीच अवर्णनीय असें भासतें. अत्यंत स्वार्थनिरपेक्ष अशा निष्काम कर्मयोगाचीं उदाहरणें पहावयाचीं असल्यास तीं रामायणांतच दृष्टीस पडतात, हा या काव्यग्रंथांतील वाल्मीकींच्या कल्पकतेचा व प्रतिभासंपन्नतेचा प्रभाव होय.

## रामावरील आक्षेपांचें निरसन.

रामायणांतील हा गुणादर्श कितीहि शुद्ध व निर्मल असला तरी त्यांतहि दोष शोधून काढणारे आढळतातच ! त्यांतल्या त्यांत प्रत्यक्ष रामाच्या चारित्र्यावर जितके आक्षेप घेण्यांत आले आहेत तितके इतर कोणाविषयीं घेण्यांत आले नाहींत याचें आश्चर्य वाटतें. तें कसेंहि असो, श्रीरामाच्या निष्कलंक व आदर्शभूत अशा चारित्र्यावर जे आक्षेप घेतले जातात त्यांचा परामर्ष घेणें जरूर आहे. या आक्षेपांचा विचार करण्यापूर्वी पौराणिक ग्रंथ वाचतांना आपली दृष्टि कशी असावी याचा विचार अगोदर करणें प्राप्त आहे. कारण पौराणिक ग्रंथांचें मर्म व हेतु बरोबर लक्षांत न आल्यामुळें अनेक शंकाकुशंका टीकाकारांकडून प्रदर्शित करण्यांत येत असतात. पण असल्या ग्रंथांचें रहस्य एकदां निश्चितपणें समजल्यावर त्या शंकांचें आपोआपच निरसन होतें. पौराणिक ग्रंथ हे प्रत्यक्ष आदर्श पुढें ठेवून नीत्युपदेश करण्याच्या हेतूनें लिहिलेले असतात. त्यांत ज्या ज्या सद्‌गुणांचा उपदेश करावयाचा असतो त्या सद्‌गुणांची परमसीमा वर्णिलेली असते आणि तो विशिष्ट गुण ज्याच्या अंगीं नखशिखांत भरलेला आहे अशा सद्‌गुणाच्या पुतळ्याचें चित्र आदर्शभूत म्हणून रेखाटण्यांत आलेलें असतें. असें शब्दचित्र रंगवितांना स्वाभाविकपणें त्या कवीची दृष्टि तेवढ्या वेळेपुरती एकांगी बनलेली असते. त्याचे दृष्टीपुढें त्या वेळीं एकच एक सद्गुण उभा असतो आणि त्या सद्गुणाशीं त्याचें इतकें तादात्म्य होऊन जातें कीं, त्या वेळीं त्यास मनुष्यस्वभावांतील इतर सद्गुणांची आठवण देखील होत नाहीं. आणि असें तादात्म्य होण्यांतच कवीचें खरें कौशल्य दिसून येतें. कारण कवि आपल्या वर्ण्य विषयांत इतका रंगून न जाईल तर त्याचें त्या विषयाचें वर्णन फिकें पडल्याशिवाय राहाणार नाहीं. पण सर्वच वाचकांची

दृष्टि अशी तादात्म्य पावूं शकत नसल्यामुळें त्यांना कवीचा तो एकांगीपणा सदोष वाटतो आणि एका सद्गुणाच्या चित्रांत इतर अनेक सद्गुणांच्या छटा कवीनें कां दाखविल्या नाहींत, असा ते त्याजवर आक्षेप घेत असतात; पण असले आक्षेप लक्षांत घेऊन कवि जर पंचरंगी भेसळ करूं लागेल तर त्या योगानें आक्षेपकांचें तर समाधान होणार नाहींच, पण कवीच्या काव्याचा हेतुहि सिद्धीस जाणार नाहीं.

या तात्त्विक विवेचनाचा प्रत्यक्ष उदाहरणें घेऊन थोडासा खुलासा करूं. पतिव्रता स्त्रीचा आदर्श म्हणून सावित्रीचें चरित्र लिहावयाचें कवीनें मनांत आणल्यावर तिच्या पातिव्रत्याला खरी कसोटी लावून पहाण्यासाठीं सत्यवानाचें आयुष्य एकच वर्ष शिल्लक राहिलेलें होतें व ती गोष्ट नारदाच्या तोंडून विवाहापूर्वीं सावित्रीला कळली होती, असें कवीनें दर्शविण्यांतच त्याचें खरें कौशल्य आहे. अशा परिस्थितींत सावित्री आपल्या पतिव्रताधर्माला जागली व तिनें एकदां मनानें वरलेल्या सत्यवानाचा त्याग करण्याची कल्पनाहि मनांत आणली नाहीं, यांतच तिच्या सद्गुणांचा परमोत्कर्ष आहे व तो वाचकांपुढें उत्तम नमुना म्हणून मांडण्यानें कवीचा हेतु सफल होणार आहे. अशा ठिकाणीं जर एकादा चिकित्सक वाचक सावित्रीचा हा निश्चय समंजसपणाचा होता काय? सत्यवानाहून अधिक सद्गुणी आणि दीर्घायुषी असा अन्य वर सावित्रीस शोधूनहि सांपडला नसताच कीं काय? असल्या शंका विचारूं लागला तर त्याला कवीच्या उपदेशपद्धतीचें रहस्यच समजलें नाहीं, असें म्हणणें प्राप्त आहे. सद्गुणांची परीक्षा संकटाचे वेळींच होते आणि तशी परीक्षा करण्याकरितां संकट ओढवून आणावयाचें तर तें कोणाच्या तरी चुकीमुळें किंवा दोषामुळेंच येणार. पण अशा संकटाच्या दिव्यांतून आपला आदर्शभूत नायक निष्कलंक पार पडला याचें कौतुक करण्याऐवजीं जर कोणी टिकाकार त्या संकटांचा उगम शोधीत जाऊन त्याची कारणमीमांसा करीत बसेल आणि अमक्यानें अथवा अमक्याच्या हातून असा दोष घडला नसता तर अमुक प्रसंग ओढवला नसता असल्या तर्कवितर्कांकडे लक्ष देत राहील तर कवीला ‘ अरसिकेषु कवित्वनिवेदनं । शिरसि मा लिख मा लिख मा लिख ’ अशी ब्रह्मदेवापाशीं प्रार्थना करण्याची पाळी येईल!

रामायणांत रामचंद्राची पितृभक्ति आणि राज्यसुखाविषयींची निर्लोभता आदर्शभूत स्वरूपांत कवीला वर्णन करावयाची आहे. अर्थातच यौवराज्याभिषेकाच्या प्रसंगींच राज्यत्याग करून दंडकारण्यांत चौदा वर्षें वनवास पत्करण्याचा आकस्मिक प्रसंग त्याजवर ओढवणें हीच त्याची कसोटी होय. त्याची पितृभक्ति या कसोटीला टिकली म्हणूनच ती सर्वांना कित्त्यादाखल झाली आहे. हा कसोटीचा प्रसंग यावयाचा म्हटल्यास तो मंथरेच्या दुष्टपणामुळें, कैकेयीच्या सवतीमत्सरामुळें आणि दशरथाच्या स्त्रैणपणामुळें प्राप्त झाला व या दोषांबद्दल त्या तीनहि व्यक्ति निंदेस पात्र ठरतात, हेंही खरें. पण वास्तविकपणें राज्यत्याग करण्याचें कारण नसतांना रामानें पित्याला सत्यवादी ठरविण्याकरितां राज्यलक्ष्मी कसपटासमान मानली, यांतच त्याच्या पितृभक्तीची व त्यागवृत्तीची पराकाष्ठा दिसून येते. यास्तव रामचंद्राच्या आंगच्या परमोच्च गुणांचा उत्कर्ष दर्शविण्याकरितां कवीनें राज्यत्यागप्रसंगाची जी कल्पना वर्णिली आहे तिच्याहून कोणतीहि अन्य कल्पना रामाच्या आंगच्या सद्‌गुणांचें तेज अधिक प्रखरतेनें दर्शवूं शकली नसती.

पौराणिक कथांतून वर्णिलेल्या प्रसंगांवर नेहमींच जे आक्षेप सामान्यत: घेण्यांत येतात त्यांचा एक मासला म्हणून इतका उहापोह करण्यांत आला. हीच विचारसरणी इतरत्र आढळून येणाऱ्या आक्षेपांचेंहि निरसन करण्यास उपयोगीं पडेल. कोणत्याहि सद्‌गुणाचा आदर्श पुढें ठेवावयाचा म्हणजे त्यांत थोडीबहुत अतिशयोक्ति ही येणारच. कारण जगांतील सामान्य व्यवहारांत जेवढे व्यावहारिक सद्‌गुण साधारण माणसाच्या अंगीं आढळून येतात तेवढेच गुण जर आदर्शभूत व्यक्तींत दर्शवावयाचे, तर त्याला कथा व पुराणेंहि नकोत व काव्यहि नको; पण असल्या कांटेतोल व्यावहारिक वर्णनानें कोणाच्याहि मनाचें कधींहि समाधान होत नाहीं. ज्याचें उदाहरण अनुकरणासाठीं जगांतील वर्तमान, भूत व भविष्य काळच्या व्यक्तींपुढें मांडावयाचें त्या व्यक्तीच्या आंगचे सद्‌गुण हे केव्हांहि कोणत्याहि व्यक्तीच्या आंगच्या गुणांपेक्षां सरसच ठरले पाहिजेत. विराटपुरुष ज्याप्रमाणें सर्व जगताला व्यापून

दशांगुळें उरला आहे, त्याप्रमाणेंच श्रीरामचंद्राची पितृभक्ति, हरिश्चंद्राचें सत्यवादित्व, मारुतीची रामभक्ति, ध्रुवाचा अढळ निश्चय, शुकाचें वैराग्य इत्यादि सद्गुण हे जगातील कोणत्याहि व्यक्तीच्या आंगच्या त्या त्या गुणांपेक्षां निर्विवादपणें श्रेष्ठ ठरले पाहिजेत व तसे ते ठरण्याकरितां कवीला आपल्या कल्पनेला शक्य तितका ताण द्यावा लागतो. तसा तो न देईल तर न जाणों आपला कल्पित नायक एखाद्या मानवी व्यक्तीपेक्षांहि कमी दर्जाचा ठरेल अशी त्यास धास्ती वाटत असते. मारुतीच्या आंगच्या बळाचें व उत्साहाचें वर्णन करितांना त्यानें सूर्यबिंब पकडण्याकरितां झाप टाकली हें वर्णन करण्यांत कवीचा हेतु हाच असतो कीं, कोणाच्याहि कल्पनेची देखील धांव त्याच्यापुढें जाऊं नये. मग प्रत्यक्ष कृति त्याच्या बरोबरीला येण्याची गोष्ट तर दूरच राहिली.

## वैयक्तिक सद्गुण.

वर्णनांतील अतिशयोक्तीसंबंधानें हा विचार झाला. पण रामायणांतील नायकांच्या व उपनायकांच्या गुणांचा विचार करितांना ते गुण सामाजिक किंवा राष्ट्रीय दृष्टीनें वर्णिलेले नाहींत, हीहि गोष्ट लक्षांत ठेवली असतां पुष्कळसा गैरसमज दूर होईल. रामाच्या पितृभक्तीचें, लक्ष्मणाच्या भ्रातृप्रेमाचें किंवा मारुतीच्या स्वामिभक्तीचें वर्णन करीत असतांना त्या त्या गुणांभीं प्रेरित होऊन केलेल्या कृतींचा समाजावर परिणाम काय होईल याचा विचार रामायणांत कवीनें मनांत आणलेला नाहीं. रामायण हा ग्रंथच वैयक्तिक सद्गुणांचा आदर्श म्हणून लिहिलेला आहे. महाभारताप्रमाणें राजनीति किंवा राष्ट्रधर्म उपदेशण्याकरितां लिहिलेला नाहीं. त्यामुळें पितृवचनासाठीं रामानें राज्यत्याग केला असतां तें राज्य रामापेक्षां सद्गुणांत कमी दर्जाच्या ठरणाऱ्या दुसऱ्या कोणाच्याहि हातीं गेल्यास त्याचा प्रजाजनांच्या हिताहितावर काय परिणाम होईल, याचा विचार करण्याची कवीला आवश्यकता भासली नाहीं; आणि म्हणूनच कैकेयीच्या नादीं लागलेल्या स्त्रीलंपट अशा पित्याच्या मुर्वतीसाठीं राज्यत्याग करण्यांत रामानें प्रजेचें अकल्याण केलें असली टीका गैरवाजवी व गैरलागू होय. कवीनें आपल्या काव्याची मर्यादा आंखून घेतल्यानंतर त्या

मर्यादेच्या पलीकडे जाऊन त्यानें समाजहिताच्या दृष्टीनें अमुक एका गोष्टीचा विचार कां केला नाहीं, असा आक्षेप घेणें हें ईश्वरानें सोन्यांत सुवास कां ठेवला नाहीं किंवा हिऱ्यांत कोमलता कां ठेविली नाहीं अशी शंका घेण्याइतकेंच समंजसपणाचें ठरेल. व्यक्तिगत सद्गुण आणि वैयक्तिक धर्माचरण हें शिकविण्याचाच रामायणाचा हेतु असल्यामुळें दशरथाची वचनबद्धता, रामाचा राज्यत्याग, लक्ष्मणाचें रामानुगमन किंवा भरताचा नंदिग्रामनिवास यांत व्यक्त होणाऱ्या त्यांच्या त्यांच्या थोरपणाच्या वर्णनाचे वेळीं त्या त्या व्यक्तीखेरीज त्यांच्या कृतीकडे पहाणारा व त्यांच्या कृतीपासून सुखदुःख पावणारा समाज म्हणून कांहीं चीज आहे याची ओळख देखील कवीनें दाखविली नाहीं. अर्थातच कवीनें स्वतः आंखून घेतलेल्या 'मर्यादेपुरताच त्याच्या वर्णनाचा विचार करणें हेंच उचित होय. समाजधर्माचे पाठ घ्यावयाचे असल्यास महाभारतासारखा काव्यसमुद्र आहेच. त्यांत या टीकाकारांनीं खुशाल वाटेल तितक्या बुड्या मारून त्यांतून सामाजिक तत्वरूपी रत्नें शोधून बाहेर काढावीं; पण रामायणरूपी शुद्ध गंगाप्रवाहांत तसलीं रत्नें हातीं लागत नाहींत म्हणून अनाठायीं निराश होऊन कवीस दोष देण्याचें पातक करूं नये.

## वालिवधासंबंधीं आक्षेप.

असो; वर उल्लेखिलेली मर्यादा लक्षांत घेऊन श्रीरामचरित्राकडे पाहिल्यास त्यांत कांहीं दोष आढळतात कीं काय याचा विचार या समालोचनेचे लेखक महाराष्ट्रिय यांनीं मार्मिकपणें केला आहे आणि श्रीरामावर घेतल्या जाणाऱ्या बहुतेक आक्षेपांचें त्यांनीं निरसन केलें आहे. ताटिकेचा वध आणि जनस्थानांत खर राक्षसाबरोबर चाललेल्या युद्धांत तीन पावलें मागें सरणें हे दोनहि आक्षेपच अगदीं बाष्कळ असल्यामुळें त्यांचा विचार करण्याचेंच कारण नाहीं. वालिवधाचा आक्षेप मात्र बराच विचारार्ह आहे. समालोचनाकार महाराष्ट्रीय यांनीं त्या आक्षेपाचा सांगोपांग विचार करून अखेरीस वालीवर आडून बाण मारणें हें कृत्य असमर्थनीय म्हणून सोडून दिलें आहे. भ्रातृद्रोहाबद्दल वालि हा दंड्य होता कीं नाहीं हा प्रश्न मुख्य नसून रामानें त्याजवर आडून बाण कां टाकला

हा वादाचा मुख्य मुद्दा आहे. आणि महाराष्ट्रिय यांनीं या मुख्य आक्षेपाचें निरसन केलेलें नाहीं. रामबाणानें विव्हल झाल्यावर आपण अगदीं निरपराधी असतां रामानें आपला निष्कारण घात केला असा आक्षेप वालीनें स्वतः उच्चारून दाखविला होता ( ४–१७–३३ ); आणि म्हणूनच रामाच्या उत्तरांत वालि दंडनीय कसा याचें विवेचन आहे व तें अखेरीस वालीलाहि मान्य करावें लागलें आहे. यास्तव तो मुद्दा आपण तूर्त सोडून देऊं. पण यांत वालीचा आक्षेप एक आणि रामाचें उत्तर भलतेंच असा प्रकार झाला असल्याचा जो संशय महाराष्ट्रिय यांनीं प्रदर्शित केला आहे तो चुकीचा आहे. वालीनें आपण निरपराधी आहों असें म्हटलें म्हणूनच रामानें त्याचे अपराध सप्रमाण त्याचे गळ्यांत बांधले. पण तें विवेचन पहिल्या आक्षेपाचें उत्तर म्हणून सांगितलेलें नाहीं किंवा त्या आक्षेपाचें उत्तर टाळण्याकरितांहि भलताच मुद्दा पुढें आणलेला नाहीं. आडून बाण मारल्याचा आक्षेप वालीनें तितक्या जोरानें पुढें आणलेला नव्हता, कारण त्यांतली गोम त्याला स्वतःला माहित होती. पण आधुनिक टीकाकारांनीं त्या आक्षेपाला विशेष महत्त्व दिलें असल्यामुळें त्याची चर्चा करणें प्राप्त आहे.

रामानें आडून बाण मारिला याचा अर्थ इतकाच कीं, रामाचें व वालीचें प्रत्यक्ष युद्ध सुरू झालें नसतांना रामानें बाण फेंकला. केवळ चढाओढीच्या सामन्यांत किंवा द्वंद्वयुद्धांत असला प्रकार दोषावह ठरेल; परंतु ज्या ठिकाणीं दोन पक्ष परस्परांशीं प्राणघातक सामना करण्यास सिद्ध होतात, त्या वेळीं एरवींच्या द्वंद्वयुद्धांतले असले नियम पाळणें शक्यहि नसतें व इष्टहि नसतें. वालि युद्धाकरितां रणभूमीवर न येतां आपल्या मंदिरांत झोंप घेत असतां रामानें छपून तेथें जाऊन त्याच्यावर बाण सोडला असता तर मात्र तो निंद्य खून झाला असता; पण जेव्हां दोन पक्ष परस्परांशीं सामना करण्याकरितां रणभूमीवर येतात, त्या वेळीं प्रतिपक्ष्यानें आपल्या अज्ञानाचा, अहंकाराचा किंवा मर्मस्थानाचा अयोग्य फायदा घेतला असली टीका बालिश होय. असलें कृत्य आक्षेपार्ह मानूं लागल्यास एका बाजूस सैनिकांची जेवढी संख्या असेल तेवढीच संख्या दुस-

त्या पक्षानेंहि युद्धार्थ आणावी आणि एका बाजूचा एक योद्धा पतन पावला असतां दुसऱ्या बाजूच्या एका योद्धयानें युद्ध सोडून बाजूस बसावें असा त्याचा अर्थ होऊं लागेल. पण युद्धामध्यें असली नीति कोणींच कधींच पाळलेली आढळत नाहीं व तशी ती पाळणें शक्यहि नाहीं.

यावर कदाचित् कोणी असें म्हणेल कीं, दोघां योद्धयांचें परस्परांशीं युद्ध चालू असतां तिसऱ्यानें त्यांत पूर्वसूचना न देतां आकस्मिक रीतीनें मध्यें पडूं नये. पण रणांगणांत हेंहि शक्य नसतें. कौरवयुद्धांत भूरिश्रव्यानें सात्यकीस जर्जर केलें असतां अर्जुनानें सात्यकीच्या रक्षणार्थ धांव घेऊन भूरिश्रव्याचा दक्षिण बाहू अकस्मात् छेदून टाकला. आणि आश्रिताचें रक्षण करणें हा क्षत्रियाचा धर्मच आहे असें म्हणून त्या वेळीं अर्जुनानें आत्मसमर्थन केलें. आतां प्रस्तुत प्रसंगांत वालि, सुग्रीव व राम यांचे संबंध कसे होते हें लक्षांत घेतल्यास वरील अर्जुनाच्या समर्थनाच्या दृष्टांताचें मर्म वाचकांच्या लक्षांत येईल. वालि व सुग्रीव यांचें वैर कायमचें ठरून गेलें होतें. त्यांत सुग्रीवाचा पक्ष निर्बल असल्यानें त्यानें रामाचें साहाय्य संपादन केलें. रामानें जरी सुग्रीवास साहाय्य करून वालीचा वध करण्याची प्रतिज्ञा केली, तथापि सुग्रीवाला रामाच्या सामर्थ्याविषयीं विश्वास वाटूं लागला नव्हता; म्हणून त्यानें रामाला सप्ततालवेध करण्याला आणि दुंदुभि राक्षसाच्या अस्थि पायानें भिरकावून देण्याला सांगितलें. या दोनहि परीक्षांतून राम उत्तीर्ण झाला. तथापि सुग्रीवाच्या मनांतली धाकधूक समूळ नाहींशी होईना. यास्तव सुग्रीवानें युद्धाची योजना अशी ठरविली कीं, आपण स्वतः वालीला आव्हान करून युद्धांत गुंतवावें आणि रामानें सुग्रीवाच्या बाजूनें साहाय्यार्थ पुढें येऊन वालीवर शरवृष्टि करून त्याचा वध करावा. रामाच्या अद्भुत सामर्थ्याविषयीं सुग्रीव साशंक नसता तर असली अपमानास्पद योजना रामानें मान्य केली नसती. परंतु सुग्रीवाच्या मनाच्या समाधानासाठीं ही योजना रामानें कबूल केली असें दिसतें. सुग्रीवाचें कार्य करून रामाला त्याचें साहाय्य मिळवावयाचें होतें. याकरितां या कामांत त्यास सुग्रीवाच्या तंत्रानें वागावें लागलें. पण यांत वालीनें तक्रार करण्यासारखा गुप-

पणा कांहीं राहिलेला नव्हता. रामाचें सुग्रीवाशीं सख्य झाल्याची वार्ता वालीनें दूतमुखानें ऐकिली होती; आणि सुग्रीवानें ज्या वेळीं वालीला युद्धांत आव्हान केलें, त्या वेळीं "सुग्रीवाला कोणाचें तरी मोठें साहाय्य मिळालें आहे; आणि हे साहाय्य करणारे राजपुत्र रामलक्ष्मण नांवाचे महापराक्रमी योद्धे आहेत, या करितां या वेळीं आपण सुग्रीवाशीं युद्ध न करितां सख्य करून त्याला यौवराज्य द्या" असा तारेनें त्यास उपदेश केला. यावर वालीनें दिलेलें उत्तर लक्षांत ठेवण्यासारखें आहे. "रामाविषयीं तूं भीति बाळगूं नकोस, कारण तो धर्मज्ञ व कृतज्ञ असल्यानें तो पापाचरण करणार नाहीं," असें वालीनें मोघम उत्तर दिलें आहे. यांतलें कृतज्ञ हें पद वालीनें रामासंबंधीं कोणत्या हेतूनें योजलें याचा नीटसा उलगडा होत नाहीं. आणि राम पाप कसें करील असें वालीनें आगाऊच अनुमान करण्याचें प्रयोजन काय, तेंहि लक्षांत येत नाहीं. कदाचित् वाली व तारा यांचा हा संवाद प्रक्षिप्त असूं शकेल; पण 'स्थितस्य गतिश्चिंतनीया' या न्यायानें त्याचा अर्थ करूं गेल्यास त्यांतून असें अनुमान निघतें कीं, वालीला रामाचा व सुग्रीवाचा ठरलेला संकेत कळलेला होता. आणि रामानें सप्ततालवेध केल्याची वार्ताहि वालीच्या कानावर गेली असावी आणि तो रामाचें सामर्थ्य ऐकून साशंक झाला असावा. तेव्हां त्यानेंहि मनांत असें योजिलें असावें कीं, आपण रामाशीं युद्धाचा प्रसंगच आणूं नये. सुग्रीवावर चाल करून जावें, त्याला जेरीस आणावें, पण त्याचा प्राणघात न करितां त्याला जीवदान देऊन परत आपल्या किष्किंधेला यावें, म्हणजे रामाशीं युद्ध करण्याचा प्रसंगच येणार नाहीं.

वालीच्या मनांतील हेतूविषयींचें हें केवळ अनुमानच आहे, हें खरें; पण युद्धाला बाहेर पडतांना मी सुग्रीवाला ठार मारणार नाहीं असें जें त्यानें तारेचें सांत्वन करीत असतांना मुद्दाम सांगितलें, त्यावरून वरील अनुमानपरंपरा साहजिकच मनांत येते. रामाशीं युद्धाचा प्रसंग आणूं नका, असें तारेनें त्यास निक्षून बजाविलें होतें; त्यामुळें रामाशीं लढण्याचा प्रसंग टाळण्याकरितांच, सुग्रीवाचा गर्वमात्र हरण करावयाचा, पण त्याच्या जीवास अपाय

करावयाचा नाहीं; आणि जोंपर्यंत आपलें सुग्रीवाशीं युद्ध चाललें आहे व त्यांत सुग्रीवाच्या जीवाला धोका प्राप्त झाला नाहीं, तोंपर्यंत रामाला आपल्यावर चालून येण्याचें कारण नाहीं, असा विचार वालीनें मनांत योजलेला दिसतो. 'धर्मज्ञश्च कृतज्ञश्च कथं पापं करिष्यति ' या वालीच्या तोंडच्या वाक्याची वरील अनुमानानेंच संगति लागते. राम धर्मज्ञ असल्यानें जोंपर्यंत आपण दुसऱ्याशीं लढत आहों तोंपर्यंत तो आपल्यावर बाण टाकणार नाहीं, हें खरें; पण सुग्रीवाच्या प्राणावर बेतल्यास तो खचित आपल्यावर चालून येईल. हें टाळण्याकरितां सुग्रीवाशीं आपण बेताबातानेंच लढावें, म्हणजे आपल्याविषयीं रामाच्या मनांत कृतज्ञता बुद्धि उत्पन्न होईल आणि मग सुग्रीवाच्या जीवाला धोका नाहीं असें पाहिल्यावर तो आपणावर विनाकारण बाण टाकण्याचें पाप करणार नाहीं, असा वालीचा मनोदय दिसतो; पण वालीच्या मुष्टिघातामुळें जर्जर होऊन सुग्रीवाचे प्राण कासावीस होऊं लागतांच रामानें पुढें येऊन वालीवर बाण फेंकला. कारण सुग्रीवाचा अधिक अंत पहाणें त्यास धोक्याचें वाटलें असावें. हा बाण वालीच्या छातीवर मारण्यांत आला. तेव्हां अर्थातच तो समोरून मारलेला होता. पाठीमागून लपूनछपून मारलेला नव्हता. शिवाय रामानें धनुष्याची प्रत्यंचा चढविली, त्या वेळीं एवढा आवाज झाला कीं, ' प्रदुद्रुवुर्मृगाश्चैव युगांत इव मोहिताः ' ( ४।१६।३४ ) असें त्याचें वर्णन केलेलें आहे. वालीच्या समोरच ही गोष्ट झाल्यानें राम आपल्यावर शरसंधान करीत आहे ही गोष्ट वालीच्याहि लक्षांत येणें साहाजिक होतें आणि या बाणाचा तडाका बसल्यानंतर वालीनें रागानें रामाला जो प्रश्न केला, त्यांत मी दुसऱ्याशीं युद्ध करीत असतां तूं माझ्यावर बाण कां फेंकलास असा प्रश्न विचारला असून तूं गुप्तपणानें बाण कां टाकलास असा त्यानें प्रश्न केलेला नाहीं. यावरून रामाशीं युद्ध करण्याचें टाळण्याची आपली युक्ति साधली नाहीं म्हणून त्याचा दोष वालि रामावर लादूं पहात आहे असें दिसतें. सुग्रीवाचें संरक्षण करण्याचें वचन देऊन त्याच्याबरोबर रणभूमीवर आल्यानंतर त्याच्या प्राणावर संकट येऊन बेतेपर्यंत किंवा वालीची आपल्याशीं लढण्याची

इच्छा प्रकट होईपर्यंत वाट पहाणें रामाला प्राप्त होतें, असें कोणीहि म्हणूं शकणार नाहीं.

## दांपत्यधर्म विरुद्ध राजधर्म.

रामाच्या चारित्र्यावर घेतला जाणारा आणखी एक आक्षेप सीतात्यागाचा होय. रावणाच्या वधानंतर लंकेंत एक वेळा दिव्य करून सीतेनें आपल्या शुद्धते-विषयीं खात्री पटविली असतां यःकश्चित् रजकाच्या वचनावरून श्रीरामानें गर्भवती अशा सीतेचा त्याग केला हें दांपत्यनीतीला व स्त्रीदाक्षिण्याला विरोधक होय असा आक्षेपकांचा रोख दिसतो. रामचरित्रांत सगळे सद्गुण एकांगी वैयक्तिक असेच वर्णिलेले आहेत. व्यक्तिधर्म व समाजधर्म यांचा झगडा कोठेंच दाखविला नाहीं, असें आम्हीं पूर्वी दाखविलेंच आहे; पण त्या विधानाला प्रस्तुत स्थळ अपवादीभूत असें आहे. पतिधर्मास अनुसरून रामाला सीतेचा त्याग करण्याचें बिलकुल कारण नव्हतें. कारण त्याला स्वतःला सीतेच्या निष्पापीपणाविषयीं खात्री पटलेली होती. परंतु राजा या नात्यानें प्रजाजनांना नीतीचें व धर्माचें योग्य वळण लावण्याकरितां त्यास सीतात्याग करणें भाग पडलें.—व्यक्तिधर्मापेक्षां राजधर्म हा केव्हांहि अधिक प्रबल असल्यानें राजधर्माच्या पूर्ततेकरितां व्यक्तिधर्माचें बलिदान करावें लागलें. अशा परिस्थितींत रामचंद्राचा पत्नीत्याग हा सद्धेतुप्रेरित असून समाजाच्या कल्याणाकरितांच त्याचा अवलंब केला असल्यामुळें तो दोषास्पद ठरत नाहीं.

'महाराष्ट्रिय' यांच्या समालोचनेंतील सर्वच प्रकरणें विचारपूर्वक, साधार व मार्मिकतेनें लिहिलीं गेलीं आहेत. त्यांतल्या त्यांत रामायणकालीन लोकस्थिति, रामायणांतील राक्षस व वानर, रामायणांतील प्रक्षिप्त भाग, कालपरामर्ष, स्थलनिर्णय आणि रामायणाचे अवतार हे भाग विशेष विस्तारपूर्वक व तौलनिक बुद्धीनें लिहिलेले आहेत. लोकस्थिति या भागांत राजसत्तेची उपपत्ति, राज्यकारभारांत प्रजेची संमति आणि प्रजेच्या अधिकाराविषयीं आक्षेप हे भाग विशेष मननीय आहेत. आणि रावबहादुर विष्णु मोरेश्वर महाजनी यांच्या आक्षेपांचें खंडण अत्यंत समर्पक झालेलें आहे. रामायणांतील वर्णनांतून लोकस्थिति-

दर्शक जितकी कांहीं माहिती काढतां येण्यासारखी आहे तितकी सर्व यांत संग्रहीत केलेली आहे. त्यावरून रामायणकालीन संस्कृति आणि समाजाची प्रगति यांचा उत्तम प्रकारें बोध होतो. स्त्रियांचा अधिकार, त्यांचें अध्ययन आणि त्यांची सामान्य स्थिति याविषयींचें जें वर्णन रामायणांत आलें आहे त्यावरून आर्य-समाजांत स्त्रियांची योग्यता केवढी मानली जात असे आणि पौर्वात्य देशांतील स्त्रियांच्या दुःस्थितीविषयींची पाश्चात्यांची कल्पना किती चुकीची व निराधार आहे, हें दिसून येतें.

## प्रचलित समजुतींचा खरपूस समाचार.

रामायणांतील राक्षस व वानर यांच्याविषयीं ज्या प्रचलित कल्पना आहेत त्यांना या समालोचनेंतील विवेचनानें पुरताच धक्का दिलेला आहे. रामायणांत राक्षसांचें जें वर्णन आहे त्यावरून त्यांच्यांत व मानवजातींत विशेष अंतर नव्हतें असें समालोचनाकारांनीं दर्शविलें आहे. वानरांच्या वर्णनावरूनहि तसेंच अनुमान निघतें. तथापि राक्षस हे स्वरूपतः किंवा धर्मतः मानवजातीच्या-सारखेच होते असें म्हणवत नाहीं. वानरांच्या संस्कृतीविषयीं तर राक्षसांच्या-हूनहि अधिक संदेह वाटतो. पुष्कळच ठिकाणीं वानरांच्या आचाराचें व व्यव-हाराचें जें वर्णन आहे तें मनुष्यजातीहून भिन्न आहे. तसेंच सर्वच वानरांचा एकाच वर्गांत समावेश करितां येईल असेंहि वाटत नाहीं; आणि वानरांच्या स्वरूपाविषयींची कोणतीहि एक कल्पना निःसंदेह व ठाम ठरत नाहीं. अशा परिस्थितींत राक्षस व वानर यांचें स्वरूप, स्वभावधर्म, रहाणी, आहार, विहार, संस्कृति आणि शिक्षण यांविषयींची सर्व उपलब्ध माहिती एकत्र ग्रथित कर-ण्याची कामगिरी समालोचनाकारांनीं निरलसपणें केलेली आहे. त्यांतून कोणता भाग आधारभूत व कोणता गौण मानावयाचा व त्यावरून सर्वत्र सुसंगत दिसेल असें कोणतें अनुमान काढावयाचें तें वाचकां-नींच ठरवावें.

दंतकथा आणि संदिग्ध परामर्ष या दोन भागांत समालोचनाकारांनीं प्रचलित समजुतींचा खरपूस समाचार घेतला आहे. मुळांत अल्पांशानेंहि

आधार नसतां असल्या दंतकथांचें पीक कसें पिकतें, त्याचा सर्वत्र प्रसार कसा होतो आणि हरळीच्या मुळीप्रमाणें त्यांचा कितीहि वेळ उच्छेद केला तरी त्या दंतकथा कायमच्या कशा नष्ट होत नाहींत याचें आश्चर्य वाटतें. रामायणांतील निःसंदिग्ध अशा ऐतिहासिक भागाचें जेवढें ज्ञान जनतेंत पसरलेलें असेल त्यापेक्षां असल्या दंतकथांचेंच ज्ञान जनतेंत अधिक पसरलेलें असतें. आणि विशेष आश्चर्याची व खेदाची गोष्ट अशी कीं, कालांतरानें असल्या दंतकथाच ऐतिहासिक सत्याची जागा पटकावतात आणि सत्य गोष्टींना आपल्या हक्कांची शाबिती करून या दंतकथांना पदच्युत करणें जड जातें ! एवढेंच नव्हे तर ज्या ऐतिहासिक वर्णनाचा दंतकथांशीं मेळ न बसेल तें ऐतिहासिक वर्णनच खोटें असला उलटा न्याय सुरू होतो ! याला रामायणांतलेंच उदाहरण द्यावयाचें झाल्यास सीतास्वयंवराचे वेळीं रावण शिवधनुष्यभंग करण्याकरितां पुढें आला व तें धनुष्य त्याच्या अंगावर पडून भरसभेंत त्याची विटंबना झाली, हें देतां येईल. या दंतकथेला मूळ रामायणांत कोठेंच आधार नाहीं. परंतु आधुनिक कालांत जर एखादा कीर्तनकार सीतास्वयंवराचें आख्यान लावून त्यांत रावणाच्या फजितीचें वर्णन न करील तर श्रोतृसमाज त्या कीर्तनकारासच अज्ञ ठरवील ! अशाच मासल्याचें ऐतिहासिक कालांतलें उदाहरण द्यावयाचें झाल्यास, सवाई माधवराव हा गंगाबाईच्या पोटीं जन्मास आलेला नसून तो सोनारणीचा मुलगा होता ही दंतकथा वरच्याच्या तोडीची म्हणून देतां येईल. कितीहि इतिहास-संशोधकांनीं ती सप्रमाण खोडून काढली तरी ती पुनःपुनः डोकें वर काढल्या-वांचून रहात नाहीं ! महाभारतांतील अर्जुनानें त्रिदंडी संन्यास घेतल्याची कथा किंवा वत्सलाहरणाची गोष्ट अशाच मासल्याची आहे. असले गैरसमज कितीहि वेळां खोडून काढले तरी त्यांचें निर्मूलन होत नाहीं; तरीपण असल्या दंतकथां-च्या खऱ्या स्वरूपाचें आविष्करण करणें हें सत्यान्वेषी इतिहासकाराचें कर्तव्यच आहे व त्या दृष्टीनें 'महाराष्ट्रिय' यांनीं यच्चयावत् दंतकथांचा व गैर-समजुतींचा यथायोग्य समाचार या पुस्तकांत घेतला आहे व तो भाग चांगला साधला आहे.

## आंकड्यांचें गौडबंगाल.

प्रचलित दंतकथांचा व संदिग्ध स्थलांचा परामर्ष घेत असतांना वनवासास निघतेवेळीं राम व सीता यांचें वय अनुक्रमें किती होतें याविषयींचा ऊहापोह 'महाराष्ट्रिय' यांनीं केला आहे. वास्तविक पहातां याचा समावेश संदिग्ध स्थलांत न करतां तें एक कोडेंच मानलें पाहिजे. महाभारतांतहि जेथें जेथें वयोमानाचा उल्लेख आला आहे त्या त्या ठिकाणीं अशींच विसंगत वर्णनें असल्यामुळें तींहि कोडीं सोडविणें अशक्यप्राय झालें आहे. वयाच्या आंकड्यांसंबंधानेंच नेहमीं असली संदिग्धता आढळून येते. यावरून असें अनुमान निघतें कीं, कोणाहि व्यक्तीच्या वयाचा उल्लेख करणें हें अपशकुनासारखें मानलें जात असावें. यास्तव सहसा कोणाच्या वयाचा उल्लेख करावयाचा नाहीं आणि जेथें तसा उल्लेख टाळतांच येत नसेल तेथें कांहींतरी एक आंकडा मनांत योजून तो वयाच्या वर्षांच्या संख्येंतून वजा करून वय सांगण्यांत येत असावें. आणि हा काल्पित आंकडा सर्वांचा सारखाच असणें संभवनीय नसल्यामुळें एकानें सांगितलेल्या वयाचा दुसऱ्याशीं मेळ बसत नसावा. भारतीय युद्धाचे वेळीं अभिमन्यूचें वय सोळा वर्षांचें होतें असें मानणें योग्य नसल्यामुळें त्यावरून वरील कल्पना बसविलेली आहे. कित्येक टीकाकार अशा स्थळीं प्रत्यक्ष सांगितलेला आंकडा हा उपनयनाच्या कालापासूनचा आहे अशी कल्पना करून, आणि क्षत्रियांचें उपनयन अकरावे वर्षीं होतें म्हणून त्याच्या वयांत ११ वर्षें मिळवून, खरें वय ठरवीत असतात. ऋग्वेदांत सूक्तांची किंवा ऋचांची संख्या सांगतांना २० हा आंकडा वजा करून ती सांगितलेली असते आणि मग टीकाकार 'अनुक्ता संख्या विंशतिः' या सूत्राचा आधार घेऊन सांगितलेल्या आंकड्याचा वस्तुस्थितीशीं मेळ घालतात. आंकड्याच्या संबंधाच्या अशा अनेक भानगडी असल्यामुळें वनास जातेवेळीं श्रीरामाचें वय १८ वर्षांचें होतें असें जरी एखादे ठिकाणीं सांगितलेलें असलें तरी तोच आंकडा खरा असें धरून चालण्यांत अर्थ नाहीं.

जी अडचण वयाच्या आंकड्यासंबंधानें तीच अडचण सामान्यतः प्राचीन

ग्रंथांतील कोणत्याहि आंकड्यासंबंधानें येऊन पडते. 'दशरथ राजानें साठ हजार वर्षें राज्य केलें.' 'पांच हजार वर्षें वयाचा एक बालक रामाच्या राज्यांत अल्पवयी मरण पावला.' इत्यादि वाक्यांतून हजार या शब्दाला कांहींच अर्थ नाहीं' असें वाटूं लागतें आणि म्हणूनच असल्या ग्रंथांतील कोणताहि एखादा आंकडा सर्वस्वीं ग्राह्य धरून त्यावरून गणितदृष्ट्या अनेक अनुमानें काढीत बसणें हेंहि चुकीचें ठरेल. उदाहरणार्थ, अगस्त्य ऋषीनें दंडकारण्याचें वर्णन करितांना तें अरण्य विंध्य पर्वतापासून सहस्र योजनें आहे असें रामायणांत म्हटलें आहे. योजन शब्दाचें मोजमाप कितीहि लहान धरलें तरी विंध्य पर्वताच्या पायथ्यापासून दंडकारण्य एक हजार योजनें असूं शकत नाहीं. हीच स्थिति मारुतीच्या समुद्रोल्लंघनासंबंधानेंहि आहे. हिंदुस्थानच्या कोणत्याहि दक्षिण टोंकापासून मोजलें तरी लंका बेट शंभर योजनें दूर जाऊं शकत नाहीं. यास्तव पौराणिक ग्रंथांतील आंकड्यांचा सूक्ष्मतेनें बरोबर मेळ घालीत बसणें निष्फलच ठरतें.

## स्थलनिर्णय.

रामायणांतील स्थलनिर्णयासंबंधानें 'महाराष्ट्रिय' यांनीं सूक्ष्म व सविस्तर वर्णन केलें आहे आणि त्यांत तत्पूर्वींच्या अनेक लेखकांचे अपसिद्धांत खोडून काढले आहेत. स्थलनिर्णयांत पंचवटी, किष्किंधा व लंका या तीनहि महत्त्वाच्या स्थलांसंबंधीं अनेकांनीं अनेक तर्क सुचविले आहेत. परंतु गोदावरीच्या उगमाजवळचें जनस्थान हीच पंचवटी, तुंगभद्रा नदीच्या तीरावरील हंपीनजीकचा प्रदेश हीच किष्किंधा, आणि सिंहलद्वीप हीच लंका, याविषयीं शंका घेण्याचें कांहींहि कारण नाहीं. हल्लींच्या भूगोलांत जसें स्थलांचें अंतर मोजमाप घेऊन दिलेलें असतें, तसेंच अंतर वाल्मीकींनीं दिलें आहे, असली असंभवनीय कल्पना टाकून दिली आणि कोणत्याहि आंकड्याला श्रुतिप्रमाणासारखें प्रामाण्य द्यावयाचें नाहीं असा वर दिलेला इषारा लक्षांत घेतला, म्हणजे स्थलनिर्णयांत विरोध दिसून येत नाहीं आणि संशयालाहि कारण उपस्थित होत नाहीं.

पंचवटी हें स्थान गोदावरीच्या मुखाकडे नसून गोदावरीच्या उगमाजवळच आहे असें 'महाराष्ट्रिय' यांनीं अनेक प्रमाणें देऊन ठरविलें आहे; आणि कै०

ओक यांचें मत खोडून काढलें आहे. भद्राचलम् नजिक गोदावरीचें पात्र खोल व रुंद असून तेथें गोदावरीला पायउतार असणें संभवनीय नाहीं आणि तेथून लंकेच्या दिशेनें दक्षिणेकडे जाऊं लागल्यास कृष्णा, पेन्नार, कावेरी वगैरे नद्या ओलांडतांना हीच अडचण भासणार, असा बलवत्तर आक्षेप भद्राचलम् नजीक पंचवटी मानण्याच्या कल्पनेवर येऊं शकतो हें महाराष्ट्रिय यांचें म्हणणें सयुक्तिकच आहे. त्यालाच पुष्टिकारक म्हणून आणखी असेंहि सांगतां येईल कीं, नद्यांच्या मुखाजवळचा भूप्रदेश हा, दिवसेंदिवस नवीन गाळ येऊन बसत असल्यानें, वाढत असतो. हा क्रम लक्षांत घेतल्यास रामायणकालापासूनच्या साडेचार हजार वर्षांच्या कालांत गोदावरीच्या मुखाकडे कितीतरी नवी भर पडली असेल. ती लक्षांत घेतल्यास भद्राचलम् नजीक जेथें हल्लीं पंचवटी दाखविली जाते तेथें पूर्वीं जमीन तरी होती कीं नाहीं अशी शंका येऊं शकेल. हा आक्षेप नदीच्या उगमाजवळील प्रदेशासंबंधानें घेतां येत नाहीं हें उघड आहे.

पण याच्याहिपेक्षां खुद्द रामायणांतलेंच आणखी एक प्रमाण देतां येईल. अगस्त्य ऋषीनें दंडकारण्यांतल्या आपल्या नवीन वसाहत केलेल्या प्रदेशाचें वर्णन करितांना

प्रवृत्ताश्च पुनर्नद्यः फुल्लपंकजमंडिताः (अरण्य १३।४१)

असें म्हटलें आहे. अर्थातच अगस्तीच्या आश्रमानजीकच्या प्रदेशांतून पुनः नद्यांचा उगम झाला असें यांत स्पष्ट म्हटलें आहे. यावरून अगस्तीचा आश्रम गोदावरीच्या उगमाच्या समीप होता, मुखाच्यासमीप नव्हे, हें उघड आहे.

पंचवटीचें स्थान निश्चित झाल्यावर किष्किंधा ओघानेंच त्याच्या दक्षिणेस मानणें प्राप्त आहे व ती हास्पेटनजीक होती असा जो प्रवाद आहे तो ग्राह्य मानण्यास बलवत्तर कारणहि आहे. नाशिकहून हास्पेटला जातांना वाटेंत शबरीवन ऊर्फ सुरेबन हें गांव लागतें व तें अद्यापिहि उत्तम बोरांविषयीं प्रसिद्ध आहे. हंपीनजीक ज्या टेंकडीवर रामलक्ष्मणांनीं पावसाळ्याचे चार महिने वास्तव्य केलें होतें ती टेंकडीहि अद्यापि रामनदुर्ग म्हणून प्रसिद्ध आहे. भद्राचलम् नजीक अगस्तीचा आश्रम कोठें असल्याविषयीं प्रसिद्धि नाहीं.

पण नाशिक व नगर यांच्या दरम्यान अकोला तालुक्यांत अगस्तीचें देऊळ अद्यापि प्रसिद्ध आहे आणि असें अगस्तीचें देऊळ दुसरीकडे कोठेंहि असल्याचें ऐकिवांत नाहीं. यावरून पंचवटी व किष्किंधा यांचीं स्थानें निश्चित ठरतात.

किष्किंधेच्या दक्षिणेस विंध्याद्रि पर्वत सांगितला आहे, ही एक मोठी अडचण पुढें उभी करून कित्येक लेखक किष्किंधेला हल्लींच्या विंध्यपर्वताच्या उत्तरेस नेऊन बसवितात. परंतु जशा एकाच नांवाच्या अनेक व्यक्ति असूं शकतात त्याप्रमाणें एकाच नांवाचे अनेक डोंगरहि असणें असंभवनीय नाहीं. आणि असाच दुसरा एक विंध्याचल म्हैसूर संस्थानच्या दक्षिणभागांत असल्याचा प्राच्य संशोधक पार्गीटर यानें रॉयल एशियाटिक सोसायटीच्या जर्नलमध्यें १८९४ सालींच उल्लेख करून ठेवला आहे. त्यावरून किष्किंधेच्या दक्षिणेस विंध्याचल कसा आला या शंकेचें निरसन होतें.

लंका बेटाच्या स्थलनिर्णयासंबंधानें इतकादेखील ऊहापोह करण्याचें कारण नाहीं. लंका दक्षिण समुद्रांत होती याविषयीं कोणासच संशय राहिलेला नाहीं; पण महेंद्र पर्वताचें दक्षिणटोंक आणि लंकेचें उत्तरटोंक यांमध्यें अंतर किती योजनें होतें याविषयीं मतभेद दृष्टीस पडतो. पण पूर्वीं सांगितल्याप्रमाणें शंभर योजनें ही संख्या कांहीं निश्चित समजावयाची नाहीं हें लक्षांत ठेवल्यास सिंहलद्वीप हेंच लंका बेट याविषयीं शंका रहात नाहीं. सिंहलद्वीपाच्या सभोंवतालच्या कांहीं भागांत आणि विशेषतः मालदीव बेटापासून दक्षिणेस दक्षिण ध्रुवापर्यंत असा एक प्रदेश आहे कीं, तेथें पाण्याची खोली अगदींच कमी आहे. यावरून पूर्वीं एका काळीं त्यांतला कांहीं भाग समुद्राच्या सपाटीवर असणें असंभवनीय नाहीं. सिंहलद्वीप व मल्लद्वीप ( मालदीव ) हीं दोन्ही बेटें प्राचीन काळीं एकमेकांला जोडलेलीं होतीं, असें मानिल्यास लंकेचा विस्तारहि रामायणांतील वर्णनाशीं जुळेसा होतो आणि विषुववृत्तहि तेथून नजीकच असल्यानें लंकेचे अक्षांश शून्य मानले गेले हेंहि यथार्थच ठरतें. सिंहलद्वीप व मल्लद्वीप हीं एकमेकांशीं जोडल्यास लंकाबेट महेंद्रपर्वताच्या थेट दक्षिणेस येतें आणि दक्षिणहिंदुस्थानचें

टोंक हल्लीं जेथपर्यंत पसरलेलें आहे तेथपर्यंत तें पूर्वी ( साडेचार हजार वर्षांपूर्वीं ) पसरलेलें नसावें व त्याची मर्यादा त्रिवेंद्रम् व तिरुचेंदूर एथपर्यंतच असावी असें मानल्यास तेथून लंकेचें अंतर हें शंभर योजनां-जवळजवळ येऊं शकेल.

## कालनिर्णय

स्थलनिर्णयानंतर महाराष्ट्रिय यांनीं केलेल्या कालनिर्णयाचा विचार केल्यास त्यांतहि त्यांनीं आपली विवेचक अशी तर्कपद्धति उपयोगांत आणलेली दिसत आहे. रामायणकालीं वर्षारंभ पौष महिन्यांत होत असे असें एक विधान त्यांनीं रामायणांतून शोधून काढलें आहे; परंतु कालनिर्णयाच्या दृष्टीनें त्याचा फारसा उपयोग होत नाहीं आणि कदाचित् झालाच तर तो त्यांच्या कालनिर्णयाला बाधक असाच होईल. महाभारतकालांतील वर्षारंभ मार्गशीर्षांत होत असे असें ' मासानां मार्गशीर्षोऽहम् ' या वचनावरून मानल्यास रामायणकालीं वर्षा-रंभ मार्गशीर्षानंतरच्या पौष महिन्यांत न होतां तो मार्गशीर्षाच्या आधींच्या महिन्यांत व्हावयास पाहिजे; परंतु महाभारतकालीं वेदांगज्योतिषपद्धतींतील कालगणना चालू होती असें मानिल्यास त्या वेळचा वर्षारंभ माघ महिन्यांत येतो. आणि रामायणकाल हा तत्पूर्वींचा असल्यानें रामायणांतील वर्षारंभ पौषांत असणें ओघानेंच प्राप्त होतें. पण हे केवळ तर्कच आहेत. कोणत्याहि काल-गणनापद्धतींत पौषमासांत वर्षारंभ असल्याचा उल्लेख आढळत नाहीं. यास्तव रामायणांतील संदिग्ध वचनांवरून पौषमासांत वर्षारंभ होत असे असलें अनु-मान काढण्याचें कारण नाहीं. स्वतंत्र प्रमाणांवरून रामायणाचा काल शकपूर्व २४५० च्या सुमाराचा ठरविण्यांत आला आहे व तोच इतर अनेक प्रमा-णांनीं सिद्ध होत आहे. महाभारतीय युद्धाचा काल शकपूर्व २०१४ असावा असें अनेक प्रमाणांवरून अलीकडे ठरविण्यांत आलें आहे आणि रामापासून भारतीय युद्धांतील बृहद्बलापर्यंत तीस पिढ्या झाल्या असल्यानें या दोहोंच्या दरम्यानचें अंतर ४५० वर्षें धरण्यास हरकत नाहीं. अर्थातच या अनुमान-पद्धतीनेंहि रामायणाचा काल शकपूर्व २४५० च्या सुमाराचा येतो. आणि

सिंहलद्वीपासंबंधाच्या राजावली ग्रंथांतहि जवळजवळ तोच काल दिला आहे. नागपूरचे रा. दप्तरी यांनीं रामजन्मकालनिर्णय नांवाचा निबंध लिहिला आहे आणि त्यांत रामजन्मकाल शकपूर्व १६८७ असा दिला आहे. दप्तरी यांच्या या मताचें खंडण महाराष्ट्रिय यांनीं सप्रमाण केलें असून तें सर्व मूळांतूनच वाचण्याची आम्ही वाचकांना शिफारस करितों.

कालनिर्णयाच्या संबंधांत एका महत्त्वाच्या प्रमाणाचा उल्लेख करणें जरूर वाटतें. कोणत्याहि ग्रंथांत दृष्टांतादाखल प्राचीन कथांचा म्हणून अनुवाद करतांना कित्येक वेळां कालविपर्यासाचा दोष घडून येतो. पण रामायणांत दृष्टांतादाखल म्हणून ज्या कांहीं उपकथा आलेल्या आहेत, त्यांत असा कालविपर्यासाचा दोष आढळून येत नाहीं. अशा सर्व उपकथा परिशिष्ट 'अ'मध्यें ग्रंथकारांनीं दिल्या आहेत व त्या सर्व रामायणाचा जो आपण काल ठरविला आहे त्याहून प्राचीन कालच्या अशाच आहेत. याच परिशिष्टांत इंद्र व बली यांची एक कथा दिली आहे व त्या कथेस कोठें आधार आढळल्यास तो कळवावा असें सुचविलें आहे. बलीच्या संबंधानें बटु वामनाची तेवढी कथा सर्वश्रुत आहे; पण त्याखेरीज महाभारतांत इंद्र व बली यांच्या अनेक कथा आहेत आणि त्यांत इंद्रानें बलीस वचनबद्ध केल्याचेंहि वर्णन आहे. शांतिपर्वांतील १२४ व्या अध्यायांत इंद्र व प्रल्हाद यांचा संवाद आहे व तो या ठिकाणीं अधिक समर्पकतेनें लागू होतो; पण त्यांत बलीच्या ऐवजीं प्रल्हादाचें नांव असल्यानें ती कथा येथें उद्दिष्ट नसावी असें वाटतें. त्याच शांतिपर्वांत अध्याय १२५ मध्यें इंद्र व लक्ष्मी यांचा संवाद आहे व तीहि कथा इंद्र व प्रल्हाद यांच्या संवादासारखीच आहे; पण तींत बलीकडून प्रत्यक्ष वचन घेतल्याचा उल्लेख नाहीं. तेव्हां या दोहोंतून कोणत्या कथेला रामायणांतला उल्लेख लागू आहे हें निश्चित सांगतां येत नाहीं.

## रामकथामाहात्म्य.

असो. रामकथा हें एक इहलोकींचें अमृत आहे. त्याचें कितीहि सेवन केलें तरी तृप्ति थोडीच होणार आहे ! वाल्मीकिमहर्षीपासून प्रस्तुत कालांतील

आधुनिक कवीपर्यंत रामकथा कितीतरी जणांनीं कितीतरी विविध प्रकारांनीं वर्णिली आहे. त्यांतून कित्येक प्राचीन, सर्वमान्य व मुख्यतः संस्कृत भाषेंतील ग्रंथांची माहिती महाराष्ट्रियांनीं ' रामायणाचे अवतार ' या भागांत संकलित केली आहे; पण कितीहि शोध करून लिहिलें तरी हा भाग अपुराच राहणार. मराठी कविवर्य मोरोपंत यांनीं एकट्यांनींच १०८ रामायणें केलीं असा प्रवाद आहे. मोरोपंतांचें काव्य तर अगदीं अलीकडच्या काळांतलें; पण त्यांच्याहि सगळ्या रामायणांचा नीटसा पत्ता लागत नाहीं. मग वाल्मीकीच्या काळापासून ज्या सहस्रावधि कविश्रेष्ठांनीं रामकथेचा अनुवाद केला असेल त्यांची यथार्थ कल्पना आतां कशी येऊं शकेल ? तथापि रामायण हा ग्रंथ किती लोकप्रिय आहे याची किंचित् कल्पना ' रामायणाचे अवतार ' या भागांतील 'महाराष्ट्रिय' यांच्या विवेचनावरून वाचकांना होऊं शकते. रामकथेची खरी महती श्रीसमर्थ रामदासांनीं वर्णिली आहे ती अपूर्वच आहे.

जेणें फेडिला पांग ब्रह्मादिकांचा । बळें तोडिला बंद त्या त्रीदशांचा ॥
म्हणोनी कथा थोर या राघवाची । जनीं ऐकतां शांति होते भवाची ॥

यांत समर्थांनीं म्हटल्याप्रमाणें देवांचे ' बंद ' तोडून त्यांना श्रीरामचंद्रानें बंधमुक्त केलें आणि ब्रह्मादिकांचा पांग फेडला, म्हणूनच राघवाची कथा सर्वांत थोर आहे, हें कथेचें मर्म वाचकांनीं आपल्या हृदयांत कोरून ठेवण्यासारिखें आहे. रामायणांतील अवांतर कथाभागांविषयीं कितीहि मतमतांतरांचा गलबला ऐकूं आला तरी रामावताराच्या मुख्य कार्यभागाविषयीं मतभेद कोठेंच नाहीं. रावणासारख्या त्रैलोक्यास गांजणाऱ्या मदोन्मत्त शत्रूचा प्रत्यक्ष त्याच्या राजधानीवर चालून जाऊन वानरादिकांच्या हातून पराभव करविण्यासारखें अश्रुतपूर्व असें महत्कार्य करून श्रीरामप्रभूनें सर्व जगताला एक प्रकारचा धीर दिला आहे.

हिणासारिखे देव ते दीन जाले । नसे शक्ति ना युक्ति पोटीं गळाले ॥
भयाभीत ते कांपती दैन्यवाणे । बहु गांजिले दुःख तें कोण जाणे ॥

इतक्या परमावधीला ज्यांची दुःस्थिति येऊन पोंचली होती त्यांच्याहि संकटाचें निवारण रावणासारख्या कर्दमकाळाचा निःपात करून रामानें केलें, ही कथा

ऐकून ज्याला धीर येणार नाहीं तो खराच करंटा मानला पाहिजे. रामकथेचें माहात्म्य वर्णन करून समर्थांनीं त्या वेळच्या जनतेला—

' धीर्धरा धीर्धरा तकवा । हडबडूं गडबडूं नका ॥
काळ देखोनि वर्तावें । सांडावें भय पोटिंचें ॥
धरावा धीर तो मोठा । विचारें पाहतां बरें ॥
अधीर माणसें खोटीं । काम कांहीं कळेचिना ॥
करील प्रेत्न जितुका । तयास लाभ तीतुका ॥

असा मनाला खंबीरपणा आणणारा उपदेश केला. अशा रीतीनें या रामकथेनें व्यक्तिमात्रालाच नव्हे तर राष्ट्रालाहि तारिलें आहे. असल्या रामकथेची महती जितकी वर्णावी तितकी थोडीच आहे. पण ती कथा मूळांत कशी आहे, वाल्मीकिमहर्षींनीं ती कोणत्या हेतूनें गायिली, पुढें तिचें रूपांतर कसकसें होत गेलें, तिच्यांत प्रक्षिप्त भागांची वारंवार भर कशी पडत चालली, तीमुळें रामायणांतील मुख्य कथाभागाला व अद्भुतरम्य अशा रामकार्याला गौणत्व येऊन वाचकांचा दृष्टिकोन कसा बदलत चालला, रामायणांतील कथाभाग ऐतिहासिक स्वरूपाचा असतांना त्यांत कविकल्पित वर्णनाची भलती भर पडत चालल्यामुळें त्या कथेला केवळ श्रद्धामय पुराणाचें कसें स्वरूप येत चाललें या सर्व प्रश्नांचें यथार्थ ज्ञान होण्याला वाचकांच्या अंगीं विवेचक शक्तीची वाढ झाली पाहिजे.

अशी विवेचक बुद्धि चालवून 'महाराष्ट्रिय' यांनीं रामायणाची ही समालोचना तयार करून वाचकवर्गापुढें मांडली, हा त्यांचा वाचकांवर महदुपकार आहे. पौर्वात्य पद्धतीच्या विद्वानांत चिकित्सक बुद्धीचा अभावच नसला तरी, चिकित्सक बुद्धि चालवून तीपासून निघणारीं अनुमानें मान्य करण्यास व विशेषत: तीं प्रसिद्ध करण्यास पौर्वात्य पंडित तयार नसतात; असा एक सर्वसामान्य दोषारोप पाश्चात्य पंडितांकडून पुढें येत असतो. त्याला प्रत्युत्तर म्हणून असेंहि म्हणतां येईल कीं, पाश्चात्यांच्या चिकित्सक बुद्धीच्या अतिरेकानें त्यांना कोणत्याहि ग्रंथाचें महत्त्व साकल्यानें प्रतीतच होत नाहीं; कारण त्यांना डॉक्टराप्रमाणें चिरफाड करण्याची संवयच लागल्यामुळें

कोणत्याहि ग्रंथांत सौंदर्य असें त्यांना कोठेंच आढळत नाहीं. पण असला हा दुहेरी अतिरेक सोडून दिल्यास आपल्याला चिकित्सक बुद्धीला अगदींच रजा न देतां कवीच्या काव्याचा साकल्यानें रसास्वादहि घेतां येईल. रामायणाची समालोचना लिहितांना 'महाराष्ट्रिय' यांनीं असा हा 'सुवर्णमध्य' साधला आहे. रामकथेविषयींचें त्यांचें अलोट प्रेम कोठेंहि भंग पावलेलें नाहीं. तथापि सारासारविचार केल्यावांचून कोणतीहि गोष्ट सिद्ध मानावयाची नाहीं, अशा कांटेकोर विवेचक बुद्धीचा त्यांनीं सर्वत्र अवलंब केला आहे. यामुळेंच रामायणाचें खरें आद्यस्वरूप त्यांच्या ग्रंथांत पाहावयास मिळतें. 'रामायणकालीन लोकस्थिति' हा भाग त्या दृष्टीनें अत्यंत चिकित्सापूर्वक लिहिला गेला असल्यानें रामायणकालच्या भरतखंडाचें चित्र आपल्या डोळ्यापुढें यथातथ्य उभें राहतें, आणि त्यावरून रामायणकालीन समाज हा सांस्कृतिकदृष्ट्या कोणत्या श्रेष्ठ दर्जाला पोंचला होता आणि आपली आर्यसंस्कृति किती प्राचीनतर आहे याचाहि चांगला उलगडा होतो. अलीकडे सिंध प्रांतांत व पंजाबांत जे प्राचीन संस्कृतीचे अवशेष सांपडले आहेत त्यांवरून आर्यावर्तांचें आद्य गुरुत्व प्रस्थापित होत चाललें आहे. पण त्या संस्कृतीची खरी कल्पना काळाच्या उदरांतून आतां कोठें बाहेर येणाऱ्या शेंपन्नास वस्तूंवरून यथार्थत्वानें येऊं शकणार नाहीं. तशी खरी कल्पना येण्याला 'आद्यकाव्य' म्हणून गाजलेल्या रामायणासारख्या जगद्वंद्य ग्रंथाकडेच आपल्याला धांव घेतली पाहिजे. असला हा अपूर्व ग्रंथ आपल्या देशाच्या भाग्यानें येथें निर्माण झाला आणि हा अमोलिक ठेवा आपण हजारों वर्षांच्या काळाच्या तडाक्यांतून वाचवूं शकलों ही केवढी तरी अभिमानास्पद गोष्ट आहे ! अशा या अमूल्य ग्रंथाचें पुनः एकवार चिकित्सापूर्वक आलोडन करण्याचा सुप्रसंग महाराष्ट्रिय यांनीं आणिला आणि मराठी भाषेंत एका अमोलिक ग्रंथाची भर घालून मराठींतील ग्रंथसंपत्ति वाढविली याबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार मानून हा समालोचना-ग्रंथपरिचय पूर्ण करितों.

पुणें,
मिति माघ कृ. ५।१८४९.

ज. स. करंदीकर.

---

# श्रीरामायण-समालोचना

अथवा

# रामायणाचा उपसंहार.

## भाग १ ला.

### रामायणाची योग्यता.

॥ इदं हि वेदैः समितं पवित्रमपि चोत्तमम् ॥
॥ आख्यानामुत्तमं चेदं पुराणमृषिसंस्तुतम् ॥
॥ अस्मिन्नर्थश्च कामश्च निखिलेनोपदेक्ष्यते ॥
॥ इतिहासे महापुण्ये बुद्धिश्च परिनैष्ठिकी ॥

महाभारत-आदिपर्व.

थोर भाग्य आम्हां भारतीयांचें, म्हणून रामायणासारखा अखिल जगताच्या गुरुस्थानीं शोभणारा ग्रंथ येथें निर्माण झाला! चरित्राची पवित्रता, विचारांची गंभीरता, हेतूंची उदात्तता व वर्णनाची बहुविधता, रमणीयता व विस्तृतता एवं-गुणविशिष्ट काव्यें निरनिराळ्या भाषांतून शोधूं लागल्यास फार विरळा सांपडतील! जगांत जीं कांहीं उत्तमोत्तम काव्यें विद्वज्जनांनीं ठरविलीं आहेत, त्यांची प्रत लाविण्याचें कोणीं मनांत आणिल्यास पहिल्या वर्गांतील काव्यांत या काव्यास स्थान देणें त्याला भाग पडेल. श्रीरामचरित्र स्वभावतः इतकें गोड आहे कीं, ज्याच्या ज्याच्या श्रवणेंद्रियावर त्याचा आघात होईल त्याला त्याला—तो सहृदय असेल तर—

वेड लाविल्याशिवाय तें कदापि सोडणार नाहीं. तशांत महर्षि वाल्मीकीसारख्यांची रसाळ, प्रासादिक व अधिकारयुक्त वाणी, यामुळेंच हें काव्य निर्माण झाल्याबरोबर खुद्द श्रीरामाच्या दरबारांत त्याची वाहवा होऊन दरबारांतील थोरथोर मुत्सद्दी, यज्ञाकरितां नानादेशांहून आलेले राजे व तपस्वी या काव्याच्या श्रवणांत गुंग होऊन गेले! आपण केलेल्या कृतीची विद्वज्जनांनीं प्रशंसा केलेली पाहून कोणत्या कवीला आनंद होणार नाहीं? परंतु हें स्वतः पाहाण्याचा योग येणें हें थोर भाग्याचें लक्षण समजलें पाहिजे. कवि निवर्तल्यावर त्याच्या काव्याचे देव्हारे माजविल्याचे प्रसंग फार आढळून येतात. तो बिचारा मात्र आपल्या परिश्रमाचें कोणी कौतुक करीत नाहीं असें पाहून "कालो ह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी" असें म्हणून दैवावर हवाला ठेवून स्वस्थ बसलेला असतो. अशा खेदमय स्थितींत त्यानें आपलें सारें आयुष्य कंठिल्यावर मग लोक आपल्या कर्तव्यास जागृत होतात. या बाबतींत वाल्मीकींचें भाग्य उत्कृष्ट होतें. त्यांचें काव्य जन्मतांच त्याचा फार प्रसार झाला; हें सिद्ध करण्यास फारसा पुरावा नको आहे. आज हजारों वर्षे तें आबालवृद्धमुखीं राहून टिकलें आहे, ही एक गोष्ट, त्या वेळीं लोकांत त्याचा केवढा प्रसार झाला होता हें सिद्ध करण्यास पुरेशी आहे. रामायणाच्या हल्लींच्या प्रतींत कांहीं भाग प्रक्षिप्त असल्यामुळें चाणाक्ष वाचकांस जरी मध्यें हिरमोड झाल्यासारखें होतें, तरी या काव्याचा स्वाभाविक सुगंध त्यायोगानें लोपला नसल्यामुळें हजारों वाचकांस रंजविण्याचें त्याचें सामर्थ्य अद्यापि कायम आहे. चाणाक्ष वाचकांस रामायणांत काय सांपडणार नाहीं? खरा कर्मयोगी कसा असावा याचें उदाहरण पाहिजे असेल तर तें रामायणांत आहे; संकटाचे वेळीं थोर पुरुष कसे वागतात हें रामायण वाचल्यास कळून येईल; राजानें प्रजाजनांचें अनुरंजन किती झटून केलें पाहिजे याचें सोदाहरण विवेचन रामायणांत केलें आहे; पितृभक्ति व बंधुप्रीति यांची उत्कटता रामायणांत पहावयास सांपडेल; गृहस्थाश्रमी पुरुषाचें आचरण कसें असावें याची जिज्ञासा असेल तर रामायण वाचून पहा म्हणजे ती पूर्ण होईल; पति व पत्नी यांचें परस्पर प्रेम कशा प्रकारचें असावयाचें हें रामायणांत आढळून येईल;—काय सांगावें!—रामायणांतील पात्रांनीं आपापलीं कामें इतकीं उत्कृष्ट रीतीनें बजाविलीं आहेत कीं, वाल्मीकीसारखे तपःस्वाध्याय-

निरत महर्षीहि रामचरित्र ऐकतांच तल्लीन होऊन गेले! रामचंद्राचें तरी हें केवढें भाग्य कीं, आपल्या हयातींत आपलीं चरित्रें होऊन तीं लोक अत्यंत प्रेमानें वाचीत आहेत, असें पाहण्याचा योग त्याला प्राप्त झाला! राजा या नात्यानें इतिहासांत त्याचा उल्लेख आल्यास त्यांत विशेष कौतुक मानण्यासारखें कांहीं नव्हतें. रामचंद्राचें महत्त्व तो राजकुलांत उत्पन्न झाला होता याकरितां नसून त्याच्या आंगच्या गुणांनीं तो सर्वांना पूज्य झाला होता, याच एका गोष्टींत आहे. ज्या ज्या ग्रंथांत त्याच्या नांवाचा उल्लेख केलेला आहे त्या प्रत्येकांत त्याच्या नांवाबरोबर त्याच्या गुणांचाहि निर्देश केला आहे, असें आढळून येईल. नुसतीं कारकीर्दीचीं वर्षे देऊन त्याच्या नांवाचा उल्लेख कोठेंहि केलेला नाहीं. हें महत्त्व रामचंद्रानें आपली जीवनयात्रा संपविण्यापूर्वी प्राप्त करून घेतलें; याच गोष्टीचें विशेष कौतुक वाटतें. असले पुरुष आमच्या राष्ट्रांत पुष्कळ झाले आहेत व होतहि आहेत; आणि त्यांनीं स्वतःबरोबर राष्ट्राचेंहि महत्त्व वाढविलें आहे. आमच्या देशास सुवर्णभूमि असें जें नांव दिलेलें आहे तें सांपत्तिकदृष्ट्या जरी सांप्रत विपरीत झालें असलें तरी तिच्या अंगीं असलीं रत्नें निपजविण्याचें सामर्थ्य अजूनहि कायम आहे. हें पाहून हृदय उचंबळल्याशिवाय राहत नाहीं.

## काव्याचा हेतु लोकशिक्षण.

महर्षि वाल्मीकीसारख्या तपस्व्याला रामायणाची रचना करण्याची आवश्यकता वाटली, यावरून त्यांची दृष्टि संकुचित नव्हती हें निःसंदेह दिसून येतें. त्यांची दृष्टि जर व्यापक नसती तर सारा संसारपाश तोडून अरण्यवासी झालेल्या या पुरुषाला रामचरित्र वर्णन करण्याची काय जरूर होती? अखिल जगतास तुच्छ मानण्याइतकें सामर्थ्य तपाच्या योगानें त्यांच्या अंगीं असतां, हें काव्य करून आपली जीवनयात्रा राजकृपेनें सुखमय करण्याची त्यांची इच्छा होती, असें म्हणतां येईल काय? स्वतांची आध्यात्मिक उन्नति करून घेतली म्हणजे आपली कर्तव्यसीमा संपली असें त्यांना वाटत नसावें. यापलीकडे आपलें कांहीं कर्तव्य नाहीं अशी आपल्या मनाची समजूत करून घेणें हाहि एक तऱ्हेचा स्वार्थसाधुपणा नव्हे तर काय? परमेश्वरानें ज्या लोकांत आपणास जन्म दिलेला आहे त्यांची आध्यात्मिक व लौकिक उन्नति करण्याची काळजी आपणास वाहिली

पाहिजे, हें वाल्मीकिमहर्षींना पूर्णपणें कळून चुकलें होतें. रामचरित्रासारखें सर्व बाजूंनीं परिपूर्ण असलेलें चरित्र लोकांपुढें ठेविल्यास आपला संसाराचा गाडा सुरळीतपणें चालविण्यास तें त्यांना कित्याप्रमाणें उपयोगी पडेल, हें जाणून महर्षींनीं रामायणाची रचना केली. नुसता तात्त्विक उपदेश केल्यानें त्याचा इष्ट परिणाम घडून येत नसतो. एखाद्या नवीन शास्त्राचा अभ्यास करावयाचा झाल्यास त्यांतील प्रमेयें समजावून घेतलीं तरी तीं हृत्पटलावर ठसत नाहींत; परंतु त्यांचें सोदाहरण विवेचन केलें तर शिक्षकाला श्रम कमी पडून शिष्याची तक्रार उरत नाहीं. दुर्मार्गाकडे मनुष्याची स्वभावतः प्रवृत्ति असते. यामुळें दुर्मार्गापासून त्याला परावृत्त करण्याकरितां त्याच्यापुढें सन्मार्गाची महती गायिल्यानें कार्यसिद्धि होणें शक्य नाहीं. सदाचरणाच्या योगानें ज्यांनीं या जगांत महत्त्व प्राप्त करून घेतलें आहे, अशा सत्पुरुषांचीं चरित्रें लोकांपुढें मांडिल्यास त्यांचें हित होऊन कर्त्याचा उद्देश सफल होणें शक्य आहे. तात्त्विक उपदेश करून लोकांना सन्मार्गाकडे वळविण्याचा प्रयत्न करणाऱ्या थोर पुरुषास बहुधा " ऊर्ध्वबाहुर्विरौम्येष न च कश्चिच्छृणोति मे " असे उद्गार काढण्याची पाळी येत असते. याचें कारण प्रयत्न-भेदांत आहे. या बाबतींत वाल्मीकींची दिशा न चुकल्यामुळें त्यांच्या कृतीवर लोकांच्या प्रेमादरपुरःसर उड्या पडल्या व पडत आहेत.

**देखें रोगातें जिणावें । औषध तरी देयावें ।**
**परी तें अति रुच्य व्हावें । मधुर जैसें ॥**

हें श्रीज्ञानेश्वरांनीं बोलिलेलें तत्त्व महर्षींनीं आपल्या कृतींत पूर्वींच सिद्ध करून ठेविलें आहे. महर्षींचें हें धोरण व आत्मप्रतीति झालेल्या पुरुषालाहि या जगांत लोकांकरितां कांहीं करावयाचें असतें हें जाणण्याइतकी त्यांची व्यापक दृष्टि पाहिली, म्हणजे आमच्या धर्मांतील या प्रवृत्तिपर निवृत्तीचें कौतुक वाटल्यावांचून रहात नाहीं.

## महर्षींची कर्तव्यपरायणता.

लोकहिताकरितां रामायणाची रचना करणें एवढीच महर्षींची इतिकर्तव्यता नव्हती. त्यांच्या परिस्थितींत त्यांना जीं आवश्यक व उचित कर्में वाटत होतीं, तीं करावयासहि ते चुकले नाहींत. प्रजानुरंजनासाठीं रामचंद्रानें सीतेचा त्याग केला

असतां तिचें आचरण शुद्ध आहे, असें ओळखून त्यांनीं तिचा उत्तम प्रकारें प्रतिपाळ केला. या वेळीं ती गरोदर होती व ती प्रसूत होऊन तिचे दोनहि पुत्र बारा वर्षांचे होईपर्यंत ती त्यांच्या आश्रमांत होती. राजानें टाकिलेली स्त्री म्हणून जर महर्षींनीं तिला आश्रय दिला नसता तर हें काव्यहि कदाचित् निर्माण झालें नसतें. आधींच अबला—त्यांतहि आसन्नप्रसवा असतां तिचा पतीनें त्याग केलेला पाहून महर्षींच्या कोमल हृदयाला कळवळा आला व त्यांनीं तिला आपल्या आश्रमांत ठेवून घेतलें. सीतादेवी खरोखर शुद्ध आहे हें पाहून रामचंद्राच्या (वस्तुतः लोकांच्या) मनांत उत्पन्न झालेला किंतु नष्ट करण्याकरितां ते स्वतः अश्वमेधाच्या निमित्तानें तिला तिच्या पुत्रांसह रामाच्या दरबारांत घेऊन गेले होते. त्यांनीं या वेळीं सर्व लोकांसमक्ष सीतादेवी शुद्ध असल्याबद्दल प्रतिज्ञा केली व खुद्द तिजकडूनहि दिव्य करविलें! रामायणांतील हा प्रसंग करुणास्पद आहे. वाल्मीकींच्या या आचरणावरून आपण ज्या परिस्थितींत आहोंत तींत सत्याकरितां, न्यायाकरितां व लोकांकरितां जीं आवश्यक व उचित कर्तव्यें असतील तीं केलींच पाहिजेत असें त्यांचें निश्चित मत होतें, हें स्पष्ट दिसून येतें.

## काव्याचें लक्षण.

अशा रीतीनें ज्यांनीं ऐहिक व पारलौकिक कर्तव्यें ओळखून तीं आचरणांत आणिलीं आहेत, तपश्चर्येच्या योगानें ज्यांचा देह व आत्मा पवित्र झाला आहे, अशा महर्षींच्या हातून रामचरितासारखा विषय पुढें असतां उत्कृष्ट काव्य निपजलें यांत आश्चर्य तें कसचें! विषयाशीं तादात्म्य झाल्याशिवाय उत्कृष्ट काव्य निपजणें शक्य नाहीं. रामचरितासारखा विषय नसता तर एखाद्या भिकार विषयांशीं महर्षींचा लय लागला नसता. तन्मयस्थितींत निघालेले सहजोद्गार म्हणजेच काव्य. गायनार्हत्व हें काव्याचें लक्षण मानिलेलें नाहीं; कदाचित् त्याला पद्य म्हणतां येईल. काव्य करावयाचें असा संकल्प करून जर एखाद्या विषयाशीं तदाकार होण्याचा यत्न केला तर त्यापासून उत्कृष्ट काव्याची निष्पत्ति व्हावयाची नाहीं. हें तादात्म्य विनायास झालें असेल तरच त्यापासून काव्य निपजेल. श्रेष्ठ किंवा अधम विषयाशीं तादात्म्य पावणें हें मनुष्याच्या मनःस्थितीवर अवलंबून

आहे. विषय अयोग्य असला तरी त्याशीं तादात्म्य झालें असेल तर उत्कृष्ट काव्य निपजलेंच पाहिजे.

काव्याचें लक्षण बांधण्याचा यत्न जो वर केला आहे तो कितपत साधला आहे हें खुद्द कवींनींच ठरवावयाचें आहे. या बाबतींत पुष्कळ मतभेद होऊं शकतील. लक्षणाविषयीं विचार केला तर सर्व साहित्यशास्त्रकारांनीं काव्याच्या बाह्यस्वरूपाविषयीं विवेचन केलें आहे; आणि कोणीही बाह्यस्वरूपाविषयीं विवेचन करणार, हें उघड आहे. कारण कांहीं विषयच असे असतात कीं, ते आपणांस कळतात; अंतःकरणाला त्यांचा बोध होतो; त्यांचे चांगलेवाईट असे भेद करितां येतात; परंतु त्यांचें स्वरूप काय आहे, हें स्पष्ट शब्दांनीं वर्णन करितां येत नाहीं. परमेश्वराची भक्ति करावी, असें पुष्कळ सांगतात; भक्तीचें महत्त्व वर्णन करितात; तिच्या भेदाविषयीं विवेचन करितात; परंतु भक्ति ही काय आहे हें कोणालाहि सांगतां येणें शक्य नाहीं. ज्यांना आपण भक्त म्हणून ओळखितों त्यांच्या बाह्य व्यापारांवरून त्यांच्या अंतःकरणांत काय घडामोडी चालल्या असतील याची आपण कल्पना करावयाची असते. अशा रीतीनें जिला आपण कल्पना हीच संज्ञा देणार, तिची वस्तुतः कांहींतरी किंमत मानितां येईल काय? सर्वव्यापी व शुद्ध लक्षण बांधावयाचें म्हणजे आकाशाला गवसणी घालणें आहे. काव्य हा विषय अशापैकीं एक आहे. थोर लोक ज्यांची गणना काव्यांत करितात त्यांच्या बाह्यस्वरूपावरून काव्य म्हणजे काय याचें लक्षण ठरवावयाचें आहे. अर्थात् हें लक्षण सर्वव्यापी होणें शक्य नाहीं. त्याला कोठें तरी पंगुपणा राहणें साहजिक आहे. उत्कृष्ट काव्य निर्माण करणाऱ्या कवीची मनोवृत्ति कशा प्रकारची असेल याची कल्पना करून वरील लक्षण सुचविलेलें आहे. काव्य म्हणावयाचें म्हणजे व्याकरणदृष्ट्या त्यांतील शब्दांच्या शुद्धाशुद्धतेविषयीं किंवा विषयाच्या श्रेष्ठाश्रेष्ठतेविषयीं विचार करावयाचा नाहीं. ज्याला काव्य ही संज्ञा मिळाली आहे त्याविषयीं विचार करावयाचा आहे. या दृष्टीनें परीक्षण केलें तर काव्य निर्माण करण्यापूर्वी कवीची मनोवृत्ति त्या विषयाशीं तदाकार झाली असली पाहिजे, असें लक्षण आम्हीं वर दिलें आहे. आतां हें तादात्म्य म्हणजे "ब्रह्मानंदीं लागली टाळी" अशापैकीं जरी नसलें तरी कवीचा कल त्या विषयाकडे स्वाभाविक

असला पाहिजे व काव्य निर्माण करितांना त्या विषयाकडे त्याचें चित्त व्यग्र होऊन गेलें असलें पाहिजे. असें तादात्म्य झाल्याशिवाय काव्य निर्माण होणें शक्य नाहीं. इंग्लिश कवि वर्डस्वर्थ यानेंहि काव्याचें लक्षण असेंच ठरविलें आहे:—

Poetry is the spontaneous overflow of powerful feelings या लक्षणांत 'उचंबळलेल्या मनोवृत्तींचा स्फोट म्हणजे काव्य' असें सांगितलें आहे. हें लक्षण वर दिलेल्या लक्षणाशीं पूर्णपणें जुळत आहे.

## आर्ष महाकाव्य.

सहृदयांच्या अंतःकरणास आल्हाद देण्याचें कार्य काव्याचे योगानें होतें. आणि हें कार्य करण्याचें सामर्थ्य असेल तरच त्याला काव्य असें म्हणतां येईल. काव्याचें हें लक्षण रामायणाला लागू पडलें तरी रामायणाचें वैशिष्ट्य याहून वेगळें आहे. रामायण हें आर्ष महाकाव्य आहे. आर्ष म्हणजे ऋषिप्रणीत. भाषेमध्यें लघुकाव्यें व महाकाव्यें पुष्कळ असलीं तरी तीं सर्व आर्ष असतात असें नाहीं. सर्व शास्त्रांवर मागाहून पुष्कळ ग्रंथ झाले तरी आर्ष ग्रंथ प्रमाण मानण्याची पद्धति आहे व याचें कारण ग्रंथकार ऋषि, शास्त्रांतील मूळ नियमांचे प्रवर्तक होत, हें आहे. ऋषि या शब्दाची व्युत्पत्ति पाहिली तर त्याचा अर्थ ज्ञानी असा होईल. ऋषि शब्दांतील धातु 'ऋष्' हा गति—ज्ञान या अर्थी आहे. अमरानें तर ऋषीला "सत्यवचसः" असा प्रतिशब्द दिला आहे. यासाठीं आर्ष ग्रंथाचें महत्त्व आहे. रामायण हें काव्य आहे. अर्थात् त्यांत कोणत्याहि शास्त्राचें विवेचन असणें शक्य नाहीं व कारणहि नाहीं; तथापि काव्याचे सामान्य हेतु—कीर्ति वा संपत्ति संपादन करणें—हें ऋषींच्या हृदयांत असणें शक्य नसल्यामुळें व धर्मशास्त्रादि उच्च विषय त्यांचे दृष्टीपुढें नित्य वावरत असल्यामुळें काव्याचें बाह्य स्वरूप मनोरंजक झालें, तरी शास्त्रीय उपदेश त्यांत आपोआपच आला आहे. रामचरित्र स्वभावतःच असें आहे कीं, त्यांत लोकशिक्षणाचें कार्य न सांगतां होणारें आहे. तथापि या कामींही कवीच्या कल्पनेची आवश्यकता आहे. मूळ चरित्र निर्मल असलें तरी लोकानुरंजनाकरितां मनुष्यस्वभावनुरूप त्यांत निरनिराळे प्रसंग आणणें कवीचे हातीं आहे; व हे प्रसंग रंगवितांना कवीच्या अधिकाराप्रमाणें तो आपलें कौशल्य दाखवितो. रामायणांत रामाचें संपूर्ण चरित्र आलें

आहे व यामुळें त्यांत कवीला कल्पितां येतील असे कित्येक प्रसंग लोकानुरंजनाकरितां आणतां येण्यासारखे आहेत. रामचरित्रांतील कांहीं कथाभागांवर मागाहून जीं काव्यें अथवा नाटकें झालीं, त्यांचें निरीक्षण केल्यास आमच्या म्हणण्याची सत्यता वाचकांस सहज पटणारी आहे. सामान्य कवि व महर्षींसारखे अधिकारी कवि यांमध्यें जर कोठें अंतर असेल तर तें येथें आहे. वाल्मीकींनीं रामायण-रचनेचा इतिहास प्रारंभीं दिला आहे, तेथेंच हा भेद दृग्गोचर होतो. नारद ऋषींची गांठ पडली असतां वाल्मीकींनीं त्यांना प्रश्न केला, त्यांत "सांप्रत लोकांमध्यें गुणवान्, पराक्रमी, सच्छील, धर्मज्ञ, कृतज्ञ, सत्यवचनी, स्वीकारलेल्या व्रताचा आपत्कालींहि त्याग न करणारा, सदाचरणसंपन्न, प्राणिमात्रांच्या हिताविषयीं तत्पर, तत्त्ववेत्ता, समर्थ, दर्शन झालें असतां लोकांना अत्यंत आनंद देणारा, मनोनिग्रही, क्रोधादिकांचें संयमन करणारा, तेजस्वी, परोत्कर्षाविषयीं मत्सर न धरणारा आणि युद्धकालीं क्रुद्ध झाला असतां देवांनाहि भीति उत्पन्न करणारा असा पुरुष कोण आहे?" असें विचारिलें आहे. पराक्रमी पुरुष सांप्रत कोण आहे अशी जिज्ञासा होणें मनुष्यस्वभावाला सोडून नाहीं; व सामान्य कवीनें तर असा प्रश्न विचारून थोरांची संमति मिळविण्याची भानगडहि न करितां अशा पराक्रमी पुरुषावर काव्यें लिहून विपुल संपत्ति व कीर्तिहि संपादन केली असती. मोठमोठे राजे, संस्थानिक इत्यादि श्रीमंतांकडे असे कवि पुष्कळ बाळगिलेले असतात व ते आश्रयदात्यांची कीर्ति गाऊन त्यांना प्रसन्न करीत असतात. आमची मराठी भाषा या दृष्टीनें प्रायः निर्दोष आहे; परंतु संस्कृत भाषेंतील मधल्या काळांतील ग्रंथांकडे पाहिलें म्हणजे त्यांत असे कवि पुष्कळ आढळून येतील. या कालामध्यें काव्यें, नाटकें वगैरे पुष्कळ झालीं. तथापि त्यांची दृष्टि केवळ कीर्ति व संपत्ति यांकडे असल्यामुळें त्यांत आर्ष ग्रंथाच्या तोडीचा ग्रंथ निर्माण झाला नाहीं.

"**दिल्लीवल्लभपाणिपल्लवतले नीतं नवीनं वयः ।**"

असें अभिमानानें सांगणारे कवि याच काळांत निपजले; व या त्यांच्या उद्गारांवरून त्यांचें आणि त्याबरोबर समाजाचें शील किती भ्रष्ट झालें होतें, हें उघड दिसून येतें. वाल्मीकींनीं मात्र नारदांना प्रश्न करितांना केवळ

पराक्रमी पुरुषाविषयीं पृच्छा न करितां शील आणि स्वधर्मपालन इत्यादि उच्च गुणांचा निर्देश बरोबर केला आहे. महर्षींची ही दृष्टि चरित्रांत सर्वत्र दृष्टीस पडते.

## महर्षि रामचरित्रास कसे मोहून गेले ?

आमच्या वाङ्मयामध्यें आदिकवि म्हणून महर्षि वाल्मीकीला मान मिळालेला आहे. वेद हीं जरी काव्यें आहेत किंवा रामायणापूर्वी जरी छंदोबद्ध ग्रंथ होते, तरी काव्य या संज्ञेस पात्र असा ग्रंथ भाषेंत पूर्वी नसल्यामुळें वाल्मीकीला आदिकवि असें म्हणत असावेत, असें वाटतें. रामानें सीतेचा त्याग केल्यानंतर तिला वाल्मीकींच्या आश्रमांत लव व कुश हे दोन पुत्र झाले. ते बारा वर्षांचे झाले, त्या सुमारास केव्हांतरी हें काव्य निर्माण झालें आहे. रावणादिकांचा वध करून राम अयोध्येला परत आल्यावर त्याला राज्याभिषेक झाला त्या वेळीं सर्व प्रजाजनांना आनंद झाला होता. निरंतर यज्ञयाग करून अरण्यांत राहणाऱ्या ऋषिजनांनीं या आनंदाचा बराचसा वांटा उचलणें साहजिक आहे. कारण रावणादिकांच्या क्रूरपणाचा परिणाम या मंडळींवर विशेष होत असे. यानंतर थोडक्या कालानें रामानें सीतेचा त्याग केला. रामाविषयीं वाल्मीकींच्या मनांत पूर्वींच आदर होता. त्यांतहि सीता त्यांच्या आश्रमांत असल्यामुळें तो द्विगुणित झाला असल्यास नवल नाहीं. जरी सीतेच्या दुःखाबद्दल त्यांना अंतःकरणांत तळमळ वाटूं लागली होती, तरी रामाच्या प्रजानुरंजनाची मर्यादा इतकी कडक आहे असें पाहिल्यावर त्यांच्या मनांत त्याच्या या विलक्षण कृतीनें कौतुकच उत्पन्न व्हावयाचें. शिवाय सीता व अयोध्येच्या विस्तीर्ण राज्याचे अधिपति—तिचीं दोन मुलें—यांचा सहवास वाल्मीकिमहर्षींला सतत बारा वर्षें झाल्यामुळें सबंध रामायण त्यांच्या अंतश्चक्षूंपुढें वावरत राहिलें होतें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. एकदां नारदऋषींची व त्यांची भेट झाली. या भेटींत त्यांच्या मनांत रामचरिताविषयीं असलेला आदर अधिक दृढ झाला. आपल्या मताला नारदासारख्या श्रेष्ठ ऋषींची जोड मिळाल्यावर त्यांनीं रामायण रचण्यास प्रारंभ केला. रामचरित्रासारखें पवित्र उदाहरण लोकांपुढें ठेवून ह्यासारखे महात्मे या जगांत वारंवार निर्माण होण्यास आपण अप्रत्यक्षपणें कारण व्हावें या हेतूशिवाय महर्षींच्या मनांत सद्यःफलदायी असा दुसरा हेतु होता. हा हेतु म्हणजे कुशलवांना तें काव्य पढविणें, हा होय. रामायणकाव्य

गावयास शिकवून त्यांना गवई बनवावें, असा महर्षींचा उद्देश नव्हता. त्यांचा पिता जो रामचंद्र त्याप्रमाणें त्यांनीं पराक्रम करून प्रजानुरंजन करण्याचें काम पुढें चालवावें अशी त्यांच्या मनांत कल्पना असली पाहिजे. अशा रीतीनें रामायणाची रचना करण्याच्या कामीं त्यांना चोहोंकडून प्रेरणा झाली; प्रत्यक्ष ब्रह्मदेवांनीं येऊन त्यांना उत्तेजन दिलें; व मग रामचरित्राच्या पावित्र्यांत गुंग झालेलें त्यांचें अंतःकरण या काव्यास प्रसवलें.

## रामायणाचा विशेष-यथार्थदर्शन.

रामायण वाचून ज्याचें मन त्यांत रममाण होणार नाहीं "स वै मुक्तोऽथ वा पशुः" असला पाहिजे, असें म्हटल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. रामायणांत पदलालित्य, व्यंग्यार्थ किंवा अलंकार वगैरे जागोजाग आहेत, म्हणून तें रमणीय आहे, असें आम्ही म्हणत नाहीं. यांपैकीं कोणत्याहि गोष्टीकडे महर्षींनीं हेतुपूर्वक लक्ष दिलेलें दिसत नाहीं. रामायणानंतरच्या पुष्कळ काव्यांत न आढळणारा भाषेचा साधेपणा यांत आहे. व्यवहारांतील उपमा, निरनिराळ्या प्रसंगांचीं साधीं वर्णनें, पात्रांच्या तोंडीं त्यांच्या स्वभावाला शोभण्यासारखी घातलेली भाषा यांनीं रामायणाचें स्वरूप मोहक झालें आहे. आतां ज्यांना अलंकाराशिवाय नैसर्गिक सौंदर्याची अभिरुचि नसेल त्यांना आम्ही कोणत्याहि प्रकारचा आग्रह करीत नाहीं. कारण लोक भिन्नरुचि असल्यामुळें कोणाला—

**कृताभ्यंगस्नाना कणकमणिभूषाविरहिता ।**
**विराजे सिंदूरें धवलवसनें भूपवनिता ॥**

असलें सौंदर्य प्रिय असतें तर कोणाला अलंकारांची आवड असते. परंतु कोणत्याहि प्रसंगीं ही गोष्ट लक्षांत ठेवणें अवश्य आहे कीं, नैसर्गिक सौंदर्य नसेल तर बाह्य आभरणांचा कांहीं उपयोग होणार नाहीं. सौंदर्य निसर्गतः असलें तर अलंकारांनीं तें द्विगुणित होतें. नवीन सौंदर्य उत्पन्न करण्याचें सामर्थ्य अलंकारांच्या अंगीं नाहीं. या दृष्टीनें पाहिलें तर वाल्मीकींची भाषासुंदरी राजवाड्यांत वाढलेली नसल्यामुळें तिच्या अंगावर अलंकार अगदीं कमी असणें साहजिक आहे. तिचें जनन व संवर्धनहि सृष्टिसुंदरीच्या भव्य मंदिरांत—अरण्यांत—झालेलें आहे. तथापि पुष्कळ गुणग्राहक लोक तिचें हें स्वरूप ओळखून मोहून गेले आहेत.

वाल्मीकिरामायणाच्या भाषेसंबंधानें "मराठी भाषेचे अधिपति" कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं लिहिलें आहे:—

**"तत्तु तीरं समासाद्य तमसाया मुनिस्तदा ।**
**शिष्यमाह स्थितं पार्श्वे दृष्ट्वा तीर्थमकर्दमम् ॥**
**अकर्दममिमं तीर्थं भारद्वाज निशामय ।**
**रमणीयं प्रसन्नं च सज्जनानां मनो यथा ॥**
**इदं तीर्थं समं सौख्यं सुजनं सूक्ष्मवालुकम् ।**
**न्यस्यतां कलशस्तात दीयतां वल्कलं नाम ॥**

बालकाण्ड–सर्ग २.

हें आद्यकवींचें काव्य कोणास रमणीय वाटत नाहीं? व कोणाचें चित्त प्रसन्न व सौम्य करीत नाहीं?—वास्तविक पाहतां यांत येवढें काय आहे बरें? गांवढळ कुणब्यासहि ज्या गोष्टी दररोज दृष्टीस पडतात, त्याच येथें वर्णिल्या आहेत. पण म्हणूनच हीं पद्यें येवढीं रमणीय झालीं आहेत. तीं समजण्यास यत्किंचित्‌हि श्रम न पडून प्रत्येक मनुष्यास मनांत नदी पाहिली असतां ज्या कल्पना सहज भरतात त्याच येथें कवीनें अगदीं साध्या रीतीनें बोलून दाखविल्या आहेत. वर्णनांत एक मात्र अलंकार घातला आहे—किंवा घातला आहे म्हणण्यापेक्षां आला आहे हेंच म्हणणें बरोबर आहे. कां कीं, तो इतका सहज आला आहे व म्हणूनच त्या ठिकाणीं इतका शोभतो कीं, तो आणण्यास कवीस यत्किंचित्‌हि प्रयत्न पडला नसावा. असो! एकंदरींत या काव्याची जितकी स्तुति करावी तितकी थोडीच आहे! ज्यानें आजपर्यंत कोट्यवधि मनुष्यांचें रंजन करून त्यांच्या प्रशंसेचें मोर्तब तें जसें काय काळास दाखवीत आहे त्या काव्यास येथच्या स्तुतीच्या दोन शब्दांनीं किती थोरवी येणार!

याचप्रमाणें पुढें क्रौंचपक्ष्याचा वृत्तांत लिहिला आहे. तोहि किती हृदयंगम आहे! तो वाचूनहि ज्याची वृत्ति पहिल्याप्रमाणेंच तटस्थ राहील, त्यास देण्यास दुसऱ्या कोणाची उपमा साजणार नाहीं. एक त्या निषादाची (कोळ्याचीच) साजेल"

निबंधमाला-विद्वत्व आणि कवित्व, पृष्ठ ३२–३३

या काव्याची महती गाण्याच्या कामीं खुद्द शास्त्रीबोवांनींहि आपलें असामर्थ्य

प्रकट केलें आहे. मग तें कार्य आम्ही कसें करूं शकणार? इतर कवींहून वाल्मीकींच्या काव्यांत विशेष काय आहे, याचा उलगडा वरील उताऱ्यावरून चांगलाच होईल. रामायणाच्या याच स्वरूपासंबंधानें आम्हींहि वर थोडेंसें विवेचन केलें आहे. रामायणानंतरच्या काव्यांत अलंकार पुष्कळ भरलेले असले तरी कांहीं स्थलीं असंभाव्य कल्पना असल्यामुळें तेथें रसिक वाचकांचा हिरमोड झाल्यावांचून रहात नाहीं. रामायण वाचतांना असंभाव्य कल्पनांची भीति वाचकांस बाळगण्याचें कारण नाहीं. रामायणांतील कोणतेंहि वर्णन घ्या, त्यांत वस्तुस्थितीचें चित्र गोड भाषेनें सांगण्यापलीकडे कांहीं केलेलें नाहीं. पण तें इतकें यथातथ्य वठविलेलें असतें कीं, वर्ण्य विषयाचें चित्र वाचकांच्या अंतश्चक्षूंसमोर आणून उभें करण्याचें सामर्थ्य त्याचे अंगीं आहे.

## रामचरित्राचा विशेष—स्वार्थत्याग.

महर्षि वाल्मीकींसारखे पुरुष ज्या रामचरित्रांत रममाण झाले, त्याचें असें महत्त्व काय आहे, याचा आतां विचार करूं. पूर्वीं सांगितलेंच आहे कीं, एका विशाल प्रदेशाचा अधिपति म्हणून रामाची योग्यता वाढली नव्हती; तर त्याच्या अंगचे गुणच त्याची योग्यता वाढविण्यास कारण झाले. त्याचें सर्व चरित्र म्हणजे मूर्तिमंत स्वार्थत्याग आहे. रामायणांत जेवढ्या म्हणून कथा आल्या आहेत त्या प्रत्येकीचा लोकांशीं संबंध आहे. किंबहुना त्याचें चरित्र म्हणजे त्या वेळच्या सर्व सार्वजनिक बाबींचें चित्र आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. वाल्मीकींनीं देखील रामचरित्राचा लोकांशीं संबंध आला तेव्हांपासूनच चरित्रास सुरवात केली आहे. रामायणांत रामाच्या बाललीला वगैरे कथा मुळींच सांगितलेल्या नाहींत. "पोरांचे पाय पाळण्यांत दिसतात" अशी जरी म्हण आहे तरी बालपणांतील हुषारीवरून पुढील आयुष्यक्रमणाचें अनुमान काढितां येणार नाहीं. कारण बालपणीं हुषार म्हणून वाखाणलेलीं पुष्कळ पोरें पुढें नादान ठरलेलीं आढळतात. हें मनांत आणून म्हणा किंवा दुसऱ्या कांहीं कारणानें म्हणा महर्षींनीं रामाचें बालचरित्र वर्णिलेलें नाहीं. विश्वामित्र-ऋषि यज्ञसंरक्षणाकरितां रामाला नेण्याच्या उद्देशानें दशरथाकडे आले; तेव्हांपासून त्यांनीं चरित्रास प्रारंभ केला आहे. पुढील चरित्राचा या कथेनेंच पाया

घातलेला आहे. या वेळीं रामाच्या वयाला पुरीं सोळा वर्षेंहि झालीं नव्हतीं. दशरथानेंहि अगदीं निरुपाय होऊनच या गोष्टीस अनुमोदन दिलें होतें. यज्ञ-संरक्षणाचें कार्य रामलक्ष्मणांनीं दक्षतेनें बजाविल्यानंतर त्यांना विश्वामित्रऋषींनीं मिथिलाधिपति जनकराजाकडे यज्ञसमारंभ व शिवधनुष्य दाखविण्याकरितां नेलें. पुढें तें धनुष्य सज्ज करितांना भंग पावलें व नंतर रामादि चार बंधूंचे विवाह झाले, वगैरे कथा सर्वश्रुतच आहे. विवाहसंबंधीं असलेल्या दंतकथेंत व रामाय-णांत फेर कोठें आहे, तो अन्यत्र दाखविला आहे.

अयोध्येला परत आल्यनंतर लवकरच केकयाधिपति युधाजित् भरत व शत्रुघ्न यांना आपल्याकडे घेऊन गेला. हे दोघे सापत्नबंधु होते. परंतु या चारहि बंधूंत सापत्नभाव मुळींच नव्हता. भरतशत्रुघ्नांचें प्रेम परस्परांवर विशेष असल्या-मुळें या वेळीं ते दोघे निघून गेले. हे निघून गेल्यावर लवकरच रामलक्ष्मणांला वनवासास जावें लागलें. यामुळें त्यांच्या जोडीबरोबर भरतशत्रुघ्नाची जोडी लोकांच्या डोळ्यांसमोर वावरूं लागली. याचा परिणाम असा झाला कीं, ते दोघे सापत्न बंधु नसून कैकेयीचेच पुत्र होत, असा लोकांत समज होऊन बसला आहे. अस्तु. यानंतर रामाला यौवराज्याभिषेक करावा असें दशरथाच्या मनांत येऊन त्यानें या कामीं प्रजेची संमति मिळविण्याकरितां पुढारी, मांडलिक राजे, मोठमोठे तपस्वी यांची परिषद भरवून त्यांना आपला हेतु निवेदन केला व त्यांची संमति विचारिली. या वेळीं प्रजेचा खरा अभिप्राय कळावा म्हणून दशरथानें कसा प्रयत्न केला, त्याचा खुलासा पुढील भागांत येणार असल्यामुळें त्याची येथें पुनरावृत्ति करीत नाहीं. तसेंच दशरथाच्या प्रश्नास उत्तरादाखल सभासदांनीं जें भाषण केलें आहे त्यांत रामाच्या स्वभावाचें चित्र उत्कृष्ट रेखाटलें असून त्यांचें विवेचनहि पुढें राजकीय स्थितीचें वर्णन देतांना करणार आहों. तथापि हा भाग जिज्ञासूंनीं मूळांतून अवश्य वाचून पहावा. रामचरित्राला इतकें महत्त्व कां प्राप्त झालें आहे, हा विषय प्रस्तुत असल्यामुळें प्रथम तिकडे वळणें अवश्य आहे. रामाच्या यौवराज्याभिषेकाला प्रजाजनांची संमति मिळाल्यावर मंथरानामक दासीच्या चिथावणीवरून राजपत्नी कैकेयी हिनें रामाला वनवासाला पाठविण्या-बद्दल राजाजवळ वर मागितला. हा वर राजानें कबूल केला नाहीं. तरी तो पूर्वीं

वचनांत गुंतला असल्यामुळें त्याला नाहीं म्हणतां येत नव्हतें. या वेळीं हा अनर्थ टाळण्यास एकच मार्ग होता व तो अर्थात् कैकेयीचें मन वळविणें हा होय. हा प्रयत्न पुष्कळांनीं करून पाहिला, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. हा प्रसंग रामायणांत उत्कृष्ट रीतीनें वर्णिला असून रामचरित्राचें महत्वहि त्यांत वाढलें असल्यामुळें तें येथें विशद करून सांगण्याचा विचार आहे.

कैकयीनें वर मागितल्याची वेळ म्हटली म्हणजे अभिषेक ज्या दिवशीं व्हावयाचा असें ठरलें होतें, त्याचे पूर्वरात्रीं होय. ही सबंध रात्र या विचारांत गेली. मात्र हा घोंटाळा राजवाड्याबाहेर कोणालाहि कळला नव्हता. प्रातःकाळीं सुमंत्र सारथि राजदर्शनाकरितां वाड्यांत आला. त्याला पाहिल्याबरोबर रामाला घेऊन येण्यास कैकयीनें त्याला सांगितलें. राजाची अनुज्ञा घेऊन सुमंत्र रामाच्या निवासस्थानाकडे निघून गेला. सुमंत्राला राजाचें म्लानवदन पाहून कांहीं शंका वाटली होती, तथापि पुढील भयंकर प्रसंगाची त्याला कल्पना नव्हती. राजाज्ञेप्रमाणें या रात्रीं राम पत्नीसहवर्तमान व्रतस्थ राहिला होता. सुमंत्राच्या सूचनेप्रमाणें तो राजाकडे येण्याकरितां निघाला. त्या वेळीं त्याच्या मनांत पुढील विचार घोळत होता.

**संचोदयति राजानं मदर्थमसितेक्षणा ॥**
**जननी चार्थकामा मे केकयाधिपतेः सुता ॥२।१६।१६**

"माझें हित चिंतणारी केकय राजाची कन्या कृष्णनयना कैकेयी ही माझ्या-साठीं राजाला कांहीं तरी सांगत आहे."

मार्गांतहि लोकांनीं आपल्या युवराजाचा प्रेमादरपुरःसर सत्कार केला. वृद्ध, तरुण स्त्रिया, निरनिराळ्या धंद्याचे लोक, मोठमोठे ऋषि वगैरे जी मंडळी वाटेंत भेटली त्यांचीं आपल्याविषयीं चाललेलीं भाषणें त्याच्या कानावर येत होतीं. अयोध्येंतील त्या वेळच्या या शेवटच्या आंनददायक प्रसंगाचें वर्णन वाल्मीकींनीं थोडक्यांत दिलें आहे:—

**यश्च रामं न पश्येत्तु यं च रामो न पश्यति ।**
**निन्दितः सर्वलोकेषु स्वात्माप्येनं विगर्हते ॥२।१७।१५॥**

"(त्या वेळीं) ज्यानें रामाला अवलोकन केलें नाहीं व रामाची ज्याच्याकडे

दृष्टि गेली नाहीं त्याची सर्व लोकांमध्यें निंदा होऊन त्याबद्दल त्याचें मनहि त्याला खाऊं लागलें."

अशा रीतीनें आनंदसागरांत पोहत असतां रामानें राजाच्या अंतःपुरांत प्रवेश केला. पित्याची ती भयप्रद स्थिति अवलोकन करून व तो कांहींच बोलत नाहीं असें पाहून त्याला त्याचा कांहींच उमज पडेना. त्यानें त्याबद्दल कैकेयीला खुलासा विचारिला. तिनें जो पेंच घालून प्रत्यक्ष आपल्या पतीला पूर्वीं घायाळ केलें होतें, तोच रामावर टाकून त्याला अडकवून टाकिलें. हा पेंच म्हटला म्हणजे आधीं वचन घेऊन मग आपला दुष्ट हेतु प्रकट करणें, हा होय. राजाचें मनोगत जाणण्याविषयीं या वेळीं रामाच्या मनांत अतिशय उत्सुकता उत्पन्न झाली होती. या गोष्टीचा फायदा घेऊन कैकेयी निर्लज्जपणानें म्हणाली:—

**न राजा कुपितो राम व्यसनं नास्य किंचन ।**
**किंचिन्मनोगतं त्वस्य त्वद्भयान्नानुभाषते ॥२।१८।२०॥**
**प्रियं त्वामप्रियं वक्तुं वाणी नास्य प्रवर्तते ।**
**तदवश्यं त्वया कार्यं यदनेन श्रुतं मम ॥ २१ ॥**

"हे रामा, राजा कोणावर रागावलेला नाहीं व त्याच्यावर संकटहि कोणतें आलेलें नाहीं. त्याच्या मनामध्यें कांहीं गोष्ट आहे, परंतु तुझ्या भीतीमुळें ती तो सांगत नाहीं. (कारण) तुझ्यावर त्याचें प्रेम फार आहे. यासाठीं त्याला तुझ्याशीं तुला न रुचेल असें भाषण करवत नाहीं. (परंतु) त्याच्या तोंडांतून निघालेले जे उद्गार मीं ऐकिले आहेत, ते तुला अवश्य शेवटास नेले पाहिजेत."

अशा रीतीनें तिनें आपला दुष्ट हेतु गुप्त ठेवून रामाची उत्सुकता अधिकच वाढविण्याचा प्रयत्न केला व तो पूर्णपणें सफल झाला. कैकेयीच्या भाषणानंतर रामानें त्याच्या निष्कपट स्वभावास अनुसरून निःशंकपणें भयंकर प्रतिज्ञा केली:—

**अहो धिङ्नार्हसे वक्तुं देवि मामीदृशं वचः ।**
**अहं हि वचनाद्राज्ञः पतेयमपि पावके ॥२।१८।२८॥**
**भक्षयेयं विषं तीक्ष्णं पतेयमपि चार्णवे ।**
**नियुक्तो गुरुणा पित्रा नृपेण च हितेन च ॥ २९ ॥**
**तद्ब्रूहि वचनं देवि राज्ञो यदभिकांक्षितम् ।**
**करिष्ये प्रतिजाने च रामो द्विर्नाभिभाषते ॥ ३० ॥**

"हे देवि, तुला धिक्कार असो! मला तरी असें बोलणें तुला योग्य नाहीं. (कारण) राजानें आज्ञा केली तर मी अग्नीमध्यें उडी घेईन. तीक्ष्ण विषहि भक्षण करीन. समुद्रामध्यें उडी घालीन. (कारण) राजा हा माझा पिता, गुरु व हितचिंतक आहे. तर हे देवि, राजाच्या मनांत जें कांहीं आहे, तें मला सांग; मी तें शेवटास नेईन, असें प्रतिज्ञेनें सांगतों. राम भाषण एकदांच कारितो. त्याचें भाषण कधींहि बदलत नाहीं."

खरोखर ही प्रतिज्ञा फार भयंकर होती! कैकेयीच्या भाषणावरून आपल्यावर लवकरच कांहीं तरी प्रसंग गुदरणार असें अनुमान न काढण्याइतकी रामाची बुद्धि अपक्व नव्हती. अशा वेळीं दुसरा एखादा पुरुष असता तर असली प्रतिज्ञा करितां येण्यासारखें धैर्य त्याच्या अंगीं राहिलें नसतें; किंवा त्यानें आपल्या भाषणांत पळ काढण्यास कांहीं वाव ठेविला असता. पण नाहीं! रामचंद्राच्या स्वप्नींहि असली कपटविद्या माहीत नव्हती. आपण जी प्रतिज्ञा करूं ती पाळण्याकरितां वाटेल तो प्रसंग सोसूं अशी धमक त्याचे अंगीं असल्यामुळें त्याबद्दल त्याच्या मनांत मुळींच विकार उद्भवला नाहीं. अशा रीतीनें कैकेयीनें रामाला प्रतिज्ञा करावयास लाविल्यावर मग आपला हेतु त्याला सांगितला. कैकेयीचें हें भाषण म्हणजे रामाच्या धैर्याची कसोटीच होती, असें म्हणावयास हरकत नाहीं. या वेळेपर्यंत पुढें काय प्रसंग येणार याचें नक्की अनुमान होणें शक्य नसल्यामुळें कैकेयीच्या भाषणाची वीज कोसळल्याबरोबर रामाचा धैर्यदुर्ग मोडून पडतो कीं काय याची भीति होती. परंतु तो या कसोटीला पूर्णपणें उतरला. वाल्मीकींनीं त्याच्या त्या वेळच्या स्थितीचें वर्णन केलें आहे:—

**तदप्रियममित्रघ्नो वचनं मरणोपमम् ।**
**श्रुत्वा न विव्यथे रामः कैकेयीं चेदमब्रवीत् ॥२।१९।१॥**
**न चास्य महतीं लक्ष्मीं राज्यनाशोऽपकर्षति ।**
**लोककान्तस्य कान्तत्वाच्छीतरश्मेरिव क्षयः ॥२।२०।३२॥**
**न वनं गंतुकामस्य त्यजतश्च वसुंधराम् ।**
**सर्वलोकातिगस्येव दृश्यते चित्तविक्रिया ॥ ३३ ॥**
**प्रतिषिध्य शुभं छत्रं व्यजने च स्वलंकृते ।**
**विसर्जयित्वा स्वजनं रथं पौरांस्तथा जनान् ॥ ३४ ॥**

"कैकेयीच्या त्या भाषणाला मरणाचीच उपमा योग्य; इतकें तें दुःसह होतें. (तथापि) तें श्रवण करूनहि शत्रुनाशक रामाच्या मनाला कोणताहि विकार न होतां त्यानें तिला (शांतपणें) उत्तर दिलें. निसर्गतः मनोहर असलेल्या चंद्राचें सौन्दर्य तो क्षीण झाला तरी ज्याप्रमाणें कमी होत नाहीं, त्याप्रमाणें रामाला त्या वेळीं सर्व राज्याचा त्याग करावा लागला तरी त्याचा स्वाभाविक सुंदरपणा कमी झाला नाहीं. सर्व पृथ्वीच्या राज्याचा त्याग करून तो अरण्यांत जात होता; तथापि एखाद्या जीवन्मुक्ताप्रमाणें त्याच्या मनाला कोणताहि विकार झाला नाहीं. त्यानें शुभ छत्र व उत्तम प्रकारें भूषित केलेलीं चामरें यांचा (शांतपणें) त्याग केला व स्वजन, रथ व पौरजन यांचा निरोप घेतला."

अखिल वसुंधरेचें आधिपत्य कोणीकडे आणि अरण्यवास कोणीकडे! परंतु आपल्या पित्याला वचनांतून मुक्त करण्याकरितां रामचंद्रानें अरण्यवास पत्करिला. हा प्रसंग इतका दुःखकारक होता कीं, तो आज हजारों वर्षांनीं श्रवण करणाऱ्या आम्हांला सहन करवत नाहीं! या वेळीं त्याचें वय तरी केवढें होतें? जगांतील निरनिराळे अनुभव घेऊन बुद्धीला स्थिरता प्राप्त करून घेण्याइतका त्याला अवकाशहि मिळाला नव्हता. अशा स्थितींत त्याच्या मनाची शांतता तिळमात्र ढळली नाहीं, ही अत्यंत आश्चर्याची गोष्ट होय. लोकांच्या अत्युत्कट प्रेमाचा त्याला पाठिंबा होता; त्याच्या जोरावर त्याला सिंहासन मिळविणें अशक्य नव्हतें. परंतु त्यानें त्याची अपेक्षा केली नाहीं. तरुण भार्येचा मोह त्याला आडवा आला नाहीं, अरण्यवासांतील दुःखांनीं त्याचें हृदय विदीर्ण झालें नाहीं; सिंहासनावरील ऐश्वर्यानें त्याच्या चित्तवृत्तीची शांतता ढळली नाहीं; लक्ष्मणाच्या उत्तेजक भाषणानें बाहुबळाच्या जोरावर राज्य बळकावून आपली प्रतिज्ञा मोडण्याचा मार्ग त्यानें स्वीकारिला नाहीं अगर कैकेयीच्या निरर्गल भाषणानें त्याला क्रोध आला नाहीं! ज्ञानेश्वरांनीं म्हटलें आहे:—

**स्वशिखरांचा भारू। नेणे जैसा मेरू।**
**कीं धरा यज्ञसूकरू। वोझें न म्हणे ॥ १ ॥**
**नाना चराचरीं भूतीं। दाटणी नव्हे क्षिती।**
**तैसा नाना द्वंद्वीं प्राप्तीं। घाभेजेना ॥ २ ॥**

**घेऊनि जळांचे लोट। आलिया नदीनदांचे संघाट।**
**करी वाड पोट। समुद्र जेवीं ॥ ३ ॥**
**तैसे जयाचिया ठायीं। न साहणें कांहींच नाहीं।**
**आणि साहतसें ऐसेंही। स्मरण नुरे ॥ ४ ॥**

रामचंद्राचें धैर्य इतकें पूर्णत्वास पोंचलें होतें कीं, त्याला या वेळीं खेद उत्पन्न न होतां उलट तो इतर मंडळींचें शांतवन करण्याकरितां निघून गेला. निघण्यापूर्वी त्यानें कैकेयीला जो प्रश्न विचारिला तो वाचला असतां त्याच्या उदार अंतःकरणाचें क्षणभर कौतुक वाटल्यावांचून रहात नाहीं. कैकेयीला जर आपल्या पुत्राला राज्य मिळावें अशी इच्छा होती तर तिनें स्वतः तसें आपणाला कां सांगितलें नाहीं, राजाच्या मार्फत रदबदली कां केली, असा त्याचा प्रश्न होता.

**न नूनं मयि कैकेयि किंचिदाशंससे गुणान्।**
**यद्राजानमवोचस्त्वं ममेश्वरतरा सती ॥ २।१९।२४ ॥**

"हे कैकेयि, तुला मीं अत्यंत श्रेष्ठ मानीत असतांहि ज्या अर्थी तूं राजापाशीं ही गोष्ट काढलीस त्या अर्थीं माझ्या अंगीं तुला कोणताच चांगला गुण दिसत नाहीं काय ?"

हा प्रश्न त्यानें उगाच वरच्यावर विचारिला होता असें नाहीं; कारण त्याजवर यापूर्वी कैकेयीचें प्रेमहि चांगलें होतें, यामुळें त्यानें हा प्रश्न अंतःकरणापासून विचारिला होता. रामाचा स्वभाव अशा प्रकारचा आहे असें कळूनहि कैकेयीनें त्याला मधूनमधून उपदेश करण्याचा जो आव घातला आहे तो वाचून खरोखर चिळस उत्पन्न होते. सहृदय मनुष्यास चीड आणणारा जर कोणता भाग असेल तर तो हाच होय. सिंहासनाच्या लालसेनें निष्ठुर बनलेल्या कैकेयीनें रामाला उपदेश करण्याचा प्रयत्न करणें म्हणजे सूर्याला ग्रहण लागलें असतां त्यापुढें काजव्यांनीं चमकण्यासारखें होय. रामाचा गादीवर हक्क होता हें सिद्ध करण्याची जरूर नाहीं व असें असूनही पितृवचन पाळण्याकरितां त्याला कैकेयीची दुष्ट इच्छा पूर्ण करणें भाग पडलें हें उघड आहे. असें असतां एकदां आपला दुष्ट हेतु प्रकट केल्यावर तिला अधिक बोलण्याचें कारण नव्हतें. आपणास दुसऱ्याचा छळ करण्याचा अधिकार प्राप्त झाला आहे असें पाहून आपल्यापेक्षां

शतपटीनें अधिक योग्यतेच्या मनुष्यास तो अशरण स्थितींत असतां उपदेश करणें म्हणजे त्याच्या दुःखावर डाग देण्यासारखेंच होय. रामाचें वर्तन किती कडक होतें हें तिला माहीत होतें. त्याचा शत्रु असो वा मित्र असो त्याच्या वर्तनाविषयीं कोणीहि शंका घेतली नव्हती. लक्ष्मणानें काढिलेले उद्गार पहा:—

**न तं पश्याम्यहं लोके परोक्षमपि यो नरः।**
**स्वमित्रोऽपि निरस्तोऽपि योऽस्य दोषमुदाहरेत् ॥ २।२१।५ ॥**

"रामाचा एखादा हाकून लाविलेला शत्रुदेखील त्याच्या पाठीमागें त्याचा दोष दाखवील असें मला वाटत नाहीं."

अंतःपुरांतून बाहेर पडल्यावर रामापुढें मोठी कामगिरी येऊन पडली होती. ती कामगिरी म्हटली म्हणजे आपली माता व पत्नी यांचें सांत्वन करणें ही होय. यापूर्वीं कौसल्येची स्थिति बरीच दुःखमय होती व आतां रामाला यौवराज्याभिषेक व्हावयाचा असल्यामुळें तिला आपली स्थिति सुधारण्याची आशा लागून राहिली होती. इतक्यांत खुद्द रामानें येऊन आपल्या वनवासासंबंधीं हकीगत कळविल्यामुळें तिला दुहेरी दुःख झालें. आपली पुढील कष्टमय अवस्था तिच्या डोळ्यापुढें उभी राहिली व रामाच्या वनवासापेक्षांहि तिला ही कल्पना सहन करवेना. दुःखाचा पहिला उमाळा ओसरल्याबरोबर कौसल्येनें आपल्या पुढील भयंकर स्थितीचें चित्र रामापुढें रेखाटलें आहे:—

**न दृष्टपूर्वं कल्याणं सुखं वा पतिपौरुषे।**
**अपि पुत्र विपश्येयमिति रामास्थितं मया ॥ २।२०।३८ ॥**
**सा बहून्यमनोज्ञानि वाक्यानि हृदयच्छिदाम्।**
**अहं श्रोष्ये सपत्नीनामवराणां परा सती ॥ ३९ ॥**
**त्वयि संनिहितेऽप्येवमहमासं निराकृता।**
**किं पुनः प्रोषिते तात ध्रुवं मरणमेव हि ॥ ४१ ॥**

"हे रामा, माझ्या पतीपासून जरी मला सुख प्राप्त झालें नाहीं, तथापि (तूं युवराज झालास म्हणजे) यापुढें तरी मला सुख मिळेल या आशेनें मीं इतके दिवस काढिले. सर्व राजपत्न्यांमध्यें जरी मी श्रेष्ठ आहें तरी (तूं अरण्यांत गेल्यामुळें) मला यापुढेंहि माझ्या कनिष्ठ सवती अंतःकरणाला घरें पडणारीं अप्रिय भाषणें बोलतील व तीं मला (निमूटपणें) ऐकावीं लागतील. तूं जवळ

असतांहि जर मला असा अपमान सहन करावा लागत होता, तर बाबा! तूं अरण्यांत गेल्यावर मला मरण येणार यांत शंका नाहीं!"

याप्रमाणें शोक करून रामाचा वनवासास जाण्याविषयींचा निश्चय शिथिल करण्याचा कौसल्येनें यत्न चालविला आहे, इतक्यांत लक्ष्मणानें आपलें भाषण सुरू केलें. लक्ष्मणाचें भाषण वाचिलें म्हणजे भारतांतील भीमसेन व युधिष्ठिर यांच्या संवादाची आठवण झाल्यावांचून राहत नाहीं. युधिष्ठिर कौरवांबरोबर युद्ध करण्याचें मनांत न आणितां क्लेश भोगीत आहे असें पाहून त्याजवर भीमसेनानें जसे वाक्प्रहार केले आहेत, तसेच वाक्प्रहार रामाचा पित्राज्ञापरिपालनार्थ वनवासास जाण्याविषयींचा दृढनिश्चय पाहून लक्ष्मणानें येथें केले आहेत. या गोष्टीची बाहेर परिस्फुटता झाली नाहीं तोंपर्यंत राज्याचा अधिकार आपल्याकडे घेण्याबद्दलहि त्यानें सूचना केली आहे. लक्ष्मणानें या वेळीं नाना तऱ्हेचे कोटिक्रम करून पित्याची आज्ञा पालन करण्याची जरूर नाहीं असें जोरदार भाषेनें प्रतिपादन केलें आहे. लक्ष्मणाचें सदर भाषण वाचण्यासारखें आहे. रामायणांत वीररसाचे जे कांहीं प्रसंग आहेत त्यांत लक्ष्मणाचें भाषण उत्कृष्ट वठलें आहे. लक्ष्मणाच्या भाषणानें रामाला या वेळीं मोह झाला नाहीं व त्यानें आपला निश्चय सोडिला नाहीं. भारतांत युधिष्ठिरानें भीमसेनाला जें उत्तर दिलें आहे तेंच रामानें येथें लक्ष्मणाला दिलें आहे:—

**धर्मो हि परमो लोके धर्मे सत्यं प्रतिष्ठितम्।**
**धर्मसंश्रितमप्येतत्पितुर्वचनमुत्तमम्॥** २।२१।४१॥

"या जगामध्यें धर्म हाच श्रेष्ठ आहे. सत्यालाहि त्याचा आधार आहे. आणि माझ्या पित्याचें हें उत्तम भाषण धर्मालाच अनुसरून आहे."

कौसल्येचें सांत्वन करून राम सीतेच्या मंदिरांत गेला. रामानें तिला सर्व हकीगत कळवितांच तिनें बरोबर येण्याचा हट्ट धरिला. सीतेचा हा निश्चय ढळण्याकरितां वनवास किती भयंकर आहे त्याचें रामानें वर्णन केलें. हें वर्णन सबंध एक सर्ग आहे. वनांतील हिंस्र पशूंविषयीं, राक्षसांविषयीं व उदरभरणार्थ पडणाऱ्या कष्टांविषयीं वर्णन करून तिला भय दाखविण्याचा यत्न केला आहे. रामाचा हा प्रयत्न फुकट जाऊन तिनें उलट कोटिक्रम लढवून त्याला निरुत्तर

केलें आहे. रामासारख्या शूर पुरुषानें क्षुद्र श्वापदांची भीति पुढें करावी व याकरितां प्रत्यक्ष आपल्या पत्नीला बरोबर नेण्यास त्यानें मागें घ्यावें, ही गोष्ट किती लाजिरवाणी आहे, हें मनांत आणून तिनें रामाला पुढील प्रश्न खोचून विचारिला:—

**किं त्वामन्यत वैदेहः पिता मे मिथिलाधिपः ।**
**राम जामातरं प्राप्य स्त्रियं पुरुषविग्रहम् ॥ २।३०।३ ॥**
**किं हि कृत्वा विषण्णस्त्वं कुतो वा भयमस्ति ते ।**
**यत्परित्यक्तकामस्त्वं मामनन्यपरायणाम् ॥ ५ ॥**

"हे रामा, माझा पिता मिथिलाधिपति जनक याला जर कळलें कीं, आपला जांवई जरी पुरुषाप्रमाणें दिसतो आहे तरी त्याचें शौर्य स्त्रियांइतकें आहे; तर त्याला काय बरें वाटेल ? मीं केवळ आपल्यावर अवलंबून राहणारी असूनहि माझा त्याग करण्यास आपण उद्युक्त झालां असें आपणास भय तरी कोणतें वाटतें ? आपण खिन्न कां झालां ?"

नंतर रामानें सीतेला आपल्याबरोबर वनांत येण्यास अनुज्ञा दिली. लक्ष्मणहि बरोबर वनांत जाण्यासाठीं तयार झाला. आपल्या भोग्य वस्तु दान देऊन तीं सर्व दशरथाकडे निरोप मागण्याकरितां निघून गेलीं. या वेळीं दशरथानें अशी तोड सुचविली कीं, सर्व उपभोग्य वस्तु, सैन्य, नगरांतील व्यापारी, आयुधें वगैरे रामाबरोबर अरण्यांत पाठवून त्याला राज्याचें स्मरणहि होणार नाहीं अशी व्यवस्था करावी. असें केलें असतें तर कोणाची प्रतिज्ञा व्यर्थ न होतां इष्ट हेतु सिद्धीस गेला असता; परंतु ही गोष्ट कैकेयीला रुचणें शक्यच नव्हतें. तिनें रागानें स्पष्ट सांगितलें कीं:—

**राज्यं गतधनं साधो पीतमण्डां सुरामिव ।**
**निरास्वाद्यतमं शून्यं भरतो नाभिपत्स्यते ॥ २।३६।१२ ॥**

"मद्यपान केल्यानंतर त्या भांड्याचा ज्याप्रमाणें उपयोग नाहीं, त्याप्रमाणें द्रव्य नेल्यानंतर राज्यहि निरुपयोगी होणार. तेव्हां असल्या शून्य राज्यांचा स्वीकार भरत करणार नाहीं."

आतां मात्र निरुपाय झाला ! खरोखर, कैकेयीचें हें भाषण कोणालाहि संताप आणण्यासारखें होतें. सिद्धार्थनामक मंत्र्यानें तर तेथेंच तिची चांगली

निर्भर्त्सना केली. इतकें झालें तरी रामानें तिळमात्र संताप दाखविला नाहीं. हत्तीचें दान केल्यावर त्याला बांधावयाच्या दोरीवर मन ठेवण्यांत काय अर्थ आहे, असा मार्मिक प्रश्न करून त्यानें आपल्याकरितां अशा तऱ्हेची व्यवस्था करण्याची मुळींच जरूर नाहीं असें अगदीं शांतपणें कळविलें आणि नेसण्याकरितां वल्कलें आणण्यास सांगितलें. रामाच्या तोंडांतून हे शब्द पुरतेपणीं बाहेर पडत आहेत तोंच कैकेयीनें स्वतः वल्कलें आणून दिलीं. राम व लक्ष्मण यांनीं त्यांतील दोन वल्कलें परिधान केलीं व तिसरें वल्कल सीतेनें नेसण्याकरितां आपल्या हातांत घेतलें. हा प्रसंग अत्यंत शोकजनक होता! वल्कलें नेसण्याचा प्रसंग तिजवर कधीं आला नसल्यामुळें हातांत वल्कल घेऊन ती कांहीं वेळ मुग्धपणें उभी राहिली; तिच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले व किंचित् लज्जित होऊन तिनें हलकेच प्रश्न केला कीं:—

**कथं नु चीरं बध्नन्ति मुनयो वनवासिनः ॥२।३७।१२॥**

"अरण्यांत राहणारे ऋषि कसें बरें वल्कल नेसतात तें?"

सीता त्या वेळीं कशा स्थितींत राहिली होती, त्याचें वर्णन एकाच श्लोकांत महर्षींनीं उत्कृष्ट प्रकारें केलें आहे:—

**कृत्वा कण्ठे स्म सा चीरमेकमादाय पाणिना।**
**तस्थौ ह्यकुशला सीता व्रीडिता जनकात्मजा ॥ २।३७।१३ ॥**

"त्या जनककन्या सीतेला वल्कल नेसतां न आल्यामुळें तिनें एक गळ्यांत अडकविलें आणि दुसरें हातांत घेऊन ती लज्जित होऊन उभी राहिली."

चित्रकारांना आपलें कौशल्य दाखविण्यास हा प्रसंग फार उपयुक्त आहे! निरनिराळे विकार उत्पन्न होऊन तिच्या अंतःकरणांत उडालेला गोंधळ चेहऱ्यावर उठविण्याचें काम फार कुशलतेचें व मार्मिकपणाचें आहे! अस्तु; मग रामानें स्वतः तिला वल्कलें नेसविलीं. सीतेला वल्कलें परिधान केलेली पाहून अंतःपुरांतील सर्व स्त्रिया आक्रोश करूं लागल्या. एवढेंच नव्हे तर वसिष्ठमहर्षींच्याहि डोळ्यांतून अश्रु आले. निघतेवेळीं कौसल्येनें सीतेला उत्कृष्ट उपदेश केला असून तिनेंहि समर्पक उत्तर दिलें आहे. यानंतर त्या तिघांनीं सर्वांचा निरोप घेण्यास प्रारंभ केला. हा प्रसंग किती हृदयद्रावक होता! राजकुलांत उत्पन्न झाल्यामुळें निरंतर सुखांत

लोळणाऱ्या त्या तिघां स्त्रीपुरुषांना वल्कलें नेसल्याचें ऐकूनच कोणाला गहिंवर आल्याशिवाय राहील बरें? रामाच्या अंगच्या सद्गुणांनींच गादीवर बसण्यापूर्वी तो सर्वजनांचा बहिश्वर प्राण होऊन राहिला होता. त्याची नेहमींची साधी रहाणी, सदाचरण, प्रजाजनांत मिसळून राहण्याची पद्धति, त्यांच्याविषयीं कुटुंबांतील मनुष्याप्रमाणें त्याच्या मनांत वाटणारें प्रेम इत्यादि गुणांच्या योगानें त्यानें कल्पनातीत लोकप्रीति संपादन केली होती. सामान्यतः लोकांची दोषाकडे नेहमीं सूक्ष्मदृष्टि असते. दोष ठेवण्यास स्थल कोणतें आहे हें ते मोठ्या काळजीनें शोधीत असतात. तेव्हां इतक्या अडचणींतून तावून सुलाखून अव्यंगपणें बाहेर पडणें म्हणजे एक भयंकर दिव्य आहे. लोकप्रीति केवळ बाह्य उपचारांनीं मिळवितां येणें शक्य नाहीं. ती इतकी सुलभ नाहीं. रामानेंहि जन्मापासून हा कालपर्यंत जी तपश्चर्या चालविली होती तिचें फल त्याला या वेळीं मिळालें. त्यानें लोकप्रीतीकरितां ह्मणून कधींहि प्रयत्न केला नव्हता. आपलें कर्तव्य म्हणून जें कांहीं करणें त्याला आवश्यक वाटत असें तेंच तो करीत असे. लोकप्रीति त्याजकडे आपोआप धांवून आली होती. त्याचें धैर्य इतकें अखंड होतें कीं, त्याच्यावरील या भयंकर प्रसंगाचें कथानक ऐकून पुष्कळ लोकांनां आपलीं दुःखें सहन करण्यास आज हजारों वर्षें त्याच्या धैर्याचा वांटा मिळत आला आहे. निघतेवेळीं सर्व उपमातांना भेटून त्यानें त्यांचा जो निरोप घेतला तो त्याच्या गंभीर, शांत व धीरोदात्त चित्तवृत्तीची साक्ष देत असून त्याचे शब्द हृदयाला पाझर आणणारे आहेत:—

**संवासात्परुषं किंचिदज्ञानाद्वापि यत्कृतम्।**
**तन्मे समुपजानीत सर्वाश्चामंत्रयामि वः॥** २।३९।३८॥

"अज्ञानाच्या योगानें किंवा आपण नेहमीं एके स्थलीं राहत असल्यामुळें (संवयींच्या योगानें) जर माझ्या हातून आपल्याशीं कठोर आचरण झालें असेल तर त्याची मला क्षमा करा; मी तुम्हां सर्वांचा निरोप घेतों."

अशा रीतीनें सर्वांचा निरोप घेतल्यावर लक्ष्मण आपल्या मातेकडे गेला. त्यानें वनांत जावें अशी कैकेयीची अट नसतां तो केवळ प्रेमानें अरण्यांत जाण्यास तयार झाला होता. सुमित्रेला या वेळीं अतिशय दुःख झालें होतें; तथापि आपला

मुलगा आपलें कर्तव्य बजावीत आहे असें तिचें मन तिला ग्वाही देत असल्या-मुळें तिनें तें धैर्यानें सोशिलें आणि आपुल्या पुत्राची प्रशंसा करून त्याला वनांत जाण्यास अनुमोदन दिलें. सुमित्रा ही कौसल्येपेक्षांहि अधिक धीराची होती असें तिच्या भाषणावरून दिसतें.

**व्यसनी वा समृद्धो वा गतिरेष तवानघ ।**
**एष लोके सतां धर्मो यज्ज्येष्ठवशगो भवेत् ॥** २।४०।६ ॥
**इदं हि वृत्तमुचितं कुलस्यास्य सनातनम् ।**
**दानं दीक्षा च यज्ञेषु तनुत्यागो मृधेषु हि ॥** ७ ॥
**रामं दशरथं विद्धि मां विद्धि जनकात्मजाम् ।**
**अयोध्यामटवीं विद्धि गच्छ तात यथासुखम् ॥** ९ ॥

"हे निष्पाप लक्ष्मणा, या लोकामध्यें ज्येष्ठभ्रात्याला अनुसरून वागणें हाच सज्जनांचा धर्म आहे. यासाठीं तुझा भ्राता राम यावर कोणतेंहि संकट येवो अथवा त्याचें कल्याण होवो, तोच तुझी गति आहे. तर याप्रमाणें आचरण करणें, तसेंच दान करणें, यज्ञ करणें व युद्धामध्यें देहत्याग करणें हें सर्व आमच्या कुलाला योग्य असून त्याप्रमाणें पूर्वींपासून आचरण करीत आले आहेत. यासाठीं रामाला दशरथ मान, सीतेला माझ्या ठिकाणीं समज आणि अरण्य हीच अयोध्या-नगरी मानून तूं सुखानें गमन कर."

या तिच्या उपदेशावरून असल्या संकटाच्या वेळींहि तिची कर्तव्यबुद्धि किती जागृत राहत असे हें स्पष्ट दिसून येतें. रामाला पोंचविण्याकरितां दशरथादि सर्व मंडळी गेली होती. रथ दिसेनासा होईपर्यंत ती अयोध्येच्या सीमेवर राहिली होती; नंतर परतली. परंतु त्यांचेबरोबर गेलेले नगरवासी लोक मात्र परत आले नाहींत. आपल्या ठिकाणीं असलेली प्रीति यापुढें भरतावर करा अशी रामानें त्यांची परोपरीनें विनवणी केली. तरी कोणीहि परत जाईना. शेवटीं निरुपाय होऊन त्यानें पहिल्याच मुक्कामास सर्व मंडळी रात्रौ झोंपीं गेली असतां त्यांना चुकवून आपला पुढील रस्ता सुधारला. येथून त्याच्या वनवासास प्रारंभ झाला. अयोध्येचा अखेरचा निरोप घेतांना त्याचें अंतःकरण किती भरून गेलें असेल! ज्या प्रजाजनांवर त्याचें पुत्रवत् प्रेम होतें, त्यांना निष्ठुरपणें अरण्यांत टाकून जातांना

त्याचें हृदय शतधा विदीर्ण झालें असलें पाहिजे! प्रजाजनांची अवस्था तर याहून भयंकर झाली होती! अयोध्येंतील पुष्कळ प्रजाजन रामाबरोबर वनांत जाण्यासाठीं निघाले होते; यामुळें अयोध्येची स्थिति अरण्याहून उदासीन झाली होती! ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चारहि वर्णांचे नित्य व्यवहार बंद झाले होते! रामानें चुकविल्यामुळें प्रजाजन परत आले तरी अयोध्येची उदासीनता नष्ट झाली नाहीं! आपल्या कुटुंबांतील हितकर्ता मनुष्य गेल्याप्रमाणें त्यांना तीव्र दुःख झालें होतें. अयोध्येंतील प्रजाजनांची ही स्थिति कोणत्याहि प्रसंगाला उपमान होऊन राहिली आहे. सुमंत्रसारथि रामाला वनांत पोंचवून परत आला त्या वेळचें वर्णन दिलें आहे:—

**सुमंत्रमभिधावन्तः शतशोऽथ सहस्रशः ।**
**क्व राम इति पृच्छन्तः सूतमभ्यद्रवन्नराः ॥ २।५७।९ ॥**
**ते तीर्ण इति विज्ञाय बाष्पपूर्णमुखा नराः ।**
**अहो धिगिति निःश्वस्य हा रामेति विचुक्रुशुः ॥ ११ ॥**
**शुश्राव च वचस्तेषां वृन्दं वृन्दं च तिष्ठताम् ।**
**हताः स्म खलु येनेह पश्याम इति राघवम् ॥ १२ ॥**

"(तेव्हां) 'राम कोठें आहे?' 'राम कोठें आहे?' असें म्हणत शेंकडों हजारों लोक त्या सुमंत्र सारथ्याच्या मागून धांवूं लागले! ते (गंगानदी उतरून पलीकडे) गेले असें त्यांना जेव्हां कळलें तेव्हां त्यांच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. 'धिक्कार! धिक्कार!' असें म्हणून दीर्घ सुस्कारे सोडून 'हे रामा! रामा!' असा ते आक्रोश करूं लागले. लोक रस्त्यामध्यें टोळ्याटोळ्यांनीं उभे होते व 'दुर्दैव आमचें! आतां आमच्या दृष्टीला राम कोठून पडणार?' असा आक्रोश करीत होते, असें त्यानें ऐकिलें."

रामाची लोकप्रियता केवढी होती हें या उताऱ्यावरून कळून येईल! रामाचा वनवास हा रामचरित्रांतील एक महत्त्वाचा प्रसंग आहे. रामचरितास ज्या कित्येक कारणांनीं इतकें महत्त्व प्राप्त झालें आहे त्यांतील हें एक असून रामाच्या अनेकविध सद्गुणांचें प्रदर्शन या वेळीं झालेलें आहे. त्याचें अप्रतिम धैर्य व निस्सीम कर्तव्यनिष्ठा हे दोन गुण त्याच्या चरित्रांत

या प्रसंगीं उत्कटतेनें दिसून येतात. त्या वेळीं व सांप्रतहि त्याच्यावर लोकांचें जें प्रेम बसलें आहे त्याचें कारण त्याच्या अंगचे हे गुण होत; आणि त्याचें स्पष्टीकरण होईल तितकें येथें करावें या हेतूनें वरील प्रसंगाचें वर्णन महत्त्वाचे उतारे घेऊन दिलें आहे.

## स्वार्थत्यागाचा कळस.

यापुढील रामाचें चरित्र येथें विस्तृतपणें सांगण्याची आवश्यकता नाहीं. त्याचे चरित्राचें रहस्य शक्य तितक्या श्रमानें काढावें या उद्देशानें प्रस्तुत भाग लिहिण्यास घेतला आहे, असें पूर्वीच कळविलें आहे. या हेतूस अनुसरून म्हणा किंवा सर्वश्रुत कथा पुन: लिहिण्यानें वाचकांचें मन विरस होण्याच्या भीतीनें म्हणा, रामायणाचा संक्षेप करून तो येथें लिहिण्याची आमची इच्छा नाहीं. रामाच्या चरित्रांत एका कथेला महत्त्व व दुसरीला लघुत्व देणें म्हणजे एक तऱ्हेनें अन्याय आहे. तथापि अशा रीतीनें प्रत्येक बाबीला महत्त्व देऊन जर तिचें उद्घाटन करावयाचें मनांत आणिलें तर तितका स्थलावकाश आमच्या-पाशीं नसून त्यांत बरीच अतिशयोक्ति होण्याचा संभव आहे. रामाच्या पुढील चरित्रांत वरीलसारखे अनेक प्रसंग आहेत. रामायण वाचतांना त्या प्रसंगांकडे ज्या दृष्टीनें आपण पाहिलें पाहिजे त्या दृष्टीनें पाहण्याची आमच्या लोकांस संवय नाहीं. याकरितां रामाला अरण्यांत जावें लागलें त्या प्रसंगाचें वर्णन या दृष्टीनें वर दिलें आहे. क्षणिक सुखाची लालूच दाखवून कर्तव्यापासून भ्रष्ट करूं पहाणारे अनेक प्रसंग त्याच्या चरित्रांत आलेले आहेत. प्रत्येक प्रसंगीं रामानें क्षणिक सुखास लाथ मारून कर्तव्यापासून आपलें पाऊल तिळभरहि ढळूं दिलेलें नाहीं. त्याला सुखाचा लाभ कधीं झाला, हें पाहण्यासाठीं कोणीं त्याचें चरित्र जर शोधूं लागला तर त्याची इच्छा सफल होईल असें वाटत नाहीं. त्याचें जीवित संकटांनीं पूर्णपणें व्यापिलेलें आहे. सुखाचा पेला भरून ओंठाजवळ नेणार तोंच तो प्रत्येक वेळीं कोणीं तरी लवंडून टाकिलेला आहे. थोर पुरुष संकटांशीं टक्कर देऊन नेहमींच पुढें येत असतात, हें तत्त्व सत्य आहे. आणि या तत्त्वाचे उदाहरणांत रामचरित्रास अग्रस्थान द्यावें लागेल. वन-वास संपवून अयोध्येला परत आल्यावर जो कांहीं काल त्यानें सुखोपभोग घेतला

असेल तेवढाच काय तो त्याच्या चरित्रांत अपवादाचा भाग आहे. इतक्या संकटांनीं त्याला जर्जर केलें तरी त्याचा उत्साह कमी झाला नव्हता. अशा तऱ्हेचा त्याचा स्वभाव असल्यामुळें लोकापवाद टाळण्यासाठीं त्यानें आपल्या प्रियपत्नीचा धैर्यानें त्याग केला. ज्या पत्नीचा वियोग झाल्यामुळें रामानें केलेले विलाप आपण पूर्वीं वाचिले तिचाच त्याग करण्यास तो निःशंकपणें उद्युक्त होतो ही केवढी अद्भुत गोष्ट आहे ! तिच्याकरितां रामानें इतके प्रयत्न करून तिला परत आणिली व अयोध्येंत आल्यावर त्यांना राज्याभिषेक झाला तोंच हा प्रसंग येऊन गुदरला ! या बाबतींत तीं दोघेंहि सारख्याच योग्यतेचीं होतीं. रामानें तिचा त्याग केला तरी त्यावरील तिचें प्रेम यत्किंचित् कमी झालें नव्हतें. आपल्या पातिव्रत्याचें सूत्र तिनें यापूर्वींच प्रकट करून ठेविलें होतें.

**दीनो वा राज्यहीनो वा यो मे भर्ता स मे गुरुः ॥**

" माझा भर्ता जरी त्याचें राज्य जाऊन तो दीन झाला तरी मला पूज्य आहे." तिला लक्ष्मणानें अरण्यांत आणून सोडिलें त्या वेळीं तिनें त्याबरोबर रामाला जो निरोप पाठविला आहे तो अत्यंत करुणास्पद असून तो वाचीत असतां त्या भयंकर स्थितींत असलेली सीतेची धैर्यशाली मूर्ति डोळ्यांपुढें उभी राहिल्याशिवाय राहत नाहीं:—

**वक्तव्यश्चापि नृपतिर्धर्मेषु सुसमाहितः ॥ ७।४८।११ ॥**
**जानासि च यथा शुद्धा सीता तत्त्वेन राघव ।**
**भक्त्या च परया युक्ता हिता च तव नित्यशः ॥ १२ ॥**
**अहं त्यक्ता च ते वीर अयशोभीरुणा जने ।**
**यच्च ते वचनीयं स्यादपवादः समुत्थितः ॥ १३ ॥**
**मया च परिहर्तव्यं त्वं हि मे परमा गतिः ।**
**वक्तव्यश्चैव नृपतिर्धर्मेषु सुसमाहितः ॥ १४ ॥**
**यथा भ्रातृषु वर्तेथास्तथा पौरेषु नित्यदा ।**
**परमो ह्येष धर्मस्ते तथा कीर्तिरनुत्तमा ॥ १५ ॥**
**यत्तु पौरजने राजन्धर्मेण समवाप्नुयात् ।**
**अहं तु नानुशोचामि स्वशरीरं नरर्षभ ॥ १६ ॥**

**यथापवादः पौराणां तथैव रघुनन्दन ।**
**पतिर्हि देवता नार्याः पतिर्बन्धुः पतिर्गुरुः ॥ १७ ॥**
**प्राणैरपि प्रियं तस्माद्भर्तुः कार्यं विशेषतः ।**
**इति मद्वचनाद्रामो वक्तव्यो मम संग्रहः ॥ १८ ॥**

" सावधानपणानें धर्माचरण करणाऱ्या त्या राजाला ( रामाला ) माझा निरोप, कळवा—' हे रामा, सीता तत्त्वतः शुद्ध असून आपणावर तिचें प्रेम आहे व आपल्या हिताबद्दल ती नेहमीं काळजी वाहते हें आपण जाणतच आहां. लोकांमध्यें दुर्लौकिक होऊं नये या भीतीनें आपण माझा त्याग केला आहे. माझ्याविषयीं लोकांमध्यें उठलेला निंद्य अपवाद आपणांस सहन करावा लागत आहे, त्याचा परिहार मीच करणें योग्य आहे. कारण माझी श्रेष्ठ गति आपणच आहां.' लक्षपूर्वक धर्मप्रमाणें वर्तन ठेवणाऱ्या त्या राजाला ( रामाला ) आणखीहि असें सांगा—' आपल्या बंधूंशीं आपण जसे वागतां तसे पौरजनांशीं नेहमीं वागत जा. पौरजनांशीं धर्मानें वागणें हाच आपला श्रेष्ठ धर्म असून त्यापासूनच उत्तम प्रकारची कीर्ति राजाला मिळत असते. हे पुरुषश्रेष्ठा, माझ्या शरिराची मी काळजी करीत नाहीं. लोकांमध्यें उठलेल्या अपवादाविषयीं एकंदरींत आपण योग्य तेंच केलें आहे. पति हा स्त्रियांची देवता, बंधु व गुरु असून, प्राणांचीहि पर्वा न करितां त्याचें प्रिय करणें हें त्यांचें कर्तव्य आहे.' याप्रमाणें आपण माझा निरोप रामाला जाऊन सांगा."

हा निरोप वाचला असतां तो ऐकून लक्ष्मणाची जी अवस्था झाली तिचा अनुभव वाचकांस कांहीं वेळ तरी आल्यावांचून राहत नाहीं! तिचें अंतःकरण किती कोमल परंतु उदार व धैर्यपूर्ण होतें, याची साक्ष या तिच्या निरोपावरून वाचकांस पटणार आहे! तिच्या सर्व चरित्राचें रहस्य या तिच्या शब्दांत सांठविलेलें आहे! घोर अरण्यांत तिचा त्याग केला असतां व पुढील भयंकर स्थितीचें चित्र तिच्या डोळ्यांपुढें मूर्तिमंत उभें असतां तिनें आपल्या पतीवरील प्रेम कायम ठेवून त्याजकडे निरोप पाठविण्यास धजावें ही आश्चर्याची गोष्ट आहे! विशेषतः आपल्यावर आलेल्या प्रसंगांतहि आपल्या प्रजेचें स्मरण ठेवून तीवरील आपलें प्रेम तिनें व्यक्त करावें हें पाहून कोणास

खरें कौतुक वाटणार नाहीं? पतीनें आपला त्याग करावयास सांगितलें असलें तरी आपण शुद्ध असल्याबद्दल त्याची अंतःकरणांत खातरी असून केवळ लोकापवादासाठीं त्यानें आपला त्याग केला आहे, अशी तिची दृढ समजूत होती व ती खरीहि होती. या समजुतीच्या आधारावर तिनें आपलें दुःख सहन केलें व अखेरीस वाल्मीकिमहर्षींनीं भरदरबारांत तिला दिव्य करावयास सांगितलें असतां तिनें न डगमगतां आपल्या शुद्धतेबद्दल प्रतिज्ञा केली! हा प्रसंग हृदयद्रावक असला तरी तो घडून आला, हें योग्य झालें! कारण रामाच्या मनांत सीतेविषयीं शंका नव्हतीच; लोकांकरितां त्यानें तिचा त्याग केला होता. म्हणून तिच्याविषयीं लोकांची खातरी पटविण्याचें कार्य होणें आवश्यक होतें! व तें महर्षींनीं मोठ्या युक्तीनें घडवून आणिलें! या दिव्याचा परिणाम मात्र चांगला झाला नाहीं! तिची प्रतिज्ञाच भयंकर होती!

**मनसा कर्मणा वाचा यदि रामं समर्चये।**
**तथा मे माधवी देवी विवरं दातुमर्हति॥ ७।९७।१६॥**
**यथैतत्सत्यमुक्तं मे वेद्मि रामात्परं न च।**
**तथा मे माधवी देवी विवरं दातुमर्हति॥ १७॥**

"मनानें, शरीरानें अथवा वाणीनें जर मीं रामाचेंच आराधन केलें असेल तर मला ही भूमाता विवर देईल. रामाशिवाय दुसरा पुरुष मला माहित नाहीं हें जर खरें असेल, तर मला ही भूमाता विवर देईल!"

ही तिची इच्छा तत्काल पुरी झाल्यामुळें पुनः तिचें दर्शन कोणाला झालें नाहीं! अशा रीतीनें रामायणाचा शेवट दुःखांत झाला!

## काव्य असून इतिहास.

काव्याचीं साहित्यशास्त्रांतील लक्षणें व प्रसिद्ध असलेल्या काव्यांचें सामान्य स्वरूप पाहिलें तर काव्याचा विषय ऐतिहासिक पाहिजे असें नाहीं, हें कळून येईल. काव्याचा विषय ऐतिहासिक असो वा काल्पनिक असो, कुशल कवीचें रचनाचातुर्य कोठेंही प्रकट होतें; परंतु आतां आपणांस कवीच्या कौशल्याविषयीं विचार करावयाचा नसून कथानकाच्या सत्यतेविषयीं विचार करावयाचा आहे. प्रथम हें सांगणें आवश्यक आहे कीं, याचा निर्णय करण्यासारखें प्रत्यक्ष प्रमाण

रामायणांतून देतां येण्यासारखें नाहीं. सर्व विवेचन केवळ अनुमानावर चालाव-याचें आहे. आपल्या प्राचीन वाङ्मयांत कल्पित कथा आहेत व त्यांच्या साहाय्यानें महत्त्वाचे सिद्धांत लोकांना शिकविण्याचे प्रयत्न आमचे पूर्वजांनीं केलेले आहेत. तेव्हां लोकशिक्षणाच्या उदात्त हेतूनें वाल्मीकींनीं हें काव्य लिहून ठेविलें असेल, अशी कल्पना कां करूं नये? रामचरित्राविषयीं लोकांत असलेला आदर पाहिला तर आमचेकडे अशी शंका कोणी घेईल, असें नाहीं. तथापि तटस्थपणें पाहिल्यास अशी शंका येणें संभवनीय आहे, व ती घेऊनच आपणांस तिजवि-षयीं येथें विचार करावयाचा आहे. आमच्या प्राचीन वाङ्मयांत कल्पित कथा असल्या तरी त्यांचें स्वरूप विशाल नाहीं हें सहज लक्षांत येण्यासारखें आहे. अशा कथेचा उपयोग एकादें तत्त्व सांगण्यापुरताच केलेला असतो. पंचतंत्रांतील कथा तर उघड उघड कल्पित आहेत. वाङ्मयाच्या या स्वरूपावरून कल्पित कथांविषयींची कवींची प्रवृत्ति कशा प्रकारची होती, हें दिसून येतें. गुणाढ्याची बृहत्कथा, तसेंच कादंबरी, वासवदत्ता वगैरे ग्रंथ काल्पनिक व ऐतिहासिक अशा दोनहि स्वरूपांत आहेत. यांत कित्येक कथा काल्पनिक आहेत तर कित्येक उघड उघड ऐतिहासिक आहेत; आणि कल्पित कथांना आपण कल्पित म्हणून सोडून दिलें तरी त्यांतही थोडा ऐतिहासिकपणा असतो. कल्पित कथांतील पात्रें कवि कल्पनेनें बनवीत असला तरी त्याच्या दृष्टीपुढें त्याला इष्ट असलेल्या कालां-तील परिस्थिति असते व तिचें तो चित्र रेखाटित असतो; म्हणजे अशा प्रकारें तो त्या त्या कालांतील विद्यमान व्यक्तींचीं नांवें बदलून इतिहासच लिहीत असतो. कै. हरिभाऊ आपटे यांच्या सामाजिक कादंबऱ्यांतून महाराष्ट्राचा प्रस्तुत कालचा इतिहासच लिहिलेला आहे. कल्पित कथांचें तात्त्विक स्वरूप अशा प्रकारचें असलें तरी इतिहास या नात्यानें त्याला गौणत्व येतें, हें नाकारितां येत नाहीं. आमच्या संस्कृत वाङ्मयांत सांगोपांग काल्पनिक अशी मोठी कथा नाहीं. काल्पनिक म्हणून गणलेल्या कांहीं ग्रंथांचें स्वरूप वर सांगितल्याप्रमाणें उभयविध आहे. साग्र कल्पित अशा कथा पुष्कळ आहेत; पण त्या फार लहान आहेत. तत्त्वोपदेश ठसविण्याचे हेतूनें अशा कथा प्रायः सांगितलेल्या असल्याचें पूर्वी सांगितलें आहेच. रूपकांचा प्रकार यांतच येतो. ऋग्वेदांत वृत्रवधाची कथा आहे व तीविषयीं

विवरण करतांना निरुक्तकारांनीं वृत्र शब्दाचे अर्थाविषयीं मतभेद दिले आहेत. व्युत्पत्तिपक्षाचे लोक शब्दाची व्युत्पत्ति पाहून त्याचा अर्थ मेघ असा करितात, व पर्जन्यवृष्टीवरील हें रूपक आहे अशी या कथेची उपपत्ति लावितात. आणि ऐतिहासिक पक्षाचे, वृत्र हा असूर असून त्याचा इन्द्रानें वध केला, असा इतिहास यांत निवेदन केला आहे असें सांगतात. पण इन्द्राला कोणताही शत्रु कधींच नसल्याची एक ऋचा प्रमाण म्हणून देऊन निरुक्तकारांनीं वृत्रवधाची कथा इतिहास नसून रूपक आहे हें आपलें मत सिद्ध केलें आहे. याच रूपकाचा इतिहास म्हणून पुराणांतून अनुवाद केलेला आहे. तथापि पुराणांतील कथेचें मूळ शोधिल्यास वेदांतील रूपक आढळल्यावांचून रहात नाहीं. अशा रीतीनें कल्पित कथेचें कल्पितत्व बाहेर येतेंच येतें. स्वतः कवीनें तर इतिहास म्हणूनच हें काव्य लिहिलें आहे, व स्वतः राम राज्यावर असतां लिहिलें आहे. महर्षींनीं नारदाला केलेल्या प्रश्नांतच हें स्पष्ट दिसून येतें. दुसरें असें कीं, काल्पनिक कथा म्हणून रामायण लिहिलें असतें तरी तसें प्रारंभीं स्वतः न सांगण्याइतका त्यांत दोष कसला ? ऐतिहासिक ग्रंथ लिहिण्यांत एका प्रकारचें तर काल्पनिक कथा लिहिण्यांत दुसऱ्या प्रकारचें कौशल्य लागतें, व हीं दोनहि भूषणावह आहेत. काल्पनिक कथा लिहूनहि तिचें कल्पितत्व गुप्त राखणारे कित्येक पंडित आहेत. इंग्रजींत "गलिवरचा वृत्तांत" म्हणून कादंबरी असून त्यांत लेखकानें कित्येक कल्पित देशांतील प्रवासांचे वृत्तांत दिले आहेत व या मिषानें त्यानें लोकांतील गुणदोषांवर टीका केली आहे. असें सांगतात कीं, एका देशांतील प्रवासाचा अद्भुत वृत्तांत वाचून एकानें तो देश कोठें आहे असें जिज्ञासाबुद्धीनें लेखकाला विचारिलें होतें ! तथापि येथें हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, त्या जिज्ञासूला भूगोलवर्णनांत किंवा नकाशांत तो प्रदेशांत आढळला नाहीं व यासाठीं त्यानें लेखकाकडे धांव घेतली. एतावता चाणाक्ष वाचकांस काल्पनिक कथांची कल्पितता उमगण्यास असलें कांहीं तरी साधन असतें. रामायणाकडे पाहिलें तर त्यांत वर्णिलेलीं स्थलें, प्रांत, पर्वत वा नद्या कित्येक त्या तर कित्येक दुसऱ्या नांवानें अद्यापि आहेत. अयोध्या, मिथिला वगैरे नगरें; अंग, मागध, कोसल, सौवीर, सौराष्ट्र वगैरे देश; गंगा, सिंधु,

शोणा वगैरे नद्या, विंध्य, ऋष्यमूक वगैरे पर्वत रामायणांत सांगितलेले अद्यापि आहेत. एवढेंच नव्हे तर रामायणांतील मुख्य नायक जो राम याचे संगतीनिमित्त कित्येक स्थलांला पावित्र्य आलें आहे. सर्वच कल्पित कथांतील स्थलें कल्पित असतात असें नाहीं. पुष्कळ कल्पित कथांतील स्थलें विद्यमान आणि प्रसिद्ध अशीं असतात. तथापि कल्पित कथांतील पात्रांच्या संसर्गानिमित्त कोणत्याही स्थलाला महत्त्व प्राप्त होत नाहीं हें विसरतां कामा नये. कालिदासानें लिहिलेलें सुंदर काव्य मेघदूत, यांतील कथा उघड उघड काल्पनिक आहे; व यामुळें त्यांतील यक्षानें कोणत्या स्थलीं बसून तेथून आपला संदेश पाठविला याविषयीं कोणीं शोध करून त्या स्थलाचें दर्शन घेण्यास जात नाहीं. स्थलाचा शोध इतिहाससंशोधक करितात, व तोहि यक्षानें मेघाला सांगितलेला मार्ग कोठपासून कवीनें कल्पिलेला आहे इतकें ठरविण्यापुरता. रामाची अयोध्यानगरी त्यापूर्वी होती व अद्यापहि आहे. तथापि रामानिमित्त तिला पूर्वी नसलेलें महत्त्व आलें. तसेंच राम वनवासांत असतां जेथें रावणानें सीतेला फसवून नेलें ती पंचवटी, वालीची किष्किंधा, समुद्रतीरीं राम प्रायोपवेशनार्थ बसल्याचें स्थल इत्यादि अद्यापि दाखवितात. या स्थलांविषयीं शोधकांमध्यें मतभेद असतील व आहेतहि. तथापि त्या स्थलांना रामानिमित्त महत्व आलें हें अमान्य करतां येत नाहीं. हें महत्त्व सांप्रत लोकांच्या अज्ञानानें आलें आहे असें नसून फार प्राचीन कालापासून आलें आहे. महाभारतांतील वनपर्वांत तीर्थयात्रा सांगतांना 'गोप्रतार'* तीर्थाविषयीं पुढील माहिती दिली आहे—

**गोप्रतारं ततो गच्छेत् सरय्वास्तीर्थमुत्तमम् ।**
**यत्र रामो गतः स्वर्गं सभृत्यबलवाहनः ॥३॥८२॥७०॥**

" नंतर सरयूमध्यें गोप्रतारनामक श्रेष्ठ तीर्थ आहे तेथें जावें; येथून राम आपले सेवक, सैन्य व वाहनें यांसह स्वर्गाला गेला. "

हा स्थलाचा प्रकार झाला. असाच कालाचा आहे. चैत्र शु. ९ ही रामाची जन्मतिथि म्हणून त्या दिवशीं उत्सव करण्याची पद्धति आहे. कल्पित कथेंतील

* हें स्थान सांप्रत अयोध्येजवळ गुप्तारघांट म्हणून प्रसिद्ध आहे. गुप्तार हा गोप्रतार शब्दाचा अपभ्रंश होय हें सांगावयास नको.

पात्रांची जन्मतिथि वा पुण्यतिथि कोणी पाळीत नाहींत हें सांगावयास नकोच. भारतीय युद्धाचे वेळीं तर राम ही व्यक्ति ऐतिहासिक का काल्पनिक याविषयीं संशयच नव्हता. कारण त्या युद्धामध्यें कौरवांना साहाय्य करण्याकरितां जे राजे आले त्यांत अयोध्येच्या गादीवर असलेला रामाहून २९ वा पुरुष बृहद्बल आला असल्याचें भागवतांत लिहिलें आहे. ( ९।१२ ). इतकेंच नव्हे तर रामायण काव्य हा एक मान्य ग्रंथ म्हणून लोकांपुढें होता व लोक त्याचें अध्ययन करीत असत. भारतीयुद्धामध्यें सात्यकी भूरिश्रव्याचा अधर्मानें वध करूं लागला असतां इतर योद्धे त्याचा निषेध करूं लागले; तेव्हां आपले कृत्याचे समर्थनार्थ सात्यकीनें वाल्मीकिरामायणांतील श्लोक प्रमाण म्हणून दिला आहे. सात्यकि म्हणतो:—

**अपि चायं पुरा गीतः श्लोको वाल्मीकिना भुवि ।**
**न हन्तव्याः स्त्रिय इति यद्ब्रवीषि प्लवंगम ॥ द्रोण.१४३।८५**
**सर्वकाले मनुष्येण व्यवसायवता सदा ।**
**पीडाकरममित्राणां यत्स्यात्कर्तव्यमेव तत् ॥ ८६ ॥**

"(मी म्हणतों याला प्रमाण) पूर्वीं वाल्मीकींनीं म्हटलेला एक श्लोक सांगतों (तो ऐका). 'हे वानरा, स्त्रियांचा वध करूं नये असें तूं म्हणतास, परंतु मनुष्यानें सर्वकाल आपला व्यवसाय करितांना आपला शत्रु म्हटला म्हणजे त्याला ज्या ज्या योगानें पीडा होईल तें तें नित्य केलें पाहिजे.'" सात्यकीनें वाल्मीकींचा म्हणून सांगितलेला श्लोक रामायणांत आला आहे. इंद्रजितानें मायाबलानें सीता निर्माण करून तिला रणांगणावर आणिलें, व युद्धांतील मुख्य कारण जी सीता तिचा एकदां वध केला आणि तो सर्व रामपक्षीयांनीं पाहिला म्हणजे ते आपोआप युद्धभूमि सोडून परावृत्त होतील, अशा कल्पनेनें तो तिचा वध करूं लागला. या वेळीं मारुतीनें स्त्रियांचा वध करूं नये अशी नीति सांगितली. त्याला उत्तर म्हणून इंद्रजितानें जें भाषण केलें त्यांत हा श्लोक आलेला आहे.* सात्यकीनें हा

* रामायणाचा निर्देश करून महाभारतांत घेतलेलें हें अवतरण प्रो. वेबर याला आढळलें व त्यावरून रामायणानंतर महाभारत झालें असावें अशी त्याला शंका आली. परंतु रामायणांत हें वचन त्याला मिळालें नाहीं; आणि स्त्रीचा वध करण्याचे निमित्तानें वानराला

श्लोक वाल्मीकींचा म्हणून, व युद्ध चालू असतां म्हटला यावरून, भारतकाळीं रामायणाचें अध्ययन चांगल्या प्रकारें होत असे व त्यावर त्यांची पूर्ण श्रद्धा होती, हें उघड दिसून येतें. रामायणांतील कथा काल्पनिक नसून तो इतिहास आहे असें सिद्ध करण्यास आतां अधिक प्रमाणें देण्याची आवश्यकता आहे असें वाटत नाहीं.

## साहित्यशास्त्रदृष्ट्या रामायणाचें महत्त्व.

रामायण हें काव्य आहे हें पूर्वी सांगितलेंच आहे व यामुळें त्याला दोन प्रकारचें महत्त्व आहे. केवळ काव्य किंवा केवळ इतिहास असला म्हणजे त्या त्या दृष्टीनें त्या ग्रंथाकडे पहावयाचें असतें. इतिहासाकडे पहावयाचें म्हणजे झालेला वृत्तांत—आपल्या टीकेसह असला तरी—जशाचा तसा दिला आहे किंवा नाहीं, हें पहावयाचें असतें; किंवा त्यांतील वृत्तांतावरून त्या वेळचा इतिहास आपणांस अनुमानावयाचा असतो; आणि काव्याकडे पहावयाचें म्हणजे साहित्य-शास्त्रदृष्ट्या त्यांतील गुणदोष पहावयाचे असतात. तथापि साहित्यशास्त्रदृष्ट्याहि रामायणाचा अधिकार वेगळा आहे. साहित्य हें काव्यांतील गुणदोषांविषयीं विवेचन करणारें शास्त्र आहे. अशा रीतीनें काव्यावर हें शास्त्र आपली सत्ता चालवित असलें तरी त्याची स्वतःची सत्ता मागाहूनची आहे, हें विसरतां नये. भाषेच्या शुद्धाशुद्धतेविषयीं नियम व्याकरण घालून देत असतें. परंतु वास्तविक

---

उद्देशून केलेल्या भाषणाचा हा प्रसंग सहज लक्षांत येण्यासारखा नसल्यामुळें तें त्यानें असंभवनीय ठरवून रामायणाची रचना महाभारतानंतर करण्यांत आली, असा आपला अभिप्राय दिला! रामायणांतील (या वचनाचें) स्थान मिळाल्यावर पुढील अनुमान-परंपरा कशी टिकणार?

महाभारतांतील हें अवतरण पाहिल्यावर त्यांत वानराला उद्देशून केलेल्या संबुद्धि प्रयोगावरून वरील प्रसंग लक्षांत आला व रामायणांत शोध करितां त्याचें स्थान मिळालें व तें वर दिलें आहे. हा शोध फार दिवसांपूर्वी रा. रा. अभ्यंकर यांनीं आपल्या "रामायणानंतरचें महाभारत" या पुस्तकांत दिलेला आहे; आणि यद्यपि अभ्यंकरांचें हें पुस्तक मिळण्यापूर्वीच स्वतांसाठीं म्हणून आम्हांला हा शोध करावा लागला असला, तरी तो प्रथम लोकांपुढें आणण्याचें श्रेय सर्वस्वी त्यांजकडे आहे हें आम्ही येथें प्रांजलपणें नमूद करून ठेवितों.

ते नियम भाषेच्या स्वरूपावरून ठरविलेले असतात. त्याप्रमाणें लोकांमध्यें प्रसिद्ध असलेल्या सुंदर काव्यांवरून साहित्यशास्त्रानें हे नियम ठरविले आहेत. अर्थात् ज्याप्रमाणें आपली जन्मभाषा शुद्ध बोलतां येण्यास व्याकरण म्हणावें लागत नाहीं, त्याप्रमाणें सुंदर काव्य लिहितां येण्यास साहित्याचें अध्ययन करण्याची आवश्यकता नाहीं. गायनाचें शास्त्र स्वतंत्र असलें तरी कंठ मधुर असल्यावांचून गातां यावयाचें नाहीं; कंठमाधुर्य ही परमेश्वराची देणगी आहे. त्याप्रमाणें कवित्वशक्ति ही परमेश्वराची देणगी आहे. साहित्याचे अध्ययनानें या देणगीला अधिक मोल चढतें हें वेगळें. असो. रामायण हें काव्य आदिकाव्य म्हणून प्रसिद्ध आहे व अशा ग्रंथांवरूनच साहित्याचे नियम ठरविण्यांत आले आहेत, हें सांगावयास नको. मात्र खेदाची गोष्ट ही कीं, संस्कृत भाषेंत साहित्यावर जे ग्रंथ आहेत त्यांचे लेखकांनीं या आदिकाव्याकडे ढुंकूनहि पाहिल्याचें दिसत नाहीं! साहित्यामधील नियम सांगतांना जीं निरनिराळ्या काव्यांतील अवतरणें उदाहरणार्थ त्यांनीं दिलेलीं आहेत, त्यांत रामायणांतील अवतरण एकहि मिळावयाचें नाहीं. सर्व अवतरणें मागाहून झालेल्या काव्यांतील आहेत. व विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, त्यांतील नियमावलिहि त्याच काव्यांच्या स्वरूपावरून निर्माण झालेली आहे. पण आमची समजूत आहे कीं, त्यांनीं हे नियम सांगण्यापूर्वीं रामायणाकडे पाहिलें असतें तर त्यांना पुष्कळ नियम बदलावे लागले असते, कित्येक तर गाळावे लागले असते. साहित्यामध्यें प्रथमच काव्याच्या गौडी, वैदर्भी पांचाली अशा रीती सांगितल्या आहेत; यांतील गौडी ही रीति अशी आहे कीं, तींत सामासिक पदें फार असतात. परंतु रामायणांत लांबच लांब सामासिक शब्द शोधावाच लागेल; व शोधूनहि तो मिळेलच असें सांगवत नाहीं. हाच प्रकार अलंकारांचा. शब्दालंकार तर मुळींच नाहीं, आणि अर्थालंकार असला तरी तो कृत्रिम नसून सरळ असावयाचा. छंदाकडे पाहूं गेलें तरी हीच स्थिति. सर्व रामायण प्रायः अनुष्टुभ् छंदांत आहे. विविध वृत्तांचे कांहीं श्लोक सर्गाचे अंतीं व कित्येक सर्गांत मधूनमधून आहेत व यासाठीं येथें 'प्रायः' असें म्हटलें. परंतु या विविध वृत्तात्मक श्लोकांचें कर्तृत्व वाल्मीकींकडे घावयाचें का प्रक्षेपकाकडे याविषयीं वाद आहे. आणि हे फार थोडे असल्यामुळें

त्यांचें तादृश महत्त्वहि नाहीं. तेव्हां सर्व रामायण अनुष्टुभ् छंदांत आहे असें म्हणणें अयुक्त नाहीं. पण यामुळें काय झालें? साहित्यशास्त्रानें कित्येक रसांविषयीं विशिष्ट छंदांची आवश्यकता सांगितली ती आपोआप नष्ट झाली. हे नियम अयुक्त आहेत असें आमचें म्हणणें नाहीं, तर त्यांची आवश्यकता अन्वयव्यतिरिकेत: नाहीं इतकेंच दाखवावयाचें आहे. अर्थात् त्या त्या रसांचें आविष्करण अन्य प्रकारें केल्यास रसभंग होत नाहीं. वीररसाचें भाषण करावयास शार्दूलविक्रीडित नको आणि शोक करावयास शिखरिणी नको. रामायणांतील कोणताहि प्रसंग घ्या, त्यांत दर्पोक्ति असो, शोक असो वा उपदेश असो, सर्वत्र छंद एक व तो अनुष्टुभ्. हा अनुष्टुभ् छंद मराठींत आहे, पण फार थोडा; त्याचे बदली मराठींत ओवी व अभंग असे दोन छंद प्रचारांत आलेले आहेत. अनुष्टुभ् काय किंवा ओवी काय, दोनहि छंद असे आहेत कीं, त्यांला छंदाचें बंधन नांवाचें आहे. अनुष्टुभाला अक्षरांचें बंधन आहे तर ओंवीला मराठीनें भूषण म्हणून आपण होऊन स्वीकारलेलें यमकाचें बंधन आहे. अनुष्टुभामध्यें प्रत्येक चरणांत अक्षरें आठ असावीं लागतात, यावांचून नियम नाहीं; तर ओवींत चरणाचे अंतीं यमक साधावें लागतें. बाकी सर्व प्रदेश दोहोंतहि मोकळा. स्पष्ट सांगावयाचें म्हणजे केवळ या बंधनानिमित्त त्यांची पद्यांत गणना होते. नाहीं तर गद्यांत व त्यांत कसलें अंतर आहे? अनुष्टुभ् व ओवी या छंदांच्या या स्वरूपाकडे पाहिलें तर काव्य पद्यात्मक का गद्यात्मक असावें, अशी शंका सुद्धां घेण्याचें कारण उरणार नाहीं. कवीची तुलना करावयाची तर ती चित्रकाराशीं करितां येईल. दोघांचेंहि कार्य वर्ण्य विषयाकडे प्रेक्षकांचें लक्ष वेधून घेणें हेंच एक आहे. एकादा प्रसंग पाहून ज्या मनोभावना हृदयांत प्रकट होतात, त्या पुनः चित्राच्या दर्शनानें उत्पन्न करणें हें चित्रकाराचें कार्य आहे, व चित्र न दाखवितां केवळ वर्णन करून त्या उत्पन्न करणें हें कवीचें कार्य आहे. प्रेक्षकाला तन्मय करावयाला लावण्याचें ज्याचें सामर्थ्य, त्याला हें कार्य स्वत: तन्मय झाल्यावांचून कसें करितां येईल? रामायणाच्या रचनेचा जो इतिहास महर्षींनीं आरंभीं दिला आहे, त्यांत त्यांनीं प्रथमच जो श्लोक रचिला तो अशा तन्मय स्थितींतच

रचिला व अशा रीतीनें काव्याचीही व्याख्या त्यांनीं न सांगतां लिहून ठेविली आहे. नारदाशीं संवाद झाल्यावर रामचरिताविषयीं चिंतन करीत महर्षि तमसातीरीं गेले असतां तें निर्मल तीर्थ अवलोकन करून स्नान करण्याच्या उद्देशानें त्यांनीं वल्कलें हातांत घेतलीं व वनप्रदेश पाहात ते उभे राहिले. इतक्यांतः—

**तस्याभ्याशे तु मिथुनं चरन्तमनपायिनम् ।**
**ददर्श भगवांस्तत्र क्रौंचयोश्चारुनिःस्वनम् ॥१।२।९॥**
**तस्मात्तु मिथुनादेकं पुमांसं पापनिश्चयः ।**
**जघान वैरनिलयो निषादस्तस्य पश्यतः ॥१०॥**
**तं शोणितपरीतांगं चेष्टमानं महीतले ।**
**भार्या तु निहतं दृष्ट्वा रुराव करुणां गिरम् ॥ ११ ॥**
**वियुक्ता पतिना तेन द्विजेन सहचारिणा ।**
**ताम्रशीर्षेण मत्तेन पत्रिणा सहितेन वै ॥ १२ ॥**
**तथाविधं द्विजं दृष्ट्वा निषादेन निपातितम् ।**
**ऋषेर्धर्मात्मनस्तस्य कारुण्यं समपद्यत ॥ १३ ॥**
**ततः करुणवेदित्वादधर्मोऽयमिति द्विजः ।**
**निशाम्य रुदतीं क्रौंचीमिमं वचनमब्रवीत् ॥ १४ ॥**

"जवळच क्रौंच पक्ष्याचें एक जोडपें संचार करीत असलेलें भगवान् वाल्मीकींच्या दृष्टीस पडलें; त्यांचा स्वर मधुर असून त्यांना कोणताहि अपाय झाला नव्हता. ( प्राण्यांशीं ) निष्कारण वैर करणाऱ्या एका पापबुद्धि निषादानें महर्षि पहात असतां त्या जोडप्यापैकीं एकाला—नराला वेध केला. ( त्याबरोबर ) तो नर सर्वांग रक्तानें भरून जाऊन भूमीवर तडफडूं लागला; व त्याला पाहून त्याची स्त्री करुणस्वरानें ओरडूं लागली. मस्तकीं आरक्तवर्ण तुरा असलेला, विषयोपभोगांत गुंग असल्यामुळें मत्त, पसरलेले पंख असलेला, व निरंतर आपल्याबरोबर असणारा जो आपला पति त्याचा वियोग तिला झाला होता. निषादानें खालीं पाडिलेला तो पक्षी तडफडत असल्याचें अवलोकन करून त्या धर्मात्म्या मुनीला दया आली. रोदन करीत असलेल्या त्या क्रौंचीला अवलोकन करून तिची दया आल्यामुळें काममोहित पक्ष्याचा वध करणें अधर्म आहे, असें मनांत आणून ते म्हणाले—"

महर्षींच्या मुखांतून या वेळीं निघालेलें वचन म्हणजेच “ मा निषाद ” हा प्रसिद्ध श्लोक होय. या श्लोकाची उत्पत्ति सांगण्याचे हेतूनें त्यांनीं हा इतिहास दिला आहे. पाहूं गेलें तर यांत अलंकार वगैरे कांहीं नसून केवळ घडलेला वृत्तांत निवेदन केलेला आहे; पण तो वाचूं लागतांच त्या प्रसंगाचें चित्र डोळ्यांपुढें दिसूं लागतें. पहिला श्लोक वाचतांच ज्या कारणानें महर्षींचें त्या क्रौंचमिथुनाकडे लक्ष गेलें तो त्यांचा सुंदर शब्द ऐकूं येऊं लागतो; व पुढील श्लोक वाचतांच त्यांतील नराकडे बाण वेधून बसलेली त्या क्रूर निषादाची मूर्ति दृग्गोचर होते; आणि इतकें होत आहे तोंच पुढील श्लोकांत सांगितल्याप्रमाणें रक्तानें भरलेला तो क्रौंच पक्षी भूमीवर तडफडत आहे असें पाहून मन व्याकुल होतें. आपल्या मनाच्या झालेल्या अशा उद्विग्न स्थितींत क्रौंचीचा आक्रोश ऐकूं येऊन अधिकच भर पडते. त्या क्रौंच पक्ष्याचे मस्तकावरील तो लाल तुरा पाहून व त्याच्याशीं केलेले विलास व सहवास मनांत येऊन ती व्याकुल होऊन पडलेली पहातांच महर्षींचें हृदय ज्याप्रमाणें द्रवून गेलें त्याप्रमाणें आपली स्थिति होते. झालें. कवीचें कौशल्य यांतच आहे व तें व्यक्त दिसल्यावर अलंकार, छंद इत्यादि बाह्य साधनांचें महत्त्व तें कसलें ? रामायणांतील सर्व वर्णनाचें स्वरूप या प्रकारचें आहे. वर्णन करूं लागल्यावर महर्षींनीं संकोच मुळींच केलेला नाहीं. किंवा कृत्रिम अलंकारांनीं आपली वाणी भूषित करण्याचा प्रयत्न केलेला नाहीं. रामायणांत अलंकार आले आहेत, पण ते साधे व सहज ओघाबरोबर आलेले आहेत. पुढील स्थलें पहाः—

महर्षि तसमातीरीं आले असतां आपला शिष्य भरद्वाज याला म्हणतात— “ भरद्वाजा, कर्दमरहित असलेलें हें तीर्थ अवलोकन कर. अरे, सज्जनांच्या मनांप्रमाणें यांतील उदक निर्मल असून रमणीय आहे. ” ( १, २, ५ )

राम वनवासाकरितां निघाले असतां पोंचविण्यास आलेल्या प्रजाजनांना निरोप दिल्यावर ते त्यांकडे पाहात उभे राहिले, असें सांगून पुढें महर्षि म्हणतात—“ तेव्हां रामाच्या दर्शनाविषयीं तृप्त न झालेले ते लोक विलाप करीत असतां, ज्याप्रमाणें प्रदोषसमयीं सूर्य ( एकदम ) दृष्टीआड होतो, त्याप्रमाणें राम त्यांच्या दृष्टीच्या टप्प्यांतून पलीकडे गेला.” (२,५०,७)

राम पंपातीरीं तिचें वर्णन करितांना म्हणतो—" दुसऱ्या वृक्षांतून बाहेर पडून कमलकेसराचा संसर्ग झालेला वायु सीतेच्या निश्वासाप्रमाणें मनोहर वाहात आहे." ( ४, १, ७२ )

रावण सीतेला उद्देशून म्हणतो " हे सुंदरी, तुला निर्माण केल्यावर दिव्य-रूपें निर्माण करणाऱ्या जगत्स्रष्टयानें तें काम सोडूनच दिलें असें वाटतें; कारण तुझ्या रूपाला दुसरी उपमाच नाहीं." ( ५, २०, १३ )

प्रहस्तानें नील वानरावर शरवृष्टि केली, त्या प्रसंगाचें वर्णन पहा—" त्या दुरात्म्या राक्षसाचे ते शरसमुदाय, प्रतिकार करण्यास असमर्थ असलेल्या त्या वान-रानें, जोराजोरानें होणारी शरदृतूंतील पर्जन्यवृष्टि ज्याप्रमाणें बैल ( डोळे मिटून ) सहन करितो त्याप्रमाणें डोळे मिटून सहन केले. " ( ६, ५८, ४३ )

वर दिलेल्या अवतरणांतील सर्व उपमा व्यवहारांतील आहेत व म्हणून त्यांचे योगानें विषय चटकन लक्षांत येऊन मनास खरा आल्हाद होतो. उपमा द्यावयाची ती कवीनें ग्रंथविस्ताराकरितां द्यावयाची नसते; तर वर्ण्य विषयाचें ज्ञान श्रोत्याला करून देण्याचे हेतूनें द्यावयाची असते. अर्थात् श्रोत्याला जें परिचित असेल अथवा परिचित असणें संभवनीय असेल त्यांतील उपमा देणें सरळ दिसतें. उपमा ज्याची द्यावयाची तेंही श्रोत्यानें अनुमानानें जाणावयाचें व त्यावरून पुनः वर्ण्य विषयाची कल्पना करावयाची, म्हणजे श्रोत्यावर दुहेरी भार पडून तो त्रस्तच व्हावयाचा ! रामायणानंतरच्या पुष्कळ काव्यांतून असे प्रसंग फार येतात. आधीं शब्द योजावयाचे ते असे कीं, त्यांचा अर्थ कळण्या-साठीं कोश शोधावयाचे; आणि कित्येक वेळां तर असें असावयाचें कीं कोशां-तील अर्थाला आधार तें काव्यच ! कित्येकांनीं तर एकेका अक्षराला असलेलेही अर्थ योजून काव्यें इतकीं क्लिष्ट केलीं आहेत कीं, सांप्रत ज्याप्रमाणें मोठ्या सभेला गेलेली सामान्य व्यक्ति गर्दी व गोंगाट यांमुळें वक्त्याचें भाषण ऐकूं न येतां गुदमरून जाऊन विषण्ण मनानें परत येते, त्याप्रमाणें तीं वाचून अर्थ न कळल्यामुळें निराशेनें अगदीं हात टेकण्याची पाळी वाचकावर येते !

साहित्यशास्त्रामध्यें प्रसिद्ध असलेले मुख्य रस रामायणामध्यें सर्व आले आहेत. रस हें काव्याचें स्वरूप आहे; व या दृष्टीनें रामायणांत कोणकोणते रस कोठें

आले आहेत याचें टांचण रामायणावरील गोविंदरावजीय टीकेमध्यें दिलें आहे. ह्यांत सर्व नवरस कसकसे कोठें आले आहेत तें सांगितलें आहे. वास्तविक साहित्यशास्त्रांत सांगितलेले सर्व रस महत्त्वाचे नाहींत व ते सर्व रामायणांत आले आहेत असें नाहीं. श्रृंगार, वीर, करुणा हे तीन रस मुख्य आहेत व हे रामायणांत सर्वत्र आलेले आहेत. रसांचीं हीं स्थानें रामायण वाचतांना सहज कळण्यासारखीं आहेत. मात्र रसांचीं साहित्यशास्त्रांमध्यें जीं उदाहरणें दिलेलीं असतात, त्याहून रामायणांतील रस अकृत्रिम आहेत हें विसरतां नये. रसपान करण्याची इच्छा असेल त्यांनीं स्वतां आपल्या मुखानें तो प्राशन करावा हा मार्ग सरळ आहे व आमची निश्चिति आहे कीं, वरील उदाहरणांवरून वाचकांची पिपासा जागृत झाल्यावांचून राहणार नाहीं. तथापि वाचकांच्या सोयीसाठीं कांहीं उत्कृष्ट स्थलांचा निर्देश करून आटपतें घेऊं. मात्र हीं स्थलें स्वतां पाहिल्यावर वाचकांची तृप्ति होईल का पिपासा वाढेल हें कोणीं सांगावें ? गंगावर्णन २, ५०, १५ ते २६; चित्रकूटवर्णन २, ५६, ६ ते १२; सुमंत्राचा अयोध्याप्रवेश २, ५७, ६ ते २३; व २, ५९, ५ ते १६; प्रावृट्काल २, ६३, १५ ते १९; श्रावणवध २, ६३ व ६४; भरतभेट २, ९९, २५ ते ४०; भरताला रामाचें उत्तर २, १०५; सीतेचा आक्रोश ३, ४९, २४, ते ४०; सीताहरण ३, ५२; रामाचा शोक ३, ६० व ६१ व ३, ६४, ११ ते ३५; पंपावर्णन ४, १; वर्षर्तु ४, २८; शरदृतु ४, ३०; रावणाचें मंदिर ५, ९ व १०; लंकेंतील सीता ५, १५, १८; ते ५४; समुद्रवर्णन ६, ४, ११० ते १२४; लक्ष्मण व इंद्रजित् यांचें युद्ध ६, ८९; रामरावणयुद्ध ६, ९३ व ६, ९९; लक्ष्मणाचें सीतेला उद्देशून भाषण ७, ४७.

## लोकशिक्षणाचें कार्य.

सामान्य व्यक्ति व तपस्वी पुरुष यांच्या दृष्टीमध्यें अंतर कोठें व कसें असतें हें वाल्मीकींनीं नारदाला केलेल्या प्रश्नावरून आम्हीं दाखविलें आहे. आणि दृष्टींतील या भेदास अनुसरून रामायणनिरूपणाचे योगानें महर्षींचे हातून लोकशिक्षणाचें कार्य आपोआप झालें आहे. महर्षींनीं ज्या गुणांचा निर्देश करून असल्या गुणी पुरुषाचें नांव सांगण्याची नारदांना विनंती केली ते गुण अत्यंत

दुर्लभ होते, व नारदांनीं उत्तर देतांना प्रथम हें सांगितलेंहि. अर्थात् लोकांमध्यें न आढळणारे गुण एकत्र असलेल्या पुरुषाचें चरित्र त्यांनीं निवेदन केलें हें ओघानेंच प्राप्त होतें. मनूनें धर्ममूलें सांगतांना श्रुति व स्मृति यांचा निर्देश करून सज्जनांच्या आचाराचा निर्देश लागलींच त्यामागून केला आहे. सदाचाराचा अधिकार याप्रमाणें श्रुतिस्मृतींचे खालोखाल आहे. रामायणाचे योगानें महर्षींनीं लोकशिक्षणाचें कार्य केलें असें आम्ही या दृष्टीनें म्हणतों. रामायणाचे आरंभीं वाल्मीकींनीं याविषयीं स्वतःहि आपला हेतु प्रकट केला आहे. रामायणाचा निर्देश करून ते म्हणतात—

**तदिदं वर्तयिष्यावः सर्वं निखिलमादितः ॥**
**धर्मकामार्थसहितं श्रोतव्यमनुसूयता ॥ १।५।४ ॥**

" तेंच सर्वांगांनीं परिपूर्ण असलेलें हें ( रामायण ) आम्ही अगदीं प्रथमपासून संपूर्ण कथन करीत आहों; धर्म, अर्थ व काम या तिघांचेंहि यांत निरूपण असून (तद्द्वारा तें मोक्षप्राप्ति करून देणारें आहे. याकरितां ) निर्मत्सर पुरुषानें तें श्रवण करण्यास योग्य आहे. "

महर्षींनीं आपली ही प्रतिज्ञा कशा प्रकारें पुरी केली हें रामायणाचें सिंहावलोकन करून पहावयाचें आहे.

रामायणरचनेचा इतिहास देतांना प्रथम नारदांशीं झालेला संवाद दिला असून महर्षींनीं केलेल्या प्रश्नाचा उपक्रम पुढीलप्रमाणें केला आहे:—

**तपःस्वाध्यायनिरतं तपस्वी वाग्विदां वरम्**
**नारदं परिपप्रच्छ वाल्मीकिर्मुनिपुंगवम् ॥ १।१।१ ॥**

" तपश्चर्या आणि स्वाध्याय यांमध्यें तत्पर, वक्त्यांमध्यें श्रेष्ठ व मुनींमध्यें वरिष्ठ अशा नारदांना वाल्मीकि मुनींनीं प्रश्न केला. " ज्यांना आपण प्रश्न केला त्यांचा अधिकार केवढा हें नारदांना तीन विशेषणें देऊन महर्षींनीं सुचविलें आहे. तें तपश्चर्या आणि स्वाध्याय यांमध्यें तत्पर होते, हें प्रथम सांगितलें व याचे योगानें त्यांना कोणती योग्यता—वक्त्यांमध्यें व ऋषींमध्यें श्रेष्ठता—प्राप्त झाली हें पुढील दोन विशेषणांनीं सुचविलें. याप्रमाणें तपश्चर्या व स्वाध्याय यांची आवश्यकता त्यांच्या फलासह महर्षींनीं पहिल्याच श्लोकांत सांगितली आहे. (स्वतांकडे तर

केवळ तपस्वी एवढें अधिकारदर्शक पण साधें विशेषण घेतलें आहे. नारदांचें पुराणप्रसिद्ध कलहप्रियतेचें स्वरूप यांत मुळींच सांगितलेलें नाहीं. ) याप्रमाणें स्वतांचा विनय, तपःप्रभावानें स्वतांची खात्री असली तरी थोरांची संमति घेण्याची आवश्यकता हीं दोनही त्यांनीं प्रकट केलीं आहेत. " तस्माद् ब्राह्मणेन निष्कारणः षडंगो वेदोऽध्येयो ज्ञेयश्च " ब्राह्मणानें कोणताहि हेतु मनांत न धरितां षडंग वेदाचें अध्ययन व ज्ञान संपादन करावें, अशी श्रुति आहे व तीच येथें, तिचा निर्देश न करितां महर्षींनीं अनुवादिली आहे.

धर्मशास्त्रामध्यें नित्य, नैमित्तिक व काम्य अशीं तीन प्रकारचीं कर्में सांगितलीं आहेत. या तीनहि कर्मांविषयीं विवेचन करण्याचें हें स्थल नव्हे. तर तीं आचरण्याचा उपदेश महर्षींनीं रामायणांत कसकसा केला तें दाखवावयाचें आहे. रामलक्ष्मणांला यज्ञरक्षणार्थ घेऊन गेल्यावर मार्गांत सरयूतीरीं विश्वामित्र उतरले असतां प्रभातकालीं ते रामाला म्हणतात,—

**कौसल्या सुप्रजा राम पूर्वा संध्या प्रवर्तते ।**
**उत्तिष्ठ नरशार्दूल कर्तव्यं दैवमान्हिकम् ॥ १।२३।२ ॥**

" हे रामा, तुज पुत्राचे योगानें कौसल्या पुत्रवती झाली आहे; प्रातः-संध्येचा हा काल प्राप्त झाला आहे. तर हे नरश्रेष्ठा, ऊठ आणि ईशचिंतन व आन्हिक कर्म कर. " येथें तर नित्यकर्माविषयीं रामाच्या मिषानें स्पष्ट उपदेश केलेला आहे. रामलक्ष्मणांनीं ऋषींच्या आज्ञेप्रमाणें आन्हिककर्म आटोपल्याचेंही पुढें सांगितलें आहे. आपलें आन्हिक वेळचेवेळीं करण्याची त्यांची पद्धति होती व त्याप्रमाणेंच त्यांनीं या वेळीं केलें; परंतु या वेळीं ते प्रवासांत होते आणि तेव्हांहि आन्हिक कर्म वेळीं करण्याची आवश्यकता महर्षींनीं सांगितली व ती त्यांना पटली, हें विशेष आहे.

नैमित्तिक कर्मांविषयींचें तसेंच एक उदाहरण घेऊं. अरण्यवासाला गेल्यावर तेथें चित्रकूटावर पर्णकुटिका लक्ष्मणानें बांधिली. तेव्हां आंत प्रवेश करण्या-पूर्वीं रामानें लक्ष्मणाला वास्तुशांति करण्याची आवश्यकता सांगून मृग आणण्यास सांगितलें.

**ऐणेयं मांसमाहृत्य शालां यक्ष्यामहे वयम् ।२।५६।२२**
**कर्तव्यं वास्तुशमनं सौमित्रे चिरजीविभिः ।**
**मृगं हत्वाऽऽनय क्षिप्रं लक्ष्मणेह शुभेक्षण ॥ २३ ॥**
**कर्तव्यः शास्त्रदृष्टो हि विधिर्धर्ममनुस्मर ॥**

" हे लक्ष्मणा, मृगमांस आणून आपण या पर्णशालेची वास्तुशांति करूं. कारण चिरजीवी होऊं इच्छिणाऱ्या पुरुषांनीं वास्तुशांति अवश्य केली पाहिजे. यास्तव हे सुलोचना लक्ष्मणा, तूं सत्वर मृग मारून घेऊन ये. हा विधि शास्त्रविहित आहे; धर्मशास्त्राचें स्मरण कर. " रामाच्या आज्ञाप्रमाणें लक्ष्मणानें कृष्णमृग मारून आणिला व रामानें सर्व देवगणांना उद्देशून यजन केलें, वास्तुदोषशमनार्थ मंगल सूक्तें वगैरें म्हटलीं, असें येथें वर्णन केलें आहे.

काम्य कर्म तर निर्दोष झालें पाहिजे, हें सांगावयास नको. दशरथानें पुत्रप्राप्त्यर्थ अश्वमेध यज्ञ करण्याचा बेत करून अमात्यांस त्याविषयीं आज्ञा करितांना तो म्हणतो.

**शक्यः प्राप्तुमयं यज्ञः सर्वेणापि महीक्षिता ।**
**नापराधो भवेत् कष्टो यद्यस्मिन् क्रतुसत्तमे ॥१।८।१७॥**
**छिद्रं हि मृगयन्ते स्म विद्वांसो ब्रह्मराक्षसाः ।**
**विधिहीनस्य यज्ञस्य सद्यः कर्ता विनश्यति ॥ १८ ॥**

" ज्याच्यानिमित्त कष्ट भोगावे लागतील अशा प्रकारचा दोष न घडेल तर हा श्रेष्ठ यज्ञ कोणाहि राजाला अनुष्ठितां येईल. विद्वान् ब्रह्मराक्षस तर छिद्र कोठें पडतें हें शोधीत असतात व यज्ञानुष्ठान अविधि झालें असतां कर्त्याचा तात्काल नाश होतो. " दशरथाचे आज्ञेप्रमाणें अमात्यांनीं व्यवस्था ठेविली व व यज्ञानुष्ठान राजाचे इच्छेप्रमाणें निर्विघ्न व निर्दोष समाप्त झालें. राजाची इच्छा पूर्ण झाली, हें तर सर्वांस विदित आहे.

धर्मशास्त्राप्रमाणें नित्य आचरण करण्याकडे रामादिकांची असलेली प्रवृत्ति जागोजाग रामायणांत प्रकट केलेली आहे व रामायणवाचनाचे निमित्तानें हें शिक्षण आपोआप वाचकांस मिळत असतें. धर्मशास्त्राचा हा विषय वगळून सामान्य नीतिदृष्ट्या विचार केला तर त्यांचेही पाठ रामायणांत पुष्कळ

दिसून येतात. रामायणांत प्रतिज्ञापालनाचा पाठ तर प्रारंभींच दिला आहे. यज्ञरक्षणाकरितां विश्वामित्र राजपुत्रांना नेण्याकरितां आले. तेव्हां राजानें त्यांचा गौरव केला व कोणत्या उद्देशानें ते आले, तें विचारिलें. आपलें उद्दिष्ट सांगून आपल्यावर अनुग्रह करावा; कार्य कोणतेंहि असलें तरी सांगण्याची शंका धरूं नये; तें आपण सर्वथा करूंच करूं अशी कार्य करण्यापूर्वी राजानें प्रतिज्ञा केली, आणि पुढें कार्य कळल्यावर राजपुत्र लहान आहेत व मोठ्या कष्टानें ते आपणास प्राप्त झाले आहेत इत्यादि सांगून तो टाळाटाळ करूं लागला. या वेळीं प्रतिज्ञा केल्यावर अशा प्रकारें ती मागें घेणें हें इक्ष्वाकुकुलाला भूषण नसून दूषण आहे वगैरे सांगून आणि विश्वामित्राचें तपःसामर्थ्य वर्णन करून वसिष्ठांनीं राजाचें मन वळविलें व राजानें राजपुत्रांस नेण्यास संमति दिली. प्रतिज्ञापालनाचा हा प्रथमचा पाठ रामलक्ष्मणांनाहि या वेळीं मिळाला व तोच त्यांनीं पुढें गिरविला. रामाच्या प्रतिज्ञापालनावर पुढील सर्व रामायणाची उभारणी आहे. स्वधर्मपूर्वक आचरण करीत असतां प्राप्त होणारे सर्व प्रसंग धैर्यानें सहन करून त्यांना-तोंड देण्याचा रामायणांतील पाठहि वारंवार मनन करण्यासारखा आहे. याप्रमाणेंच गुरुशुश्रूषा, इंद्रियदमन, भूतदया, साधी वागणूक, विनय, क्षमाशीलता, तेजस्विता इत्यादि गुणांचेही पाठ प्रसंगानुसार रामायणांत आले असून ते कोणाहि चाणाक्ष वाचकास मिळूं शकतात. रामायणांतील पात्रांचे गुणदोषांविषयीं स्वतंत्र विवेचन दुसऱ्या प्रकरणांत यावयाचें असल्यामुळें येथें अधिक विस्तार करीत नाहीं.

## अतिशयोक्ति आणि अलौकिक कथा.

रामायण हें काव्य असून इतिहास आहे हें पूर्वी सप्रमाण दाखविलें आहे. आणि यासाठीं त्याकडे पाहतांना या दोनहि दृष्टींनीं पाहिलें पाहिजे. कवीनें रेखाटलेला एकादा प्रसंग काव्यदृष्ट्या विशोभित दिसत असेल तर त्यांत तो तसाच घडून आला असल्यामुळें अन्यथा वर्णन करणें कवीला अयुक्त होतें इकडे लक्ष देऊन कवीला दोष देतां कामा नये. कथानकांत काव्यदृष्ट्या सुसंगतता ठेवणें कादंबरीकाराला शक्य आणि उचित असतें; इतिहास लिहिणाराला हें करितां येणार नाहीं. दोघांचे प्रदेश अगदीं भिन्न आहेत. रामायणाकडे इतिहास या दृष्टीनें

पाहतांना हा भेद लक्षांत ठेवणें अवश्य आहे. अतिशयोक्ति हा काव्याचा अलंकार अर्थात् भूषण आहे आणि इतिहासाला दूषण आहे. रामायण या भूषणापासून वा दूषणापासून प्राय: अलिप्त आहे. प्राय: म्हणण्याचें कारण स्वतां रामाचे चरित्रांत अतिशयोक्ति नसली तरी राक्षसांचे वर्णनांत आहे. राक्षसांचें स्वरूप वर्णन करितांना हिचा उपयोग महर्षीनीं फार केला आहे. कुंभकर्णाचें शरीर कसें आणि केवढें होतें हें सांगतांना त्याचे नेत्र गाडीच्या चाकासारखे असून तो पर्वताप्रमाणें विशाल असल्याचें वर्णन केलें आहे. तो निजला असतां त्याला उठविण्याकरितां रावणाच्या आज्ञेवरून राक्षस गेले तर त्याच्या उच्छ्वासानें ते उडून जाऊं लागले. अश्वादिकांना ताडन करून ओरडविलें, भेरी वगैरे वाद्यें वाजविलीं, मुसल व मुद्गरांचे प्रहार त्याचेवर केले; कांहीं राक्षस त्याला चावूं लागले, कित्येकांनीं त्याचे केंस उपटले, शतघ्नीचे प्रहार केले, शेवटीं एक हजार वानर त्याचे शरीरावरून एकदम धांवत नेण्यांत आले. तेव्हां त्याला कांहींतरी स्पर्श झाल्यासारखा भास झाला ( ६।६० ), पूर्वापर ग्रंथ पाहून वरील वर्णनाची संगति लावूं लागलें म्हणजे हें काव्यमय असल्याचा प्रत्यय त्वरित येतो. ऐतिहासिकदृष्ट्या यांत तथ्य किती आहे हें आम्हीं स्वतंत्र प्रकरणांत दाखविलें आहे. अतिशयोक्तिपर वर्णन आढळलें असतां पूर्वापर ग्रंथ पाहिला म्हणजे वस्तुस्थिति रामायणांत तरी कळून येण्यासारखी आहे. पर्वत, अरण्यें, समुद्र, नद्या यांचीं वर्णनेंहि कांहीं स्थलीं अतिशयोक्तिपूर्ण आहेत, असा संशय येतो; यांविषयीं निश्चित विधान करितां येत नाहीं. कारण कित्येक लांबीरुंदीचें प्रमाण सांगतांना त्या कालच्या समजुतीप्रमाणें वर्णन कवीनें करणें संभवनीय व अर्थात् निर्दोष आहे. पर्वताची उंची सांगतांना तो आकाशाला भिडला अथवा सूर्याला रोध करूं लागला हें म्हणणें अत्युक्तिपूर्ण वाटलें तरी दृष्टीला तसा भास होतो व तसा कवीनें रेखाटला असें त्याचें समर्थन करितां येण्याजोगें आहे. अशा स्थलीं पर्वत अति उंच होता असें सामान्यत: समजावयाचें आहे. सूर्य उदय पावतो तेथपासून तो अस्तास जातो तेथपर्यंत सर्व प्रदेश दशरथाच्या ताब्यांत असल्याचें वर्णन आहे. त्याचा अर्थ त्या वेळीं माहीत असलेला भूप्रदेश असाच घेणें युक्त होय. आपणांला विसंगत वाटणारा दुसरा भाग म्हटला म्हणजे

अलौकिक कथांचा होय. यांतील कित्येकांची संगति सध्यांच्या समजुतीप्रमाणें लावितां येते, तथापि सर्वांची ती लावितां येईल असें म्हणवत नाहीं. रामायणांतील प्रमुख पात्रें राक्षस व वानर हीं अलौकिक आहेत व ह्यासंबंधीं सविस्तर विवेचन स्वतंत्र प्रकरणांत केलें आहे. रामायणांतील बहुतेक कथा या दोन जातींवर आहेत व त्या विवेचनांत त्यांसंबंधींच्या अलौकिक कथांची संगति आपोआप येणारी आहे. तथापि त्यांतहि कित्येक कथा, संगति लावितां येत नाहीं म्हणून सोडून द्याव्या लागतात. दुंदुभि नांवाचा राक्षस महिषरूप धारण करून वालीशीं युद्धाला आला असें वर्णन आहे (४।११।७). तेथें वालीनें एका रेड्याशीं झुंज घेतलें असा अर्थ करितां येतो. कबंध व विराध यांचीं वर्णनें अशा प्रकारचीं असावींत असा संशय येतो. कबंध राक्षसाचे एकेक योजन लांब पसरलेले हात सांगितले आहेत व त्याचा अग्निसदृश एकच नेत्र वर्णिला आहे, तेव्हां हा ज्वालामुखी नसेल ना, असें वाटूं लागतें. महाभारतांत धुंधु नांवाच्या राक्षसाचें वर्णन आहे. तें तर ज्वालामुखीचें आहे, यांत संशय नाहीं. पण कबंधाविषयीं तसें स्पष्टपणें म्हणण्यासारखें प्रमाण आढळत नाहीं. सीतेनें दिव्य केलें व तिच्या प्रार्थनेप्रमाणें भगवती वसुंधरेनें तिला उचलून उदरांत घेतलें अशी कथा रामायणाचे अंतीं आहे. येथें काय कल्पना करावयाची? अशा स्थलीं आपली बुद्धि चालत नाहीं, म्हणून स्वस्थ रहाणें भाग पडतें. पण लौकिक व अलौकिक हा भेद तरी आपणच करावयाचा आहे. सृष्टींतील घडामोडी नित्य चालू असतात व त्या नित्य अवलोकन करून त्यांविषयींचे नियम आणि अपवाद आम्हां माणसांनीं बसविले आहेत. पदार्थांतील गुणधर्मांविषयीं शोध शास्त्रज्ञ लोक नित्य करीत असतात व यावरून हे नियम अपूर्ण आहेत व पुढेंहि तसे असणार हें उघड आहे. अशा या अपूर्ण नियमांकडे पाहून लौकिक व अलौकिक हे भेद आपण करीत असतों; पण या नियमांनीं सृष्टीचा चालक थोडाच बद्ध झालेला आहे? केनोपनिषदामध्यें हें तत्त्व एक गोड दृष्टांत देऊन सांगितलें आहे. देवाचें तेज प्रकट झालें असतां त्याकडे जिज्ञासाबुद्धीनें अग्नि व वायु हे गेले; आणि त्यांना त्यानें "तुमचे अंगीं सामर्थ्य काय आहे?" असें विचारिलें. तेव्हां त्यांनीं अनुक्रमानें "दहन व वहन" हे दोन धर्म आपले म्हणून सांगितले. पुढें

देवानें एक गवताची काडी दोघांपुढें टाकिली व आपलें सामर्थ्य प्रकट करण्यास सांगितलें. दोघांनीं आपापली सर्व शक्ति एकवटून प्रयत्न केले. पण अग्नीला ती दहन करितां येईना व वायूला वाहून नेतां येईना! तेव्हां त्या तेजाविषयींची जिज्ञासा बाजूला राहिली व निराश होऊन ते परत गेले. तात्पर्य काय, तर सृष्टिकर्त्यापुढें सृष्टीविषयींचे नियम निरुपयोगी होत. हे नियम ठरविण्याचा प्रयत्न करणें म्हणजे मूर्खपणा आहे, असें आमचें मत आहे, असें मात्र यावरून कोणी समजूं नये. हे नियम व त्यांचे अपवाद ठरविणें हें आपलें कर्तव्य आहे व त्यांविषयीं नित्य प्रयत्न करणारे पुरुष सृष्टिकर्त्याची समीपता मिळवीत असलेले व म्हणून वंद्य होत असें आम्ही समजतों. पण या नियमांची अपूर्णता लक्षांत न घेतां त्यावरून अलौकिक हा भेद कल्पून तो असंभाव्य कोटींत ढकलूं पाहणें चुकीचें आहे, एवढेंच आमचें म्हणणें आहे.समजुतींतील भेदामुळें कित्येक कथा अलौकिक पद्धतीनें सांगितलेल्या असतात व त्यांतील हा भेद दाखवून त्यांची संगति लावितां येते व ती लावणें युक्त होय; पण सर्व अलौकिक कथा समजुतींतील भेदामुळें अलौकिक गणल्या जातात असें म्हणवत नाहीं. संगति लावण्याचा प्रयत्न करितांना याविषयीं प्रत्येकानें सावधानता ठेविली पाहिजे.

## उपसंहार.

रामचरित्राइतकें पवित्र चरित्र जगतीतलावर क्वचित् पहावयास सांपडेल. बुद्धिपुरःसर शोध केला तरी दोष आढळणें शक्य नाहीं, असें चरित्र हेंच एक आहे असें म्हटल्यास अतिशयोक्तीचा दोष पदरीं येईल असें वाटत नाहीं! उत्तम प्रकारें रामचरित्राचें कोणत्या गुणाच्या उत्कटतेबद्दल म्हणून वर्णन करावें? प्रजापालन करणारा राजा म्हणून रामचरित्राची महती गावी? का उत्कृष्ट योद्धा म्हणून त्याचें वर्णन करावें? का खरा कर्मयोगी म्हणून त्याची स्तुति करावी? का संकटकालीं न डगमगणारा साधु पुरुष म्हणून त्याचे धन्यवाद गावे? कोणतीहि बाजू धरली तरी तिला रामचरित्रांत अवकाश आहे. अशा तऱ्हेचें अष्टपैलू चरित्र पाहून मागून झालेल्या पुष्कळ थोर पुरुषांना आपल्यांतील वैगुण्याकडे दृष्टि जाऊन खंती वाटली असेल! आमच्या हिंदुस्थानांत इतकें लोकप्रिय नांव दुसरें कोणतेंहि नाहीं! कोट्यवधि जिव्हांनीं त्याचा उच्चार कोट्यवधि वेळां

केलेला आहे ! ज्यानें ज्यानें या चरित्राचें मननपूर्वक अध्ययन केलें आहे त्याला त्याला त्यानें कांहीं वेळ गुंग केल्याशिवाय सोडिलें नसेल, अशी आमची ठाम समजूत आहे. फारशी, इंग्रजी यासारख्या परभाषांत त्याचीं रूपान्तरें झालीं आहेत. बौद्धांनींहि रामचरित्राचें हें महत्त्व लक्षांत आणून "दशरथजातक" नामक ग्रंथ तयार करून रामाला आपल्याकडे ओढण्याचा प्रयत्न केलेला आहे. एकंदरींत आमचें उपास्य दैवत म्हणून रामचरित्राचें महत्त्व दाखविण्याची गरज नसून परकीयांनाहि रमविण्यासारखें खरोखरच त्यांत स्वयंसिद्ध महत्त्व आहे, यांत शंका नाहीं. सनातन धर्मावर मोठें संकट आलें असतां ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं रामचंद्राचा अवतार झालेला आहे व त्यानें आपल्या पराक्रमानें हें अरिष्ट टाळल्यामुळें त्याचें नांव आमच्या इतिहासांत अजरामर झालें आहे; धर्माला ग्लानि आली असतां व सज्जन संकटग्रस्त झाले असतां परमेश्वर अवतार घेऊन त्यांचें संरक्षण करितो, हें तत्त्व या चरित्राच्या योगानें त्यानेंच सिद्ध केलेलें आहे. हिंदुस्थानाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि देशांत हें तत्त्व सिद्ध झालेलें नाहीं. खिस्ती लोक जीजस ख्राइस्टाशिवाय पूर्वीं जगाचा तारक कोणी झाला नाहीं व पुढें होणार नाहीं, असें मानितात; महंमदानुयायी ठराव व्यक्तीसच हा मान देतात. एवंच, इतर धर्मांच्या प्रवर्तकांनीं सर्व मान आपल्याकडे ठेविण्याचा प्रयत्न केलेला आहे. याकरितां या तत्त्वाचें जनकत्त्व व पालकत्त्व आम्हीं आमच्याकडे आहे, असें लिहिलें आहे. आणि असें आश्वासन असल्यावर आम्हांला निराश होण्याचें कारण काय? आमच्या संरक्षणाकरितां त्यानें हजारों अवतार घेतलेले आहेत. हजारों वेळां त्यानें अवतार घेऊन आपल्या प्रत्यक्ष साहचर्यानें ही भूमि पवित्र केली आहे ! तो आमची उपेक्षा कधीं करणार नाहीं, असा आमचा विश्वास हजारों वर्षांच्या आनुवंशिक संस्कारांच्या योगानें दृढ झालेला आहे व तो मनांत राहून आमच्या हातून आमचीं कर्तव्यें बजाविलीं जावोत अशी त्या जगन्नियंत्यास अनन्यभावानें प्रार्थना आहे.

---

# भाग २ रा.

## रामायणकालीन लोकस्थिति.

कोणत्याहि देशांतील कोणत्याहि काळच्या लोकस्थितीविषयीं विचार करावयाचा म्हणजे राज्यव्यवस्थेची बाब प्रथमतः पुढें येते. समाजाच्या उच्चनीच अवस्था सर्वस्वीं राज्यव्यवस्थेवर अवलंबून असल्यामुळें राज्यव्यवस्थेचें परीक्षण केल्यास तदनुरोधानें लोकस्थितीचें चित्र डोळ्यांपुढें चटकन् उभें राहतें; लोकस्थितीविषयीं मग वेगळा विचार करावा लागत नाहीं. रामायणकालीं राज्यव्यवस्था कशा प्रकारची होती याचा विचार करावयाचा असेल तर त्या वेळच्या राज्यव्यवस्थेशीं तुलना करण्यासारखी राज्यव्यवस्था सध्यां कोठेंहि नाहीं, एवढें सांगितलें म्हणजे पुरे आहे. आमच्या या लिहिण्याचें कारण व रहस्य आर्यधर्मीयांच्या अंतःकरणास कळल्यावांचून राहणार नाहीं. एकाद्या उत्कृष्ट राज्यपद्धतीला उपमा द्यावयाची असल्यास रामराज्याची देत असतात, हें सर्वांना माहीत आहे. किंबहुना "रामराज्य" या आनुपूर्वीचा अर्थ 'उत्कृष्ट राज्य' असा होऊन बसला आहे. मग अशा या सर्वमान्य राज्यव्यवस्थेचें परीक्षण करण्याची आवश्यकता काय आहे, अशी शंका वाचकांस येणें साहजिक आहे. रामराज्याबद्दल लोकांत आदरबुद्धि असली तरी ती उत्पन्न होण्याचें कारण कोणालाहि सांगतां येणार नाहीं. रामराज्यांतील कारभाराचें ध्येय प्रजानुरंजन हें एकच होतें, ही गोष्ट आह्मांला मान्य आहे; आणि हें ध्येय संपादण्याचे मार्ग कशा प्रकारचे होते हें आह्मांला पहावयाचें आहे. आतां ही गोष्ट खरी आहे कीं, वाल्मीकिरामायणावरून रामराज्याचा वसूल किती होता, लष्करी खात्याकडे किंवा शिक्षणखात्याकडे किती रक्कम खर्ची पडत असे, निरनिराळ्या गुन्ह्यांचें लोकसंख्येशीं शेंकडा प्रमाण काय होतें इत्यादि विषयांची तपशीलवार माहिती मिळणें शक्य नाहीं. वाल्मीकिरामायण सोडून दिलें आणि रामचरिताविषयीं इतर पुराणांतून माहिती मिळविली तरी त्यांत असली माहिती असावयाची नाहीं; आणि मिळाली तरी तिच्यावर वाल्मी-

किरामायणाइतका विश्वास ठेवितां येणार नाहीं. याकरितां त्या वेळच्या राज्यपद्धतीची माहिती देणें म्हणजे प्रजेचा व राजाचा परस्परसंबंध कशा प्रकारचा होता यासंबंधीं विवेचन करणें होय. यासंबंधाचें वर्णन राम वनवासास गेल्यावेळीं वसिष्ठांनीं थोडक्यांत दिलें आहेः—

**न हि तद्भविता राष्ट्रं यत्र रामो न भूपतिः ॥**
**तद्वनं भविता राष्ट्रं यत्र रामो निवत्स्यति ॥ २।३७।२९ ॥**

"ज्या ठिकाणीं राम हा राजा नाहीं तें राष्ट्र नव्हे; परंतु तो ज्या ठिकाणीं राहील तें जरी अरण्य असलें तरी तें राष्ट्र होईल."

राजाविषयीं प्रजेच्या मनांत त्या वेळीं किती प्रेम व पूज्यभाव नांदत होता त्याचें हा श्लोक निदर्शन आहे. अशा या राज्यपद्धतीचें स्वरूप कशा प्रकारचें होतें हें आपणांस आतां पहावयाचें आहे.

## राजसत्तेची उपपत्ति.

समाजव्यवस्था सुरळीत चालावी, बलिष्ठापासून दुर्बलाला पीडा पोंचूं नये, व सर्व समाजाच्या गरजा भागविण्याचें काम व्यक्तीवर न पडतां समाजाला करितां यावें याकरितां सरकार ही संस्था निर्माण झालेली आहे. समाजांत राहून सर्व प्रकारचे हक्कांचा आपणांस उपभोग घेतां यावा अशी प्रत्येक मानवी प्राण्याची इच्छा असते. अगदीं रानटी स्थितींतील मनुष्यालाहि समाजानें राहण्याची आवड असते. मानवी प्राण्यांच्या अशा समुदायाला समाज म्हणण्यापेक्षां कळप म्हणणें अधिक योग्य आहे. या कळपांत—सध्यांच्या समाजाच्या पूर्वावस्थेंत—लोकांवर कोणी तरी सत्ता चालविणारा असे. या सत्ताधाऱ्याच्या अंगचा मुख्य गुण म्हटला म्हणजे बलिष्ठपणा हा असून त्याच्या योगानें त्यानें आपलें स्थान मिळविलेलें असे, हें उघड आहे. नंतर ज्या वेळीं हे कळप आपआपसांत मिसळूं लागले त्या वेळीं या संयुक्त कळपाला समाजाचें स्वरूप आलें व या सर्व समाजाचें—राज्याचें—प्रभुत्व बलिष्ठपणा व कर्तबगारी अंगीं असलेल्या पूर्वीच्या कळपांतील एकाद्या पुढाऱ्याला मिळून, येथपासून वंशपरंपरा राज्य चालविण्याच्या हक्काची उत्पत्ति झाली. एका कळपाची व्यवस्था ठेविणें व एकमेकांपासून दूर राहणाऱ्या संयुक्त कळपांची व्यवस्था ठेविणें यांत उघडपणें फरक आहे. समाजाच्या गरजा व अड-

चणी वाढून त्या भागविण्याचें व त्याबरोबर स्वतांचा इतमाम चालविण्याचें काम यापुढें या पुढाऱ्याकडे आलें. या वेळीं हा राजा झाला तरी आपला कारभार लोकांच्या सल्ल्यानें चालविणार हें उघड आहे. एवढेंच नव्हे तर त्यामागून त्याच्या जाग्यावर आलेले त्याच्या वंशांतील प्रारंभींचे कांहीं पुरुषहि त्याचा कित्ता गिरविण्यास चुकले नसतील. जोंपर्यंत वंशपरंपरा हक्काची शाश्वती नव्हती तोंपर्यंत हा सलोखा नांदत असला पाहिजे. हा हक्क आतां कायम झाला—दुसरा कोणी तो काढून घेईल अशी भीति बाळगावयास नको, इतका दरारा लोकांवर बसला आहे—असें त्याला दिसून आलें म्हणजे तो आपली चैन सुरू करावयाचा, हें ठरलेलें आहे. जोंपर्यंत आपण चांगल्या रीतीनें वागूं तोंपर्यंत आपणाला या गादीचा मान मिळावयाचा आहे; जर आपण आपली चैन चालवून लोकांना अल्पहि पीडा देऊं तर गादी जाऊन आपली अवस्था काय होईल याचा नियम नाहीं, असें जोंपर्यंत या सत्ताधाऱ्याला वाटत असे तोंपर्यंत तो सुरळीतपणें राज्यकारभार करीत असे. या सत्तेला वंशपरंपरा शाश्वती प्राप्त झाल्यापासून चांगला व वाईट राजा अशा भेदाची उत्पत्ति झाली. या रानटी राज्यांचा नाश होऊन सांप्रत सर्व जगांत जरी सुधारलेल्या राष्ट्रांचीं राज्यें आहेत तरी रानटी समाजानें दाखविलेलें तत्त्व अद्यापि कायम आहे. पुढें पुढें हे समाज वाढूं लागले, नवीन नवीन समाज त्यांत मिळूं लागले व राजे लोक मिळवूं लागले तसें तसें त्यांच्यावर सत्ता चालविण्याचें काम अधिक महत्त्वाचें व बिकट होऊं लागलें. सरकार या संस्थेचा इतिहास अशा प्रकारचा आहे. या इतिहासास अनुसरून ज्या राज्यपद्धतींत लोकांचा अधिकार पूर्णत्वानें चालतो ती सर्वोत्कृष्ट, असें सध्यां ठरलें आहे.

## राज्यकारभारांत प्रजेची संमति.

आतां अयोध्येच्या राज्यकारभारांत प्रजेचा अधिकार किती होता, हें पाहूं. अयोध्येच्या राज्यकारभाराला सध्यांच्या काळांतील समर्पक उपमा द्यावयाची म्हणजे सध्यांच्या इंग्लंडच्या राज्यकारभाराची—कांहीं बाबी सोडून देऊन—देतां येईल. इंग्लंडची सध्यांची राज्यपद्धति राजप्रजासत्ताक आहे. "राजप्रजासत्ताक" हे शब्द इंग्लंडच्या राज्यपद्धतीला लावण्यांत येतात खरे, तथापि राजाच्या हातीं सत्ता मुळींच नसून लोकप्रतिनिधिसभेच्या गळ्यांत लॉर्ड सभेचें लोढणें अडकविलेलें

असल्यामुळें खरा सत्ताधारी कोणालाच म्हणतां यावयाचें नाहीं. अयोध्येची राज्य-पद्धति मात्र खरीखुरी राजप्रजासत्ताक होती. ज्या कांहीं विशेष महत्त्वाच्या गोष्टी करावयाच्या असत त्या करावयाचें ठरल्यावर अंमलांत आणण्याचें कार्य खुद्द राजाकडे असे. प्रजेला निवेदन केल्याशिवाय मात्र त्याला कोणतीहि गोष्ट करितां येत नसे. राजाच्या मनांत एखादी गोष्ट करावयाची आली म्हणजे तो प्रजेच्या पुढाऱ्यांला बोलावून त्यांची परिषद् भरवीत असे व ती गोष्ट त्यांना कळवून त्यांची संमति मिळाली तर ती गोष्ट राजाला अमलांत आणितां येत असे. इंग्लंडच्या सध्यांच्या राज्यपद्धतीमध्यें कॉमन्स व लार्ड्स या दोन सभांनीं एकादी गोष्ट ठरविल्यावर फक्त राजाची सही तीवर घेऊन ती अमलांत आणितात. म्हणजे यांत राजाची संमति नांवाची असते. अयोध्येच्या राज्यपद्धतींत राजाची सत्ता नष्ट केलेली नसून सर्वसंमत गोष्ट अंमलांत आणावयाचें कार्य राजाच्या हातांत ठेविलेलें होतें. इंग्लंडच्या राज्यपद्धतींत व अयोध्येच्या प्राचीन राज्यपद्धतींत महत्त्वाचा भेद आहे. अयोध्येच्या राज्यांत जी परिषद भरत असे ती मात्र सध्यांच्या इंग्लंडच्या किंवा अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांच्या प्रतिनिधिपरिषदांप्रमाणें नव्हती. राज्यांतील श्रेष्ठ ऋषि, प्रजेचे मोठमोठे पुढारी व मांडलिक राजे यांना या परिषदेला त्या वेळीं बोलावीत असत. रामाला यौवराज्याभिषेक करावयाचें दशरथानें मनांत आणिलें त्या वेळीं त्यानें अशी एक परिषद् बोलाविल्याचा रामायणांत उल्लेख आहे:—

**नानानगरवास्तव्यान्पृथग्जानपदानपि ।**
**समानिनाय मेदिन्यां प्रधानान्पृथिवीपतिः ॥** २।१।४६

" निरनिराळ्या नगरांमध्यें व देशांमध्यें राहणाऱ्या सर्व पृथ्वीवरील मोठमोठ्या मंडळींना राजानें बोलावून आणिलें. "

यापुढील कांहीं श्लोकांत परिषदेंतील सभासदांचा " नृपति " असा उल्लेख बरेच वेळां आलेला असल्यामुळें ही परिषद केवळ मांडलिकांची होती कीं काय अशी शंका येते. वस्तुतः या परिषदेंत केवळ मांडलिक राजे नसून लोकांचे पुढारी नागरिकहि तींत होते; परंतु इतरांपेक्षां मांडलिकांचा मान अधिक असल्यामुळें त्यांचा निर्देश प्राधान्यानें व वारंवार केलेला आहे, इतकेंच. ज्या वेळीं दशरथानें परिषदेपुढें आपला हेतु प्रकट केला त्या वेळीं—

**तस्य धर्मार्थविदुषो भावमाज्ञाय सर्वशः**
**ब्राह्मणा बलमुख्याश्च पौरजानपदैः सह॥ २।२।१९ ॥**
**समेत्य ते मंत्रयितुं समतागतबुद्धयः॥**
**ऊचुश्च मनसा ज्ञात्वा वृद्धं दशरथं नृपम् ॥ २० ॥**

"धर्मार्थवेत्त्या दशरथ राजाचा अभिप्राय लक्षांत घेऊन ब्राह्मण, सेनापति, देशांतील व नगरींतील लोक यांनीं एकत्र जमून विचार केला आणि मनानें काय करावें याचा निश्चय करून त्या वृद्ध राजाकडे जाऊन बोलूं लागले."

अशा रीतीनें त्या परिषदेंत मांडलिकांबरोबर लोकांचे पुढारीहि बोलाविले होते असें सांगितलें आहे. यानंतरच्या दशरथाच्या भाषणालाहि उत्तर देणारांत नागरिक होते, असा निर्देश आहे.

**ते तमूचुर्महात्मानः पौरजानपदैः सह ॥ २।२।२६ ॥**

"ते महात्मे (राजे) नगरांतील व देशांतील लोकांसहवर्तमान त्याला म्हणाले."

**ब्राह्मणान्क्षत्रियान्योधानमात्यगणवल्लभान्**
**क्षिप्रमानयताव्यग्राः कृत्यमात्ययिकं हि नः ॥ २।८१।१२ ॥**

"हे सत्कार्यदक्ष दूतहो! ब्राह्मण, क्षत्रिय, योद्धे, अमात्य आणि सेनापति या सर्वांना तुम्हीं सत्वर घेऊन या; आमचें जरूरीचें काम आहे."

इतक्या सभासदांना बोलावून आणण्याबद्दल ही वसिष्ठांची आज्ञा आहे. परिषदेंतील सभासदांच्या या उल्लेखावरून ही परिषद जरी प्रतिनिधींची नसली तरी तींत लोकांच्या थोर पुढाऱ्यांचा समावेश होत असे, हें निर्विवाद आहे. अयोध्येच्या या परिषदेंत लोकांचे पुढारी असतील त्यांना स्वतः राजा किंवा त्याच्याकरितां वसिष्ठांसारखे महर्षि निमंत्रण करीत असल्यामुळें खालील अधिकाऱ्यांच्या हातांत असलेले नामधारी पुढारी तींत येत नसत. खऱ्या लोकनायकांला ओळखण्याची दक्षता राजाच्या अंगीं निरंतर राहणें शक्य नाहीं. याकरितां निवडणुकीची पद्धति सर्वश्रेष्ठ आहे हें उघड आहे. त्या वेळीं निवडणुकीशिवाय काम सुरळीत चालत होतें म्हणून तें सध्यांहि तसें चालेल असें नाहीं. अयोध्येच्या राज्यपद्धतीच्या या वर्णनावरून पूर्वी राजसत्तेवर प्रजेचा दाब असे हें उघड होत आहे. राजसत्तेवर प्रजेचा दाब असण्याची कल्पना पौरस्त्यांना मुळींच माहीत नव्हती

असें कांहीं परदेशस्थ लेखक व आमच्यांतील त्यांचे अंध अनुयायी नेहमीं प्रतिपादन करीत असतात. त्यांनीं रामायणांतील हे सर्ग नीट डोळे उघडून पहावे, अशी आमची त्यांस आग्रहाची सूचना आहे. वर जे उतारे घेतले आहेत त्यांवरून कोणी शंका घेईल की प्रजेचे पुढारी परिषदेला बोलावीत असत; परंतु राज्यकारभारावर त्यांचें वजन असे, यास प्रमाण काय? प्रजेला कोणतीहि गोष्ट कळवावयाची मात्र, त्यांच्या संमतीची अपेक्षा मुळींच करावयाची नाहीं, असा या परिषदेचा उद्देश नव्हता, असें सिद्ध करितां येईल काय? अशी शंका काढणारांनीं दशरथाचे भाषणांतील खालील श्लोक वाचावे. दशरथ म्हणतो:--

**यदिदं मेऽनुरूपार्थं मया साधु सुमंत्रितम् ॥**
**भवन्तो मेऽनुमन्यन्तां कथं वा करवाण्यहम् ॥ २।२।१५ ॥**
**यद्यप्येषा मम प्रीतिर्हितमन्यद्विचिन्त्यताम् ॥**
**अन्या मध्यस्थचिन्ता तु विमर्दाभ्यधिकोदया ॥ १६ ॥**

"मीं योजिलेलें कार्य चांगला विचार करून योजिलें आहे असें जर आपणांस वाटत असेल तर आपण त्याला अनुमोदन द्यावें; तसें नसेल तर (या प्रसंगीं) मीं काय करावें तें आपण सांगावें. मीं योजिलेला मार्ग चांगला आहे असें जरी मला वाटत आहे तथापि दुसरा याहून चांगला मार्ग आपणांस सुचत असल्यास सांगावा. कारण तटस्थपणानें केलेला विचार अधिक फायदेशीर असतो."

दशरथाच्या या भाषणांत त्यानें आपला विचार परिषदेला कळवून तो पसंत नसल्यास दुसरा विचार सुचविण्यास तिस सांगितलें आहे. परिषदेनें त्याला संमति दिल्यावर त्यानें पुनः जो कोटिक्रम लढविला आहे तो वाचून त्याच्या प्रजाहितपरतेचें क्षणभर कौतुक वाटल्यावांचून राहणार नाहीं. रामला यौवराज्याभिषेक करावयाच्या कामीं कोणीहि सभासद विरुद्ध जाणें शक्य नव्हतें. तथापि त्यांनीं दिलेली संमति औपचारिक होती किंवा खरी मनापासून होती हें जाणण्याच्या उत्कंठेनें दशरथानें परिषदेला खालील प्रश्न केला:--

**कथं नु मयि धर्मेण पृथिवीमनुशासति ।**
**भवन्तो द्रष्टुमिच्छन्ति युवराजं महाबलम् ॥ २।२।२५ ॥**

"मीं धर्मानें सर्व पृथ्वीचें पालन करीत असतां महाबलाढ्य रामाला युवराज करावें असें तुमच्या मनांत तरी कसें येतें?"

या प्रश्नाला परिषदेनेंहि समर्पक उत्तर दिलें आहे. दशरथाच्या या प्रश्नावरून प्रजेच्या पूर्ण संमतीशिवाय राज्यकारभार हांकला जात नसे ही गोष्ट सिद्ध होते.

## राजाचें कर्तव्य-प्रजानुरंजन.

ज्या राज्यांतील कारभार प्रजेच्या संमतीनें चालला आहे, तेथील राजावर प्रजेनें प्रेम केल्यास नवल तें काय? प्रजेचें प्रेम संपादन करणें हें काम कधींहि विनायास साधत नसतें. स्वार्थलोलुपता ही नेहमीं प्रेमाच्या आड येणारी आहे. ती राजानें सोडिली म्हणजे प्रजेच्या प्रेमाला केव्हांहि तोटा नसतो. प्रजेचें प्रेम संपादन करण्याकरितां आमच्याकडील राजांनीं विलक्षण त्याग केले आहेत. सिद्धार्थनामक एका प्रधानानें कैकेयीला असमंज नांवाच्या राजपुत्राची कथा सांगितली आहे. या राजपुत्राचें वर्णन वाचिलें म्हणजे अहिल्याबाईचा पुत्र मालेराव याचें स्मरण होतें. हा राजपुत्र राजमार्गावर खेळणाऱ्या लहान मुलांना सरयू नदींत नेऊन बुडवीत असे व अशा रीतीनें तो आपल्या जीवाची करमणूक करीत असे. या वेळीं प्रजेनें राजा सगर याजकडे तक्रार केली तेव्हां राजानें—

**तं यानं शीघ्रमारोप्य सभार्यं सपरिच्छदम् ।**
**यावज्जीवं विवास्योऽयमिति तामन्वशात्पिता ॥२।३६।२४॥**

"त्या (असमंजा) ला त्याच्या स्त्रीसह एका गाडींत लवकर बसवून हांकून लावा. त्याचें सामानसुमानहि त्याच्याबरोबर जाऊं द्या आणि तो जन्मभर तिकडेच राहूं द्या, असा त्याचा पिता जो सगर राजा त्यानें हुकूम केला."

अशा रीतीनें त्याला जन्मठेप हद्दपार करण्याचा निःशंकपणें हुकूम केला. आपला पुत्र म्हणून त्याला कोणत्याहि रीतीनें गय केली नाहीं. अशा तऱ्हेची न्यायनिष्ठुरता त्या राजांचे अंतःकरणांत वास करीत होती व असली भानगड उपस्थित झाली असतां त्याचा आपल्या तर्फे निकाल करून घेण्याइतकें प्रजेचें राजसत्तेवर वजन होतें, हें यावरून उघड होतें. प्रजानुरंजन हें आपलें मुख्य कर्तव्य आहे असें राजांना वाटत असे. हें कर्तव्य बजावीत असतांना स्त्री-पुत्रादिकांचा मोह मध्यें आडवा आला तरी तो बाजूला सारून ते नेहमीं पुढें जात असत. कर्तव्यनिष्ठा या गुणाचें स्तवन आम्हांला शब्दांनीं करितां येतें; परंतु खरोखर हें कार्य शब्दातीत आहे. सर्व मानसिक मोह नाहींसा करून

कर्तव्यकर्म करण्यास चुकतां नये, हें कोणालाहि कळतें; परंतु तें आचरणांत आणणें फार कठीण आहे. हे विचार मनांत आले म्हणजे प्रजानुरंजनाकरितां झटणाऱ्या या राजांविषयीं आदर उत्पन्न झाल्यावांचून राहत नाहीं. रामाच्या प्रजानुरंजनाविषयींच्या विचारांचें चित्र भवभूतीनें रेखाटलें आहे तें तर सर्वतोमुखीं आहे.

**स्नेहं दयां तथा सौख्यं यदि वा जानकीमपि ।**
**आराधनाय लोकानां मुंचतो नास्ति मे व्यथा ॥**

" प्रजांचें रंजन करण्याकरितां मला जरी प्रेम, दया, तसेंच सुख यांचा जरी त्याग करावा लागला - काय सांगावें? जरी प्रत्यक्ष जानकीचा त्याग मला करावा लागला—तरी तो मी ( आनंदानें ) करीन. मला त्यापासून किमपि दुःख वाटणार नाहीं. "

राज्याभिषेक झाल्यानंतर ज्या वेळीं सीतेविषयीं लोकांत विपरीत बोलूं लागले त्या वेळीं रामानें हे उद्गार काढिले आहेत. सीता पवित्र असल्याबद्दल रामाची खात्री होती. पूर्वीं तिनें दिव्य केलें होतें व विचारी लोकांत तिजविषयीं पूज्यभाव कायम होता. तथापि लोकांना संशय येत होता. तो संशय राहूं नये यासाठीं त्यानें प्रत्यक्ष आपल्या प्रियपत्नीचा त्याग करण्यास कमी केलें नाहीं. लक्ष्मणालाहि सीतेच्या पावित्र्याबद्दल शंका नव्हती. तथापि प्रजानुरंजन करण्याकरितां रामानें केलेली भयंकर आज्ञा त्यानें कठोर अंतःकरणानें पाळिली. तसेंच सीता अशा दुःखमय स्थितींत असतांहि तिनें, लक्ष्मणाबरोबर रामाला जो निरोप पाठविला आहे त्यांत—

**यथा भ्रातृषु वर्तेथास्तथा पौरेषु नित्यदा ।**
**परमो ह्येष धर्मस्ते तथा कीर्तिरनुत्तमा ॥७।४९।१५॥**

"ज्याप्रमाणें आपल्या भ्रात्यांशीं आपण वागतां त्याप्रमाणें आपल्या प्रजांशीं सदोदित वागणें हा आपला मुख्य धर्म होय. तसें केल्यानें ( या धर्माच्या आचरणानें ) आपणांला अतिशय उत्तम कीर्तीचा लाभ होईल."

हा श्लोक आहे. हा वाचला म्हणजे रघुवंशीयांच्या प्रजावात्सल्याचें कौतुक वाटून हृदय भरून येतें! प्रजापालन हें जणूं काय त्यांच्या प्रत्येक रोमांत भरून

गेलें होतें! नाहींतर अशा प्रसंगीं सीतेला प्रजाजनांचें स्मरण होणें शक्य नव्हतें. परंतु प्रजानुरंजनाकरितां प्रत्यक्ष पत्नीचा त्याग करणाऱ्या महात्म्याची ती स्त्री होती. मग तिनें असे उद्गार काढिल्यास नवल तें काय! रामाची प्रजापालनो-विषयींची ही दक्षता वृद्धपणीं किंवा सिंहासनावर बसल्यावर दिसूं लागली असें नाहीं. अगदीं लहानपणापासून त्याचे विचाराला वरील वळण लागलें होतें. अरण्यांत जावें लागलें तरी त्यानें तेथेंहि प्रजापालनाचें कार्य सोडिलें नव्हतें. दंडकारण्यांत ऋषिजनांना राक्षसांपासून फार पीडा होत असल्याचें ऐकून तो आपण होऊन अगदीं अरण्याच्या मध्यभागीं प्रविष्ट झाला. प्रारंभीं दहा वर्षे वेग-वेगळ्या ऋषींच्या आश्रमांत राहून त्यानें काढिलीं. ऋषींच्या तक्रारी त्याजकडे आल्या-वर त्याला पुढें जाऊन आपणावर संकट ओढून घ्यावें लागलें. हें टाळण्याकरितां सीतेनें रामाचें मन वळविण्याचा प्रयत्न केला होता. आपण अरण्यवास स्वीका-रिला असल्यामुळें आतां येथें आपणांस क्षात्रधर्मानें वागण्याची जरूर नाहीं; अयोध्येला परत गेल्यावर मग हें कार्य हातीं घेतां येईल, असा सीतेच्या भाष-णाचा आशय होता. यावर रामानें तिला सममर्मक उत्तर देऊन अनुकूल करून घेतलें. त्यानें तिला क्षात्रधर्माचें रहस्य सांगून ऋषींला दिलेल्या आश्वासनाचा उल्लेख केला व सांगितलें: —

> क्षत्रियैर्धार्यते चापो नार्तशब्दो भवेदिति ॥
> अप्यहं जीवितं जह्यां त्वां वा सीते सलक्ष्मणाम् ।
> न तु प्रतिज्ञां संश्रुत्य ब्राह्मणेभ्यो विशेषतः ॥ १८ ॥
> तदवश्यं मया कार्यमृषीणां परिपालनम् ॥
> अनुक्तेनापि वैदेहि प्रतिज्ञाय कथं पुनः ॥ १९ ॥

"लोकांला पीडा होऊन त्यांचें रक्षण न झाल्यामुळें त्यांना आक्रोश कर-ण्याची पाळी येऊं नये एवढ्यासाठीं क्षत्रियांनीं धनुष्य धारण करावयाचें असतें. हे सीते, एकदां प्रतिज्ञा केल्यावर—विशेषतः ब्राह्मणांशीं ती केल्यावर—मग जरी मला आपल्या जीविताचा, तुझा आणि लक्ष्मणाचा त्याग करावा लागला तरी करीन. (परंतु प्रतिज्ञा फिरविणार नाहीं!) तर हे सीते, कोणीं मला सुचविलें नसलें तरी ऋषिजनांचें रक्षण करणें हें माझें कर्तव्य आहे. आणि आतां मीं तर

त्याबद्दलची प्रतिज्ञा करून चुकलों आहें. मग हें कार्य मला आतां केलें पाहिजे हें काय सांगायला हवें ? "

सीतात्याग करितेवेळीं रामाच्या मनांत जी कर्तव्यनिष्ठा वास करीत होती ती अगदीं तारुण्योत्थ पूर्णत्वास पोंचलेली होती असें दिसून येतें. प्रजापालन हें राजाचें कर्तव्य आहे ही गोष्ट सर्व राजांना माहीत असते व संमतहि असते. एक लाख हिंदूंची कत्तल केल्याशिवाय परत न फिरण्याची प्रतिज्ञा करून बाहेर पडणारे क्रूर बादशाहाही हें तत्त्व कबूल करतील; मग इतरांची गोष्ट कशाला? जोंपर्यंत स्वार्थास चट्टा बसला नाहीं तोंपर्यंत सात्त्विक गोष्टी सर्व लोक मान्य करीत असतात. ज्या वेळीं स्वतःचें नुकसान होणार असें दिसूं लागतें त्या वेळीं ज्याच्या चित्तास मोह पडत नाहीं, तो मात्र लोकांच्या आदरास पात्र होत असतो. स्वार्थलोलुपता नसेल तर सर्व तात्त्विक विचार आचरणांत आणितां येतात. कारण कोणतेंहि तत्त्व कोणाला पसंत नसतें असें नाहीं. तें आचरणांत आणणें कठीण असल्यामुळें तसले महात्मे जगांत क्वचित् उपलब्ध होत असतात. प्रजापालनाविषयीं रामानें प्रकट केलेले जे विचार वर दिले आहेत ते त्याच्या स्वभावाची परीक्षा पाहण्याचे जे नानाविध प्रसंग त्याजवर आले त्या वेळीं त्याच्या मुखांतून निघालेले आहेत. या दृष्टीनें रामाच्या उद्गारांकडे पाहिलें म्हणजे त्यांचें महत्त्व केवढें आहे हें वाचकांस कळून येईल.

## लोकांची निष्ठा–आपोआप

अशा रीतीनें ज्या राजाच्या मनांत प्रजापालनाविषयीं आस्था आहे त्याजवर प्रजेनें प्रेम केल्यास आश्चर्य तें काय ? राजा आणि प्रजा यांमधील संबंध फार नाजूक असतात. जोंपर्यंत एक पक्ष आपल्या कर्तव्यास चुकत नाहीं तोंपर्यंत दुसरा त्याच्याशीं मिळून वागतो व हा प्रेमभाव उभयपक्षांस परस्पर सुखकारक होत असतो. विशेषतः राजाची कर्तव्यभ्रष्टता त्याच्या हातीं सत्ता असल्यामुळें प्रजेला फार भोंवते व यापुढें दोघांच्याहि अधोगतीला प्रारंभ होतो. याकरितां या बाबतींत राजानें सावधान असणें अधिक आवश्यक आहे. मनुष्य हा स्वभावतः शांतताप्रिय असल्यामुळें त्याला प्रतिपक्षाकडून पीडा होऊं लागेपर्यंत तो आपण होऊन कोणत्याहि भानगडींत पडत नाहीं. रघुवंशीय राजांची कर्तव्य-

निष्ठा कशा प्रकारची होती हें वरील सोदाहरण विवेचनावरून कळून येणार आहे. प्रजाजनहि त्या मानानें त्यांजवर प्रेम करीत असत हें वेगळें सांगावयास नकोच. राजकारणांतील प्रत्येक बाबींत आपली संमति घेण्यांत येते हें एकदां प्रजेला कळल्यावर राजासंबंधीं तिच्या मनांत आदर उत्पन्न होणें शक्य आहे. रामाविषयीं प्रजेच्या मनांत किती प्रेम होतें हें रामायणांत पुष्कळ स्थळीं सांगितलें आहे. ज्या वेळीं रामानें महाप्रस्थान केलें त्या वेळीं सर्व प्रजा त्याच्या मागून गेल्या असें वर्णन आहे. या एका गोष्टीवरून रामावरील प्रजाजनांचें प्रेम स्पष्ट होतें. पुष्कळ राजांनीं महाप्रस्थान केलें आहे, परंतु प्रजाजन त्याच्या मागून गेल्याचें उदाहरण क्वचित् आढळतें. अत्यंत प्रेम असल्याशिवाय ही गोष्ट घडणें शक्य नाहीं. रामाशिवाय इतर रघुवंशीय राजांवरहि प्रजा पूर्ण प्रेम करीत असे हें अयोध्येच्या प्रारंभींच्या वर्णनांत—

**कश्चिन्नरो वा नारी वा नाश्रीमान्नाप्यरूपवान् ।**
**द्रष्टुं शक्यमयोध्यायां नापि राजन्यभक्तिमान् ॥** ॥ १।६।१६ ॥

"त्या अयोध्येमध्यें एकहि पुरुप अथवा स्त्री गरीब किंवा कुरूप नव्हती. तसेंच राजावर ज्याची निष्ठा नाहीं असा एकहि पुरुष अथवा स्त्री तेथें मिळणें शक्य नव्हतें."

असा जो श्लोक दिला आहे, त्यावरून दिसून येईल. रामावरील प्रजेचें प्रेम मात्र इतरांहून वेगळ्या प्रकारचें होतें. राजा या नात्यानें प्रजेच्या मनांत जितका आदर असणें शक्य आहे, तितका रामाविषयीं असल्यास त्यांत विशेष प्रशंसार्ह कांहीं नाहीं. रामाच्या वागणुकींत विशेष एवढेंच होतें कीं, तो प्रजाजनांत फार मिसळत असे व यामुळें तो त्यांना आप्तसा वाटत असे. आपल्या राज्यांतील ऋषि, पंडित, शिष्ट, अनाथ, निरनिराळ्या धंद्याचे लोक यांची तो जातीनें विचारपूस करीत असे, हें त्याच्या लोकप्रियतेचें कारण होय. दशरथानें ज्या वेळीं रामाला यौवराज्याभिषेक करावयाचें मनांत आणून पौरजनांची सभा भरविली, त्या वेळीं लोकसभेनें रामाचें जें वर्णन केलें आहे तें वाचलें असतां आमच्या म्हणण्याची सत्यता कळून येईल. "मी यथान्याय तुमचें पालन करीत असतां तुम्ही रामाला अभिषेक करावयास कां सांगतां?" असा दशरथानें खोंचदार प्रश्न केला होता, त्यास सभेनें दिलेल्या उत्तरांत वरील वर्णन आहे:—

पौरान्स्वजनवन्नित्यं कुशलं परिपृच्छति ।
पुत्रेष्वग्निषु दारेषु प्रेष्यशिष्यगणेषु च ॥ २।२।३८ ॥
निखिलेनानुपूर्व्या च पिता पुत्रानिवौरसान् ।
शुश्रूषन्ते च वः शिष्याः कच्चिद्वर्मसु दंशिताः ॥ ३९ ॥
इति वः पुरुषव्याघ्रः सदा रामोऽभिभाषते ।
बलमारोग्यमायुश्च रामस्य विदितात्मनः ॥ ५० ॥
आशंसते जनः सर्वो राष्ट्रे पुरवरे तथा ।
आभ्यंतरश्च बाह्यश्च पौरजानपदो जनः ॥ ५१ ॥
स्त्रियो वृध्दास्तरुण्यश्च सायंप्रातः समाहिताः ।
सर्वा देवान्नमस्यन्ति रामस्यार्थे मनस्विनः ॥ ५२ ॥

" हा राम स्वजनांप्रमाणें आपल्या पौरजनांना—पुत्र, अग्नि, स्त्रिया, सेवकजन आणि शिष्यगण—यांविषयीं कुशल प्रश्न करितो. ज्याप्रमाणें बापानें आपल्या मुलाला (प्रेमानें) विचारावें, त्याप्रमाणें तो आपल्या पौरजनांना विचारितो. 'शिष्य आपली शुश्रूषा करितात ना?' 'सेवकजन आपल्या रक्षणाविषयीं तत्पर असतात ना?' असें तो पुरुषांमध्यें श्रेष्ठ असलेला राम आम्हांला सर्वदा विचारितो. (यामुळें) राष्ट्रामध्यें अथवा नगरामध्यें असलेला प्रत्येक मनुष्य रामाला बल असावें, त्याला आरोग्य असावें व तो दीर्घायु व्हावा, असें चिंतीत असतो. वृद्ध व तरुण स्त्रिया, तसेंच नगरांत राहणारे किंवा नगराबाहेर राहणारे प्रजानन या विचारी रामासाठीं सकाळसंध्याकाळ एकाग्र अंतःकरण करून देवांना नमस्कार करीत असतात."

या वर्णनांत रामाचें लोकांशीं असलेलें वर्तन व लोकांचें त्याजवरील प्रेम हीं थोडक्यांत पण चटकदार भाषेनें सांगितलीं आहेत. वनांत जाण्याकरितां राम बाहेर पडला असतां प्रजाजनांनीं त्याजविषयींचा आपल्या मनांतील आदर अशा रीतीनें व्यक्त केला आहे कीं, रामायणांतील तें वर्णन वाचीत असतां वाचकाचा कंठ दाटून आल्याशिवाय कदापि राहणार नाहीं. अशा प्रसंगीं आपल्याविषयीं लोकांच्या मनांत पूर्ण आदर आहे ही वार्ता मनुष्याच्या अंगीं धैर्य वाढवीत असते.

**ततः संबालवृध्दा सा पुरी परमपीडिता ।**
**राममेवाभिदुद्राव घर्मार्तः सलिलं यथा ॥२।४०।२०॥**
**पार्श्वतः पृष्ठतश्चापि लंबमानास्तदुन्मुखाः ।**
**बाष्पपूर्णमुखाः सर्वे तमूचुर्भृशनिःस्वनाः ॥ २१ ॥**
**संयच्छ वाजिनां रश्मीन्सूत याहि शनैः शनैः ।**
**मुखं द्रक्ष्याम रामस्य दुर्दर्शो नो भविष्यति ॥ २२ ॥**

" नंतर उन्हानें व्याकुल झालेला मनुष्य ज्याप्रमाणें पाणी दृष्टीला पडतांच तिकडे धांव मारितो त्याप्रमाणें त्या नगरींतील लहानापासून थोरापर्यंत सर्व मंडळी अत्यंत दुःखी होऊन रामाच्या मागून धावूं लागली—कोटि लोक त्या रथाच्या बाजूला राहिले. कांहीं पाठीं राहिले, कांहीं त्याच्या समोर उभे राहिले; आणि डोळ्यांत पाणी आणून आक्रोश करीत ते त्या—( सारथ्या ) ला म्हणाले, ' हे सारथ्या, अरे घोड्यांचे लगाम आंवळून धर आणि जरा हळू हळू रथ हांक. अरे, रामाला ( एकदां तरी ) आह्मांला पाहूं दे. कारण आतां त्याचें दर्शन होणें कठीण आहे. "

एका व्यक्तीकरितां इतके अश्रु गळल्याचे प्रसंग फार क्वचित् पहावयास सांपडतील. हा प्रसंग तर असल्या इतर प्रसंगांला उपमान होऊन राहिला आहे. विचार केला तर रामाला या वेळीं राज्याभिषेक झाला नव्हता; प्रजानुरंजनाकरितां त्यानें कांहीं विशेष कृत्य केलें नव्हतें. तथापि " पुरःफलानि " दर्शविणारें त्याचें आचरण त्याच्या एवढ्या लोकप्रियतेला कारण झालें !

## धर्माचें बंधन दोघांलाहि.

आमच्या इतिहासांतले असले प्रसंग वाचले म्हणजे मनाला क्षणभर कौतुक वाटून हृदय उचंबळून येतें. राजा व प्रजा यांमधील परस्पर प्रेमाचीं उदाहरणें या भरतखंडाच्या इतिहासाशिवाय अन्यत्र सांपडतील असें वाटत नाहीं. आमच्या लोकांचा सात्विक स्वभाव व अढळ कर्तव्यनिष्ठा हीं असल्या ऐतिहासिक प्रसंगांवरून स्पष्ट होतात. पाश्चात्य लोकांच्या इतिहासांत असले प्रसंग कितीसे सांपडतील? राजा व प्रजा यांमधील कलहांनीं पाश्चात्यांचे सारे इतिहास भरले आहेत. अशा कलहांबद्दल आम्हीं तेथील लोकांना दोष देऊं इच्छीत नाहीं.

परिस्थितीला अनुसरून प्राप्त झालेलें कर्तव्य त्यांनीं बजाविलें आहे. आणि त्यांचा पक्ष न्यायाचा असल्यामुळें विजयश्रीनेंहि पुष्कळ वेळां अखेरीस त्यांच्या गळ्यांत माळ घातली आहे. तथापि यावरून पाश्चात्य राष्ट्रांची आसुरी संपत्ति व तामसी स्वभाव चांगला व्यक्त होतो. पाश्चात्य राष्ट्रांनीं "राजा" या संस्थेची व्याख्या काय केली आहे हें सर्वांला माहीत आहे. राजा हा सर्व प्रजेचा एक नोकर आहे असें ते मानितात. कांहीं राष्ट्रांनीं तर ही व्याख्या शब्दांत न ठेवितां कृतींत आणिली आहे. कांहीं राष्ट्रांनीं याच्याहि पुढें जाऊन ही संस्था पूर्ण नष्ट करून सर्व सत्ता आपल्या हातीं घेतली आहे. आमच्या इतिहासाकडे नजर फेंकिली तर असलें उदाहरण त्यांत एकहि सांपडणार नाहीं. आमच्या प्राचीन ग्रंथांतून राजा व प्रजा यांसंबंधीं कल्पना किती उदात्त आहे! या कल्पनांप्रमाणें रामायणकालीं या दोन संस्थांमध्यें परस्परप्रेमभाव कशा प्रकारचा होता हें वर उतारे देऊन आम्हीं वर्णन केलें आहे. हा प्रेमभाव व या कल्पना अलिकडील इतिहासांतहि दिसून येतात. महाकवि कालिदास यानें रघुवंशीय राजांचें जें वर्णन केलें आहे, त्यावरून त्याच्या वेळीहि या कल्पना प्रचलित होत्या हें स्पष्ट होत आहे.

**प्रजानां विनयाधानाद्रक्षणाद्भरणादपि ।**
**स पिता पितरस्तासां केवलं जन्महेतवः ॥**

"अन्नाच्छादन देउनी जगविणें, भीतीसही वारणें ।
विद्या सांगुनि सद्गुणा शिकविणें, कष्टांतुनी तारणें ।
हें तो भूप करी, म्हणूनि म्हणती त्याला प्रजांचा पिता ।
तेव्हां केवळ जन्मदत्व उरलें बापांकडे तत्त्वत्तां ॥ १ ॥"

—रघुवंश-कै० गणेशशास्त्री लेले.

याच कल्पना पुढील इतिहासांतहि आहेत. आतां पाश्चात्यांची कल्पना योग्य कीं पौरस्त्यांची कल्पना योग्य, हें ठरविणें कठीण आहे. त्यांच्या योग्यायोग्यतेचा निर्णय करावयाचा म्हणजे लोकांचा स्वभाव व परिस्थिति यांविषयीं प्रारंभीं विचार केला पाहिजे. प्रजेचें रक्षण हें दोनहि कल्पनांचें एक ध्येय आहे. हें ध्येय साध्य होण्यास प्रजेच्या हातीं राजसत्ता असण्याचें सामान्य तत्त्व दोहों-

कडील कल्पनांत अंतर्भूत आहे. आमच्या प्राचीन ग्रंथांतील राजा व प्रजा यांमधील वरीलसारखीं परस्पर प्रेमदर्शक उदाहरणें वाचून आमच्याकडे राजसत्तेला कोणतेंहि बंधन नसून प्रजेच्या हातीं एकहि हक्क नव्हता असा कांहीं मंडळींनीं उगाच गैरसमज करून घेतला आहे. आमच्या सर्वव्यापी धर्मानें राजा व प्रजा या दोघांलाहि एकदम बांधून टाकिलें आहे.

बालोऽपि नावमंतव्यो मनुष्य इति भूमिपः ।
महती देवता ह्येषा नररूपेण तिष्ठति ॥
एकमेव दहत्यग्निर्नरं दुरुपसर्पिणम् ॥
कुलं दहति राजाग्निः सपशुद्रव्यसंचयम् ॥
तं यस्तु द्वेष्टि संमोहात्स विनश्यत्यसंशयम् ॥

"राजा जरी लहान असला तरी तो मनुष्य आहे, म्हणून त्याचा अपमान करूं नये. (कारण) राजा म्हणजे मनुष्यरूपानें असणारी एक देवता आहे. विस्तवावर जर कोणाचा पाय पडला तर त्या मनुष्यालाच काय ती इजा होईल; परंतु राजारूपी जो अग्नि आहे, (त्याला जर राग येईल तर) तो सबंध कुलाचा, त्याच्या द्रव्याचा, त्याच्या गुराढोरांचा फडशा करून टाकील. (यासाठीं) त्याचा जो द्वेष करितो त्याचा नाश होतो यांत शंका नाहीं."

अशी प्रजेला आज्ञा करून राजाला खालीं लिहिल्याप्रमाणें भीति घातली आहे:—

अन्यायेन नृपो राष्ट्रात्स्वकोशं योऽभिरक्षति ।
सोऽचिराद्विगतश्रीको नाशमेति सबांधवः ॥
प्रजापीडनसंतापात्समुद्भूतो हुताशनः ।
राज्ञः कुलं श्रियः प्राणानदग्ध्वा न निवर्तते ॥

"जो राजा आपल्या प्रजांवर नानातऱ्हेचे कर बसवून आपल्या खजिन्याची भर करितो त्याच्या सर्व संपत्तीचा लौकर नाश होऊन त्याचाहि त्याच्या बांधवांसहवर्तमान नाश होतो. (कारण) प्रजेला पीडा होऊन तिला संताप आला असतां तो अग्नि राजाचें कुल, त्याची संपत्ति, एवढेंच नव्हे तर प्रत्यक्ष त्याचे प्राण यांचा नाश केल्याशिवाय परत फिरत नाहीं!"

अशा रीतीनें दोनहि पक्षांला त्यांना पूज्य वाटणाऱ्या धर्मशास्त्रांनीं बंधनें

घातलीं असल्यामुळें अधिकारासंबंधानें प्राचीनकालीं त्यांमध्यें संग्राम माजले नाहींत. यावरून इकडील प्रजा राजानें केलेला छळ निमूटपणें सहन करीत असे, अशी कोणींहि आपली समजूत करून घेऊं नये. इकडील राजांनीं उत्कृष्ट प्रकारें प्रजापालन करून प्रजेला कायदा हातीं घेण्यास लावण्यासारखे फारसे प्रसंग आणिले नाहींत. यामुळें प्रजाहि पूर्ण राजनिष्ठ राहिली. त्या कालापासून प्रजेच्या अंगीं जी ही राजनिष्ठा खिळून गेली आहे ती अद्यापि कायम आहे. प्राचीन राजांची कर्तव्यनिष्ठा हें यास मुख्य कारण आहे. प्रजानुरंजनाकरितां प्रत्यक्ष पत्नीचा त्याग करणारे रामचंद्रासारखे राजे लाभल्यावर प्रजेचें राजावर प्रेम कां असूं नये?

## अराजकता.

पाश्चात्य राष्ट्रांतील राजांनीं आपल्या प्रजेचा छल केला व प्रजेनेंहि राजसत्ता नामशेष करून टाकिली. तेथें अशा रीतीनें नेहमीं कलह चालला असल्यामुळें तिकडे अराजक लोकांचा एक प्रचंड वर्ग उत्पन्न झाला आहे. राजकुलांतील पुरुष गादीवर असो वा लोकांचा प्रतिनिधि राज्यकारभार करो, एका व्यक्तीच्या हातीं सत्ता असून इतरांनीं त्याची प्रजा म्हणून वागणें ही विषमता त्यांना नकोशी वाटते व यामुळें त्यांनीं कितीएक निरपराधी स्त्रीपुरुषांचे वध करून आपलाहि नाश करून घेतला आहे. हिंदुस्थानांतील सात्त्विक प्रकृतीच्या मनुष्यांस ही कल्पना तरी सुचणें शक्य आहे काय? प्राचीनकाळीं ही कल्पना इकडे नव्हती व अलीकडेहि नाहीं. कांहींतरी सत्ता राष्ट्रावर नेहमीं असली पाहिजे असेंच येथील प्रजाजनांना पूर्वीं वाटत होतें, आतां वाटत आहे; आणि आम्ही आशा करितों, पाश्चात्य राष्ट्रांतील या अमंगल सुधारणेचा (?) यापुढेंहि आमच्या राष्ट्राच्या पवित्र अंतःकरणास स्पर्श होणार नाहीं. राष्ट्रावर कोणाची सत्ता नसल्यास चोहोंकडे कशी अस्वस्थता उत्पन्न होते याचें वर्णन उत्तम प्रकारें रामायणांत केलें आहे. दशरथ मृत झाल्यावर अयोध्येच्या राज्याची हीच स्थिति झाली होती. राजाच्या चार पुत्रांपैकीं तेथें कोणी हजर नव्हता. या वेळीं अयोध्येंतील प्रजाजनांनीं राजवाड्यांत जाऊन कोणातरी राजपुत्राला आणून लवकर गादीवर बसवावें अशी राजमंत्र्यांची प्रार्थना केली. इतकी त्वरा

करण्याचें कारण सांगतांना राष्ट्र अराजक असेल तर कोणते अनर्थ होतात याचें उत्कृष्ट वर्णन केलें आहे.

**अराजकं हि नो राष्ट्रं विनाशं समवाप्नुयात् ॥ २।६७।८॥**
**नाराजके जनपदे प्रहृष्टनटनर्तकाः ।**
**उत्सवाश्च समाजाश्च वर्धन्ते राष्ट्रवर्धनाः ॥ १५ ॥**
**नाराजके जनपदे धनवन्तः सुरक्षिताः ॥ १८ ॥**
**नाराजके जनपदे स्वकं भवति कस्यचित् ।**
**मत्स्या इव जना नित्यं भक्षयन्ति परस्परम् ॥ ३१ ॥**
**अहो तम इवेदं स्यान्न प्रज्ञायेत किंचन ।**
**राजा चेन्न भवेल्लोके विभजन्साध्वसाधुनी ॥ ३६ ॥**

" आमच्या राष्ट्रावर जर राजा नसेल तर त्याचा नाश होईल. ज्यामध्यें आनंदित नट आणि सूत्रधार असतात, असे राष्ट्रवर्धक उत्सव आणि समाज अराजक राष्ट्रामध्यें वृद्धि पावत नाहींत. अराजक राष्ट्रामध्यें धनिक लोक सुरक्षित नसतात. अराजक राष्ट्रामध्यें कोणाचेंहि आपलें असें कांहीं असत नाहीं. ( कारण ) लोक एकमेकांना माशांप्रमाणें नेहमीं खाऊं पाहतात. चांगलें कोणतें, वाईट कोणतें, हें ठरवून त्यांची यथान्याय व्यवस्था करणारा राजा जर नसेल तर लोकांमध्यें सर्वत्र अंधकार होऊन कशाचाच उमज पडणार नाहीं. "

या उताऱ्यावरून अराजकतेविषयीं आमच्या लोकांचीं मतें कशा प्रकारचीं होतीं हें कळून येईल. अराजक राष्ट्र त्यांच्या दृष्टीला पूर्णपणें अमंगल वाटत होतें व हीच भावना त्यांच्या पुढील पिढ्यांतहि दिसून येते.

## प्रजेच्या अधिकाराविषयीं आक्षेप.

रामायणकालीं राज्यपद्धति कशा प्रकारची होती याविषयीं रामायणांतील वचनांवरून आमचें जें मत झालें तें वर दाखविलें आहे. आतां या बाबीत कांहीं गृहस्थांनीं ज्या शंका काढिल्या आहेत त्यांविषयीं आम्हांला काय वाटतें तेंहि येथें नमूद करणें अवश्य आहे. सर्व शंका एकाच प्रकारच्या असल्यामुळें मासल्याकरितां एका विद्वान् गृहस्थाच्या पुस्तकांतील उतारा येथें घेतों.

रा. ब. विष्णु मोरेश्वर महाजनी आपल्या "रामायणकालीन लोकस्थिति" या निबंधांत लिहितातः—

"पण या अधिकाऱ्यांची जी सभा होती तिला कांहीं हक्क असतील अशी आपली समजूत झाली तर ती चुकीची होईल. रामाला यौवराज्य देण्याचा निश्चय करून आपलें मत पौरजानपदांस पसंत पडतें काय हें पाहण्याकरितां दशरथानें ही सभा भरविली. त्या वेळीं त्याचें भाषण हितकर, सर्वांना ऐकूं येण्याजोगें व आनंदजनक झालें........यांत पौरजनपदाला दशरथानें मोठेपणा दिला हें खरें, व लोकांनीं त्याचें अभिनंदन करून रुकारही दिला; पण उलट उत्तर दिलें असतें तर दशरथानें रामाला युवराज केलें नसतें काय? मला वाटतें, केलें नसतें असें नाहीं. 'राजा देवाचा अवतार'-त्यानें मनास वाटेल तें केलें असतें. प्रजेचें अनुमत मिळालें तर दुधांत साखर इतकेंच. न मिळालें तर दूध गोड तें गोडच. कारण, कैकयीनें वरदान पुढें केल्यानें हा अभिषेकाचा व्यूह ढासळला; तेव्हां राजानें नाखुषीनें म्हणा, कसेंहि म्हणा, रामाला अरण्यांत पाठविण्याचा निश्चय केला. तेव्हां ही सभा कोठें होती? तिचें अनुमत कोठें गेलें? या उदाहरणाशिवाय राजाच्या अप्रतिहत सत्तेचें दुसरें कोणतें उदाहरण देतां येईल? दशरथानें गोडगोड भाषण केलें खरें; पण त्यांत अर्थ नव्हता. वनाला राम गेला तो गेलाच. लोकांनीं काय केलें? तर ते मुळूमुळू रडले; त्याच्या मागून गेले; राम चुकवून गेला तेव्हां परत आले." (पान २५)

रा. ब. महाजनी यांच्या शंकांविषयीं आतां क्रमानें विचार करूं. रामाला यौवराज्याभिषेक करावयाचें ठरल्यावर लोक नको म्हणत असतां दशरथानें त्याला अरण्यांत पाठविलें. तेव्हां लोकांचा हक्क कोठें गेला होता? असें रावबहादूर म्हणतात. दशरथाचें भाषण औपचारिक होतें. जर प्रजेचा राजसत्तेवर दाब खराच असता, तर रामाला अरण्यांत जाण्यास तिनें प्रतिबंध केला असता. ही शंका येणें अशक्य आहे, असें आम्ही म्हणत नाहीं. तथापि यांत त्या वेळच्या परिस्थितीचा विचार केलेला दिसत नाहीं. दशरथाच्या भाषणावरून प्रजेचा राजसत्तेवर दाब होता, असें आम्हीं प्रतिपादिलें आहे. असल्या हक्कांचा खरा उपयोग एखाद्या आणीबाणीच्या प्रसंगीं होत असतो. जोंपर्यंत

सहानुभूतिपूर्वक परस्पर व्यवहार चालतात, तोंपर्यंत असल्या हक्कांची अंमलबजावणी करण्याचा प्रसंगच येत नाहीं. आमच्याकडे राजा व प्रजा यांचा संबंध कशा प्रकारचा होता हें आम्हीं पूर्वीं सांगितलेंच आहे. आम्हीं वर निर्दिष्ट केलेल्या हक्कांची प्रचीति पाळण्याचे प्रसंग त्यांना क्वचित् आले. रामाला अरण्यांत जावें लागलें, त्या वेळीं प्रजेनें या हक्कांचा उपयोग करणें आवश्यक व योग्य होतें, असा सकृद्दर्शनीं भास होतो. हा हक्क बाजूला राहो; पण जर रामानें लक्ष्मणाच्या भाषणाप्रमाणें त्याचें साहाय्य घेऊन राज्य बळकाविलें असतें, तर तें अशक्य होतें काय? दशरथ मनांतून या गोष्टीला विरुद्ध नव्हता व प्रजा तर पूर्ण अनुकूल होती. मग असें कां घडून आलें नाहीं बरें? आम्ही म्हणतों कीं, **रामानें राज्य बळकाविलें नाहीं, याचें जें कारण होतें त्याच कारणास्तव प्रजेनें** आपल्या हक्कांचा उपयोग केला नव्हता. दशरथ वर देऊन चुकला होता, म्हणून त्याला विरुद्ध बोलतां येत नव्हतें. त्याचप्रमाणें आपल्या **पित्याला वचनांतून मुक्त करण्याकरितां व स्वतःची प्रतिज्ञा पाळण्याकरितां राम अरण्यांत निघून गेला.** प्रजेनें आपल्या हक्कांचा उपयोग यांत कसा करावयाचा? **दोघांना सत्यप्रतिज्ञ ठेवणें प्रजेलाहि अवश्य होतें.** शिवाय या गोष्टीशीं प्रजेच्या हक्कांचा प्रत्यक्ष संबंध पोंचत नव्हता—त्यांचें रक्षण करण्याचें कार्य रामाच्या अभावीं पूर्वींप्रमाणें दशरथानें केलें असतें किंवा त्याच्या अभावीं भरतानें केलें असतें. रामावर त्यांची प्रीति होती व भरतावर नव्हती असें नाहीं. याकरितां प्रजेनें आपला हक्क बजाविण्याची या प्रसंगीं जरूर नव्हती व त्यांची प्रतिज्ञा सत्य होण्याकरितां त्यांना विघ्न करणें अयोग्य होतें. रामावर त्यांचें प्रेम असल्यामुळें त्यानें वनांत जाऊं नये अशी त्यांची इच्छा होती. ही इच्छा पूर्ण होण्यास त्यांना एकच मार्ग खुला होता व तो कैकयीचें मन वळवून तिला आपली मागणी मागें घेण्यास लावण्याचा होय. हा उपाय पुष्कळांनीं योजून पाहिला; पण तो निष्फळ झाला. रामाच्या मागून प्रजा अरण्यांत गेली, ती प्रेमानें गेली. कोणावरहि सक्ती करण्याचा हा प्रसंग नव्हता. आमच्या म्हणण्याची सत्यता पुढील उताऱ्यावरून दिसून येईल. "तेव्हां भरतानें बसल्या जाग्यावरूनच सर्व बाजूंकडे पाहिलें आणि बरोबरअसलेल्या नगरवासी लोकांना उद्देशून तो

म्हणाला, आर्य ! रामाला दोन शब्द सांगून तुम्ही तरी त्यास परत फिरायला लावीत नाहीं काय?" तेव्हां नगरवासी लोक महात्म्या भरताला म्हणाले, "काकुत्स्थ! रामाला आम्ही ओळखितों. तो बोलतो तेंच बरोबर आहे. तो महात्मा पित्याच्या आज्ञेप्रमाणें वागत आहे. आम्हीं त्याला आतांच्या आतां परत फिराव-याला लावलें असतें; पण वरील कारणास्तव आम्हांला तसें करितां येत नाहीं." भरत रामाला अरण्यांतून परत आणण्याकरितां गेला, त्या प्रसंगींचे हे श्लोक आहेत. (२।१११) कोणत्याहि उपायानें राम परत येत नाहीं असें पाहून बरोबरआलेल्या प्रजाजनांला भरतानें रामास परत येण्यास भाग पाडावें अशी विनंति केली. या त्यांच्या विनंतीवरून प्रजाजनांला या वेळीं हक्क बजावितां येणें शक्य होतें ही गोष्ट स्पष्ट होते. भरताच्या या विनंतीवर "रामाला पित्राज्ञापालन करणें अवश्य असल्यामुळें आम्ही त्याला वनवासापासून निवृत्त करीत नाहीं." असें प्रजा-जनांनीं सांगितलें यावरून आम्ही वर केलेलें अनुमान अगदीं बरोबर दिसतें. या वेळीं प्रजाजनांनीं हक्क बजाविला नाहीं, त्यापक्षीं त्यांना हक्कच नव्हते असें रा.ब. महा-जनी यांनीं अनुमान केलें आहे. परंतु या वेळीं हक्क न बजाविण्याचें कारण प्रजा-जनांनीं स्वतःच दिलेलें असल्यामुळें त्याविरुद्ध अनुमान करणें म्हणजे केवळ धाष्टर्य होय.

आतां हक्क बजाविण्याच्या प्रसंगीं तो बजाविल्याचें उदाहरण रामायणांतच आहे. सगर राजानें आपला पुत्र असमंज याला हद्दपार केल्याची कथा वर दिली आहे. ही कथा म्हणजे प्रजेचा राजसत्तेवर दाब किती होता याचें ढळ-ढळीत उदाहरण आहे. रा. ब. महाजनी यांनीं हें पाहिलें नाहीं असें नाहीं. आपल्या पुस्तकांत त्याचा त्यांनीं उल्लेख केला असून राजा अत्यंत दयाळु अस-ल्यामुळें ही गोष्ट घडली असा त्यावर त्यांनीं शेरा दिला आहे. पण याला आधार काय? अधिकारारूढ लोकांना आपल्या इभ्रतीचें किती वेड असतें, हें सर्वांला माहीत आहे. रा. ब. महाजनी म्हणतात कीं, "प्रजेला राजाकडे केवळ तक्रारी नेण्याचा हक्क होता. राजा दयाळू असल्यास उपयोग होई, नसल्यास प्रजा स्वस्थ रहात असे." राजपुत्र असमंजाच्या हद्दपारीवरून राजाचा केवळ दयाळु-पणा निष्पन्न होतो हें अनुमान एकदेशी दिसतें; यांत त्याचा दयाळूपणा नव्हता

असें नाहीं. पण प्रत्यक्ष आपल्या पुत्राला हद्दपार करण्याचा हुकूम राजानें केला तो त्याच्या अंतःकरणांत केवळ कळवळा उत्पन्न होऊन नव्हे; प्रजेचा राजसत्तेवर दाब असल्याशिवाय ही गोष्ट घडणें शक्य नाहीं. " राजा म्हणजे देवाचा अवतार " ही समजूत आमच्याकडे फार प्राचीनकाळापासून आहे, ही गोष्ट आम्ही कबूल करितों. पण या समजुतीलाहि मर्यादा होती. नाहींतर वेनराजाचा नाश करण्याचें काम मोठमोठ्या ऋषींनीं कसें केलें असतें? आमच्या धर्मशास्त्रकारांनीं ज्याप्रमाणें राजा देवाचा अवतार म्हणून सांगितलें आहे, त्याप्रमाणें राजालाहि प्रजापालनाचें बंधन घातलें आहे.

## लोकशिक्षण—सर्वस्वी लोकांकडे

आतां राजकीय सत्ता कोणकोणत्या बाबींत चालत असे, याचा विचार करूं. असल्या बाबी सांप्रत आम्हांला विशेष महत्त्वाच्या वाटत असल्या तरी त्यांचा स्पष्ट उल्लेख रामायणांत सांपडणें शक्य नाहीं. निरनिराळ्या प्रसंगीं दिलेल्या वर्णनांवरून असल्या गोष्टी अनुमानानें सिद्ध करावयाच्या असतात. रामायणकालीं राजा व प्रजा यांमधील संबंध कशा प्रकारचा होता, हें पाहिलें म्हणजे कोणत्याहि पक्षाला मर्यादा घालून ठेविण्याची जरूर नव्हती, हें स्पष्ट दिसून येणार आहे. अशा स्थितींत ज्या मर्यादा असाव्यात असें त्यांतील उदाहरणांवरून वाटतें, त्यांचें येथें दिग्दर्शन करावयाचें आहे. कधींकधीं या मर्यादांचें उल्लंघन झाल्याचेंहि दिसून येण्याचा संभव आहे. ज्या वेळीं राजा व प्रजा यांचे हितसंबंध वेगळे असतात, त्या वेळीं असल्या मर्यादांचें खरें महत्त्व असतें. प्राचीनकालीं पौरस्त्य राष्ट्रांस ही गोष्ट महत्त्वाची वाटणें शक्य नाहीं. तथापि पाश्चात्य राजनीतिशास्त्रज्ञांनीं ज्या मर्यादा सध्यां ठरविल्या आहेत, त्यांतील बऱ्याच त्या वेळीं अस्तित्वांत होत्या, असें दिसून येतें. आतां परचक्रापासून किंवा राज्यांतील दुष्ट लोकांपासून प्रजेचें संरक्षण करण्यापलीकडे राजाचें कांहीं काम नाहीं, अशी जी मर्यादा हर्बर्ट स्पेन्सर यांनीं ठरविली आहे, तितकी पूर्णावस्था जरी त्या वेळीं प्राप्त झाली नव्हती, तरी ज्या सामान्य तत्त्वांस अनुसरून त्यांनीं या मर्यादा दाखविल्या आहेत तीं तत्त्वें त्या वेळीं पाळलीं जात होतीं हें निर्विवाद आहे. सध्यां ज्याप्रमाणें राजाकडे प्रजेसंबंधींच्या निरनिराळ्या बाबींचें काम

असतें त्याप्रमाणें त्या वेळींहि होतें. मात्र त्या त्या बाबींवर त्याची सत्ता मुळींच नव्हती. सध्यां जगांतील निरनिराळ्या देशांच्या सरकारांवर लोकशिक्षणाची एक बाब असते. हें काम करण्याकरितां त्या वेळीं मोठमोठ्या ऋषींचे आश्रम जागो-जाग असत. नानादेशांतून त्यांजकडे अध्ययनाकरितां शिष्य येत असत. शिष्यां-कडून किंवा राजाकडून वेतन घेऊन शिक्षणाचें काम करण्याची त्यांची पद्धति नव्हती. शिष्यांकडून गुरुदक्षिणेच्या रूपानें त्यांना कांहीं प्राप्ति असे व अशा मंडळीच्या योगक्षेमाची जबाबदारी राजावर असल्यामुळें त्याजकडून त्यांना साहाय्य मिळत असे; तथापि या सर्व बाबी नेहमीं त्यांच्या मर्जीवर अवलंबून असत. यामुळें त्यांचें स्वातंत्र्य लोपत नसे. त्यांनीं काय, कोणाला व कोणत्या पद्धतीनें शिक्षण द्यावें हें ठरविण्याचें काम त्यांच्या हातीं होतें. शिष्यानें केलेल्या सेवेच्या योगानें संतुष्ट होऊन ते विद्या सांगत असत. राजसत्तेचे अगर एकाद्या व्यक्तीचे जर ते ओशाळे होऊन राहिले असते, तर त्यांचें स्वातंत्र्य लुप्त होऊन आपल्या मनाविरुद्ध वागण्याचे प्रसंग त्यांजवर आले असते. रामाचा पराक्रम पाहून विश्वा-मित्रानें त्याला अस्त्रविद्या सांगितल्याचें रामायणांत वर्णन आहे. अशा रीतीनें ते निःस्पृहतेनें वागत असल्यामुळें त्यांचें समाजावर चांगलें वजन राहत असे. वसिष्ठमहर्षींचें वजन दशरथाच्या दरबारांत किती होतें, हें रामायण वाचल्यानें सहज कळणार आहे. त्यांची उपजीविका जरी लोकांच्या व राजसत्तेच्या साहा-य्यानें चालत असे, तरी त्यांच्याशीं ते निःस्पृहतेनें वागत असल्यामुळें त्यांचें समाजावर चांगलें वजन असे. त्या वेळीं राजपुत्रांकरितां किंवा सरदारलोकांकरितां वेगळी शाळा नसे. सर्वांचें अध्ययन एकत्र होत असे. यामुळें त्यांना इतर शिष्यांशीं मिळून रहावें लागत असे व गुरुसेवा प्रत्यक्षपणें घडून गुरूचे गुण सहवासानें त्यांच्या अंगीं उतरत आणि या पद्धतीच्या योगानें उदार राजांची परंपरा अव्याहतपणें गादीवर येत असे. वनवासाला निघण्यापूर्वीं रामानें आपल्या संपत्तीचें दान केलें, त्यावेळीं त्यानें आपले पुष्कळ सहाध्यायी बोलाविले होते. त्यांचें त्यानें वर्णन केलें आहे:—

**ये च मे कठकालापा बहवो दंडमाणवाः ।**
**नित्यस्वाध्यायशीलत्वान्नान्यत्कुर्वन्ति किंचन ॥ २।३२।१९**
**अलसाः स्वादुकामाश्च महतां चापि संमताः ॥२०॥**

"कठकालापशाखांचें अध्ययन करणारे माझे पुष्कळ मित्र असून ते दंड धारण करितात. ते नेहमीं अध्ययन करण्यापलीकडे कांहीं करीत नाहींत. त्यांना मिष्टान्नाची इच्छा असते, तथापि त्यासाठीं ( भिक्षेला वगैरे जाऊन ) प्रयत्न करण्याचा त्यांना कंटाळा आहे. आणि ( याकरितां ) मोठमोठ्या लोकांत त्यांची मान्यता आहे."

रामानें केलेल्या या वर्णनावरून त्या वेळच्या गुरुशिष्यांची योग्यता किती श्रेष्ठ प्रकारची होती हें चांगलें कळून येतें.

## त्या कालांतील विचारस्वातंत्र्य.

सध्यांच्या मन्वन्तरांत एखाद्या देशाच्या राजकीय उन्नतीविषयीं विचार करितांना सामान्यतः तेथील विचारस्वातंत्र्यावर विशेष कटाक्ष आढळून येतो. याकरितां जगांतील थोरथोर मुत्सद्यांनीं वाखाणिलेलें हें विचारस्वातंत्र्य रामायणकालीं कितपत होतें याचा येथें विचार करणें जरूर आहे. विचारस्वातंत्र्याचा हक्क एखाद्या देशाला देतांना किंवा घेतांना ती हकीगत जाहीरपणें प्रसिद्ध करण्याची वहिवाट आहे. त्या वेळीं असले हक्क देण्याघेण्याचा अधिकार राजसत्तेकडे आहे अशी दोनहि पक्षांची समजूत नव्हती. यामुळें या बाबीचा उल्लेख विशेष स्पष्टपणें केलेला रामायणांत सांपडावयाचा नाहीं. प्राचीनकाळीं जीं कायद्याचीं पुस्तकें होतीं, त्यांत विचारस्वातंत्र्यास आळा घातल्याचें कोठें दिसून येत नाहीं. या कायद्याच्या पुस्तकांसंबंधानेंदेखील विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही आहे कीं, त्यांनीं कोणत्याहि न्यायाधीशाला बंधन घातलें नव्हतें. मोठमोठ्या तपस्वी मुत्सद्यांनीं स्वानुभवानें हीं पुस्तकें रचिलीं आहेत. यांत नैतिकदृष्ट्या दिसणाऱ्या गुन्ह्यांचें वर्गीकरण केलें असून तींच सर्वत्र प्रमाण मानिलीं जात असत; तथापि सध्यां ज्याप्रमाणें न्यायाधीशाला अमुक नंबरच्या कलमाप्रमाणें म्हणून प्रत्येक खटल्याचा निकाल करावा लागतो, अर्थात् यांत त्याच्या स्वतःच्या मताचें महत्त्व नसून कायद्याच्या डोळ्यांनीं त्याला पहावें लागत असतें, त्याप्रमाणें त्या वेळची स्थिति नव्हती. कायद्याचीं पुस्तकें हीं केवळ मार्गदर्शक होतीं. यामुळें आपल्या नैतिक दृष्टीला अयोग्य वाटत असूनहि ज्याप्रमाणें हल्लींच्या न्यायाधीशाला कायद्याला शरण जावें लागतें, त्याप्रमाणें त्या वेळीं न्याया-

धीशावर बोजा पडत नसे. त्या वेळच्या विचारस्वातंत्र्याचें हें स्पष्ट निदर्शक आहे. रामायणांतील कांहीं कथाभागांवरून त्या वेळीं विचारस्वातंत्र्याचा किती मान ठेवण्यांत येत असे हें पाहून कौतुक वाटल्यावांचून राहात नाहीं. हें स्वातंत्र्य म्हणजे वाटेल तसें बहकण्यास किंवा नीतीला धाब्यावर बसवून पाहिजे तसें वर्तन करण्यास पूर्ण मुभा असणें नव्हे; तर या स्वातंत्र्याच्या योगानें लोकांत असलेल्या मताहून वेगळें मत प्रतिपादन करितां येऊन त्याप्रमाणें वर्तन करणारास राजकर्त्यांकडून किंवा समाजाकडून पीडा होत नसे. रामाला वनवासाला पाठविण्यांत आलें त्या वेळीं असले पुष्कळ प्रसंग आले होते. त्या वेळीं कैकेयीचें वर्तन उघडपणें अन्यायाचें होतें. याकरितां प्रत्येकानें तिच्याविरुद्ध प्रतिपादन करणें साहजिक आहे. दशरथाच्या दरबारांतील बहुतेक मुत्सद्यांनीं ही कामगिरी योग्य प्रकारें बजाविली आहे. कांहींनीं तर तिचें मन वळविण्याचा यत्न करीत असतां इष्टसिद्धि होत नाहीं, असें पाहून तिजवर वाक्प्रहार करण्यासहि कमी केलें नाहीं. या वेळीं रामाला वनवासास जावें लागणार असल्यामुळें व तिचा मुलगा भरत गादीवर यावयाचा असल्यामुळें तिच्याविरुद्ध बोलण्याचें धोक्याचें होतें. परंतु अशा रीतीनें प्रतिपादन केलें म्हणून त्याला शिक्षा करणें त्या वेळीं योग्य मानिलें जात नव्हतें, असें दिसतें. याच मासल्याची व याहून महत्त्वाची दुसरी गोष्ट रामायणांत आली आहे व ती सर्वप्रसिद्ध आहे. सीता एक वर्षपर्यंत लंकेंत असल्यामुळें तिचा स्वीकार करणें रामाला उचित नव्हतें, अशा गोष्टी अयोध्येंतील प्रजाजन बोलत असतात असें जेव्हां रामाला कळलें, त्या वेळीं त्यानें सीतेचा त्याग केला. पूर्वी सीतेनें दिव्य केलें असल्यामुळें आतां तिजविषयीं शंका प्रदर्शित करणें उचित नव्हतें व अपराध करणारास रामानें शिक्षा केली असती तरी त्याबद्दल त्याला कोणीं दोष दिला नसता. परंतु तसें झालें असतें तर रामायणाचें स्वरूप बदललें असतें. सीतेचें दिव्य लंकेंत झालें होतें व त्यावेळीं अयोध्येंतील कोणीहि प्रजाजन तेथें हजर राहणें शक्य नव्हतें. याकरितां लोकांची शंका शिक्षा करून दाबून टाकणें योग्य झालें नसतें. अशा अपराध्याला शिक्षा केल्यानें उघडपणें शंका काढणें कदाचित् बंद झालें असतें; परंतु रामचरित्रावरील हा आरोप अक्षय्य राहिला असता. याकरितां दूरवर विचार

करून रामानें स्वीकारिलेला हा मार्गच योग्य होता असें म्हणणें भाग आहे. रामायणकालीं विचारस्वातंत्र्याला सत्ताधारी लोक किती जपत असत हें यावरून उघड दिसतें. पाश्चात्य राजनीतिशास्त्रवेत्ते आपल्या देशांतील ज्या हक्कांबद्दल प्रौढी मिरवीत असतात ते हक्क आमच्या देशांत फार प्राचीनकालीं अस्तित्वांत होते, ही मोठ्या अभिमानाची गोष्ट आहे यांत शंका नाहीं. पाश्चात्य देशांतील कांहीं विद्वान् शोधकांनीं ही गोष्ट आपल्या लेखांत नमूद करून ठेविली आहे. याकरितां त्यांच्या डोळ्यांनीं पाहणारालाहि या गोष्टी पटतील असा भरंवसा वाटतो.

## वैभव आणि व्यवस्था.

प्रजेच्या संमतीनें राज्यकारभार चालत असल्याचें पूर्वीं दाखविलें आहे. तथापि अशा कारभाराचे परिणाम दोघांनाहि कसे सुखदायी होतात, हें त्या वेळच्या वैभवाचें स्वरूप कळल्यावांचून लक्षांत येणार नाहीं. दशरथाचे वेळीं लहान लहान राज्यें आणखी होतीं. तथापि त्यांवर अयोध्यापतीची सत्ता सार्वभौमपणाची होती. आपल्या राज्यामध्यें सूर्य कधीं मावळत नाहीं अशा स्वरूपाचेंच वाक्य—सूर्यमंडल प्रकाशित होतें तेथपर्यंत पृथ्वी आपल्या आधीन आहे असें—( २।१०।३६ ) दशरथाचे तोंडीं आहे. तथापि पुढें देशांचीं नांवें देऊन त्याचा उलगडा केला असल्यामुळें त्या वेळच्या भौगोलिक ज्ञानास अनुसरून त्यावर अत्युक्तीचा दोष तादृश येणार नाहीं. त्यानें " द्राविड, सिंधु, सौवीर, सौराष्ट्र, दक्षिणापथ, वंग, अंग, मागध, मत्स्य व काशिकोसल " हे देश ( २।१०।३६ ) आपल्या आधीन असल्याचें सांगितलें आहे. आणखी देशांचा यांत उल्लेख नाहीं व ते कळण्यास मार्ग नाहीं. तथापि दशरथाच्या राजसभेमध्यें कांहीं मांडलिक राजे असल्याचें सांगितलें आहे, त्यावरून त्यांचें अस्तित्व अनुमानितां येतें. रामाला यौवराज्याभिषेक करावयाचें ठरविण्यासाठीं जी सभा बोलाविली होती तींत असे " लोकसंमत " राजे दशरथाचे मागून सभेंत आले व राजाचे सन्मुख त्यानें दाखविलेल्या आसनावर जाऊन बसल्याचें (२।१।४९-५०) वर्णन असून राजाचे विचाराला त्यांनीं संमति दिल्याचें सांगतांना जी उपमा दिली आहे, तीवरून ते मांडलिक असल्याचें उघड दिसतें.

**इति ब्रुवन्तं मुदिताः प्रत्यनन्दन्नृपा नृपम् ।**
**वृष्टिमन्तं महामेघं नर्दन्त इव बर्हिणः ॥ १ । १ । १० ॥**

"राजा दशरथानें याप्रमाणें भाषण केलें असतां जलवृष्टि करणाऱ्या मोठ्या मेघाचें ज्याप्रमाणें मयूरपक्षी गर्जना करीत अभिनंदन करितात त्याप्रमाणें त्या सभेंतील राजांनीं आनंदित होऊन त्याचें अभिनंदन केलें." येथील उपमेवरून ते राजे त्याचे आश्रित होते व त्यांच्या या आश्रित भावानुरूप त्यांनीं राजाला एकदम संमति दिल्याचें सांगितलें आहे. सभेंत बोलाविलेल्या इतर लोकांनीं मात्र एकत्र जमून कांहीं वेळ विचार केला व मग आपली संमति दिली. (२।२।२०) दोहोंच्या पद्धतींतील या अंतरावरूनहि हे राजे स्वतंत्र नसून मांडलिक होते हें उघड होतें. दशरथ मृत झाल्यावर भरताला राज्यकारभार शिरावर घेण्याविषयीं ज्या वेळीं सभेनें विनंति केली, त्या वेळीं प्रथम वसिष्ठांनीं केलेल्या भाषणांत अशा राजांकडून येणाऱ्या उपायनांचा निर्देश आहे. यांत हे मांडलिक राजे चारी दिशांना असल्याचें वर्णन आहे.

**उदीच्याश्च प्रतीच्याश्च दाक्षिणात्याश्च केवलाः ।**
**कोट्यापरान्ताः सामुद्रा रत्नान्युपहरन्त ते ॥२।८२।८॥**

"उत्तरेकडील, पश्चिमेकडील, दक्षिणेकडील अपरान्त भागांतील व समुद्रांत वास करणार केवल अर्थात् सिंहासनरहित राजे तुला कोट्यवधि रत्नें आणून देवोत." मांडलिकांशीं राजा दशरथाचा संबंध कशा प्रकारें होता हें स्पष्ट समजलें नसलें तरी महत्त्वाच्या कामीं त्यांचा विचार घेण्यांत येत असे व त्यांजकडून राजाला करभार पोंचत असे यांत शंका नाहीं. अयोध्यानगरीचें वर्णन करितांना करभार देण्याकरितां आलेल्या मांडलिक राजांचा तेथें नेहमीं संमर्द असल्याचें सांगितलें आहे. (१।५।१४)

मांडलिक राजांच्या प्रदेशांसह दशरथाचे राज्याचा विस्तार मोठा झाला होता आणि त्यावर त्याची सार्वभौम सत्ता नांदत होती. स्वतः त्याचे सत्तेखालचा देश म्हणजे कोसल होय. हा देश सरयूनदीचे तीरीं असून तो धनधान्य समृद्ध असल्याचें मात्र रामायणांत सांगितलें आहे. (१।५।५) कोसल देशाची राजधानी जी अयोध्या नगरी तीविषयीं विस्तृत विवेचन दिलें आहे. ही नगरी बारा योजनें

लांब व तीन योजनें रुंद होती; तथापि तिचा आकार अष्टपैलु होता. तिच्या-भोंवतीं तटबंदी असून त्याबाहेर परिखा होत्या व संरक्षणाकरितां दुर्गही बांधिलेले होते. शेंकडों तोफांची योजना मधूनमधून केलेली असून सर्व प्रकारचीं यंत्रें व आयुधें यांचा तींत संग्रह होता. त्या नगरीला सर्व बाजूंनीं वेशी व कमानी असून निरनिराळ्या जिनसांचे बाजार नियमित अंतरावर बसविले होते. पर्वताप्रमाणें उंच असलेले रत्नखचित वाडे तींत पुष्कळ होते व अशा मोठ्या वाड्यांवर लाविलेल्या ध्वजांचे योगानें ती शोभिवंत दिसत असे. लोकांची वस्ती तर इतकी होती कीं घरांची खेंचाखेंच झालेली होती, व नवें घर बांधण्यास जागा राहिली नव्हती. नगरी आधीं मोठी असली तरी दशरथाचे राजवटीमध्यें ती अधिक वाढली. स्त्रियांच्या नृत्यशाळा जागोजाग असून जिकडेतिकडे उद्यानें व आंबराया होत्या. इतकें असूनहि तींतील राजमार्ग विशाल होते व त्यांवर प्रत्यहीं पाणी शिंपडण्याची व्यवस्था केलेली असून त्यांवर फुलें उधळीत असत. हा मार्ग पुढें तमसा नदीपलीकडे अरण्यापर्यंत गेलेला होता. नगरीच्या संरक्षणार्थ मोठी सेना नेहमीं सिद्ध असून तींत मोठमोठे शब्दवेधी आणि महारथी असे सैनिक होते. रामाला परत आणण्याकरितां म्हणून भरत अरण्यांत गेला, त्या वेळीं त्याजबरोबर नऊ हजार हत्ती, साठ हजार रथ व एक लक्ष घोडेस्वार गेल्याचें वर्णन आहे. (२।८३।३-५) या सैन्यानें अरण्यांत तळ दिला त्या वेळीं त्यानें दीड योजन इतका प्रदेश व्यापिला होता. (२।९७।३०)

नगरीमध्यें राजा व राजपुत्र यांचे वाडे वेगवेगळे होते. दशरथाचे वाड्याला सात चौक असून रामाच्या वाड्याला पांच होते. तीन चौकांपर्यंत आंत रथांत बसून जातां येत असे. मात्र आंत जाण्यास कोणालाहि प्रतिबंध नव्हता. राम वनवासाला निघाला त्या वेळीं त्यानें दानें केल्याचें ऐकून त्रिजट नांवाचा ब्राह्मण आपणासहि कांहीं मिळावें या हेतूनें रामाकडे गेला. त्याला वाड्यांत कोणीहि प्रतिबंध केला नसल्याचें सांगितलें आहे. (२।३२।३४)

राजस्त्रियांचीं गृहेंहि वेगवेगळीं होतीं. रामाला यौवराज्याभिषेक करण्याचें ठरविल्यावर हें आनंदवृत्त कळविण्याकरितां राजा दशरथ कैकेयीच्या घरीं गेला असें सांगितलें आहे (२।१०।११), आणि पुढें राम वनांत गेल्यावर राजा

शोकक्षीण होऊन त्यानें आपणास राममाता कौसल्येच्या घरीं घेऊन जाण्याची द्वारपालांना आज्ञा केली, असें वर्णन आहे. ( २।४२।२७ ) सुमित्रेचें घरहि वेगळें असल्याचें स्पष्ट लिहिलें नाहीं तरी राम कौसल्येकडे यौवराज्याभिषेकाचा राजाचा विचार तिला कळविण्याकरितां गेला, त्याच वेळीं लक्ष्मण, सुमित्रा व सीता तेथें आल्याचें लिहिलें आहे. ( २।४।३२ ) यावरून तिचेंहि घर वेगळें असल्याचें दिसतें. राजा व राजपुत्र यांची खाजगी मिळकतहि वेगवेगळी होती. आणि त्यांनीं करावयाचीं दानें अथवा देणग्या त्यांतून होत असत, असें दिसतें. राम वनवासाला निघते वेळीं त्यानें दानें करण्यासाठीं ' आपलें द्रव्य घेऊन या ' अशी धनाध्यक्षाला आज्ञा केली. ( २।३२।२७ ) एवढेंच नव्हे, तर राजपुत्रांच्या या वेगवेगळ्या वाड्यांतून असलेल्या परिचारकांची व्यवस्थाहि स्वतंत्रपणेंच होत होती. आपल्या व लक्ष्मणाच्या वाड्यांतील सेवकांना वनांतून परत येईपर्यंतच्या निर्वाहाची व्यवस्था रामानें वनांत निघतेवेळीं केली व दोघांचेहि वाड्यांत राखण ठेवण्याची त्यांना आज्ञा केली. राज्याच्या उत्पन्नांतून ही व्यवस्था होत असती तर अशा प्रकारें रामाला आगाऊ योजना ठेवण्याचें कारण नव्हतें. ( २।३२।२४–२६ ) या दानांकडे पाहिलें म्हणजे ही संपत्तिहि अल्प होती असें दिसत नाहीं. या दानांची गोळाबेरीज केली तर त्यांत सुवर्णाचीं बाहुभूषणें, कुंडलें, सोन्यांत ओंवलेल्या रत्नमाला, कडीं, आंगठ्या, अनेक रत्नें, कमरपट्टा, रत्नखचित पर्यंक, शत्रुंजय नामक हत्ती, हजारों गायी, धान्य, वस्त्रें, दासी, हजारों निष्क व सुवर्ण वगैरे दिल्याचें वर्णन आहे. ( २।३२ ) दशरथ मरण पावल्यावर भरताला बोलावण्याकरितां जे दूत गेले त्यांबरोबर वीस कोटींचीं वस्त्रें व भूषणें केकय राजाला व दहा कोटींचीं मातुलाला येणेंप्रमाणें भेटी अयोध्येहून त्यांनीं आणिल्याचें वर्णन आहे. या भेटीहि त्यांच्या खासगी मिळकतींतून असल्या पाहिजेत, हें उघड आहे. भरताला परतभेट म्हणून केकय राजानें दोन हजार सुवर्णनिष्क, सोळाशें घोडे, उत्कृष्ट हत्ती, चित्रविचित्र कांबळीं, अजिनें इत्यादि दिलीं होतीं. परंतु भरताची त्वरा असल्यामुळें त्यानें तीं घेतलीं नाहींत. भेटी–परतभेटीचा व्यवहार राज्याचे उत्पन्नांतून व्हावयाचा असता तर भरताला त्वरा असली तरी परतभेट नाकारतां आली नसती.

रामाप्रमाणें लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न यांचीं गृहें वेगवेगळीं असल्याचें उत्तरकांडांत रामाज्ञेवरून द्वारपालानें त्यांना प्रत्येकाकडे त्यांच्या गृहीं जाऊन बोलावून आणिल्याचें जें वर्णन आहे (७।४४।२–११) त्यावरून दिसतें. राजवाड्यामध्यें प्रत्येक प्रहराला दुंदुभिघोष करण्याची व्यवस्था केलेली होती. (२।८१।३)

राजाला राज्याचा कारभार हांकण्याकरितां लागणारें उत्पन्न कोणत्या बाबीं-तून मिळत असे हें कळण्यास रामायणांत साधन नाहीं. जमिनीवरील उत्पन्नाचा सहावा भाग राजाला मिळावयाचा अशी स्मृति आहे व या कराविषयीं अप्रत्यक्ष निर्देश रामायणांत आलेला आहे. दशरथ मृत झाल्यानंतर भरतानें अयोध्येमध्यें आल्यावर ज्या शपथा घेतल्या, त्यांत "कराच्या रूपानें एकंदर उत्पन्नाचा सहावा अंश घेऊनहि प्रजांचें परिपालन न करणाऱ्या राजांना जें पातक लागतें तें पातक ज्याच्या मतानें राम वनांत गेला असेल त्याला लागेल, (२।७५।२५)" अशी एक शपथ आहे व तीवरून ही एक उत्पन्नाची बाब स्पष्ट अनुमानितां येते. मांडलिक राजांकडून मिळणाऱ्या खंडणीची दुसरी बाब दिसते व तिचा निर्देश रामायणांत असल्याचें पूर्वीं सांगितलें आहे; तथापि खंडणीचें उत्पन्न मांडलिकांनीं आपल्या राज्याचा कारभार न्यायानें चालवून अवशिष्ट उत्पन्नांतून द्यावयाचें असल्यानें मर्यादित असणार, हें उघड आहे. विश्वामित्राच्या कथेमध्यें वशिष्ठांशीं जो संवाद झाल्याचें सांगितलें आहे त्यांत वसिष्ठाची कामधेनु हें एक रत्न आहे व रत्नावर अधिकार राजाचा आहे (रत्नहारी च पार्थिवः १।५३।९) असें विश्वामित्राचे तोंडीं वचन आहे; यावरून रत्नांवर अधिकार राजाचा असावा —अर्थात् तीं काढणें वगैरे कामें त्याचे आज्ञेनें होत असावीं—असें अनुमान आहे. तथापि राजा आणि राजपुत्र यांच्या स्वतांच्या मिळकतींतून झालेलीं दानें व देणग्या पाहिल्या म्हणजे राज्याचें उत्पन्न त्याहून पुष्कळ अधिक असणार, हें उघड आहे. राजाची सेना, त्याकरितां लागणारे अश्वादि पशु व इतर कारभार पाह-णारे राजाजवळचे व राज्यांत सर्वत्र असलेले सेवक यांची सर्व व्यवस्था राज्या-च्या उत्पन्नांतून व्हावयाची, आणि ते तर सर्व संतुष्ट असल्याचें रामायणांत लिहिलें आहे. तेव्हां "पीनो देवदत्तो दिवा न भुंक्ते" या न्यायाप्रमाणें, त्या

मानानें उत्पन्न असलें पाहिजे, हें निर्विवाद आहे. कोशाचा उल्लेख राम वनवास आटोपून परत आल्यावर भरताची गांठ पडली त्या वेळीं आला आहे, व त्यांत भरतानें कोशादि सर्व दसपट वाढविल्याचें सांगितलें आहे. ( ६।१२७।६ ) राम परत येईपर्यंत भरतानें राज्य, ठेव म्हणून संभाळिलें होतें, व त्याच्या या बाण्याप्रमाणें त्याला सेवकांचीं वेतनें व सैन्याचा खर्च यापलीकडे कांहीं खर्च करितां येत नव्हता; आणि त्याप्रमाणें त्यानें केल्यामुळें कोश व कोष्ठागार हीं चौदा वर्षांचे अवधींत दसपट झालीं. कोष्ठागाराच्या येथील उल्लेखावरून राजाकडे धान्यसंग्रह मोठा असे, हें उघड आहे.

राज्याचा एवढा मोठा कारभार चालविण्याचें काम राजानें अमात्यांचे साहाय्यानें करावयाचें असे व त्याप्रमाणें दशरथाचे आठ अमात्य होते. हे सर्व विद्याविनयसंपन्न, तेजस्वी, व्यवहारकुशल असून कोश व सैन्य यांचा संग्रह करण्यांत दक्ष असत; आणि प्रजेला उपद्रव न देतां ते कोश वाढवीत असत. राजाचें प्रजांवरील प्रेम तर पुत्राप्रमाणें असल्याचें सांगितलें आहे व यावरून कोशसमृद्धि प्रजा असंतुष्ट होऊन झाली नव्हती, हें सांगावयास नको.

## परदेशाशीं व्यवहार.

लोकांची संपन्नस्थिति अनुमानावयाच्या आधुनिक साधनांपैकीं परदेशाशीं व्यवहार हें एक आहे. रामायणकालाला हें साधन लावावयाचें तर त्या वेळच्या दळणवळणाच्या साधनांच्या मानानें हा व्यवहार चालत असे असें अनुमानितां येतें. त्या वेळचीं वाहनें म्हटलीं म्हणजे शिबिका, शकट व रथ हीं दिसतात. त्यांपैकीं शिबिका ही मनुष्यांनीं न्यावयाची असल्यानें सामान्य व्यवहारांत तिचा उपयोग नाहीं. रथांचा उपयोग सैन्यामध्यें व नेहमींच्या व्यवहारांत पुष्कळ होत असे. राम वनवासाला निघून गेले ते रथांतून गेल्याचें सर्वप्रसिद्ध आहे. तसेंच राम व वसिष्ठमुनि दशरथाच्या वाड्याकडे रथांत बसून गेल्याचें वर्णन आहे. यावरून नगरींतील संपन्न लोकांचा व्यवहार रथांतून होत असे, असें दिसतें. व रथ फिरविण्याइतके नगरींतील मार्ग विशाल असणार हें उघड आहे. राम अरण्यांत रथांतून गेले तरी अरण्यापर्यंतचा सर्व मार्ग नगरीप्रमाणें होता असें नाहीं. अरण्याशीं व्यवहार क्वचित् असावयाचा व त्यामुळें तिकडे जाण्याचा सोईचा

मार्ग नसला तरी त्याबद्दल राजसत्तेकडे दोष देतां येत नाहीं. भरत रामाला परत आणण्याकरितां अरण्यांत गेला, त्या वेळीं बरोबरीचें सर्व सैन्य व नागरिक जाण्याइतका तो सोईचा करण्यांत आला. हा मार्ग कसा करण्यांत आला याचें वर्णन ( २।८०।६ - १४ ) वाचलें म्हणजे त्या वेळीं हे मार्ग कसे असत याची कल्पना होते. मार्गांत पुढें आलेले वृक्षादि तोडून, धोंडे फोडून, सखल प्रदेश भरून काढून, पाणी वहात असेल तें पाट बांधून बाहेर काढून हा मार्ग कारागिरांनीं केला होता. अरण्याकडे जाण्याचा हा मार्ग आयत्या वेळीं करण्यांत आला असला तरी दळणवळणाचे नेहमींचे मार्ग विशाल असत. दशरथ मृत झाल्यावर भरत आपल्या मातामहाच्या गिरिव्रज नगरीहून अयोध्येकडे रथांत बसून आठवे दिवशीं ( २।७१।१९ ) आला, तेव्हां इकडील मार्ग रथ जाण्याजोगे होते, हें उघड आहे. रामाच्या विवाहाकरितां दशरथ सपरिवार मिथिलेला रथांतूनच गेला. हा प्रवास तीन दिवसांचा होता. ( १।६९।७ ) इतर लोकांचे व्यवहार शकटांनीं—गाड्यांनीं होत असत. विश्वामित्र आपल्या सिद्धाश्रमांतून रामाला घेऊन मिथिलेला गेल्यावेळीं बरोबर अनेक ऋषि व त्यांचें सामान होतें; त्यांच्या शंभर गाड्या होत्या, ( १।३१।७ ) असें वर्णन आहे. दशरथानें अश्वमेधाकरितां जे राजे बोलाविले ते दूरदूरचे होते व ते रथांतूनच अयोध्येला आलेले असणार. या राजांमध्यें मिथिला, काशी, अंग, कोसल, मागध, सिंधु, सौवीर, सौराष्ट्र व दक्षिणात्यदेश इतक्या देशांच्या अधिपतींचीं नांवें आहेत. ( १।१३।२१–२८ ) दळणवळणाचें मुख्य साधन जे मार्ग ते याप्रमाणें सोयीचे असल्यानें त्यांनीं लोकांचा व्यवहार सुरळित चालत असे. अयोध्येच्या वर्णनामध्यें निरनिराळ्या जिनसांचे बाजार असल्याचें वर्णन असून देशोदेशींच्या व्यापारी लोकांनीं ते शोभिवंत दिसत, ( नानादेशनिवासैश्च वणिग्भिरुपशोभिताम् १।५।१४ ) असल्याचें सांगितलें आहे. राम वनवासास गेल्यावर शोकाकुल होऊन सर्व व्यापाऱ्यांनीं बाजार बंद ठेविला होता. ( २।४८।३५ ) व्यापाराचा याहून स्पष्ट निर्देश दुसऱ्या स्थलीं आलेला आहे. राष्ट्र अराजक झालें तर काय अनर्थ होतात, तें सांगतांना पुढील श्लोक आहे:—

**नाराजके जनपदे वणिजो दूरगामिनः ।**
**गच्छन्ति क्षेममध्वानं बहुपण्यसमाचिताः ॥ २।६७।२२ ॥**

"अराजक राष्ट्रामध्यें दूर देशाला पुष्कळ माल बरोबर घेऊन जाणारे वाणी मार्गानें सुखरूपपणें जात नाहींत." अर्थात् राजसत्ता असतां त्यांचा प्रवास सुखरूप होतो व तो इष्ट आहे असें सांगण्याचा उद्देश आहे. यावरून त्या वेळीं परदेशाशीं व्यापार मोठा असला पाहिजे, हें उघड आहे. त्याच्या अमात्यांविषयीं ते परदेशांतहि प्रसिद्ध (विदेशेष्वपि विज्ञाताः १।७।१७) असल्याचें वर्णन आहे. अयोध्येंतील सैन्यादिकांचें वर्णन देतांना, कांबोज, वाल्हीक इत्यादि देशांतील उत्तम अश्व, विंध्य व हिमालयावरील मोठे हत्ती राजाचे संग्रहीं असल्याचें सांगितलें आहे व त्यावरून परदेशाशीं दळणवळण अनुमानितां येतें.

दळणवळणाचें दुसरें साधन नावांचें होतें. गंगादि नद्यांवरून नदीपार होण्याकरितां नावा ठेविलेल्या असत. अशा एका नावेंतून राम गंगापार गेलेल्या नावेवर एक सुकाणूवाला व कांहीं नावाडी होते, ( २।५२।८१ ) व यावरून ती नाव दहा माणसें नेण्याइतकी मोठी असावी. तथापि भरत रामाला परत आणण्याकरितां तेथें गेला, त्या वेळीं त्याबरोबर मोठी सेना होती व या सेनेसह नदीपार करण्याचें काम गुहानें आपल्या नावाडयांकडून करविलें. सर्व सेनेला उतरण्यास तेथें पांचशें नावा सज्ज होत्या. याशिवाय स्वस्तिकसंज्ञक नावा तेथें आल्या असून त्यांवर शिडें, पताका होत्या; त्यांवर घंटा वाजत असून त्यांचे सांधे बळकट असत. या नावा अधिक वेगानें जात असत. भरत ज्या नावेंत बसला तिजवर पांढऱ्या बनातीचें आच्छादन केलेलें होतें. या नावांतून मनुष्य तरून गेले, इतकेंच नव्हे तर कित्येकांवर घोडे, बैलगाडया व हत्तीहि बसून पलीकडे गेले. नावांच्या वर्णनावरून त्या मोठ्या होत्या, हें उघड आहे; पण इतक्या नावांचा व्यवहार सुरळीत चालणें व्यापारी दळणवळणावांचून शक्य नाहीं, हें लक्षांत घेतलें म्हणजे जलमार्गानें त्या वेळीं होणाऱ्या व्यापाराची कल्पना होते. समुद्रमार्गानें होणाऱ्या व्यापाराचें अनुमान करण्यास अयोध्या किंवा कोसलदेश यांचे समीप समुद्र नसल्यामुळें साधन नाहीं, तथापि गंगानदीवरील नावांच्या संख्येवरून ज्याप्रमाणें जलमार्गावरील व्यापार आपण

अनुमानला, त्याप्रमाणें हाहि अनुमानण्याइतकें प्रमाण रामायणांत मिळतें. वाली-सुग्रीवयुद्धाचें वर्णन देतांना सुग्रीवानें सालवृक्ष उपटून वालीचे अंगावर त्याचा प्रहार केला, त्याचे योगानें वालीची अवस्था काय झाली तें पुढील उपमा देऊन महर्षींनीं व्यक्त केलें आहे—

**स तु वृक्षेण निर्भग्नः सालताडनविव्हलः ।**
**गुरुभारभराक्रान्ता नौः ससार्थेव सागरे ॥ ४।१६।२४ ॥**

" तो ( वाली ) वृक्षाचे योगानें भग्न झाला, व अतिशय ओझें लादलेली नौका समुद्रामध्यें आंतील व्यापाऱ्यांचे तांड्यासह ( बुडूं लागते ) त्याप्रमाणें सालवृक्षाचे ताडनानें विव्हल होऊन गेला ( मनामध्यें खचूं लागला. ) " यांत समुद्रांतील नाव आणि व्यापाऱ्यांचा तांडा ( सार्थ ) यांचे निर्देश स्पष्ट आहेत. ज्यांना व्यापाराचा निर्देश मागील अनुमानाचे वेळीं मिळाला नाहीं म्हणून असंतोष वाटत असेल, त्यांनीं येथील निर्देश पाहून संतुष्ट व्हावें व नावांची संख्या ज्यांना पाहिजे असेल त्यांनीं गंगातीरावरील नावांचा तांडा पाहून घ्यावा. येथील नौका, व्यापाऱ्यांचा तांडा व तीवरील अतिशय ओझें यावरून, मोठीच अभिप्रेत असावी, हें उघड आहे. एके ठिकाणीं तर " समुद्रामध्यें मोठी नौका ( महानौः ) असतां प्रतिकूल वाऱ्याचे योगानें तिची स्थिति होते त्याप्रमाणें, ( ५।१।७८ ) " अशी उपमा दिली असून तींत मोठ्या नौकेचा स्पष्ट निर्देश आहे. व्यापार अनुमानितां आला, तरी तो कोणत्या मालाचा हें मात्र कळण्यास मार्ग नाहीं.

## धर्मरक्षणाचें कार्य राजसत्तेकडे.

राज्यपद्धतीचें विवेचन करितांना राजा व प्रजा यांचे अधिकार कसकसे मर्यादित होते, हें सांगितलें व अशा पद्धतीच्या योगानें प्रजा कशी संपन्न व संतुष्ट असून एकंदरींत सर्व व्यवहार कसा व्यवस्थित चालत असे याचें येथवर निरूपण केलें; परंतु त्या वेळीं राजसत्तेच्या " स्थलसीमेंत " येत असलेली एक बाब आतां सांगावयाची आहे व ती धर्मरक्षणाची होय. रामायणाचे प्रारंभीं नारदांनीं वाल्मीकींना सांगितलेलें चरित्र दिलें आहे. त्यांत चरित्रसमाप्ती-नंतर लोकस्थिति सांगतांना, रामराज्यांत लोक " आनंदी, संतुष्ट, पुष्ट व धर्म-

निष्ठ " ( १।१।९० ) असल्याचें लिहिलें आहे. प्रजा संतुष्ट व संपन्न असणें राजसत्तेला कोणत्याहि काळीं भूषणावह होय; परंतु रामायणकालीं ती धर्मनिष्ठ असणें भूषण मानलें जात असे. नीतिविरुद्ध आचरण करणाराला मात्र आतां राजसत्ता शासन करिते; धर्मविरुद्ध आचारांविषयीं ते नीतिविरुद्ध नसतां ती उदासीन असते. नीति व धर्म यांचा हा विभक्तपणा विधर्मी राजांची सत्ता आल्यापासून झाला आहे. राजा व प्रजा समानधर्मी असतां धर्माचे बाबतींत राजसत्तेला उदासीन रहावयाचें प्रयोजन नसतें; कारण धर्मविरुद्ध आचरण करणाराला शासन केल्यास प्रजेचा असंतोष होण्याचा संभव नसतो. धर्मप्रसार अथवा धर्माची बळकटी दोघांनाहि सारखी इष्ट असते. पण धर्मप्रसार दोघांना इष्ट आणि धर्म तर भिन्न, असें झालें म्हणजे कलहास प्रारंभ होतो. गौतमबुद्धाचा उदय होऊन राजे जेव्हां बौद्धधर्मी झाले तेव्हां राजसत्तेचें धर्माला असलेलें संरक्षण नष्ट झालें; धर्माचें रक्षण न होतां ऱ्हास होऊं लागला. धर्माची अशी अशरण स्थिति झाली असतां श्रीशंकराचार्यांनीं मठस्थापना करून धर्मशासनाचें कार्य आपणाकडे घेतलें. राजसत्ता व धर्मसत्ता यांच्या प्रदेशाची विभागणी या कालीं झाली. रामायणकालीं राजसत्तेंतच धर्मसत्तेचा अंतर्भाव होत असे; किंबहुना धर्मसत्ताच अधिक प्रबल होती. कारण राजानें प्रजापालन करण्याचे व प्रजेनें राजनिष्ठ रहाण्याविषयींचे सर्व नियम धर्म या नांवानेंच मोडत असत. म्हणजे या नियमांविरुद्ध आचरण करणें अधर्म समजला जात असे. त्या वेळच्या या परिस्थितीकडे पाहिलें म्हणजे राजसत्तेकडे धर्मरक्षणाचें कार्य होतें, असें म्हणण्यांत थोडा विपर्यासच झाला, असें मान्य करावें लागेल. कारण " धर्माचे नियम राजा व प्रजा या दोघांवरहि अधिकार चालवीत असल्यामुळें" धर्माला रक्षणाची अपेक्षा नव्हती. सर्वांचें रक्षण करण्यास धर्म समर्थ आहे, अशी दोघांची भावनाच याला कारण होय. धर्माविषयींच्या या भावनेचें महत्त्व केवढें आहे, हें सांप्रतच्या परिस्थितींत आपणांस पटावयाचें नाहीं; तथापि तें अनुमानितां येण्यासारखें आहे. पापाकडे मनुष्याची प्रवृत्ति स्वभावतः असते व व तिला बंधन त्यानें स्वतां घालावयाचें असतें. हें बंधन राजसत्ता घालीत असते; पण तिचे उपाय कृत्रिम--शारीरिक पीडा देणारे असतात. म्हणजे हें

बंधन ज्या ज्या वेळीं राजसत्ता घालते, त्या त्या वेळीं ती असल्या कृत्रिम उपायांनीं मनुष्याच्या हृदयांत भीति उत्पन्न करिते. पण ही भीति त्या त्या शारीरिक यातनांविषयींची असते, हें येथें लक्षांत घेणें अवश्य आहे. म्हणजे या उपायांनीं मनुष्याच्या वृत्तीला आळा न बसतां कृतीला बसतो व ही भीति फार दिवसांच्या सहवासानें लुप्त होत चालली असतां या उपायांचा कांहीं उपयोग होत नाहीं. त्या यातना सोसण्याला मनुष्य सिद्ध होतो किंवा त्या टाळण्याचा प्रयत्न करूं लागतो. अशा रीतीनें हे उपाय दोनहि प्रकारें निरुपयोगी होऊं लागले म्हणजे ते अधिक कठोर होत जातात. जगांतील सर्व राजशासनांचा इतिहास हेंच कंठरवानें सांगत आहे. या पापप्रवृत्तीला धर्ममात्र बंधन घालूं शकतो, व हें बंधन घट्ट पण न दुखवितां बसलेलें असतें. हें बंधन उपजतांच घट्ट बांधलें गेलें व स्वतां तोडून टाकलें नाहीं, तर तें टिकतें; आणि आधीं बांधलेलें नसेल किंवा मागाहून बुद्ध्या तोडिलें असेल तर मात्र तें पुनः सांधितां येत नाहीं. राजशासनाचें बंधन कृत्रिम असल्यामुळें तें बंधन असेंच लवकर तुटतें आणि त्यानें पापप्रवृत्तीला आळा न बसतां ती गुप्तपणें करण्याकडे प्रवृत्ति उत्पन्न होते. धर्मशासनानें मात्र या प्रवृत्तीला आळा बसतो. " राजसत्तेला कठोर शिक्षा करून जें कार्य साधत नाहीं तें निराकार धर्म प्रेमभावानें करीत असतो. धर्मशासनाच्या या कालांतील व सांप्रतच्या कालांतील दुराचारांची तुलना करून त्यांतील अंतर पाहिलें म्हणजे धर्मशासनाचें कार्य किती महत्त्वाचें होतें, हें कळून येईल. धर्माची सत्ता राजावर राजकारणांतहि होती व यामुळें राजशासनाला तें बंधन होतें. त्या कालीं राजसत्तेला इहलोकींचा आळा नव्हता, असें रा. ब. महाजनी यांनीं लिहिलें आहे.* या प्रश्नासंबंधानें स्वतंत्र विवेचन अन्यत्र केलें आहे. तथापि त्यांचें मत गृहीत धरिलें तरी राजसत्तेला असलेलें धर्मशास्त्राचें बंधन किती प्रबल होतें, हें लक्षांत घेतलें म्हणजे इहलोकींचें कृत्रिम बंधन अधिक काय करणार असें मनांत आल्याशिवाय रहात नाहीं. धर्मशास्त्राचें बंधन राजा व प्रजा या दोघांनाहि असलें तरी राजसत्तेनें धर्मरक्षणाचें कार्य हातीं घेऊन तें टिकविलें व हें त्या कालच्या राजसत्तेचें

* रामायणकालीन लोकस्थिति. पृ. २६

वैशिष्ट्य होय. धर्माप्रमाणें आचरण ठेवणें याहून धर्मरक्षणाचें कार्य वेगळें नाहीं, हें लक्षांत घेतलें म्हणजे त्या वेळच्या राजसत्तेनें हा केवढा भार पत्करिला व त्याचें महत्त्व काय याविषयीं कल्पना करितां येईल. दशरथानें रामाला यौवराज्याभिषेक करण्याविषयीं विचार करण्याकरितां भरविलेल्या सभेंत लोकांच्या धर्मरक्षणाचें हें मोठें जूं वहातां वहातां आपण थकल्याचें सांगितलें आहे. ( २।२।९ ) तसेंच दशरथ मरण पावल्यावर भरताला आणण्याविषयीं जी मंत्र्यांची चर्चा झाली तींत अराजक राष्ट्रांत काय काय अनर्थ होतात, हें सांगतांना दुष्ट लोक प्रजांना पीडा देतील वगैरे अनर्थांबरोबर आचारलोपांचा निर्देश केलेला आहे. " अराजक राष्ट्रामध्यें यज्ञयाग करणारे द्विज रहात नाहींत; जितेंद्रिय व व्रत पालन करणारे ब्राह्मण सत्रानुष्ठान करीत नाहींत; शास्त्रविशारद लोक चर्चा करीत नाहींत; देवांच्या पूजेचें साहित्य—पुष्पादि—कोणी आणीत नाहींत. " ( २।६७।१३,२६,२७ ) हे सर्व निर्देश धार्मिक आचारासंबंधाचे आहेत. हे आचार प्रजाजनांकडून राजा करवीत असे, असा याचा अर्थ नव्हे; तर आचारांस उत्तेजन व त्यांना येणाऱ्या विघ्नांचें निवारण हीं कार्यें राजाकडून होत असत, हें येथें अभिप्रेत आहे. राजा विधर्मी असतां हीं कार्यें होणें शक्य नाहीं; व धर्म भिन्न असल्यामुळें त्याला त्यांचें बंधन नसतें. दशरथाकडे विश्वामित्र यज्ञरक्षणार्थ राजपुत्रांस मागावयास आले असतां राजपुत्र लहान म्हणून राजा त्यांना त्यांस आरंभीं देत नव्हता. तरी यज्ञरक्षणार्थ सैन्यासह स्वतः येण्याचें त्यानें आश्वासन दिलें. राक्षस कपटानें युद्ध करणारे, यासाठीं त्यांची राजाला भीति वाटली. तसेंच ताटकावधाचे वेळीं स्त्रीचा वध कसा करावा, अशी शंका रामाला आली असतां ती देशाचा विध्वंस कसा करीत आहे तें सांगून प्रजांचें संरक्षण करण्यासाठीं व चातुर्वर्ण्याचे हितासाठीं बरें, वाईट, क्रूर वा सदोष, कसेंहि कर्म असलें तरी तें करणें राजाचें कर्तव्य आहे, असा विश्वामित्रांनीं त्याला उपदेश केला व त्याप्रमाणें रामानें ताटकेचा वध केला. विश्वामित्राचा उपदेश ग्रहण करून रामानें,

**गोब्राह्मणहितार्थाय देशस्य च हिताय च ।**
**तव चैवाप्रमेयस्य वचनं कर्तुमुद्यतः ॥** १।२६।५ ॥

" गोब्राह्मणांच्या हिताकरितां आणि देशाच्या कल्याणाकरितां अतर्क्य प्रभावानें युक्त असलेल्या आपल्या आज्ञेप्रमाणें वागण्यास मी सिद्ध आहें." असें म्हणून त्याला आपली मान्यता दिली. यावरून धर्मरक्षणाचें कार्य राजसत्तेकडून धर्म म्हणूनच होत असे, हें लक्षांत येईल. येथें चातुवर्ण्याच्या व ब्राह्मणांच्या हिताचा निर्देश अभेदानें केलेला आहे व प्रारंभीं विश्वामित्रांच्या उपदेशांतहि हा प्रकार आहे (१।२५।१५), हें येथें विशेष महत्त्वाचें आहे. कारण पूर्वी क्षत्रिय असून मागाहून ब्राह्मण झालेल्या विश्वामित्रांच्या तोंडचें हें वचन आहे. " ब्राह्मणत्वस्य हि रक्षणेन रक्षितः स्याद्वैदिको धर्मः " ब्राह्मण्याचें रक्षण केलें असतां वैदिक धर्माचें रक्षण केल्यासारखें होईल, असें जें श्रीशंकराचार्यांनीं तत्त्व निवेदन केलें आहे, त्याचें मूळ कसें व किती खोल आहे हें यावरून दिसून येईल.

## वर्णव्यवस्था.

वैदिक धर्माची चातुर्वर्ण्य ही मुख्य संस्था आहे. तेव्हां तिचें रक्षण त्या वेळीं कोणत्या प्रकारें होत असे, हें आतां पाहूं. वर्णचतुष्टयाची माहिती आमच्या लोकांस नव्यानें दिली पाहिजे, असें नाहीं; तेव्हां येथें केवळ त्या वेळच्या परिस्थितीचें निरीक्षण करावयाचें आहे. वर्णव्यवस्था राजमान्य असल्यामुळें व तिचे संरक्षणाचें कार्य राजसत्तेकडे असल्यामुळें वर्णाश्रमविहित कर्में करण्याकडे लोकांची साहजिक प्रवृत्ति होती. यामुळें वर्णांमध्यें परस्पर द्वेषाचा उद्भव झाला नव्हता. " क्षत्रिय ब्राह्मणांच्या आज्ञेंत वागत; वैश्य क्षत्रियांना अनुसरून वागत; आणि शूद्र स्वकर्मांत तत्पर असत, म्हणजे तीन वर्णांची सेवा करीत." (१।६।१९) असें अयोध्येंतील चतुर्वर्णांचें वर्णन रामायणांत आलें आहे. राजसत्ता वर्णचतुष्टयाला संरक्षक असली तरी वर्णांचा नित्य व्यवहार परस्परांवर अवलंबून असल्यामुळें ती टिकून राहिली. देशाचें रक्षण करण्याचें काम क्षत्रियांकडे असे व क्षत्रियवर्णाचे पुरुष सैन्यामध्यें राहून आपलें कार्य करीत असत. युद्धविद्येप्रमाणें वेदविद्या त्यांना अवगत असे. तथापि पौरोहित्याचें काम ब्राह्मणवर्णाकडे असे. यज्ञयाग करण्याकडे राजे लोकांची प्रवृत्ति विशेष असल्यामुळें त्यांना ब्राह्मणांची अपेक्षा व त्यांविषयीं आदर असे. ब्राह्मणवर्णानें विद्या व

तपश्चर्या यांच्या योगानें आपणास श्रेष्ठता प्राप्त करून घेतली होती. यज्ञयाग राजे लोकांनीं करावयाचे असले तरी प्रत्यक्ष कर्म ब्राह्मणद्वारां होत असे. ब्राह्मणानें दुसऱ्याकरितां अथवा स्वतःकरितां यज्ञाची दीक्षा घेतली म्हणजे यज्ञरक्षणाचें कार्य राजे करीत असत. यज्ञदीक्षा घेतल्यावर शाप देण्याचें सामर्थ्य ब्राह्मणांला असे. तरी तो दिल्यास तपोबल वृथा होईल म्हणून ते देत नसत. विश्वामित्र स्वतः समर्थ असतांहि दशरथाकडून याच कारणाकरितां राजपुत्रांना घेऊन गेल्याचें सांगितलें आहे. यज्ञदीक्षा घेतल्यावर यज्ञसमाप्ति होईपर्यंत व्रतस्थ रहावें लागत असे आणि हें यज्ञाचें अनुष्ठान नियमित काल चालत असे. इतका काल बद्ध होऊन राहणें राज्यकारभार पहाणाऱ्या क्षत्रिय राजाला शक्य आणि इष्टहि नसे; आणि यासाठीं अनुष्ठान ब्राह्मण पुरोहित करीत असत. तथापि या कामीं यजमान क्षत्रिय असले तरी तज्ज्ञ होते. याजन, अध्यापन व प्रतिग्रह त्यांना विहित नसल्यामुळें तीं कर्मे ते करीत नसत. वर्ण भिन्न असले तरी त्यांचें अध्ययन एकत्र होत असे. रामानें वनवासाला जातेवेळीं जीं दानें केल्याचें सांगितलें आहे, त्यांत त्यानें कित्येक दानें आपल्या सहाध्यायी विद्यार्थ्यांना दिल्याचें वर्णन आहे. रामपुत्र कुशलवांचें अध्ययन वाल्मीकींच्या आश्रमांत ब्राह्मणकुमारांबरोबर झालें. अध्यापनाचें कार्य ब्राह्मणांकडे असे व त्याप्रमाणें जिकडेतिकडे मोठमोठे ऋषींचे आश्रम असत. या आश्रमांतून अध्यापनाचें कार्य अखंड चालत असे. या सर्वांची उपजीविका कशी होत असे, याचा स्पष्ट निर्देश रामायणांत केलेला नाहीं; तथापि यज्ञांत मिळणारीं दानें हें एक साधन अनुमानितां येतें. दशरथाच्या अश्वमेधांत चार ऋत्विजांना चार दिशा ( भूमि ) दान केल्याचें व त्यांनीं राज्यकारभार पहाण्यास आपण समर्थ नाहीं, तेव्हां भूमीशीं आपणांस कर्तव्य नाहीं असें म्हणून त्या न घेतां निष्कद्रव्य घेतल्याचें वर्णन आहे. यावरून या दानांच्या मोठेपणाची कल्पना होईल. विद्यार्थ्यांची सर्व उपजीविका प्रायः गुरूवर अवलंबून असे व यामुळें दानें मोठीं असलीं तरी त्यांचा व्यय अशा रीतीनें विद्यादानाकडे होत असल्यामुळें लोकांकडून येणारें उत्पन्न लोककल्याणाकडे वेंचलें जाई, असें म्हटल्यास अनुचित होणार नाहीं. ऋषींचे हे आश्रम नगरींतून असल्याचें कोठें लिहि-

लेलें नाहीं. बहुधा अरण्यांत जवळ उदक असेल अशा स्थलीं असे आश्रम असत. गंगेच्या तीरीं असे अनेक आश्रम असल्याचें सांगितलें आहे. ( २।५०।१३ ) वाल्मीकींचा आश्रम तमसातीरीं होता. भरद्वाजांचा आश्रम गंगा व यमुना यांच्या संगमावर होता. ( २।५४।९ ) भरद्वाजांच्या आश्रमांत शिष्य पुष्कळ होते. चित्रकूटाच्या समीपहि असे अनेक आश्रम होते. ब्राह्मण आणि क्षत्रिय या वर्णांची याप्रमाणें परिस्थिति होती. अर्थात् वर्णविहित कर्म करून ते सुस्थितींत होते. वर्णविहित कर्म शास्त्राज्ञा म्हणून करणें वेगळें व त्यांतच उपजीविकेचें साधन असतां तें करणें वेगळें. उपजीविकेकरितां वेगळा व्यवसाय करण्याची आवश्यकता असली म्हणजे प्रथम शास्त्रसंमत, मग निषिद्ध नसलेला व शेवटीं निषिद्धहि व्यवसाय पत्करण्यापर्यंत मनुष्याचा क्रमानें अधः-पात होत असतो; आणि याच क्रमानें विहित कर्मांचें अनुष्ठान त्यांत उप-जीविका नसल्यामुळें हळूहळू सुटत जातें. परिस्थिति बदलत जाते, तसतसें हें होत असतें; बुद्धिपूर्वक करावें लागतें, असें नाहीं. रामायण-कालाकडे पाहिलें तर ब्राह्मणादि चारी वर्णांची, विहित कर्म व व्यवसाय सोड-ण्याकडे प्रवृत्ति दिसून येत नाहीं. ब्राह्मण केवळ तपश्चर्या करीत असावेत असा मात्र कोणीं ग्रह करून घेऊं नये. त्यांचे आश्रम नगरांत नसून अरण्यांत असले तरी तेथें ते सर्व तप करीत असत, असें नाहीं. अध्यापनाचें कार्य तेथें चाले आणि नगरींतून हें कार्य न करितां शक्य तितकें निवांत स्थलीं करण्याकडे अजूनहि जी प्रवृत्ति आहे तीवरून त्या वेळच्या या प्रघाताकडे पाहून कोणा-लाहि कौतुक वाटेल. या आश्रमांतून ऋषि आपल्या कुटुंबासह असत. ऋषींच्या आश्रमांतून येणारा अग्निहोत्राचा धूर हें एक आश्रम ओळखण्याचें साधन होतें. ( २।५४।५ ) आश्रमांतील स्त्रियांचें प्रत्यक्ष वर्णन रामायणांत दिसत नाहीं व याचें कारण त्यांचेकरितां आश्रमांत वेगळी सोय असावी, असें वाटतें. सीतेचा अरण्यांत त्याग केला तेव्हां वाल्मीकींची व तिची गांठ पडल्यावर त्यांनीं "आपल्या आश्रमाजवळ तापसी तपश्चर्या करीत आहेत, त्या तुझें आपल्या अपत्याप्रमाणें नित्य पालन करितील." ( ७।४९।१३ ) असें सांगितलें आहे. व यावरून या कल्पनेला पुष्टि मिळते. तपश्चर्या किंवा अध्ययन हीं प्रायः

अशा आश्रमांतून होत. पण ब्राह्मणांचे व्यवसाय एवढेच होते असें म्हणवत नाहीं. रामानें अरण्यांत जातेवेळीं कित्येक ब्राह्मणांस भूमिदान दिल्याचें वर्णन आहे. आणि दशरथानें भूमिदान दिल्याचा वर निर्देश आला आहे. यावरून कृषि हें एक ब्राह्मणांचें उपजीविकेचें साधन अनुमानितां येतें. कित्येक तापसी अरण्यांतील फलमूलांवर निर्वाह करीत हें तर रामायणांत पुष्कळ वेळां आलें आहे. वसिष्ठ मुनि कांहीं दिवस तरी अयोध्येंत निरंतर होते, हें उघड आहे. कारण ज्या ज्या वेळीं वसिष्ठांना रामायणांत राजानें बोलाविल्याचें अथवा स्वतः ते आल्याचें वर्णन आहे, त्या त्या वेळीं ते अरण्यांतून आल्याचें दिसत नाहीं. ते राजाचे कुलपुरोहित होते आणि इतर मंत्री वगैरे अधिकारी वर्गापेक्षां त्यांना मान अधिक होता. पुरोहित या नात्यानें याजनादि कामावांचून अन्य विषयांत पडण्याचें त्यांना कारण नव्हतें. परंतु दशरथ मृत झाल्यावर गादीवर कोणीतरी राजा बसवून कारभार चालू करावा अशी त्यांना सर्वांनीं विनंति केली व त्यांनीं भरताला आणविण्याची सूचना केली आणि त्याप्रमाणें व्यवस्था झाली. यावरून मंत्र्यांचें काम त्यांनीं केलें तरी सेवक म्हणून वागत नव्हते. इतर मंत्र्यांत ब्राह्मण दिसत असले तरी त्यांच्या कामगिरीविषयीं रामायणांत उल्लेख नाहीं. आणखी ब्राह्मण राजसेवेमध्ये होते किंवा नव्हते हें निश्चयानें सांगण्याजोगें साधन रामायणांत नाहीं. ब्राह्मण स्वकर्मनिरत असल्याचें ( १।६।१३ ) रामायणांत सांगितलें आहे व त्यावरून आपद्धर्म म्हणूनहि कांहीं तरी अन्य व्यवसाय करण्याची ब्राह्मणांवर पाळी आल्याचें दिसून येत नाहीं. मंत्र्यांमध्यें ब्राह्मण होते, हें खरें; तथापि सेवा म्हटली म्हणजे वर्ज्य असें समजतां नये. मनूनें 'श्ववृत्तीनें' निर्वाह करूं नये असा निषेध केला आहे, आणि सेवा याला प्रतिशब्द म्हणून श्ववृत्ति शब्द उपयोजीत असले तरी येथें तो अर्थपूर्ण आहे. अर्थात् सेवा करावयाची ती कुत्र्याप्रमाणें—लांगूलचालनादितुल्य उपायांनीं करूं नये असा भाव आहे. हीनसेवेनें ब्राह्मणाचा नाश होतो असें जें सांगितलें आहे, त्याचा अर्थ याच धोरणानें करावयाचा आहे. नाहींतर पौरोहित्य वसिष्ठ करीत होते व पौरोहित्याची निंदा—

**नरकाय मतिस्ते चेत् पौरोहित्यं समाचर ।**
**वर्षं यावत् किमन्येन मठचिंतां दिनत्रयम् ॥**

"नरकप्राप्ति व्हावी अशी इच्छा असेल तर पुरोहितपणा एक वर्ष केल्यास पुरे आहे. पण इतकें कशाला? राज्याचा कारभार तीन दिवस पहा!"

अशा प्रकारें एके स्थलीं केलेली आहे. श्ववृत्तीनें वागूं नये असा मुख्य मुद्दा आहे तिकडे लक्ष द्यावयाचें आहे. सेवा न करितां श्ववृत्तीनें वागूं लागल्यास तें तरी अनिष्ट नव्हे असें कसें म्हणावें? बाकी, सेवा ही स्वभावतःच बंधन-कारक आहे ही गोष्ट खरी आहे; परंतु वरील बाबींकडे लक्ष देऊन ती केल्यास दोष लागणार नाहीं. आणि हेंच रामायणांतील मंत्रिपदारूढ ब्राह्मणांच्या वर्तनावरून लक्षांत घ्यावयाचें आहे. क्षत्रियांची उपजीविका बाहुबलावर होत असे व तें दाखविण्यास त्या कालीं पुष्कळ अवकाश होता. वैश्यवर्गाचा व्यवसाय व्यापार व त्याविषयीं विवेचन मागें आलेंच आहे. शूद्रांचा शास्त्रविहित व्यवसाय सेवा. इतर वर्ण ह्या व्यवसायांत पडले नसल्यामुळें हा सर्व देश त्यांना मोकळा होता. एवंच, सर्व वर्ण आपला विहित व्यवसाय सांभाळून होते आणि अशा रीतीनें आपल्या व्यवसायांत दुसरा शिरल्यामुळें उत्पन्न होणाऱ्या द्वेषाचें बीज त्या वेळीं उद्भवलें नाहीं. प्रत्येकाला आपला वर्णविहित आचार व व्यवसाय श्रेयस्कर आहे, असें वाटत असे. रामाविषयीं सांगतांना असें म्हटलें आहे कीं, "कुलाला योग्य अशीच त्याची मति असे; स्वतःचा क्षात्रधर्मच तो श्रेष्ठ समजत असे; आणि स्वर्गरूप महाफल क्षात्रधर्माच्या अवलंबनानेंच साध्य आहे असें त्याला अगदीं मनापासून वाटत असे." (२।१।१,६) या त्याच्या स्वधर्मविषयक श्रद्धेला अनुसरूनच त्यानें वनवासाला गेल्यावर "गुहानें नानाप्रकारचीं अन्नें, भक्ष्य पदार्थ आणि विविध फळें भोजनाकरितां आणून दिलीं होतीं; परंतु त्या सत्यपराक्रमी रामानें क्षात्रधर्माला अनुसरून आपणास प्रतिग्रह घेतां येत नाहीं असें सांगून तीं परत केलीं (२।८७।१६।१७)." यावरून वर्णान्तरोचित आचार न करण्याकडे त्या वेळीं असलेली सूक्ष्म दृष्टि व्यक्त होते. दुसरें असें कीं, सर्व वर्णांचे व्यवसाय परस्परांशीं संबद्ध होते. प्रत्येक वर्णाला इतर वर्णत्रयाची अपेक्षा असे व यामुळें प्रयत्नावांचून सख्य नांदत होतें. भिन्न वर्णांचे शरीरसंबंध सांप्रत होत नाहींत, ते त्या वेळीं शास्त्राच्या संमतीला अनुसरून होत असत. दशरथाच्या विवाहित स्त्रिया अनेक असल्या तरी त्यांत तीन वर्णांच्या तीन स्त्रिया होत्या, असा स्पष्ट उल्लेख आहे. अश्वमेधवर्णनांतील पुढील श्लोक पहा:-

**होताऽध्वर्युस्तथोद्गाता हयेन समयोजयन् ।**
**महिष्या परिवृक्त्याऽथ वावातामपरां तथा ॥ १।१४।३५ ॥**

" होता, अध्वर्यु व उद्गाता यांनीं महिषी ( राजाची क्षत्रिय जातीची स्त्री ), परिवृक्ति ( राजाची वैश्य जातीची स्त्री ) आणि त्याप्रमाणें वावाता ( राजाची शूद्र जातीची स्त्री ) यांचा त्या अश्वाशीं समागम करविला." यांत ब्राह्मण-जातीय स्त्रीशीं विवाह केल्याचा उल्लेख नाहीं. यावरून निषिद्ध असलेला प्रतिलोम ( उच्चवर्णाचे स्त्रीशीं ) विवाह करण्याचा प्रघात नव्हता, असें दिसतें. मात्र याविषयीं आणखी प्रमाण देण्याजोगें आढळलें नाहीं. श्रावणवधाच्या कथेंत श्रावणाचें वर्णन आहे, तेंहि याच प्रकारचें आहे. श्रावण बाणानें विद्ध होऊन पडला असतां दशरथ जवळ आला व त्याला तो ब्राह्मण वाटला. तेव्हां ब्रह्म-हत्येच्या दोषानिमित्त तो बिचकला असतां श्रावणानें आपण वैश्यापासून शूद्रीचे ठायीं उत्पन्न झालों असल्याचें सांगून त्याला थोडा धीर दिला. या शरीर-संबंधावरून आणि या अश्वमेधाकरितां वसिष्ठांनीं धर्मशील अशा चारी वर्णां-तील लोकांना दूत पाठवून बोलावून आणल्याचें जें वर्णन आहे त्यावरून सर्व वर्णांमध्यें परस्पर सख्य किती होतें, हें दिसून येतें. ( १।१३।२० ) रामानें केलेल्या अश्वमेधाला याप्रमाणें चारी वर्णांचे लोक बोलाविल्याचा स्पष्ट उल्लेख नाहीं; तथापि सीतेच्या शपथेचे वेळीं ते होते, असें म्हटलें आहे. (७।९६।७) त्यावरून यज्ञाचे वेळीं ते होते हें उघड आहे. रामायणांतील नानाविध उल्ले-खांवरून तत्कालीन वर्णव्यवस्थेविषयीं सामान्यपणें जें अनुमान होतें त्याचें येथवर निरूपण केलें. नियमाला कांहीं अपवाद असतात त्याप्रमाणें या बाबी-लाहि कांहीं अपवाद होते. चातुर्वर्ण्याची व्यवस्था अबाधित चालली असती तर संकरजाति उत्पन्नच झाल्या नसत्या; पण असें होणें अपरिहार्य होय, हें विसरतां कामा नये; आणि यासाठीं रामायणकालाच्या वर्णव्यवस्थेविषयीं कोणीं भलती समजूत करून घेऊं नये. राम राज्य करीत असतां स्त्रियांना वैधव्य येत नसल्याचें वर्णन आहे; पण याचा अर्थ शब्दशः घ्यावयाचा नव्हे. त्या वेळच्या परिस्थितीचें हें सामान्य स्वरूप आहे. नाहींतर रामाच्या एकदोन नव्हे, तीनशें त्रेपन्न ( ३५३ ) माता विधवा होत्या, त्यांची वाट काय ? रामायणांत सर्व संकरजातींचा उल्लेख नसला तरी, कांहींचा आहे. शूद्रापासून ब्राह्मणीच्या

ठायीं झालेला पुत्र चांडाल होय. रावणाला उद्देशून सीतेनें जें भाषण केलें, त्यांत यज्ञांतील वेदीला ज्याप्रमाणें चांडालाचा स्पर्श होणें शक्य नाहीं त्याप्रमाणें मला तुझा स्पर्श होणें शक्य नाहीं, ( ३।५६।१८ ) असें सांगितलें आहे, व त्यावरून चांडालजात त्या वेळीं होती, हें सिद्ध होतें. रामाचा मित्र म्हणविणारा गुह निषादांचा अधिपति होता. गुह हा या जातीचा अधिपति होता, एवढेंच नव्हे, तर तो त्याच जातीचा होता व त्यानें रामाला अरण्यांत स्वस्थ निजावयास सांगून आपण जातभाईंसह रक्षण करूं असें आश्वासन दिलें. ( ३।५१।६ ) क्षत्रिय नसतांहि तो एका राज्याचा अधिपति होता व धनुर्विद्येंत निष्णात होता, हें विशेष होय. ज्यानें काममोहित क्रौंच पक्ष्याचा वध केला म्हणून वाल्मीकींनीं शाप दिला व हीच शापोक्ति छंदोमय झाली, तो निषाद होता, हेंहि विसरतां नये. संकरानिमित्त होणाऱ्या सर्व जातींचा निर्देश रामायणांत स्पष्टपणें दिसत नसला तरी मनुष्याच्या नैसर्गिक स्वभावाप्रमाणें संकर जातिसंख्या त्या वेळीं वाढूं लागली होती, असें म्हटल्यास दोष येणार नाहीं. वर्णविहित आचारांचे बाबतींतहि असे अपवाद मानितां येतात. तपश्चर्या ब्राह्मणवर्णाला विहित आहे व त्याप्रमाणें ते करीत असत. ऋषींच्या आश्रमांचीं जीं वर्णनें आहेत त्यांत ब्राह्मणेतरवर्णीयांच्या आश्रमाचें वर्णन रामायणांत नाहीं. श्रावणवधाच्या कथेंत श्रावण हा वैश्यापासून शूद्रीच्या ठायीं झालेला पुत्र असून तपश्चर्या करीत होता व त्याच्या तापसवेषावरून दशरथाला तो ब्राह्मण वाटून ब्रह्महत्येच्या दोषाची भीति वाटून तो बिचकला. तापसवेष पाहून त्याला तो ब्राह्मण वाटला. यावरून ब्राह्मणांची तपश्चर्येकडे त्या वेळीं असलेली प्रवृत्ति व तिचा प्रसार व्यक्त होतो. श्रावणाच्या पित्यानें त्यानिमित्त जो शोक केला त्यांत तो अध्ययन करीत असल्याचें वर्णन आहे. कोणत्या ग्रंथाचें अध्ययन तो करी हें येथें स्पष्ट लिहिलेलें नाहीं. तथापि तपश्चर्या व अध्ययन हीं त्या वेळच्या लोकपरिस्थितीला विरुद्ध असल्याचें तेथील वर्णनावरून दिसतें. तथापि असले अपवाद क्वचित् असल्यामुळें वर्णव्यवस्थेविषयीं रामायणांतील वर्णन तत्कालिन सामान्य परिस्थितीचें द्योतक समजावयाचें आहे.

## आचार.

वर्णव्यवस्था हा आमच्या धर्माचा विशेष आहे व वर्णानुरूप आचार हे त्याचें दृश्य स्वरूप आहे. प्रत्येक धर्ममध्यें कांहींतरी आचार विहित म्हणून असतात आणि धर्माच्या किंवा समाजाच्या सुव्यवस्थेसाठीं ते पाळावे लागतात. कोणताहि धर्म आपण मानीत नाहीं, असें प्रतिज्ञेनें सांगणाऱ्या पुरुषालाहि समाजाच्या सुव्यवस्थेसाठीं स्वतःचा विवाह नोंदावा लागतो. धर्मानें सांगितलेले आचार त्यांची चिकित्सा केल्यास बहुतेक समाजाच्या सुव्यवस्थेसाठीं आहेत असें आढळून येईल. आचारांचें हें धोरण बाह्यतः दिसत नाहीं व यासाठीं धर्म या नांवाखालीं त्यांचा समावेश सर्व धर्मांमध्यें करितात. रामायणकालीं वर्णव्यवस्था कशी होती व समाजाची स्थिति कशी होती याविषयीं जें विवेचन केलें त्यावरून विहित आचाराकडे असलेली समाजाची प्रवृत्ति कळण्यासारखी आहे आणि ती कळल्यावर या धार्मिक आचारांविषयीं निरूपण करण्याचें कांहीं प्रजोजन नाहीं. वर्णव्यवस्था लुप्तप्राय होऊन आचार कितीहि शिथिल झाले असले तरी ते अद्यापि सर्वथा नष्ट होऊन गेले असें म्हणतां येत नाहीं, हें कोणीहि मान्य करील. म्हणजे सांप्रत अवशिष्ट असलेल्या आचारांवरून व ते सांगणाऱ्या धर्मग्रंथांवरून तत्कालीन आचारांविषयीं अनुमान करण्यास अडचण नाहीं. तेव्हां आतां आपणांस त्या काळच्या आचारांकडे पहावयाचें म्हणजे त्यांचें साकल्यानें वर्णन करण्याकरितां नव्हे, हें उघड आहे. आचार शास्त्रविहित असले तरी सांप्रत त्यांत किती फेरफार झाले आहेत व लुप्त किती झाले आहेत याची जिज्ञासा या वेळीं वाचकांस उत्पन्न होणें संभवनीय आहे व त्याविषयीं दोन शब्द लिहिणें अवश्य आहे. आचारांचा लोप झाला तरी तो अल्पकालांत होणारा नव्हे. यासाठीं अशा आचारांचें खरें स्वरूप जें धर्मशास्त्रांत कळावयाचें तें रामायणासारख्या प्राचीन इतिहासांत प्रत्यक्ष गोचर होणारें आहे व या दृष्टीनें अशा निरीक्षणाचें महत्त्व आहे.

रामायण हा धर्मशास्त्राचा ग्रंथ नव्हे व यासाठीं त्यांत सर्व आचारांचें वर्णन येणें संभवनीय नाहीं. आचारांचे उल्लेख प्रसंगवशात् आले आहेत व त्यावरून आपण अनुमान करावयाचें आहे. कित्येक आचार कारण नसल्यामुळें

सांगितले नाहींत, म्हणून ते त्या वेळीं नव्हतेच असें एकदम अनुमान करितां नये. रामायणांत उपनयनविधीचा कोठें उल्लेख नाहीं. तथापि इतर विधि धर्मशास्त्रानुसार असल्यामुळें त्याच्या अभावाला तादृश महत्त्व नाहीं. संस्कारांपैकीं विवाहाचें वर्णन रामायणांत आलें आहे हें वर्णन साकल्यानें आलें आहे असें नाहीं; तथापि केवळ उल्लेख करून पुढील वर्णनाला प्रारंभ झाला असें केलें नाहीं हा त्यांत विशेष आहे. विवाहाचे जे आठ प्रकार धर्मशास्त्रामध्यें आहेत त्यांपैकीं पाहिल्या ब्राह्मविधीनें रामाचा विवाह झाला असल्याचें दिसून येतें. अमुक विधीप्रमाणें विवाह झाला असें रामायणांत स्पष्ट लिहिलें नसलें तरी त्यांतील वर्णनावरून विवाहाचा प्रकार अनुमानितां येतो. मनूनें ब्राह्मविवाहाचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे—

**आच्छाद्य चार्चयित्वा च श्रुतशीलवते स्वयम् ।**
**आहूय दानं कन्याया ब्राह्मो धर्मः प्रकीर्तितः ॥३।२७॥**

" विद्वान् व आचारसंपन्न अशा वराला बोलावून वस्त्रालंकारांनीं भूषित करून कन्यादान करणें याला ब्राह्मविवाह म्हटला आहे." रामलक्ष्मण विवाहाकरितां बोलावून आणिल्याचें रामायणांत लिहिलेलें नाहीं, हें खरें आहे. तथापि शिवधनुष्य पाहण्याकरितां म्हणून ते तेथें आले व तें प्रत्यंचा चढवितांना रामाचे हातून भग्न झाल्यामुळें जनक संतुष्ट होऊन त्यानें कन्यादानाचा निश्चय केला. रामलक्ष्मण या वेळीं तेथें पूर्वी आले असल्यामुळें त्यांना बोलावून आणण्याचा विधि करावा लागला नाहीं. दशरथाला जनकानें बोलावून आणिलें व तो आल्यावर त्याचे संमतीनें पुढील कार्य उरकण्यांत आलें. रामाला बोलावून आणिलें नसल्यामुळें हा विवाह ब्राह्म नसून प्राजापत्य होय असा त्यावर कित्येकांचा आक्षेप आहे; परंतु ब्राह्म व प्राजापत्य यांमध्यें मुख्य भेद असेल तर तो कन्यापित्यानें वराला बोलावून आणणें, वर कन्येला मागणी घालण्याकरितां आलेला नसणें, यांत आहे. रामलक्ष्मण जनकाकडे आधीं गेले होते व तेथें विवाहाचा निश्चय झाला, यासाठीं, म्हणजे जनकानें त्यांना बोलावून आणिलेलें नव्हतें, म्हणून तो ब्राह्म विवाह नव्हे, अशी शंका येथें घेऊन तो प्राजापत्य ठरविण्यांत येतो. परंतु रामायणांतील वृत्तांतावरून ते कन्येला मागण्याकरितां गेले नव्हते, हें उघड आहे. वरांचे गुण पाहून जनकाला ते संमत झाले व सीता वीर्य-

शुल्का असल्याचें जें त्यानें पूर्वी सर्वांना सांगितलें होतें तो त्याचा हेतु धनुर्भंगानें पूर्ण झाला व यासाठीं तो कन्यादान करण्यास सिद्ध झाला. वराला बोलावून आणण्याचें कार्य वर तेथें असल्यामुळें त्याला जाऊं न देण्यांत झालें आहे. पुढील विवाहविधि होण्यापूर्वी उभयकुलांच्या पुरोहितांनीं यजमानांची वंशपरंपरा सांगितली. कन्यादान व पाणिग्रहण अग्निसाक्षिक झालें. विवाहविधि मोठ्या समारंभानें करण्याची सांप्रत जशी पद्धति आहे तशा प्रकारें हा समारंभ झाल्याचें दिसत नाहीं, असें रा. रा. अभ्यंकर यांनीं लिहिलें आहे; परंतु याविषयीं कोणतेंहि निश्चित अनुमान करितां येत नाहीं. जनकाकडे यज्ञसमारंभ होता व त्याकरितां त्याजकडे दूरदूरचे हजारों ऋषि आले होते. अर्थात् त्याबरोबर नगरींतील लोक आलेले असणार; तेव्हां लोकसमाज मोठा आला होता व त्याच्या समक्ष विवाह विधि झाला; मग समारंभ तो वेगळा कसला? असें एकदां वाटतें; तर विवाहविधि होतांच दुसरे दिवशीं विश्वामित्र निरोप घेऊन स्वस्थानीं गेले व राजा दशरथ निघाला असें लिहिलें आहे (१।७४।२।३), यामुळें त्याविषयीं शंका येते. दोघांची संगति लावावयाची म्हणजे समारंभ थाटाचा झाला, पण तो एका दिवसांत आटोपला असें म्हणतां येईल.

दशरथाचें और्ध्वदेहिक कृत्य राम वनांत गेला असल्यामुळें भरत मातुलाकडून परत आल्यावर त्यानें केलें. राजा मरण पावला, त्या वेळीं कोणीहि पुत्र त्याजवळ नव्हता, म्हणून भरत येईपर्यंत त्याचें प्रेत अमात्यांनीं तेलानें भरलेल्या एका कढईत ठेविलें होतें. भरत परत आल्यावर प्रेत शिबिकेंत घालून नगराबाहेर सरयूतीरीं नेण्यांत आलें (२।७६।१४,१५). सोन्याचांदीचीं नाणीं व वस्त्रें मार्गामध्यें उधळीत सेवक शिबिकेपुढें जात होते. राजाच्या होमशालेंतील अग्नीमध्यें ऋत्विज व याजक यांनीं यथाविधि हवन केल्यावर ते अग्नि बाहेर आणून त्यानेंच चिता पेटविण्यांत आली. येथें त्या अग्नीनें राजाचें दहन केल्याचा स्पष्ट निर्देश नसला तरी तेथील वर्णनावरून असें अनुमान होतें. सरळ व पद्मक आणि देवदारु यांच्या काष्ठांची चिता रचण्यांत आली असून त्यांत चंदन आणि अगरु यांचा चीक व इतर सुंगधी द्रव्यें घातलीं होतीं. प्रेतयात्रेबरोबर नगरांतील वृद्ध लोक आले होते. या वेळीं सर्व राजस्त्रिया

यथोचित यानांमध्यें बसून बरोबर आल्या होत्या व त्यांनीं ऋत्विजांसह राजा चितेवर ठेवण्यांत आल्यावर दहन होत असतां उलटी प्रदक्षिणा घातली हें विशेष आहे. यानंतर अकरावे दिवशीं अशौच संपल्यावर, बारावे दिवशीं पुढील श्राद्धादि कर्में, दानें वगैरे करण्यांत आलीं. राजाचा मृत्यु रामाला भरताची अरण्यांत भेट झाली तेव्हां कळला व त्या वेळीं त्यानें त्याला पिंडदान केलें. राजानें मात्र कैकयी ऐकत नाहीं असें पाहून भरतानें आपली उदकक्रिया करूं नये असें म्हटलें आहे. (२।४२।९; २।१२।९२) जटायूचा मृत्यु ऐकून संपातीनें त्याला उदकदान केल्याचें वर्णन रामायणांत आहे (४।५८।३३, ३४) व त्याहूनहि विशेष म्हणजे रामानें त्याचें और्ध्वदैहिक केलें हें होय. जटायु मृत झाल्यावर रामानें पित्याप्रमाणें तो आपणाला पूज्य आहे असें म्हणून प्रथम त्याला अग्नि दिला, व नंतर राम व लक्ष्मण या दोघांनीं त्याला उदक दिलें; आणि त्याला उद्देशून मृगमांसाचे पिंड दिले. (३।६८।३३)

राज्याभिषेकाविषयींचीं वर्णनें रामायणांत राम, सुग्रीव, बिभीषण यांच्या निमित्तानें आलीं आहेत. रामाला यौवराज्याभिषेक करण्याचा विचार ठरला असतां वसिष्ठांनीं मंत्र्यांना सिद्धता करण्यास सांगतांना "सुवर्णादिक रत्नें, बलि (त्याकरितां आवश्यक पदार्थ), सर्व प्रकारच्या औषधी, श्वेतपुष्पें, लाह्या, वेगवेगळ्या पात्रांत मध, घृत, कोरीं वस्त्रें, सर्व आयुधें, चतुरंग सेना, सुलक्षणी गज, चवरी, मोर्चेल, ध्वज, श्वेत-छत्र, अग्नीप्रमाणें उज्ज्वल असे शंभर सुवर्णकुंभ, सुवर्णश्रृंगी वृषभ, सबंध व्याघ्रचर्म व इतरहि साहित्य" आणून ठेवण्यास सांगितलें आहे. ( २।३।९-१२ ) या साहित्याचा त्या वेळीं उपयोग झाला नाहीं हा भाग वेगळा; तथापि या कामीं लागणाऱ्या साहित्याचा हा संग्रह आहे व या दृष्टीनें त्याचें महत्त्व आहे. वनवासांतून परत आल्यावर रामाला राज्याभिषेक करण्यांत आला, त्या वेळीं चार समुद्रांचें उदक वानरांनीं आणिल्याचें लिहिलें आहे; व जो किरीट राज्याभिषेकाचे वेळीं मनूनें व त्यापुढील राजांनीं धारण केला होता तो रामाला वसिष्ठांनीं घातला, असा विशेष उल्लेख आहे. राज्याभिषेकाविषयीं, समारंभाहून त्यांत कांहीं अधिक आहे, अशी आपली कल्पना नाहीं व अधिक कल्पना होण्यांचा संभव नाहीं. यासाठीं येथें राम-

राज्याभिषेकाविषयीं थोडी माहिती दिली आहे. राज्यारोहण म्हणजे पूर्वजाधिष्ठित सिंहासनावर केवळ बसावयाचें नसून हा विधि धर्मशास्त्राप्रमाणें प्रत्यक्ष अभिषेक करून करण्यांत येत असे, हें विशेष आहे.

रामायणांतील अतिथिपूजनाविषयींचे उल्लेख कौतुकानें वाचण्यासारखे आहेत. पाहुणा आला असतां त्याला " या बसा " म्हणणें सरळ दिसतें, परंतु हें आतिथ्य त्याच्या योग्यतेप्रमाणें व आपल्या सवडीप्रमाणें करणें वेगळें आणि धार्मिक विधि म्हणून करणें वेगळें. रामायणांत, अतिथि आला असतां प्रत्येक वेळीं यजमानानें अर्घ्यपाद्यादिकांनीं पूजा केल्याचें वर्णन आहे. वाल्मीकींनीं ब्रह्म-देवाची याप्रमाणें पूजा केल्याचें प्रथमच लिहिलें आहे. (१।२।२५) दशरथानें विश्वामित्र आले असतां त्यांचा अर्घ्यप्रदानपूर्वक सत्कार केला. ( १।८।४३ ) असाच रामाचा प्रथम गुहानें ( २।५०।३८ ) व पुढें भरद्वाजानें (२।५४।७) केल्याचें वर्णन आहे. हा अतिथिसत्कार सर्वत्र सारखा असला तरी तो कर-ण्याच्या पद्धतीमधील भेदहि लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. विश्वामित्र येत अस-ल्याचें द्वारपाळांकडून कळल्याबरोबर, दशरथ पुरोहितांसह त्याला आणण्याकरितां पुढें गेला आहे. ( १।१।४० ) आपल्या देशांत राम येत असल्याचें ऐकून असाच गुह, अमात्य व ज्ञातिबांधव यांसह आपण होऊन त्याला भेटला आहे. ( २।५०।३४ ) आणि भरद्वाजाश्रमीं राम गेल्यावर रामानें त्यांना प्रथम अभि-वंदन केलें व सर्वांचीं नांवें आणि आपण कशाकरितां आलों तें त्यानें सांगि-तल्यावर मुनींनीं त्यांचें स्वागत केलें आहे. अतिथि दूरचा व क्वचित् येणारा असेल तर त्याचें स्वागत अधिक होणें साहजिक आहे व असा अतिथि यज-मानाला कुशल विचारावयाचें तें विस्तारानें विचारीत असे. दशरथानें विश्वा-मित्रांचें स्वागत केल्यावर त्याला मुनींनीं प्रथम स्वतांविषयीं व मग नगरी, कोश, देश, बांधव आणि मित्र यांविषयीं कुशल प्रश्न केले व शेवटीं "संनिध असलेले तुझे शत्रु तुला नमून आहेत ना? तुझें दैव, मानुष कर्म चांगल्या प्रकारें चाललें आहेना?" असें विचारिलें. ( १।१८।४४, ४५ ) अतिथीचा सत्कार व त्या सत्काराचा स्वीकार हीं दोनहि कार्यें शास्त्रविहित पद्धतीनें होत असल्याचें येथें स्पष्टच लिहिलें आहे. धार्मिक कर्तव्य म्हणून अतिथिसत्कार

करावयाच्या प्रत्यहींच्या या अभ्यासाला अनुसरून रावण यतिवेषानें आला असतां सीतेनें अरण्यांत त्याचा सत्कार केला व त्यानें तिला " तूं कोण ? येथें कां राहतेस ? " वगैरे विचारिलें असतां, हा ब्राह्मण असून अतिथि आहे, तेव्हां प्रश्नाचें उत्तर न दिल्यास शाप देईल, या भीतीनें त्याला आपला वृत्तांत निवेदन केला. ( ३।४७।२ ) यावरून अतिथींविषयींची मानसिक आदरबुद्धि व्यक्त होते. अतिथिसत्काराप्रमाणें रामायणांतील आशीर्वादपद्धति शास्त्रानुरूप दिसून येते. मस्तकाचे ठिकाणीं अवघ्राण करावें असें शास्त्रवचन आहे, व त्याचा प्रत्यक्ष प्रयोग रामायणांत आढळतो. विश्वामित्राबरोबर यज्ञसंरक्षणाकरितां राम बाहेर पडते वेळीं मातापित्यांनीं त्याचेकरितां मंगल करून मस्तकाचें अवघ्राण केल्याचें लिहिलें आहे. ( १।२२।३ ) वनवासाकरितां निघतेवेळीं तर कौसल्येनें ब्राह्मणांकडून रामाकरितां हवन करविलें, अवशिष्ट द्रव्याचे लोकपालांला उद्देशून बलि दिले व आशीर्वाद देऊन मस्तकाचें अवघ्राण केलें. ( २।२५।४० ) भरद्वाजांचे आश्रमांतून निघतांना त्यांनीं याप्रमाणेंच स्वस्त्ययन केल्याचें वर्णन आहे ( २।५५।२ ).

विवाहकार्य अग्नीचे साक्षीनें व्हावयाचें, हा शास्त्रोक्तविधि आहे व त्याप्रमाणें तो त्या वेळीं होत असे व सांप्रतहि होतो, परंतु व्यवहारांतील मैत्रीचें बंधनहि अग्निसाक्षिक होत असे. सुग्रीव व राम यांची भेट होऊन उभयतांना उभयतांचा वृत्तांत कळल्यावर दोघांना परस्परांचे साहाय्याची अपेक्षा असल्याचें आढळून आलें. रामलक्ष्मणांची सुग्रीवाशीं सख्य करण्याची इच्छा मारुतीनें त्याला कळविल्यावर सुग्रीवानें आपला हात रामापुढें करून " माझ्याशीं सख्य करणें आपणास इष्ट असेल तर हा हात मीं पुढें केला आहे. आपल्या हातानें माझा हात धरा आणि एकमेकांचें कार्य शेवटास नेण्याविषयीं कधींहि न फिरणाऱ्या अशा निश्चयाची विचारपूर्वक प्रतिज्ञा होऊं द्या. " ( ४।५।११ ) असें म्हटलें आणि रामानेंहि तें ऐकून त्याचा हात आपल्या हातांत घट्ट धरिला. या वेळीं मारुतीनें अग्नि सिद्ध करून त्याची पूजा केली; व राम आणि सुग्रीव यांच्यामध्यें अग्नीची स्थापना केली; नंतर त्या दोघांनीं अग्नीला प्रदक्षिणा करून त्याच्या साक्षीनें एकमेकांची मैत्री संपादन केली. पुढें बिभीषणाशीं सख्य करितांना तें

अग्निसाक्षिक केल्याचें वर्णन नाहीं. त्या वेळीं रामानें बिभीषणाला लंकेचें राज्य देण्याची प्रतिज्ञा करून प्रत्यक्ष अभिषेक करविला व बिभीषणानें साहाय्य करण्याचें अभिवचन दिलें, याहून अधिक विधि झालेला नाहीं. द्विजातीला विहित असलेली अग्निसेवा त्या वेळीं सर्वत्र प्रचलित होती व व्यवहारांतहि अग्निसाक्षिक कार्य करण्याच्या वरील पद्धतीवरून तिचा प्रसार व्यक्त होतो. राम वनवासाला निघाला त्या वेळीं अयोध्येंतील पुष्कळ ब्राह्मण त्याबरोबर गेले व ते आपापले अग्नि बरोबर घेऊन गेल्याचें वर्णन आहे. रामाला परत फिरण्यास सांगत असतांना तो परत फिरत नाहीं, असें पाहून संतप्त होऊन त्यांनीं रामाला उद्देशून जें भाषण केलें, त्यांत " हा सर्व ब्राह्मणसमुदाय ब्राह्मणांचें रक्षण करणाऱ्या तुझ्या मागोमाग येत आहे, म्हणून त्यांच्या खांद्यांवर असलेल्या या अग्नींनाहि तुझ्या मागोमाग येऊं दे. " ( २।४५।२१ ) असें म्हणून अग्नीचा स्पष्ट निर्देश केलेला आहे. यज्ञोपवीताचा उल्लेखहि रामायणांत आलेला आहे. अंगदानें हातांत खड्ग घेऊन शोणिताक्षावर जो वार केला तो यज्ञोपवीताप्रमाणें केल्याचें ( ६।७६।१० ) लिहिलें आहे. इंद्रजितानें मायाबलानें निर्माण केलेल्या सीतेचा वध केला तेथेंहि यज्ञोपवीताचा उल्लेख आहे ( ६।८१।३१ ).

रामायणकालचे आचार कसे होते हें आमच्या लोकांस तरी अपूर्व म्हणून नव्यानें सांगावयास पाहिजे असें नाहीं. सामान्य स्वरूप स्वानुभवानें अनुमानितां येणारें आहे, तथापि त्यांतील विशेष, ज्या हेतूनें हा विषय हातीं घेतला, त्याच्या स्पष्टीकरणापुरते येथें सविस्तर सांगितले आहेत:

## आहार.

रामायणकालीं हल्लींच्याप्रमाणें केवळ वनस्पत्याहार करून राहणारा एकहि वर्ण दिसत नाहीं. सांप्रत सर्व वर्णांचे आचार समान झाले आहेत, तरी आहाराच्या दृष्टीनें ब्राह्मणवर्ग इतरांपासून वेगळा राहिला आहे. रामायणकालीं आहाराच्या बाबतींत हा भेद दिसून येत नाहीं. प्रत्येक वर्णाचा आचार व व्यवहार पृथक् होता व एवढाच काय तो त्यांच्यांत भेद होता. वातापी व इल्वल यांना शासन करण्याकरितां अगस्त्य महर्षि त्यांजकडे गेले, तेव्हां एकानें द्विजश्रेष्ठ केलें व दुसऱ्याचा पशु बनवून त्याचें मांस त्यांना वाढल्याचें वर्णन रामाय-

णांत आहे. रामाला अरण्यांतून परत आणण्याकरितां भरत गेला, तेव्हां वाटेंत तो भरद्वाज ऋषींकडे उतरला होता. त्या प्रसंगीं त्याचेकरितां व त्याच्या सैन्याकरितां त्यांनीं सामिष भोजन तयार करविल्याचें वर्णन अयोध्याकांडांत आहे. आपण मांसाहार करणारे आहोंत असें रामानें स्पष्टपणें कबूल केलें आहे. वालीला रामबाण लागून तो पडला, तेव्हां या कृत्याबद्दल रामाचा त्यानें निषेध केला. त्या वेळीं रामानें आपल्या कृत्याचें समर्थन केलें त्यांत तो म्हणतोः—

**प्रमत्तानप्रमत्तान्वा नरा मांसासिनो भृशम् ।**
**विद्ध्यन्ति विमुखांश्चापि नच दोषोऽत्र विद्यते ॥४।१८।४०॥**

"प्राणी सावध असो वा नसो किंवा तो पराङ्मुख झालेला असो, मांसभक्षक पुरुष त्यांचा वेध करितात; आणि यांत कांहीं दोष नाहीं."

असें म्हणून त्यानें आपण मांसाहारी असल्यामुळें वालीला मारल्याबद्दल आपणाकडे दोष नाहीं असें सुचविलें आहे. वनांत जातांना गंगानदी उतरून जावयाच्या वेळीं सीतेनें तिला नवस केले आहेत, ते सर्व याच प्रकारचे आहेत. त्यांतील एक श्लोक पहाः—

**सुराघटसहस्रेण मांसभूतौदनेन च ।**
**यक्ष्ये त्वां प्रीयतां देवि पुरीं पुनरुपागता ॥२।५२।८९॥**

"हे देवि गंगे, मी अरण्यांतून अयोध्येला सुखरूप परत आल्यें म्हणजे एक हजार घडे मद्य आणि मांसमिश्रित भात यांचा तुला बलि देईन. तूं मजवर प्रसन्न हो."

सीतेनें परत आल्यानंतर हे नवस कधीं फेडले तें कांहीं रामायणांत सांगितलेलें नाहीं. अशा तऱ्हेचीं उदाहरणें रामायणांत पुष्कळ स्थळीं आलेलीं आहेत. शिवाय हा विषयहि सामान्यतः सर्वांला मान्य आहे. याकरितां अधिक विवेचन करून जागा अडविण्यांत हांशील नाहीं.

## मूर्तिपूजा.

रामायणकालीं मूर्तिपूजा करावयाचा प्रघात होता असें रामायणांतील कांहीं उल्लेखांवरून वाटतें. रामायण हा कांहीं धर्मशास्त्राचा ग्रंथ नव्हे. मूर्तिपूजा करावी किंवा नाहीं याबद्दल त्यांत विवेचन केलेलें असणें शक्य नाहीं. एखाद्या पात्राच्या

भाषणांत किंवा आचरणांत क्वचित् स्थलीं जर एखादा उल्लेख आला असेल तर त्यावरून त्याबद्दल अनुमान करावयाचें आहे. रामायणकालीं किंवा त्याच्यापूर्वी यज्ञयागांचें माहात्म्य विशेष होतें असें म्हणावयास हरकत नाहीं. परंतु एवढ्या-वरून त्या कालीं मूर्तिपूजा नव्हती असें म्हणतां यावयाचें नाहीं. वेदांत यज्ञांतील देव-तांचीं जीं वर्णनें आलीं आहेत तीं गुणवर्णनात्मक नसून स्वरूपवर्णनात्मक आहेत. मनुष्याला किंवा मूर्तीला ज्याप्रमाणें हस्तपादादि अवयव असतात त्याप्रमाणें या देवतेचे अवयव वर्णिले आहेत. याकरितां रामायणकालीं मूर्तिपूजा करीत अस-ल्यास नवल नाहीं. असें असून रा. ब. वैद्य यांनीं आपल्या पुस्तकांत ते ते उल्लेख त्या त्या देवतांचे आलयांचे वाचक नसून त्यांना आहुति देण्याकरितां वेगवेगळीं आयतनें असत त्यांचे वाचक आहेत असें लिहिलें आहे. त्या वेळीं यज्ञयागांचा प्रघात सर्वत्र होता हें आम्हीं पूर्वींच लिहिलें आहे. तथापि यावरून त्या वेळीं मूर्तिपूजा नव्हती असें म्हणतां येत नाहीं. ज्या स्थलीं यज्ञाचा निर्देश नसून देवालयांचा उल्लेख असतो त्या स्थलीं तें वर्णन यज्ञासंबंधीं आहे असें अनुमान कां करावें तें कळत नाहीं. ज्या श्लोकावर रा. ब. वैद्य यांनीं आपलें मत प्रकट केलें आहे, तो श्लोक संदर्भ कळण्याकरितां पूर्वींच्या श्लोकासह खालीं देत आहोंत.

**गते पुरोहिते रामः स्नातो नियतमानसः ।**
**सहपत्न्या विशालाक्ष्या नारायणमुपागमत् ॥२।६।१॥**
**प्रगृह्य शिरसा पात्रीं हविषो विधिवत्ततः ।**
**महते दैवतायाज्यं जुहाव ज्वलितानले ॥ २ ॥**
**शेषं च हविषस्तस्य प्राश्याशास्यात्मनः प्रियम् ।**
**ध्यायन्नारायणं देवं स्वास्तीर्णे कुशसंस्तरे ॥ ३ ॥**
**वाग्यतः सह वैदेह्या भूत्वा नियतमानसः ।**
**श्रीमत्यायतने विष्णोः शिश्ये नरवरात्मजः ॥ ४ ॥**

" वसिष्ठ महर्षि गेल्यावर राम आणि विशालनयना सीता यांनीं स्नान केलें आणि स्वस्थ अंतःकरणानें त्यांनीं नारायणाचें ध्यान केलें. प्रणाम करून त्यानें आज्यस्थाली ( तुपाचें भांडें ) हातांत घेतली आणि प्रज्वलित अग्नीमध्यें त्या

मोठ्या देवतेला उद्देशून त्यानें त्या तुपाचा होम केला. उरलेलें तूप त्यानें प्राशन केलें. नंतर त्या दोघांनीं वाणी आणि मन यांचें संयमन केलें आणि विष्णूच्या भव्य मंदिरामध्यें चांगल्या प्रकारें हांतरलेल्या दर्भास्तरणावर नारायणाचें ध्यान करीत त्यांनीं शयन केलें. ''

यांत अग्नीमध्यें हवन करून विष्णूच्या आयतनामध्यें रामानें शयन केल्याचें वर्णन आहे. टीकाकारानें विष्णूचें आयतन याचा अर्थ देवपूजालय असा केला आहे तो रा. ब. वैद्य यांस संमत नाहीं. ते विचारतात कीं, जर तें देवपूजालय असतें तर त्याला विष्णूचें आयतन कां म्हटलें आहे? आमच्या मतें दोन्हि एकार्थींच नांवें आहेत. राजवाड्यांत एक देवपूजालय असल्याचा अन्यत्र उल्लेख आहे. राज्याभिषेक करण्याचें ठरल्यावर राम कौसल्येला भेटण्यास गेला तेव्हां—

तत्र तां प्रवणामेव मातरं क्षौमवासिनीम् ।
वाग्यतां देवतागारे ददर्शायाचतीं श्रियम् ॥२।४।३०॥

" त्या देवगृहामध्यें त्याची माता कौसल्या सोवळें नेसून बसली होती. तिनें वाणीचें संयमन केलें होतें आणि नम्रभावानें कल्याण होण्यासाठीं ती परमेश्वराची प्रार्थना करीत होती असें रामाच्या दृष्टीला पडलें. ''

असें वर्णन आहे. तसेंच यापुढील वर्णनांत यज्ञयागासंबंधी उल्लेख नसून उलट—

प्राणायामेन पुरुषं ध्यायमाना जनार्दनम् ॥२।४।३३॥

---

1 There was no idol-worship in their devotion; their huts contained separate sacrificial altars for the various deities of the Vedas इंद्र, वरुण, यम and so on.

राम's palace also contained a separate आयतन for विष्णु. " श्रीमत्यायतने विष्णोः शिश्ये नरवरात्मजः ॥" 2-6-4 ॥ The commentator wrongly explains this by saying निजभवनवर्ति देवपूजालये. If it were a देवपूजालय, why is it called विष्णु's house? It appears that राम's palace had separate sacrificial apartments for each of the Vedic Gods in the same way as the humble habitation of अगस्त्य, Page 12.

" प्राणायाम करून ती जनार्दनाचें ध्यान करीत होती. "
असें लिहिलें आहे. यानंतर वनवासांत जावयाचें ठरलें त्या वेळीं तर याहून स्पष्ट शब्दांनीं मूर्तिपूजेचा निर्देश केला असून हवनकर्म वेगळें सांगितलें आहे:—

**कौसल्याऽपि तदा देवी रात्रिं स्थित्वा समाहिता ।**
**प्रभाते चाऽकरोत्पूजां विष्णोः पुत्रहितैषिणी ॥२।२०।१४॥**
**सा क्षौमवसना हृष्टा नित्यं व्रतपरायणा ।**
**अग्निं जुहोति स्म तदा मंत्रवत्कृतमंगलम् ॥ १५ ॥**

" कौसल्येनें रात्रीं स्वस्थ राहून पुत्राचें कल्याण व्हावें यासाठीं प्रातःकालीं विष्णूची पूजा केली. ती नेहमीं व्रतस्थ असे. ती त्या वेळीं सोंवळें नेसली होती. आणि समंत्रक स्वस्तिवाचन झाल्यावर ती आनंदानें अग्नीचें हवन करीत होती."

याशिवाय देवपूजेसंबंधीं अन्यत्र असलेले उल्लेख खालीं देतों:—

**देवागाराणि शून्यानि न भांतीह यथा पुरा ।**
**देवतार्चाः प्रविध्दाश्च यज्ञगोष्ठास्तथैव च ॥ २।७१।४१ ॥**
**येभ्यः प्रणमसे पुत्र देवेष्वायतनेषु च ।**
**ते च त्वामभिरक्षन्तु वने सह महर्षिभिः ॥ २।२५।४ ॥**
**देवकार्यं स्म सा कृत्वा कृतज्ञा हृष्टचेतना ॥ २।२६।४ ॥**
**कल्यमुत्थाय देवानां पूजां कृत्वा यथाविधि ।**
**वन्दितव्यो दशरथः पिता मम जनेश्वरः ॥ २।२६।३० ॥**

" हीं देवालयें शून्य झालीं असून त्यांना पूर्वीची शोभा राहिली नाहीं. देवतांच्या पूजा बंद झाल्या असून यज्ञांचीहि तीच स्थिति दिसत आहे. " " देवालयामध्यें तूं ज्यांना नमस्कार करितोस ते देव आणि महर्षि अरण्यामध्यें तुझें रक्षण करोत." "तिनें देवकार्य केलें आणि ती कृतज्ञ सीता आनंदित मनानें बसली होती. " " नित्य पहांटे उठून यथाविधि देवांची पूजा कर आणि राजा दशरथाला वंदन कर. "

यांतील पहिल्या व दुसऱ्या श्लोकांत देवागार व यज्ञागार यांचा स्पष्टपणें वेगळा उल्लेख केलेला आहे. घरोघर असणाऱ्या देवागारांशिवाय त्या वेळीं कांहीं सार्वजनिक देवालयें हल्लींप्रमाणें होतीं असें वाटतें. कारण रामाला राज्याभिषेक

व्हावयाचें ठरल्यावर ज्या ज्या स्थलीं पताका उभारण्यांत आल्या होत्या असें वर्णन आहे, त्यांत देवालयांचा उल्लेख केलेला आहे.

सिताभ्रशिखराभेषु देवतायतनेषु च ॥ २।६।११ ॥
ध्वजाः समुच्छ्रिताः साधु पताकाश्चाभवंस्तथा ॥ २।६।१२॥

" हिमालयपर्वताप्रमाणें भव्य आणि उंच असलेल्या देवालयांवर निशाणें आणि पताका उभारल्या होत्या. "

हीं घरोघरचीं देवालयें म्हणतां येणार नाहींत. कारण घरोंवर पताका उभारल्याचा वेगळा उल्लेख केला असल्यामुळें तीं सार्वजनिक नसतीं तर त्यांचा वेगळा उल्लेख करण्याचें कारण नव्हतें. एवंच रामायणकालीं मूर्तिपूजेचा प्रघात नव्हता, असें म्हणतां येत नाहीं.

## शास्त्रांतील प्रगति.

रामायणकालीं शास्त्रीय ज्ञानाची प्रगति किती झाली होती, तें आतां पाहूं. आध्यात्मिक ज्ञानाविषयीं भारतीयांचा अधिकार सर्व जगांत अधिक आहे व त्याविषयीं कोणाला संशयहि नाहीं. आधिभौतिक शास्त्रांविषयीं मात्र सांप्रतच्या खालावलेल्या परिस्थितीवरून अनुमान कोणीहि करितो व तें आपणांस मान खालीं घालावयास लावणारें असणार हें उघड आहे; पण याबरोबर हा परिस्थितीचा परिणाम आहे, इकडे लक्ष न देतां आमच्या प्राचीनकालच्या पूर्वजांनीं संपादिलेल्या ज्ञानाविषयीं जेव्हां तो तशींच निर्विवाद अनुमानें करूं लागतो, तेव्हां मात्र त्याला उत्तर देणें भाग असतें व तें देण्यासारखेंहि आहे. रामायण हा इतिहास आहे व त्यांत अशा दृष्टीनें कांहीं उल्लेख असतील ते शोधून काढिले म्हणजे अशा आक्षेपांस वेगळें उत्तर देण्याचें कारण नाहीं.

रामाच्या अध्ययनाविषयीं वर्णन करितांना त्यानें वेदाध्ययन केल्याचें सांगितल्यावर तो 'गजारोहण, अश्वारोहण, रथचर्या व धनुर्वेद' यांत निष्णात असल्याचें सांगितलें आहे ( १।१८।२७ ). भरताला मातुलगृहीं पाठवितेवेळीं दशरथानें त्याला तेथें असे तोंपर्यंत " अस्त्रविद्या, अश्वारोहण, रथचर्या, गायन व अन्य शिल्पकला यांचा अभ्यास करावयाचा उपदेश करून व्यायाम अल्प करण्यास सांगितल्याचें लाहोरप्रतींत लिहिलें आहे. (२।१।२४,२५) याच प्रतींत

भरतानें तेथें असतां पित्याकडे एक दूत पाठवून त्याबरोबर आपण राजाच्या आज्ञेप्रमाणें त्या त्या शास्त्रांचा अभ्यास करीत असल्याचें कळविलें आहे. ( २।२।३० ). दूताबरोबर पाठविलेल्या संदेशांत हस्तिशिक्षा, धनुर्वेद, चित्र-कला, उडी मारणें, पोहणें व ज्योतिःशास्त्र ( २।२।२८,२९ ) यांचे अधिक उल्लेख आहेत. यज्ञाकरितां सिद्धता करण्याची आज्ञा करिते वेळीं स्थापत्याचा उल्लेख असून ( १।१३।६ ) विटांचे मोठमोठे वाडे बांधण्याची आज्ञा केलेली आहे. ( १।१३।९ ) अरण्यांत गेल्यावर तेथील पर्णशाला लक्ष्मणानें स्वतां बांधिली असून तिच्या भिंती मातीच्या होत्या, तिला चांगले खांब बसविले असून लांब लांब कळकाचे वांसे तिला ठोकलेले होते, शमीच्या शाखा वांशा-वर आंथरल्या असून कुशकाश, देवनळ व पानें यांचें त्यांवर आच्छादन घातलें होतें ( २।१५।२१,२२ ) असें वर्णन आहे. अयोध्येचें वर्णन करितांना तिची तटबंदी, आंतील राजमार्ग, मोठमोठे वाडे यांतील वर्णनावरून स्थापत्य-विषयक प्रगति कळण्यासारखी आहे. तथापि ही पर्णशाला लक्ष्मणानें स्वतां बांधिल्याचें लिहिलें आहे, यावरून राजपुत्रांचा शास्त्रविषयक अभ्यास केवळ पुस्तकी नव्हता, हें दिसून येणारें आहे, म्हणून त्याचें महत्त्व विशेष आहे.

## व्यवसाय.

कित्येक कारागिरांचे रामायणांत उल्लेख आहेत, त्यावरून त्यांच्या व्यवसायां-तील त्यांच्या प्रावीण्याबरोबर त्या व्यवसायांविषयींची प्रगति गोचर होते; आणि असे व्यवसाय वंशपरंपरेनें करीत गेल्यानें व्यवसायानुरूप जातिसंख्या वाढूं लागली व ती अद्यापि विद्यमान आहे. अशा कारागिरांचे उल्लेख कोणते आहेत व त्यांचे व्यवसाय कोणते हें आतां पाहूं.

कर्मान्तिक = मजूर (१।१३।७)
शिल्पकार = कारागीर ,,
वर्धकि = सुतार ,,
खनक = खणणारा ,,
गणक = ज्योतिषी ,,
नट = सूत्रधार, नट; (१।१३।७) शैलूष = नट (२।८३।१५)

नर्तक = नाचणारा (१।१३।७)
सूत = सारथि (२।४।३)
" = पुराणीक (२।६५।२)
" = सुतार
द्वाःस्थ = द्वारपाल
दैवज्ञ (२।४।१८), दैवचिन्तक=फलज्योतिषी (२।४।२१)
मागध = वंशावळि सांगणारा (२।६।६)
बंदिन् = स्तुतिपाठक (२।६।६)
वादित्र = वाद्य वाजविणारा (२।१६।३६)
गायक = गवई (१।६५।२)
पाणिवादक = ताल धरणारा (२।६५।४)
स्नानशिक्षाज्ञ: = स्नान घालण्यांत कुशल (२।६५।८)
स्नापक = " (२।८३।१४)
व्यवहारिन् = व्यापारी (२।६७।१६)
यंत्रक = यंत्रांची माहिती असलेला (२।८०।१)
सूत्रकर्मविशारद = गवंडी (२।८०।१)
मार्गिन् = मार्गरक्षक (२।८०।२)
वृक्षतक्षक = झाडें तोडणारा (२।८०।२)
सूपकार = आचारी [२।८०।३]
सूद = " [२।१२।०६]
सुधाकार = चुना करणारा, चुना काढणारा [२।८०।३]
वंशकृत् = बुरूड [२।८०।३]
चर्मकृत = चांभार [२।८७।३]
मणिकार = जवाहिऱ्या [२।८३।१२]
कुंभकार = कुंभार [२।८३।१२]
शस्त्रोपजीविन् = शस्त्रें करणारा [२।८३।१२]
मयूरक = मोर वेऊन हिंडणारा, मोरपिसांचीं कामें करणारा २।८३।१३

| | | |
|---|---|---|
| क्राकचिक | = | कर्वतीनें कापणारा, चिरकाम करणारा [ २।८३।१३ ] |
| वेधक | = | रत्नांना भोंक पाडणारा [ २।८३।१३ ] |
| रोचक | = | कांचेच्या कुप्या वगैरे करणारा [ २।८३।१३ ] |
| दंतकार | = | हस्तिदंती काम करणारा [ २।८३।१३ ] |
| गंधोपर्जीविन् | = | सुगंधी उटणीं वगैरे करणारा [ २।८३।१३ ] |
| सुवर्णकार | = | सोनार [ २।८३।१४ ] |
| कंबलकारक | = | सणगर [ २।८३।१४ ] |
| वैद्य | = | वैद्य [ २।८३।१४ ] |
| धूपक | = | धूपावर निर्वाह करणारा [ २।८३।१४ ] |
| शौण्डिक | = | कलाल [ २।८३।१४ ] |
| रजक | = | धोबी [ २।८३।१५ ] |
| तुन्नवाय | = | कोष्टी [ २।८३।१५ ] |
| कैवर्तक | = | नावाडी [ २।८३।१५] |
| श्मश्रुवर्धन | = | न्हावी [ ६।१२८।१३ ] |

रामायणांतील या उल्लेखांवरून त्या वेळीं लोकांचे व्यवसाय कोणते होते, याची सामान्य कल्पना सहज होण्यासारखी आहे. यांतील कित्येक व्यवसाय स्वतंत्र आहेत तर कित्येक राजादिकांवर अवलंबून असणारे आहेत. कशीहि स्थिति असली तरी सर्वांची उपजीविका आपापल्या व्यवसायानें होत असे हें निर्विवाद आहे. यांतील कित्येक व्यवसायी यांचे उल्लेख रामाबरोबर ते वनांत गेल्याच्या निमित्तानें आले आहेत. अर्थात् त्या त्या व्यवसायांवर निर्वाह करणाऱ्या वर्गांचे हे उल्लेख आहेत असें मानणें भाग आहे. केवळ नामनिर्देशावरून वर्गा-विषयीं अनुमान करितां आलें नसतें, परंतु तें येथें निर्विवाद संभवतें व यासाठीं याचें महत्त्व आहे.

### वस्त्रें.

कित्येक व्यवसायांविषयीं रामायणांत स्वतंत्रपणें निर्देश नसला तरी अनु-मानानें ते जाणतां येण्यासारखे आहेत. तुन्नवायांचा—कोष्ट्यांचा—निर्देश वर दिलेला आहे, आणि त्यावरून एका व्यवसायाचें आपण अनुमान करितों; पण

त्यांत कापूस पिंजणें, सूत काढणें, रेशमाची निपज करणें, रेशमी सूत काढणें, इतक्या व्यवसायांचा अंतर्भाव होतो हें लक्षांत घेतलें पाहिजे. वस्त्रांच्या निर्देशावरून वल्कलांची कल्पना होणार नाहीं, पण त्या वेळीं वल्कलें परिधान करणारा मोठा वर्ग होता व म्हणून तीं करणारा वर्ग त्या वेळीं होता असें अनुमानणें अवश्य आहे. वस्त्रांविषयींचे भिन्न निर्देश रामायणांत स्पष्टपणें आहेत. राज्याभिषेकाच्या साहित्यांत कोऱ्या वस्त्रांचा आलेला उल्लेख वर दिला आहे. राम, आपण वनवासाला जात असल्याचें सांगण्याकरितां जेव्हां कौसल्येकडे गेला, तेव्हां ती रेशमी वस्त्र नेसली होती, [ २।२०।१५ ] व तें शुभ्र होतें, [ २।२०।१९ ] असें लिहिलें आहे. शुभ्रवर्णाच्या येथील निर्देशावरून इतर वर्णांचा निर्देश न मिळाला तरी त्यांचें अस्तित्व अनुमानितां येतें. सीतेला रावण घेऊन गेला त्या वेळीं तिचें नेसावयाचें वस्त्र रेशमी असून पिंवळें होतें असें वर्णन आहे. [ ४।५२।१४ ] व यावरून इतर वर्णांविषयीं अनुमान करणें धाडसाचें होणार नाहीं हें सांगावयास नको. गुह व भरत यांची भेट झाल्यावर गुहानें त्याला राम कोठें बसला, कोठें निजला वगैरे स्थलें दाखविलीं, त्या वेळीं भरतानें एके स्थलीं दिसणारे रेशमी तंतु पाहून " या ठिकाणीं सीतेचें उत्तरीय वस्त्र अडकलें होतें असें स्पष्ट होतें; कारण चिकटून राहिलेले रेशमाचे तंतु येथें झळकत आहेत. " [ २।८८।१५ ] असे उद्गार काढिले आहेत. आपल्या पुच्छाभोंवतीं तागाचीं व कापसाचीं वस्त्रें गुंडाळण्यांत आलीं असें मारुतीनें सांगितलें आहे. [ ५।५८।१५२ ]. वल्कलांचा निर्देश वाल्मीकि तमसातीरीं गेले असतां तेथें त्यांनीं आपला शिष्य भरद्वाज याजवळ वल्कल मागून घेतलें, असा प्रारंभीं आला आहे. [ १।२।६ ] वनवासाला निघतेवेळीं रामलक्ष्मणांनीं वल्कलें परिधान केल्यावर सीतेकरितां कैकयीनें आणून दिलेलें वल्कल तिला नेसतां येईना, तेव्हां तें रामानें तिच्या रेशमी वस्त्रावरून नेसविलें असें वर्णन आहे. [ २।३७।१४ ] वल्कलें प्रायः वनांत राहणारे मुनि वापरीत असत व यासाठीं त्याला मुनिवस्त्र असेंच नांव दिलेलें आहे. [ २।३७।७ ]. कापसाचीं किंवा रेशमाचीं वस्त्रें बारीक व हलकीं असावींत असें या वेळीं रामानें टाकून दिलेल्या वस्त्रांचें जें वर्णन आहे त्यावरून दिसतें. सांप्रत स्त्रिया एकवस्त्र परिधान करितात, परंतु त्या वेळीं दोन वस्त्रें

परिधान करीत असत व म्हणून वर उत्तरीयाचा निर्देश आलेला आहे. रावण सीतेला नेत असतांना ऋष्यमूक पर्वतावर कांहीं वानर बसलेले पाहून ते आपलें वृत्त रामाला कळवितील या आशेनें सीतेनें त्यांजकडे आपलें उत्तरीय वस्त्र व अलंकार टाकिल्याचें वर्णन आहे. ( ४।५४।२ ) वस्त्रें दोन असल्यामुळें नित्य हा व्यवहार करितां आला, हें उघड आहे.

## अलंकार.

सुवर्णकार व मणिकार यांच्या उल्लेखांवरून अलंकारांविषयीं कांहीं कल्पना होते. अलंकारांचे सर्व प्रकार रामायणांत कोठें तरी नोंदले गेले आहेत, असें नाहीं. तथापि जे कांहीं आहेत त्यांचा येथें संग्रह केल्यास या कल्पनेला मूर्त स्वरूप येण्यास अडचण नाहीं. सीतेनें उत्तरीयांत अलंकार बांधून टाकिल्याचा वर उल्लेख आला आहे, तेथेंहि तो मोघम आहे; तथापि हे अलंकार जेव्हां सीतेच्या कल्पनेप्रमाणें त्या वानरांनीं दाखविले तेव्हां ते पाहून लक्ष्मणानें " सीतेच्या वांक्या अथवा बाजूबंद ( केयूर ) मला ओळखितां येत नाहींत व कुंडलेंहि ओळखितां येत नाहींत. नित्य पदाभिवंदनाच्या वेळीं पहात असल्यामुळें तोरड्या ( नूपुर ) मात्र ( तिच्या म्हणून ) ओळखितां येतात." (४।६।२३) असें सांगितलें व त्याच्या या भाषणावरून या तीन अलंकारांची कल्पना होते. प्रथम अयोध्येचें सामान्य वर्णन आहे. त्यांत नागरिकांचे सर्वसामान्य अलंकारांचे उल्लेख आहेत. त्यांत कुंडलें, मुकूट, बाहुभूषण (अंगद), उरोभूषण ( निष्क ) ( १।६।१०,११ ) हे अलंकार आले आहेत. मंथरेनें रामाला वनवासाला पाठविण्याची कल्पना कैकयीला सुचविल्यावर तिनें संतुष्ट होऊन सुवर्णाची माला देण्याचें वचन दिलें. ( २।९।४७ ) त्या निमित्त हा अलंकार आपणांस कळतो. रामानें वनांत जातेवेळीं जीं दानें दिलीं आहेत, त्यांत सोन्यांत ओंवलेल्या रत्नमाला, हार, हेमसूत्र, रशना (कमरपट्टा), आंगठ्या [वलयें] हे अलंकार अधिक आहेत. ( २।३२।५-७ ) मारुतीबरोबर रामानें आपलें नांव वर कोरलेली आंगठी दिली होती. [ ५।३६।२ ] सांप्रत आपणांस माहीत असलेल्या अलंकारांहून हे फार कमी आहेत, हें वेगळें सांगावयास नको. किरीटादि अलंकार सर्वसामान्य नसले तरी त्यांचा समावेश यांतच केला पाहिजे व अशांचा

संग्रह करावयाचा म्हणजे त्याचें सिंहासन व किरीट रत्नजडित असून त्याची सर्व सभा सोन्यानें मढविलेली होती, [ ६।१२८।६५ ] हें येथें सांगणें अवश्य आहे. रामाला सुमंत्र बोलवावयास गेला, तेव्हां तो सुवर्णमंचकावर बसला होता. [ २।१६।८ ] वनांत निघतेवेळीं रामानें दान दिलेला मंचक रत्नखचित असून त्यावर उत्कृष्ट आस्तरणें होतीं. [ २।३२।९ ].

## नाणीं.

लोकांचा व्यवहार सुरळीत व पुष्कळ व्हावयाचा म्हणजे त्याला नाण्याची आवश्यकता आहे. व्यापाराची उलाढाल साधारण असली तरी नाण्यावांचून ती करावयाची म्हणजे व्यापार केवळ जिनसांच्या मोबदल्यांत करावा लागतो व तसा करावयाचा म्हणजे पदोपदीं अडचणी येणार, हें उघड आहे. रामायणांत त्यां वेळीं चालू असलेल्या व्यवसायांची जी माहिती वर सांगितली आहे तीवरून त्या वेळचा व्यवहार परिस्थितीच्या मानानें मोठा होता व तो चालविण्यास विनिमयाचें साधन असणें अपरिहार्य होतें. त्या वेळच्या नाण्याचें मोल आणि माप कळण्यास साधन नाहीं. तथापि सांप्रत जें सोन्याचें नाणें देशाच्या सांपत्तिक उन्नतीचें लक्षण मानण्यांत येतें तें त्या वेळीं प्रचलित होतें, हें येथें सप्रमाण दाखवितां येण्यासारखें आहे. वनांत निघतेवेळीं रामानें आपल्या गजाचें जें दान दिलें त्याबरोबर एक सहस्र निष्क दक्षिणा दिल्याचें लिहिलें आहे. ( २।३२।१० ) हें नाणें कोणत्या धातूचें हें येथें लिहिलें नाहीं; तथापि कुशलवांनीं रामायण रामापुढें गायिलें त्या वेळीं पहिल्या दिवशीं त्यांना अठरा हजार सुवर्ण देण्याची रामानें आज्ञा केली, [ ७।९४।१७ ] असें लिहिलें आहे; व येथील संख्यानिर्देशावरून तें नाणें होतें, हें उघड आहे. हें नाणें सोन्याचें होतें हें त्यांतील सुवर्णशब्दावरून दिसतें व तें सोन्याचें होतें म्हणून नाण्यालाच सुवर्ण अशी संज्ञा प्रचलित असावी, असें वाटतें.

## वैद्यक.

वैद्यकीवरील एकाद्या ग्रंथाविषयीं रामायणांत उल्लेख नाहीं; तथापि त्या विषयासंबंधानें लोकांत ज्ञानाचा प्रसार होऊन कांहीं लोक निपुण होते असें अनुमानावयासारखीं प्रमाणें रामायणांत आहेत. कैकयीनें दशरथाजवळ ज्या वेळीं

रामाला वनांत पाठविण्याचा वर मागितला, त्या वेळीं राजानें तिची जी निर्भर्त्सना केली तींत त्यानें, " अपथ्य पदार्थांनीं युक्त असलेलें अन्न भक्षण केलें असतां रोग्याला ज्याप्रमाणें पीडा होऊं लागते त्याप्रमाणें तुझ्याशीं मीं जें चांगलें वर्तन केलें, त्याची मला आतां पीडा होत आहे." (२।१२।७१) असे उद्गार काढिले आहेत. राजा मरण पावला तोहि रात्रीं कौसल्येसह रामविषयक कथा बोलून निजला तीच त्याची अंतिम निद्रा. सकाळीं बंदिजन राजाला उठविण्याकरितां आले असतां तो उठत नाहीं, असें पाहून कांहीं स्त्रिया जवळ जाऊन पाहूं लागल्या व हालचाल दिसत नाहीं असें पाहून कित्येक स्त्रिया पुढें होऊन त्यांनीं चलन पावणाऱ्या नाड्या तपासून पाहिल्या व राजाचें प्राणोत्क्रमण झालें, असें त्यांनीं निश्चयानें ठरविलें. ( २।६५।१४ ) या स्त्रियांना निद्रेचीं लक्षणें उत्तम प्रकारें कळत होतीं ( स्वप्नशीलज्ञाः ) असें येथें लिहिलें आहे. अर्थात् निद्रा, मूर्च्छा व मृत्यु यांतील भेद त्यांना कळत होता, हें निर्विवाद आहे. रामलक्ष्मण इंद्रजिताच्या शरबंधांत बद्ध होऊन रणांगणावर पडले असतां सुग्रीवाला त्यांच्या जीविताविषयीं शंका वाटूं लागली. त्या वेळीं बिभीषणानें " आसन्नमरण झालेल्या पुरुषाची कान्ति नष्ट होते तशी रामाची कान्ति नष्ट झालेली दिसत नाहीं. " ( ६।४६।४१ ) असें सांगून त्याची शंका दूर केल्याचें लिहिलें आहे. वनांत निघतेवेळीं कौसल्येनें रामाच्या हातांत " विशल्यकरणी " नामक ओषधी मंत्रवून बांधिली होती. ( २।३५।३८ ) वनस्पतीच्या नांवावरून शरीर शल्यरहित करण्याचा तिचा तिचा गुण असावा, असें वाटतें.

वनस्पतींच्या ज्ञानाप्रमाणें रसायनांचें ज्ञान शास्त्रदृष्ट्या महत्त्वाचें आहे व त्याचा उल्लेख उपमा देतांना एके स्थलीं आला आहे. सीतेविषयीं विलाप करितांना रामानें " रोगी मनुष्य उत्सुकतेनें ज्याप्रमाणें रसायनाचें सेवन करितो, त्याप्रमाणें सीतेचें मुखपान आपण केव्हां बरें करूं ? " [ ६।५।१३ ] असें म्हटलें आहे.

वालिवधानंतर वर्षाकालीं माल्यवान् पर्वतावर राहात असतां आकाश मेघाच्छादित झालेलें पाहून रामानें " संध्याकालच्या आरक्त वर्णानें युक्त झाल्यामुळें ताम्रवर्ण आणि शेवटीं श्वेतवर्ण असून स्निग्ध दिसत असलेल्या अभ्ररूप

फडक्यांनीं आकाश जसें कांहीं जखम बांधलेल्या पुरुषाप्रमाणें दिसत आहे." (४।२८।५) असें वर्णन केलें आहे. येथें त्या कालांतील व्रणचिकित्सा सूचित होत आहे.

वैद्यकीचा व्यवसाय करणारे कांहीं लोक असल्याचें पूर्वी दिलेल्या नांव-निशीवरून कळलें तरी त्यांच्या ज्ञानाचें अनुमान त्यावरून कांहींच करितां येणार नाहीं. यासाठीं तद्विषयक रामायणांतील उल्लेखांचा हा संग्रह केला आहे.

## वृक्षविषयक ज्ञान.

वैद्यकीच्या निमित्तानें वनस्पतीचें ज्ञान वैद्याला व साहचर्यात् समाजाला असणें साहजिक आहे. वृक्षांचें ज्ञान त्याबरोबर येतें. वनस्पतीविषयीं रामायणांत प्रसंग नसल्यामुळें उल्लेख नाहींत. राम अरण्यांत गेल्याच्या निमित्तानें वृक्षांची माहिती अधिक झाली आहे. वृक्षांच्या गुणधर्मांविषयीं जरी त्यांत कांहीं लिहिलें नसलें तरी त्यांच्या नामनिर्देशांचें महत्त्व आहे. गहन अरण्यांचें वर्णन केवळ वृक्षांच्या दाटीचा निर्देश करून करितां येण्यासारखें आहे; पण रामायणांत तसें केलेलें नाहीं. वृक्षांचे निर्देश कोणत्या कथेच्या निमित्तानें केलेले आहेत हें सांगण्याची तादृश आवश्यकता नाहीं. यासाठीं तसें न करितां केवळ नांवें येथें देऊन पुढील विषयाकडे वळूं:-१ वट (२।५५।७), २ साळई, ३ बोरी, (२।५५।९) (विंध्याद्रीवरील) ४ आंबा, ५ जांब, ६ आसणा, ७ लोध्र, ८ खिरणी, ९ फणस, १० धव, ११ अक्रोड, १२ तिवस, १३ बेल, १४ टेंबुर्णी, १५ कळक, १६ शिवणी, १७ निंब, १८ वायवरणा, १९ मोहा, २० तिळवा, २१ आंवळी, २२ कळंब, २३ वेत, २४ कुडा, २५ इडनिंबू, (२।९४।८।९) (चित्रकूटावरील) २६ साल, २७ ताल, २८ तमाल, २९ खजूर, ३० जल-कदंब, ३१ नागचांफा, ३२ अशोक, ३३ तिलक, ३४ केवडा, ३५ चंदन, ३६ ओट, ३७ अश्वकर्ण, ३८ खैर, ३९ शमी, ४० पळस (३।१५।१६।८), ४१ मालती, ४२ मोगरी, ४३ कमल, ४४ कणेरी, ४५ निर्गुंडी, ४६ कुसरी, ४७ महाळुंग, ४८ कुंद, ४९ करंज, ५० बकुळ, ५१ नील, ५२ पिस्ता, ५३ कोरांटी, ५४ सीवरी, ५५ मंदार, ५६ उद्दालक, ५७ शिरीष, ५८ शिंशपा, ५९ तांबडी कोरांटी, ६० शिंदी (पंपातीरावरील ४।१।७६-८३),

६१ अर्जुनसादडा, ६२ कस्तुरी मोगरा, ६३ पाणवेत, ६४ तिमिद (?), (प्रस्रवणावरील ४।२७।१०।१८), ६५ प्रसेक(?), ६६ पिंपरी, ६७ अंबाडा, ६८ रक्तचंदन, ६९ पाडळी, ७० नील अशोक (सह्याद्रीवरील ६।४।७४–८३) अशा प्रकारें रामायणांतील वृक्षविशेषांचा हा संग्रह विशाल आहे. स्थलनिर्देशावरून त्या त्या स्थलीं तेवढे वृक्षविशेष असल्याचें मात्र कोणी समजूं नये. वृक्षविशेष-निर्देशांचा हा संग्रह त्या वेळीं कोणकोणत्या वृक्षांचे गुणधर्म कळले होते हें कळावें या हेतूनें केला आहे आणि याकरितां एकदां आलेलें नांव पुनः आलें असतां दिलें नाहीं. कित्येक वृक्ष अजूनहि राहिले असतील. तथापि वरील संग्रह आमचा हेतु सिद्धीस नेण्यास समर्थ आहे. वृक्षांचे निर्देश केवळ नांवापुरते नाहींत हें येथें लक्षांत ठेविलें पाहिजे. त्या त्या प्रदेशांत होणारे वृक्ष त्या प्रदेशाच्या वर्णनांत आले आहेत आणि वृक्षांचीं वर्णनें मार्मिकपणें केलेलीं आहेत. वटवृक्षाचें वर्णन करितांना भोंवतीं पुष्कळ वृक्ष वेढून राहिले असून हिरव्या पानांनीं आच्छादित असल्याचें लिहिलें आहे. कुंदांचीं झांकरें सांगितलीं आहेत. महाळुंग फळांनीं पूर्ण असलेला दाखविला आहे. नागचांफे फुललेले वर्णिले आहेत. लोध्र वृक्षाला सिंहाच्या आयाळीच्या वर्णाची उपमा दिली आहे. अर्थात् येथील वृक्षांचीं वर्णनें कालस्थलांचा विधिनिषेध न बाळगितां संग्रहबुद्धीनें केलेलीं नाहींत.

## पशु आणि पक्षी.

रामचरित्रांतील मुख्य भाग अरण्यांत घडलेला आहे. इतका कीं रामायणांतील अर्ध्याहून अधिक भाग त्या चरित्रानें व्यापून टाकिला आहे. रामायणांतील मुख्य कामगिरी पशु आणि पक्षी यांनीं केली आहे; पण ही कामगिरी बजाविणाऱ्या या वर्गाविषयीं स्वतंत्र विचार करावयाचा आहे. आणि यासाठीं सामान्यपणें पशुपक्ष्यांविषयीं समाजानें किती ज्ञान संपादिलें होतें हें रामायणांतील उल्लेखांवरून प्रस्तुत अनुमानावयाचें आहे. चतुरंग सेनांमध्यें हत्ती आणि अश्व यांची आवश्यकता असते. व त्यानिमित्त केलेल्या संग्रहाचें वर्णन करितांना या प्राण्यांविषयीं ओघाबरोबर माहिती आली आहे. दशरथाच्या सैन्यामध्यें रथ आणि स्वार यांचेकरितां जे अश्व बाळगिले होते ते भिन्न भिन्न प्रदेशांतील होते आणि

हें सांगतांना कांबोज, वाल्हीक, वनायुज व सिंधुनदीसमीपचा प्रदेश इतक्या देशांचीं नांवें आलीं आहेत. ( १।६।२२ ) गजांचे भेद याहून अधिक दिले आहेत. विंध्याद्रि व हिमालय यांवरील ऐरावत, महापद्म, अंजन व वामन या दिग्गजांच्या कुलांतील गज त्याच्या संग्रहीं होते. विंध्याद्रि, हिमालय व सह्याद्रि यांवरील गजांना अनुक्रमें भद्र, मद्र व मृग अशा संज्ञा होत्या आणि या तीन जातींतील संयोगापासून संकरजातीची उत्पत्ति होऊन तो एक संग्रह झाला होता. ( १।८।२३,२५ ) गजांचें सामान्य स्वरूप 'पर्वतप्राय, अति बलाढ्य व नेहमीं मदस्राव होत असलेले' असें मानिलें आहे. केकयाधीपतीनें भरताला दिलेल्या भेटींत इंद्रशिर देशांतील गजांचा एक वर्ग सांगितला आहे. (२।७०।२३) सुवर्णमृगाकरितां बाहेर निघतांना रामाच्या भाषणांत मृगांचे भेद आले आहेत. कदली व प्रियकी या दोन जातींच्या मृगांच्या अजिनापेक्षां प्रस्तुत सुवर्ण-मृगाचें अजिन मृदु असावें अशी कल्पना रामानें येथें व्यक्त केली आहे. ( ३।४३।३६ ) राम वनवासाला निघतांना कौसल्येनें त्याला जे आशीर्वाद दिले त्यांत कित्येक वन्यपशूंचा निर्देश आहे. "वानर, वृश्चिक, मक्षिका, सर्प व कीटक गहन वनामध्यें तुझ्यासमीप न येवोत. मोठमोठे गज, सिंह, व्याघ्र, मोठ-मोठ्या दाढा असलेले अस्वल, क्रूर व मोठीं शिंगें असलेले महिष, हे पुत्रा, तुझा द्रोह न करोत." ( २।२५।८,१९ ). पशूंबरोबर ओघानें यांत इतर प्राणीहि आले आहेत आणि मूलग्रंथ अबाधित राखण्याकरितां ते येथें सांगावे लागले आहेत. भरताला त्याच्या मामानें दिलेल्या भेटींत शीघ्रवेगी व चांगले सजविलेले खर [ २।७०।२३] आणि अंतःपुरामध्यें वाढविलेले, धीर्य आणि बल यांमध्यें वाघाची बरोबरी करणारे, मोठमोठ्या दाढा असलेले लठ्ठ कुत्रे असल्याचें (२।७०।२०) लिहिलें आहे. अयोध्येंतील सेनेमध्यें खर आणि कुत्रे यांचा उप-योग करून घेत असल्याचें दिसत नाहीं, पण केकय देशामध्यें त्यांचा उपयोग विशेष करीत असावे असें दिसतें. कोल्ह्यांचा निर्देश शकुनाचेनिमित्त आला आहे. अरण्यें व नद्या यांच्या वर्णनाच्या निमित्तानें पक्ष्यांचीं वर्णनें रामायणांत पुष्कळ वेळां आलीं आहेत. उदकाचें वर्णन करण्याचा प्रसंग आला आणि तेथें हंस, कांसव, सारस, आणि चक्रवाक नाहींत असें व्हावयाचें नाहीं. त्यांचा वर्ण, मधु-

स्वर, आवडीनिवडी यांचा जेथें तेथें उपयोग केला आहे. गरुड, टिट्टिभ इत्यादिकांची उपमा कोठें कोठें दिली आहे. काकोलूकादि कित्येक पक्षी शकुनाच्या निमित्तानें पुढें आले आहेत. शकुनाच्या निमित्तानें वंचुलक नामक पक्ष्याचा निर्देश आला आहे. [३।६९।२३] रामलक्ष्मण शरबंधांत सांपडून भूमीवर पडले असतां त्यांना साळईची उपमा दिली आहे: [६।५०।७] विविध पक्ष्यांचा संचार आकाशांत किती किती उंचावर होऊं शकतो, याविषयीं सविस्तर वर्णन संपातीच्या भाषणांत मार्मिकपणें आलें आहे. "चिमण्या व इतर धान्योपजीवी पक्षी पहिल्या मार्गांत, कावळे व इतर फलोपजीवी पक्षी दुसऱ्या मार्गांत; भास, क्रौंच व कुरर तिसऱ्या मार्गांत; श्येन चवथ्या मार्गांत; गृध्र पांचव्या मार्गांत; हंस सहाव्या मार्गांत आणि गरुड सातव्या मार्गांत संचार करितात." [४।५८।२३-२७] असें त्यानें सांगितलें आहे. गरुडाचें दृष्टिबल तर त्यानें शंभर योजनें सांगितलें आहे. वनवासाला गेल्यावर पहिल्या दिवशीं एका वृक्षाखालीं रामानें वस्ती केली त्या दिवशीं रात्रीं लक्ष्मणाला उद्देशून त्यानें जें भाषण केलें त्यांत राजवाड्यांतील सारिकेचा उल्लेख आला आहे. ही सारिका कौसल्येच्या मंदिरांत असून तिला "अरे शुका, शत्रूच्या पायाला दंश कर" [शुक, पादमरेर्दश २।५२।२२] असें बोलावयाला शिकविलें होतें.

## युद्धपद्धति.

रामायणांतील वर्णिलेलें युद्ध मनुष्य, वानर व राक्षस यांमध्यें झालेलें आहे, हें सर्वविदित आहे. आपणांस युद्धपद्धति मनुष्यांमध्यें कशी होती, हें पहावयाचें आहे व तशा दृष्टीनें वर्णन करावयाचें तर मनुष्यामनुष्यांतील युद्ध रामायणांत प्रायः नाहीं. तथापि वर्णिलेल्या युद्धावरून त्याविषयीं अनुमान करितां येण्यासारखें आहे, व तें आतां करावयाचें आहे. चतुरंग सैन्याचा निर्देश रामायणांत आहे व दशरथाची सेना विशाल असल्याचें सांगितलें आहे. आतां युद्धाचे ठायीं मुख्यतः उपयोगी असलेलीं शस्त्रास्त्रें कोणतीं होतीं, तें पाहूं. मुख्य शस्त्र बाण असून त्याचे भेद अनंत दिसून येतात. बाणांचें अग्र पोलादी असून दुसऱ्या बाजूला पिसें लाविलेलीं असत. हे बाण विविध मंत्रांनीं अभिमंत्रित करून सोडावयाचे असत. ज्याच्या मंत्राचें अभिमंत्रण करावयाचें त्याला

अनुसरून त्यांना भिन्न भिन्न संज्ञा असत. विश्वामित्राच्या यज्ञरक्षणार्थ रामलक्ष्मण गेले असतां मार्गांत ऋषींनीं रामाला बला आणि अतिबला नामक मंत्रांचा उपदेश केला. ( १।२२।१२,७ ) या मंत्रांच्या योगानें निद्रिस्त अथवा असावध असतां राक्षस जवळ येण्याचा संभव नाहीं, असें मुनींनीं सांगितलें. यानंतर दुसरे दिवशीं मुनींनीं रामाला नानाविध अस्त्रें दिलीं. अस्त्रांचा प्रयोग करितेवेळीं म्हणावयाचे मंत्रांचा त्यांनीं उपदेश केला, असें येथें स्पष्ट सांगितलें आहे. पण याबरोबर मंत्रांचा जप करितांच तीं मूर्तिमंत पुढें उभीं राहिल्याचें [ १।२७।२४ ] म्हटलें आहे, त्याअर्थीं केवळ मंत्रांप्रमाणें तीं अदृश्य मानितां येत नाहींत. अस्त्रांमध्यें शैव, शूलवत्, ब्रह्मशिरस्, ऐषीक, ब्राह्म, पैनाक, नारायण, आग्नेय वगैरे अनेकविध अस्त्रांचीं नांवें दिलीं आहेत. यावरून बाणांनाच त्या त्या मंत्राच्या निमित्तानें या भिन्न संज्ञा पडल्या असाव्यात, असें वाटतें. या अस्त्रसमुदायांत कांहीं नांवें अशीं आहेत कीं, त्यांवरून त्यांपैकीं कांहीं बाणांहून भिन्न असावींत, असें दिसतें. कालचक्र, विष्णुचक्र, धर्मचक्र व इंद्रचक्र अशीं चार चक्रें, मोदकी आणि शिखरी नामक गदा; धर्म, काल व वारुण संज्ञक पाश व खड्ग अशीं भिन्न नांवें यांत आलीं आहेत. याशिवाय शूल, परिघ, प्रास, तोमर यांचीं नांवें अन्यत्र आलीं आहेत. अस्त्रांचा विनियोग करावयाचा त्याप्रमाणें उपसंहार करावयाचे मंत्र वेगळे असत व ते विश्वामित्रांनीं रामाला उपदेशिल्याचें लिहिलें आहे. लंकेच्या वर्णनांत, तिचे तटांवर बाण व दगड फेंकण्याचीं मोठमोठीं बळकट यंत्रें ठेविलीं असून त्यांच्यायोगानें शत्रूचें सैन्य परत फिरवितां येत असे ( ६।३।१२ ) असें लिहिलें आहे. अंगदादि वानर सीताशुद्धीनंतर तें वृत्त रामसुग्रीवांना कळविण्याकरितां मधुवनांतून परत फिरल्याचें लिहितांना "यंत्रांतून वर उडालेल्या पाषाणांप्रमाणें त्यांनीं उड्डाण केलें.' ( ५।६४।२४ ) अशी उपमा दिलेली आहे. या उपमेवरून वरील यंत्र अभिप्रेत असावें, असें दिसतें. लंकेच्या वर्णनांत बाण व दगड फेंकण्याचीं यंत्रें म्हणून भिन्नतादर्शक निर्देश आहे, तेव्हां दगड फेंकण्याचें यंत्र म्हणजे गोफण असावी, असें वाटतें. आतां शतघ्नी म्हणून जें दुसरें यंत्र आढळतें, तीच तोफ असावी, अशी आमची शंका आहे व कित्येक विद्वान् तोफ हा तिचा

प्रतिशब्द म्हणून उपयोजितातहि. लंकेच्या वरील वर्णनांत शतघ्नीविषयीं " लोखंडी, तीक्ष्ण आणि भयंकर " (६।३।१३) असे शब्द आहेत. तिचा उपयोग कसा करीत हें कळण्यास मार्ग नाहीं. दारूचा शोध त्या वेळीं लागला नव्हता, असें जें रा. ब. महाजनी यांनीं अनुमान केलें आहे* तें ग्राह्य वाटत नाहीं. शतघ्नींचा उल्लेख अयोध्येच्या वर्णनांतहि आला आहे. (१।५।११) यांचा उपयोग केल्याचा कोठें उल्लेख नाहीं. मात्र " दारू " याचा प्रतिशब्द अग्निचूर्ण हा उपमेच्या निमित्तानें रामायणांत आला आहे. युद्धकांडांत समुद्राचें वर्णन करण्याच्या निमित्तानें पुढील श्लोक आला आहे.

अग्निचूर्णमिवाऽऽविध्दं भास्वरांबुमहोरगम् ।
सुरारिनिलयं घोरं पातालविषयं सदा ॥ ६।४।११७ ॥

वानरसेना समुद्रतीरीं उतरली असतां रात्रीं समुद्राची शोभा कशी दिसत होती, त्याचें हें वर्णन आहे. पाण्यांत लकलकणारे मोठमोठे पाणसाप फिरूं लागले असतां, दारुकाम सोडलें म्हणजे तें जसें वक्रगतीनें उडत जातें तशी शोभा दिसत होती, असा याचा आशय आहे. समुद्रांत अथवा खाडींत काळोख्या रात्रीच्या वेळीं जलचरांची हालचाल झाली किंवा नावाड्यांनीं वल्हीं फिरविलीं तरी उदकांत लकलकून रेषा दिसते व लागलींच अदृश्य होते, याचा अनुभव समुद्रांत प्रवास करणारांना नेहमीं मिळणारा आहे, आणि या शोभेला दारुकामाचा येथें दृष्टांत दिलेला आहे. दारूचा उपयोग युद्धभूमीवर केल्याचें रामायणांत लिहिलेलें नसलें तरी त्यावरून वरील कारणासाठीं रा. ब. महाजनी यांच्याप्रमाणें तर्क करवत नाहीं.

त्या वेळीं युद्ध व्हावयाचें म्हणजे दोन्ही बाजूंची सेना समोरासमोर येऊन होत असे. विरुद्ध पक्षाचा नाश फार दूर राहून करण्याचीं साधनें जशीं जशीं उपलब्ध होत आहेत तसें तसें दोन पक्षांमधील अंतर वाढत जात आहे. गदा, शूल, इत्यादि कित्येक प्राचीन आयुधांवरून त्या वेळचीं युद्धें दोन पक्षांतील वीर अगदीं जवळ येऊन त्यांमध्यें होत असत हें निर्विवाद आहे. आणखी कित्येक स्थलीं तर दोन पक्षांकडील वीरांचीं रणांगणावरील भाषणें दिलेलीं असतात.

* रामायणकालीन लोकस्थिति, पृ. २८.

बाण हेंच त्या वेळीं दूर राहून युद्ध करण्याचें साधन; तथापि प्रतिपक्ष्याच्या मर्मस्थानीं लक्ष्य धरून बाण सोडावयाचा म्हणजे दृष्टीच्या टप्याचे आंत प्रतिपक्षी असावयाचा आहे. प्रतिपक्षी दृष्टीच्या पलीकडे राहून युद्ध केल्याचें वर्णन रामायणांत एकदां आहे व तें इंद्रजिताविषयीं आहे. त्याचा रथ आकाशगामी (वैहायस रथ (६।८०।२२) असल्याचें येथें लिहिलें असून त्या रथांत बसून तो फार उंच गेला व यामुळें रामपक्षाकडील वीरांला तो दिसेनासा झाला. या वेळीं रामलक्ष्मणांनीं बाण जेथून येत असे तेथें लक्ष्य धरून बाण सोडले. तरी तो आकाशांत अखंड फिरत राहून युद्ध करूं लागल्यामुळें त्यांचे प्रयत्न वाया गेले. इंद्रजिताचा हा रथ म्हणजे विमान असावें असें वाटतें. रावणाजवळ पुष्पकनामक विमान होतें असें रामायणांत लिहिलें असलें तरी युद्धाचे वेळीं त्याचा उपयोग केल्याचें दिसत नाहीं. इतर सर्व युद्धप्रसंग दोनही पक्ष रणांगणावर येऊन आणि दिवसा घडले आहेत. एकदां मात्र सूर्यास्त झाल्यानंतर रात्रीं युद्ध चालू असल्याचें वर्णन आहे. (६।९९।३०) भारतीयुद्धांत रथ्याचें रथ्याशीं व पदातीचें पदातीशीं अशा प्रकारें युद्ध करण्याचे नियम पाळीत असत; पण रामायणांतील युद्धच विषम पक्षांमध्यें होतें, मग तेथें हा नियम कसा पाळावयाचा? तथापि प्रायः एका वीराचें प्रतिपक्षांतील एका वीराशीं युद्ध होत असे. शेवटचें युद्ध होतांना मात्र रावणाशीं राम आणि लक्ष्मण या दोघांनीं युद्ध केलें.

युद्धाला प्रारंभ करण्यापूर्वी शेवटचा उपाय म्हणून प्रतिपक्षाकडे दूत पाठविण्याची पद्धति राजनीतिशास्त्रांत प्रसिद्ध आहे व त्याप्रमाणें रामानें अंगदाला रावणाकडे पाठविला होता. अशा दूताचा उपयोग प्रायः कांहीं होत नसतो; व या वेळींहि झाला नाहीं. युद्धाला सिद्ध झाल्याची ही पूर्वसूचना असते. अशा दूताला तो विरुद्ध बोलला तरी—आणि त्याचें भाषण विरुद्ध असणार हें उघड आहे—अपाय करूं नये अशी नीति आहे. परंतु अविचारी अधिपतींला हा विचार रहात नाहीं व ते दूताला स्वतःच्या प्रजाजनाप्रमाणें शिक्षा करूं लागतात. रावणानें रामाकडील दूत मारुती व अंगद यांना ते दूत असतां बांधून शिक्षा करण्यास कमी केलें नाहीं. ते आपल्या चातुर्यानें मुक्त झाले हा भाग वेगळा. दूत परत आल्यावर युद्धाकरितां दोहोंकडील सेना सिद्ध होत असे.

युद्धभूमि दोनहि पक्षांनीं आधीं योजून ठेवणें शक्य नसतें; अर्थात् प्रत्येक पक्ष दुसऱ्याच्या प्रदेशांत युद्ध व्हावें अशा सावधानतेनें आपण पुढें निघण्याची योजना करीत असे. मात्र स्वतःची सिद्धता पूर्णपणें आहे व संरक्षणाचीं साधनें किल्ले, खंदक वगैरे आपल्यापाशीं आहेत असें दिसलें तर प्रतिपक्षाकडे आपण जाण्यापेक्षां स्वतः दक्षतेनें राहून शत्रूला अंगावर घेण्यांत जयाचा संभव अधिक असे. युद्धाची सिद्धता दूतद्वारा कळल्यावर यांपैकीं कोणती तरी एक योजना होत असे. रामाला युद्धभूमि ठरविण्याचें प्रयोजन नव्हतें. कारण दक्षिणेकडील हा प्रदेश त्याच्या अधिकारांतला नव्हता. दूत आल्यावर रावण सावध होऊन त्यानें लंकेच्या रक्षणाची व्यवस्था केली. तथापि वानरांनीं हल्ला करून नगरींत नासधूस करीपर्यंत रावणाला शत्रु आपणाकडे येत असल्याचें वृत्त आधीं कोणीं कळविलें नाहीं. हें त्याच्या असावधानतेचें लक्षणच होय. शत्रूवर चालून जावयाचें म्हणजे फार सावधानपणें जावें लागे. दूत परत येऊन युद्ध करण्याचें ठरल्यावर आपल्यावर प्रतिपक्षी चालून येणार असें समजून शत्रु त्याला विघ्न करण्याचा प्रयत्न करूं लागतो. अशीं विघ्नें म्हणजे शत्रूचें सैन्य पुढें येऊं नये म्हणून त्याजकडील वीर फोडणें, सैन्याला खाणेंपिणें मिळूं नये असें करणें, उदकांत विष घालणें, शत्रूवर अचानक हल्ला करणें, मार्गांतील वृक्षादि तोडून मार्ग दुर्गम करणें वगैरे होत. रामाची सेना पुढें निघाली त्या वेळीं त्यानें याविषयीं सेनापति नील याला बोलावून स्पष्ट सूचना केली. " दुरात्मे राक्षस मार्गांत मुळें, फळें व उदक दूषित करून टाकितील; यास्तव नित्य दक्ष राहून तूं आपल्या सैन्याचें रक्षण कर. खड्डयांतून, वनरूप किल्लयांतून आणि वनांतून शत्रूंनीं सैन्य ठेविलें आहे कीं काय, तें उड्डाण करून जातांना वानरांनीं पहात असावें." ( ६।४।१२–१३ ) रामाच्या कल्पनेप्रमाणें मार्गांत कांहीं आढळलें नाहीं. पण याचें कारण रावणाचें सौजन्य नसून स्वतःच्या सामर्थ्याची घमेंड होय. सेनांची व्यवस्थित मांडणी करण्याचें काम यापुढील होय. भारती युद्धाप्रमाणें व्यूहांचे विविध भेद रामायणकालीं विशेष दिसून येत नाहींत. निदान वर्णन केलेले नाहींत. वानरसेना लंकेसमीप गेल्यावर प्रथम त्यांनीं सैन्याची रचना करून मुख्य मुख्य स्थळीं बलाढ्य वीरांची योजना केली. (६।२४।१४,

२० ) रावणाचा सावधपणा पूर्वी मुळींच नव्हता. कित्येक वीर मरण पावल्या-वर त्याची घमेंड जिरली व मग तो सावध झाला. यानंतर मात्र त्यानें सर्व सेव-कांना “ आपल्या शिबिरांतून जातो कोण, येतो कोण, याचा सावधपणें शोध करीत रहा; सैन्यासह सर्व बाजूंनीं तुम्ही सज्ज असा व वानरांची चाहूल घेत रहा. संध्याकाळ असो, मध्यरात्र असो वा पहांट असो, वानरांसंबंधानें तुम्हीं गाफील होतां नये. शत्रूचें सैन्य सावध आहे, हल्ला करतें आहे, कां स्वस्थ आहे, इकडे तुमचें लक्ष असूं दे. ” ( ६।७२।१२–१५ ) अशी आज्ञा केली. शत्रूं-मध्यें भेद करून त्याला निर्बल करण्याचा उपाय राजनीतींत प्रसिद्ध आहे. मात्र या उपायाचा अवलंब रामानें स्वतः केला नाहीं. परंतु बिभीषण शत्रुपक्षाकडून आपण होऊन रामाला येऊन मिळाला यामुळें या उपायाचें फल रामाला मिळालें. राव-णाच्या सेनेची वगैरे सर्व माहिती त्यानें रामाला सांगितली. या उपायाचा अवलंब रावणानें केला, परंतु तो अकालीं आणि अस्थानीं होता. त्यानें सुग्रीवाकडे आपला दूत पाठवून त्याला रामाचें सख्य सोडून परत जाण्याचा संदेश कळ-विला व यांत सुग्रीवाची निवड करण्यांतच रावण फसला. बिभीषण फुटून शत्रुपक्षाकडे मिळाल्यामुळें रावणानें शत्रूकडील वर्तमान कळण्याकरितां पाठवि-लेले चार त्यानें तत्काल पकडले व रावणाचा प्रयत्न फुकट गेला.

बाणादि आयुधांची सामग्री रथांतून युद्ध करणाराला बरोबर घेतां येत असे. रथांत सर्व प्रकारचीं आयुधें ठेवितां येऊन वाटेल त्याशीं युद्ध करण्यासाठीं वेगानें जातां येत असे. रथावरील ध्वजावर कांहींतरी चिन्ह असून त्यावरून त्यांतील रथी ओळखितां येत असे. रावणाच्या रथावरील ध्वजावर मनुष्याचें शिर होतें. ध्वजाचा उपयोग रथी ओळखण्याचे कामीं होई, तसा ध्वज पाडला असतां आंतील रथी मारल्याचें भासवून सैन्य पळविण्याचे कामीं होई. रामाय-णांतील युद्धांत रथांचें ऐश्वर्य राक्षसांकडे असल्यामुळें रामाकडील वीरांना हीं दोनहि प्रकारचीं फलें घेतां आलीं. सारथ्याचा वध करूनहि रथ्याला निर्बल करितां येत असे. रथाची गति त्याचे हातीं असल्यामुळें रथ्याप्रमाणेंच त्याला महत्त्व होतें. रावणाचे सारथ्यानें आपणाकडे कोणती कामगिरी आहे, [illegible] भाषणांत स्पष्ट विवेचन केलें आहे. “ देश, काल, लक्षणें;

हालचाली, रथ्याचें दैन्य, हर्ष, खेद, ( हीं सारथ्यानें जांणलीं पाहिजेत. ) तसेंच भूमि सखल आहे, सम आहे का विषम आहे, युद्धाला उचित काल कोणता, शत्रूचें छिद्र कोठें आहे, ( हें त्याला कळलें पाहिजे. ) रथ शत्रूचे समीप नेणें, दूर नेणें, धैर्यानें रथ उभा करणें, सन्मुख न जातां मागें सरणें ( याविषयीं त्याला धोरण असलें पाहिजे. )" [६।१०५।१८-२०] इतकीं सारथ्याचीं कामें त्यानें सांगितलीं आहेत.

शस्त्रावांचून युद्ध म्हणजे बाहुयुद्ध. हें रणांगणावर झाल्याचें रामायणांत वर्णन नाहीं. परंतु रावण शत्रुपक्षाकडील सैन्याची पाहणी करण्याकरितां लंकेच्या वेशीवर बसला असतां आणि रामासह सुग्रीव सुवेलाचलाचे शिखरावर आला असतां सुग्रीवाला त्वेष येऊन तेथून तो एकदम उड्डाण करून रावणाच्या समोर उभा राहिला. या वेळीं त्या दोघांचें बाहुयुद्ध झालें. या युद्धाचे वर्णनाचे निमित्तानें बाहुयुद्धांतील पेंच आणि पद्धति रामायणांत आल्या आहेत. नाना प्रकारचीं मंडलें, स्थानें व हुलकावण्या झाल्यावर " तिर्यग् गति, वक्रगति, दुसऱ्याचे प्रहार चुकविणें, आपला प्रहार व्यर्थ होणार असें दिसल्यास तो न करणें, प्रतिपक्ष्याचे भोंवतीं भ्रमण करणें, समोर चालून जाणें, थबकत जाणें, प्रहार करून समोर उभें राहणें, तोंड फिरवून जाणें, बाजूला सरणें, वांकून धांवत [ जवळ ] जाणें, पाय धरण्याकरितां समोर जाणें, हात छातीजवळ धरून राहणें, प्रतिपक्ष्याचा हात धरण्याकरितां आपला हात पुढें करणें" इत्यादि कल्पना त्यांनीं योजिल्याचें लिहिलें आहे. [ ६।४०।२३-२६ ]. बाहुयुद्धाचे प्रसंग रणांगणावर फारसे वर्णिलेले नाहींत. हीं युद्धें दोनहि पक्ष जवळ जवळ येऊन झालीं तरी शस्त्रांचे अथवा वृक्षपाषाणादिकांचे प्रहारांवर काम भागलें आहे. हातघाई झालेली नाहीं, आणि यामुळें तसें वर्णन अन्यत्र आलेलें नाहीं.

## ज्योतिःशास्त्रांतील प्रगति.

आकाशांत उगवणाऱ्या ज्योतींकडे मनुष्य सृष्टीच्या आरंभापासून कौतुकानें पहात आहे व त्यांविषयींच्या ज्ञानाचा संग्रह करीत आहे. हें कार्य आकाशाप्रमाणें अनादि आणि अनंत आहे. सूक्ष्म दृष्टि, कुशाग्र बुद्धि, प्रयत्नांची शिकस्त

इत्यादि गुण असल्यावांचून या शास्त्रांतील शोधाचें कार्य होणें शक्य नाहीं. रामायणकालीं या शास्त्रांतील शोध किती झाले होते हें आतां पहावयाचें आहे. ज्योतिर्विषयक उल्लेख रामायणांत मधून मधून आले आहेत व त्यांवरून असे शोध अनुमानावयाचे आहेत. ज्योतिःशास्त्राविषयींच्या ग्रंथांचा रामायणांत उल्लेख नाहीं; तथापि शास्त्रावरून कळावयाच्या कांहीं गोष्टी त्यांत निर्देशिलेल्या पाहिल्या म्हणजे अशा ग्रंथांचें अस्तित्व अनुमित होतें. आकाशामध्यें सूर्यास्तानंतर प्रत्यहीं अनेक तारे उगवतात, मावळतात, हें आपण पहात आहों; पण त्यांपैकीं नक्षत्रें कोणतीं, ग्रह कोणते, हें ठरवून, त्यांची गति किती आहे हें जाणून, त्यांचे पुढील उदयास्त आधीं समजण्याचें ज्ञान संपादन करणें हें पुरुषाच्या बुद्धिकौशल्याचें फल आहे. सूर्योदय होतांच दिवस होतो व सूर्यास्त होतांच रात्र होते व असा हा क्रम अखंड चालला आहे. आमचेकडे रात्र व दिवस यांचा काल सारखाच असल्यामुळें कालगणना करण्याला तें सोयीचें आहे. तथापि बारा महिन्यांच्या संवत्सराचें चक्र बरोबर ठरवावयाचें तें धोरणानें ठरविलें पाहिजे. संवत्सराचें हें चक्र रामायणकालाच्या फार पूर्वीं निर्माण झालेलें आहे, यांत शंका नाहीं; तथापि याविषयींची विशेष चर्चा पुढें कालपरामर्शाचे निमित्तानें यावयाची आहे. पंचांगांतील तीन अंगें—तिथि, वार व नक्षत्र यांचे उल्लेख रामायणांत आलेले आहेत. वारांपैकीं गुरुवाराचा उल्लेख मात्र रामायणांत आहे. वनवासाला जाण्याचें ठरल्यावर राम आपल्या मंदिरीं गेला असतां सीतेला यांतील कांहीं वार्ता नसल्यामुळें तिनें रामाचें म्लान वदन पाहून त्याला "आज चांगला गुरुपुष्ययोग आहे व या योगावर आपणांला राज्याभिषेक होणार असें विद्वान् ब्राह्मण सांगत आहेत, तेव्हां आपणांस खिन्न होण्याचें कारण काय ?" [ २।२६।९ ] असा प्रश्न केला आहे. गुरुवारीं पुष्य नक्षत्राचा योग असला म्हणजे त्याला गुरुपुष्ययोग म्हणतात व या निमित्तानें येथें वाराचा उल्लेख आलेला आहे. इतर वारांचे उल्लेख रामायणांत नाहींत. रामजन्माची तिथि नवमी व वनवासांतून राम परत आल्याची तिथि पंचमी (६।१२४।१ व ६।१२५।२४) अशा दोन तिथि आल्या आहेत. अशोकवनिकेमध्यें सीता असतां तेथें रावण आला, तेव्हां त्याला ती कशी दिसली हें सांगतांना, अंधकारांत चंद्रमंडल

लोपून गेल्यामुळें विशोभित झालेल्या पौर्णमासी रात्रीची उपमा दिली आहे. [ ५।१९।१३ ] शारदी पौर्णिमेच्या रात्रीं चंद्रोदय झाल्यावर नक्षत्रें आकाशांत चमकूं लागली असतां जशी शोभा दिसते तशी शोभा राम वानरसेनेमध्यें बसला असतां दिसत होती, असा दृष्टांत अन्यत्र दिला आहे. [ ६।२४।१ ] कृष्णपक्षांतील चतुर्दशी व अमावास्या यांचे उल्लेख सुपार्श्व नामक रावणाच्या मंत्र्याचे भाषणांत आले आहेत. [ ६।९२।६४ ] नक्षत्रांचे उल्लेख याप्रमाणें दृष्टांतरूपानें आले आहेत.

नक्षत्रांपैकीं मृगशीर्षपुंज निसर्गतः मोहक आहे. त्यांतील व्याधानें तर आपला शर आकाशांतील मृगांबरोबर भूतलावरहि रोखून धरिला आहे, असा अद्यापि भास होतो. मायामृगाचें स्वरूप पाहून सीता व राम दोघेंहि मोहित झालीं व राम त्या मृगाकारितां बाहेर निघाले, त्या वेळीं लक्ष्मणाला म्हणतात—

**एष चैव मृगः श्रीमान् यश्च दिव्यो नभश्चरः ।**
**उभावेतौ मृगौ दिव्यौ तारामृगमहीमृगौ ॥** ३।४३।३७ ॥

"हा सुंदर मृग व आकाशांत संचार करणारा दिव्यमृग असे हे तारामृग व महीमृग मिळून दोनच दिव्यमृग (जगांत) आहेत." तसेंच रामादि पुत्रचतुष्टयाचें वर्णन करितांना प्रोष्ठपद नक्षत्रांची मार्मिक उपमा दिलेली आहे. (१।१८।२६) प्रोष्ठपद नक्षत्रें म्हणजे पूर्वा भाद्रपदा व उत्तरा भाद्रपदा यांचीं दोन दोन मिळून चार नक्षत्रें होत. नक्षत्रें चार व त्या सर्वांना मिळून प्रोष्ठपद संज्ञा असून त्यांच्या दोन जोड्या आहेत; आणि त्या जोड्यांला वरील दोन संज्ञा आहेत. राजाचे पुत्र चार व त्यांच्या रामलक्ष्मण व भरतशत्रुघ्न अशा दोन जोड्या पुढील इतिहासांत आपोआप घडल्या आहेत आणि हें लक्षांत घेऊन ही मार्मिक उपमा महर्षींनीं योजिली आहे.

रोहिणीचंद्रांचा योग महर्षींना फार आवडता आहे व यामुळें रोहिणीचा उल्लेख रामायणांत वारंवार आला आहे. पुढील स्थलें पहा. [१] १।२८, [२] १६।४१, ११७।११; ११४।३, [३] १८।१७; ४६।६; ४९।१६, [४] १७।२४; १५।२२; १९।९; ३७।२६, २७; ३९।४५; [६] २४।७; ९२।४३; ५९; १११।२०; १२६।२५. इतर नक्षत्रांचे उल्लेख प्रसंगानुसार आले आहेत.

मृग ३।४३।३७.

पुनर्वसु २।२।१२; २।३।४१; ३।१८।१२; ५।५७।२३.

मघा १।७२।२१. उत्तरा ६।४।६. हस्त ६।४।६.

चित्रा २।१६।१०; ३।१७।३; ३।४६।१०.

स्वाती ५।५७।२३; ४।६७।१९.

विशाखा ६।७६।१५. श्रवण ५।५७।२३.

याशिवाय 'सौम्य नक्षत्रें' असा मोघम उल्लेख भरत गंधर्वांना जिंकण्याकरितां बाहेर पडला, त्यानिमित्त केलेला आहे. ऋतूंपैकीं वसंत, वर्षा, शरद्, हेमन्त व शिशिर यांचे उल्लेख आले असून धूमकेतूचा उल्लेख वानरसेना युद्धार्थ निघाली त्या वेळीं आलेला आहे. [ ६।४।५२ ] येथेंच ध्रुव, त्रिशंकु, सप्तर्षि व शुक्र यांचे उल्लेख आले आहेत. अयनांपैकीं दक्षिणायन (३।१६।८) येथें उल्लेखिलें असून कांहीं मासांचे उल्लेख प्रसंगोपात आले आहेत. या सर्व संज्ञा रामायणकालाचे पूर्वीपासून प्रचारांत आहेत. याहून या माहितीचा विशेष उपयोग आहे असें नाहीं. कारण रामायणांतील उल्लेख प्रायः दृष्टांतरूपानें आहेत; याहून ज्योतिःशास्त्रांतील कोणताहि सिद्धांत त्यांत उल्लेखिलेला नाहीं. पुढील कार्यासाठीं म्हणून मुहूर्तयोजना करण्याच्या पद्धतीवरून त्यासंबंधीं शास्त्र त्या कालीं अवगत होतें, हें निर्विवाद आहे. राशींसंबंधानें रामायणांत उल्लेख प्रायः नाहींत व आहेत ते विश्वसनीय नाहींत. रामजन्माची वेळा सांगतांना मेष व कर्क या राशींचे उल्लेख आहेत; पण ते श्लोक गॉरिशिओच्या प्रतींत नाहींत. दुसरा उल्लेख रामाभिषेकनिमित्तानें (२।१५।२) आला आहे पण हा श्लोक लाहोरप्रतींत नाहीं. गॉरिशिओच्या प्रतींत हा श्लोक आहे किंवा नाहीं हें माहीत नाहीं; तथापि तो असण्याचा संभव नाहीं. तेव्हां राशिचक्र त्या कालीं अवगत होतें, असें रामायणावरून ठरवितां येणार नाहीं.

एका महत्त्वाचे योगाचा उल्लेख रामायणांत दोन वेळीं आलेला आहे. हा योग म्हणजे मंगळकृत रोहिणीशकटभेदाचा होय. शकटभेदाचा तेथें स्पष्ट उल्लेख नाहीं हें खरें; तथापि तो तेथें विवक्षित आहे, यांत शंका नाहीं. मारुतीला सीता कशी दिसली हें सांगतांना अंगारकानें पीडित झालेल्या रोहिणीची

उपमा दिलेली आहे. ( ५।१५।२२ ) सेतूवरून समुद्राचे परतीरीं गेल्यावर रामाला लंका दिसूं लागली, तेव्हां "हरिणबालकाप्रमाणें नेत्र असलेली सीता लोहितांगानें त्रस्त झालेल्या रोहिणीप्रमाणें रावणानें येथेंच प्रतिबंधांत ठेविली आहे." (६।२४।७) असें त्याचे मनांत आल्याचें वर्णन केलें आहे. शनिकृत व मंगळकृत रोहिणीशकटभेद ज्योतिःशास्त्रांत फार अनिष्ट म्हणून प्रसिद्ध आहे. बृहत्संहिता व ग्रहलाघव या दोहोंतहि हा योग युगांतरसूचक मानिला आहे. कै० दीक्षित यांनीं गणित करून पाहून हा योग शकारंभानंतर कधीं आलेला नाहीं व शकापूर्वी पांच हजार वर्षांच्या अलीकडे कधीं होण्याचा संभव नाहीं, असें स्पष्ट लिहिलें आहे. (भारतीय ज्योतिःशास्त्राचा इतिहास, पृष्ठ १४४।४५) " शनि व मंगळ यांच्या पाताच्या एका चक्रांत रोहिणी जवळ असतां कधीं-तरी त्यांचा शर शकटभेद होण्याजोगा होऊं शकेल. त्यांच्या पाताचें एक भ्रमण होण्यास ४०।५० हजार वर्षे लागतात." शनिकृत रोहिणीशकट-भेद शकपूर्व ५२९२ व्या वर्षी व मंगळकृत शकटभेद त्याच्यापूर्वी बराच काल व्हावा, असें कै० दीक्षित यांचें अनुमान आहे. वराहमिहिर व गणेश दैवज्ञ यांनीं या योगाचे आपल्या ग्रंथांत जे उल्लेख केले आहेत ते परंपरागत माहितीवरून होत, हें उघड आहे. रामायणाचे पूर्वीचा ज्योतिःशास्त्रांतील ग्रंथ तर प्रसिद्ध नाहीं. शकटभेद व त्याचें फल यांचा अनुभव आल्यानंतर त्याची नोंद शास्त्रांत किंवा अन्यत्र व्हावयाची, हें उघड आहे. अगदीं अलीकडचा शकटभेद घेतला तरी शकपूर्व सहा हजार वर्षांचे अलीकडे येत नाहीं व त्याची नोंद रामायणांत आल्याचें मानिलें—आणि तेंच संभवनीय आहे—तरी यावरून त्या वेळीं ग्रहांचें ज्ञान आमचेकडे किती झालें होतें व त्याचा प्रसार रामायणकालीं व्यवहारामध्यें आलेल्या दृष्टान्तांवरून किती झाला होता याची कल्पना सहज होते.

## फलज्योतिष.

मुहूर्त पाहण्याच्या प्रवृत्तीवरून फलज्योतिषावरील लोकांचा विश्वास व त्या शास्त्रांतील ज्ञात्यांचें अस्तित्व दोनहि अनुमित होतात. यौवराज्याभिषेकाविषयीं बोलतांना राजा दशरथानें आपल्या ( जन्म-) नक्षत्राला सूर्य, मंगल व राहु हे ग्रह

आले आहेत व ते मृत्युसूचक असल्याचें ज्योतिषी सांगतात, म्हणून आपण घाई करीत आहों, असें सांगितलें आहे. ( २।४।१८,१९ ) मुहूर्तासंबंधीं प्रशस्त मुहूर्त म्हणून मोघम उल्लेख पुष्कळ आहेत व कित्येकांच्या संज्ञा आल्या आहेत. रामाला परत आणण्याकरितां भरत गेला, तेव्हां त्याची सेना मैत्र-मुहूर्तावर प्रयागवनामध्यें उतरली, असें वर्णन आहे. ( २।८९।२१ ) रावणानें सीतेला ज्या मुहूर्तावर हरण करून नेलें तो विन्द मुहूर्त असून त्या मुहूर्तावर नष्ट झालेलें धन यजमानाला लवकर प्राप्त होतें व हें रावणाला न कळल्या-मुळें त्यानें त्या वेळीं तिला नेलें असे उद्गार जटायूनें रामापाशीं काढिले आहेत. ( ३।६८।१२,१३) विजय मुहूर्ताचा उल्लेख वानरसेना युद्धार्थ बाहेर पडाव-याचे वेळीं आला आहे. ( ६।४।३ ) आयुष्यांतील पुढील शुभाशुभ समजून घेण्याची प्रवृत्ति सध्यांहून त्या कालीं कोणत्याहि प्रकारें कमी दिसत नाहीं. वनास जाण्यास निघण्यापूर्वीं राम सीतेकडे आला व त्यानें तिला सर्व वृत्तान्त निवेदन केला, तेव्हां तिनें आपण बरोबर येणार असें सांगितलें व राम नको म्हणूं लागला असतां तिनें आपण पितृगृहीं असतां लक्षणज्ञ ब्राह्मणाकडून आपल्या दैवीं वनवास असल्याचें ऐकिलें आहे व यासाठीं त्याविषयीं नित्य उत्साह वाटत आहे, असें सांगितलें आहे. ( २।२९।८,९ ) रामलक्ष्मण शर-बंधांत सांपडून रणांगणीं मूर्छित पडले असतां रावणानें सीतेला पुष्पक विमा-नांत बसवून त्यांना पाहण्याकरितां तिला पाठविलें, त्या वेळीं ते मृत झाले असावे असें वाटून ती विलाप करूं लागली; तिनें केलेल्या विलापांत लाक्ष-णिकांनीं आपणाविषयीं केलेलें भविष्य मिथ्या झालें, असें म्हटलें आहे. ( ६।४८।२–१४ ) " पुत्रवती, अविधवा, यज्ञ करणाऱ्या राजाची पट्टराणी, तूं होशील. " असें भविष्य ज्योतिःशास्त्रवेत्त्यांनीं तिला सांगितलें होतें. ज्योतिः-शास्त्राबरोबर सामुद्रिकाचा उल्लेख येथें असून या निमित्तानें सीतेनें स्वतांचीं शुभलक्षणें वर्णिलीं आहेत. या लक्षणांत दोनहि पायांवरील रेखा, कमलें, सूक्ष्म व एकसारखे असे कृष्णवर्ण केस, एकमेकांना न लागलेल्या भ्रुकुटी, वर्तुल व रोमरहित जंघा, नेत्रांचे उपांत्य प्रदेश, नेत्र, हात, पाय, घोंटे आणि मांड्या एकसारख्या असणें, तुळतुळीत सारख्या नखांचीं व वाटोळीं बोटें, मांसल वक्षः-

स्थल, उज्ज्वल कांति, दोनहि तळवे व दहा बोटें अशीं बारा, जातांना भूमीला स्पष्ट लागणें वगैरे लक्षणें तिचे भाषणांत आलीं आहेत. रामाचें मायामय शिर विद्युज्जिव्ह राक्षसाकडून करवून रावणानें तिला दाखविलें, त्या वेळींहि तिनें रामाला दीर्घ आयुष्य असल्याचें भविष्य दैवज्ञांनीं पूर्वीं वर्तविल्याचें स्मरण केलें आहे. (६।३२।१२) सीतेला रामाज्ञेप्रमाणें वाल्मीकींच्या आश्रमासमीप सोडल्यानंतर लक्ष्मण परत फिरला, तेव्हां मार्गांत सुमंत्र सारथ्याशीं त्याचा जो संवाद झाला, त्यांत दुर्वास ऋषींनीं रामाचे वनवासासंबंधीं वगैरे भविष्य राजा दशरथाला सांगितल्याचें सुमंत्रानें लक्ष्मणाला सांगितलें आहे. ( ७।५०,५१ ) वरील सर्व भविष्यांपैकीं दुर्वासाचे भविष्यावांचून इतर सर्व भविष्यें ज्योतिषी व सामुद्रिक यांनीं वर्तविलेलीं आहेत व यांवरून त्यांविषयीं लोकांचा विश्वास व अभ्यास व्यक्त दिसतो. या व्यवसायावर उपजीविका करणारा एक वर्ग त्या वेळीं होता, हें व्यवसायाविषयींच्या मागील विवेचनांत आलें आहे आणि हा व्यवसाय करणारांचा प्रवेश राजापर्यंत होता व असा प्रवेश होण्यासारखें आपल्या व्यवसायांतील प्रावीण्य त्यांनीं संपादिलें होतें, असें वरील विविध अवतरणांवरून दिसून येतें. फलज्योतिषावर सर्वस्वी अवलंबून राहणें किंवा नादीं लागणें हीं दोनहि दुर्व्यसनासारखीं मनुष्यास कर्तृत्वशून्य करितात हें खरें आहे, आणि या दृष्टीनें पाहिलें तर रामायणांतील पुरुष त्याचे नादीं लागलेले दिसत नाहींत. पूर्वीं वर्तविलेलें भविष्य मिथ्या होत आहे, असें पाहून त्या प्रसंगीं त्यांना त्याची स्मृति झाली आहे, इतकेंच. कार्यारंभ शुभमुहूर्तीं करण्याची पद्धति होती, आणि हा विषय फलज्योतिषांतच येतो हें खरें आहे; तथापि कार्यारंभीं मुहूर्त पाहणें वेगळें आणि आपल्या आयुष्यांतील पुढील गोष्टी कळण्याचा प्रयत्न करून तदनुसार कोणतें कार्य करावयाचें हें ठरविणें वेगळें. विविध गृहस्थितीचा अनुभव घेऊन बसविलेलें हें शास्त्र आहे व म्हणून त्याला पूर्णता केव्हांहि येणारी नाहीं. कारण अनुभव संपादावयाचें कार्य जगाच्या अंतापर्यंत असेंच चालावयाचें आहे. त्या शास्त्राचा व्यासंग करणारे हा अनुभव संपादीत असतात; पण शास्त्राला पूर्णता आणण्याचें हें कार्य ज्यांना कळत असतें त्यांचे हातून त्याची वाढ होते आणि इतरांना अवगत असलेलें ज्ञान

सर्वांगपूर्ण वाटतें व यामुळें शास्त्रीय ज्ञानाची वाढ होत नाहीं. कर्त्या पुरुषानें त्यावर अवलंबून राहतां नये, हें तत्त्व मुख्य आहे व रामायणकालचे पुरुषांना त्याचें स्मरण होतें, असें त्यांच्या वर्तनावरून अनुमित होतें.

## नवस.

कार्यारंभीं तें सिद्धीला जावें म्हणून कार्यसिद्धीनंतर करावयाच्या सेवादिकांचें वचन देवतांना उद्देशून प्रार्थनापूर्वक देणें याला आपण नवस म्हणतों. कार्यसिद्धीसाठीं देवतांची प्रार्थना करणें हें मनुष्यस्वभावानुरूप आहे. कार्यासाठीं प्रयत्न करावयाचे ते मनुष्य करीत असला तरी त्यांत यश मिळणें त्याचे हातीं नसतें. मनुष्याची ही दुर्बलता जगांत नेहमीं अनुभवास येत असते व हें जाणून परमेश्वराचें अदृश्य साहाय्य त्याला मागावें लागतें. साहाय्ययाचनेचा धर्मादायादि सेवा करणें हा मार्ग आहे. त्यांत स्वार्थाचा व्यय करावा लागतो. नवसांत अशा त्यागाचें केवळ वचन द्यावयाचें असतें. अर्थात् नवसांत त्याग असला तरी तो नवस करितेवेळीं नसून कार्यसिद्धीनंतर असतो. नवसाचा प्रकार सट्टयाचे व्यवहारासारखा असतो. सट्टा करितांना आरंभीं भांडवल लागत नाहीं. यामुळें तो वाटेल तितका करितां येतो; तसें नवस करितांना वचन वाटेल तें देतां येतें. पाहूं गेलें तर रामचरित्रांत नवस करण्याचे प्रसंग पुष्कळ दिसून येतात; पण त्याकडे लोकांची विशेष प्रवृत्ति मात्र आढळत नाहीं. सीतेनें वनवासाला निघतांना गंगा व यमुना या नद्यांवरून उतरतेवेळीं त्यांना उद्देशून नवस केल्याचें रामायणांत लिहिलें आहे. तिनें गंगेला हात जोडून "माझा भर्ता वनांतून परत येऊन राज्य करूं लागला म्हणजे मी तुला नमस्कार करीन; तुझी स्तुति करीन आणि तुझा संतोष व्हावा म्हणून एक लक्ष गोप्रदानें, वस्त्रें आणि सुग्रास अन्न ब्राह्मणांना अर्पण करीन; तसेंच अयोध्येला परत आल्यानंतर एक हजार घट मद्य व मांसमिश्रित अन्न तुला बलि देईन. हे देवी, प्रसन्न हो." (२।५२।८८–९९) असा नवस केला. असाच नवस तिनें यमुनेला केला. (२।५५।२०) वनांत निघतेवेळीं रामानें जीं दानें केलीं त्या मानानें हे नवस मोठे नाहींत व इतर प्रसंगीं तिनें नवस केल्याचें रामायणांत दिसत नाहीं.

## शकुन, स्वप्न आणि उत्पात.

शकुनादि पाहण्याची प्रवृत्ति रामायणकालीं फार असल्याचें दिसून येतें. हीं पुढील शुभाशुभ सूचित करितात अशी श्रद्धा असून त्यांचीं वेगवेगळीं लक्षणें मानीत असत. रावणानें सीतेला नेतांना मार्गांत जटायूचा वध केला, तेव्हां तिनें " सुखाचे किंवा दुःखाचे प्रसंग यावयाचे असल्यास स्वप्न अथवा पक्ष्याचा स्वर असें कांहीं तरी सूचक चिन्ह मनुष्याच्या दृष्टोत्पत्तीस अवश्य येत असतें, " ( ३।५२।३ ) असे उद्गार काढिले आहेत. आणि याचे उलट खर राक्षसाला घोर उत्पात दिसूं लागले तरी, बलिष्ठ पुरुष दुर्बलांना विचारीत नाहीं त्याप्रमाणें आपण तिकडे लक्ष देत नाहीं, असें तो म्हणत आहे. (३।२३।१९) लोकांतील प्रवृत्ति पाहिली तर खराचें भाषण अपवादभूत मानावें लागेल असें वाटतें. शुभाशुभसूचक दोनहि प्रकार रामायणांत आले असले तरी शुभसूचकांचें वर्णन फार थोडें आहे. विश्वामित्राबरोबर यज्ञरक्षणार्थ राम निघाला त्या वेळीं वायु निर्मल व सुखकर असा वाहूं लागल्याचा शुभशकुन सांगितला आहे. ( १।२२।४ ) बाहु स्फुरण पावणें हाहि शुभशकुन होय. ( ३।२४।७ ) देहाची कांति पूर्णपणें असणें, स्त्रीचा डावा डोळा, बाहु व मांडी हीं स्फुरण पावणें हीं शुभसूचक होत ( ५।२७।४२–२६ ). पुढें अशुभसूचक निमित्त दिसत असतां स्वतःच्या ठायीं दिसणाऱ्या शुभ चिन्हांवरून शत्रूंचा पराजय होऊन आपला जय होणार असें अनुमान रामानें केलें असल्याचें लिहिलें आहे ( ३।२४।७ व ८ ) हें विशेष आहे. रामाला यौवराज्याभिषेकाची त्वरा करण्याचें कारण सांगतांना राजा दशरथानें अशुभसूचक स्वप्नदर्शन झाल्याचें सांगून विद्युत्पात, मेघगर्जना व उल्कापात होत असल्याचें दाखविलें आहे. ( २।४।१७ ) भरत मातुलगृहीं असतां इकडे राजा मरण पावला; तेव्हां तिकडे तो एकदां विषण्ण बसलेला पाहून त्याला त्याचे मित्रांनीं कारण विचारिलें असतां त्यानें स्वप्नांत काय अशुभ पाहिलें तें सांगितलें आहे. " मलिन व मोकळे केस असलेला माझा पिता पर्वतशिखरावरून शेणानें भरलेल्या डबक्यांत पडलेला मी पाहिला. तो त्यांत तरंगत असून ओंजळीनें तेल पीत वारंवार हंसत होता. सागर शुष्क झाला; चंद्र भूमीवर पडला; पृथ्वीवर अंधकार झाला;

राजाचे बसावयाच्या हत्तीचे तुकडे तुकडे झाले; प्रज्वलित अग्नि विझून गेले; वृक्ष उपटून खालीं पडले; पर्वत कोसळले; असें मी पाहिलें. लोखंडाचे आसनावर कृष्णवस्त्र नेसून राजा बसला असून काळ्या व पिंगट स्त्रिया त्याला मारीत होत्या. रक्तचंदन अंगाला लावून व रक्तपुष्पांच्या माला धारण करून तो गर्दभरथांत बसला होता व दक्षिणेकडे चालला होता, असें आपण पाहिलें." (२।६९।८–१५) याच वेळीं गर्दभांचे रथांत बसून मनुष्य चाललेला स्वप्नांत दिसला कीं त्याची चिता लवकर पेटणार, असें समजावें, असें त्याचें फल भरतानें सांगितलें आहे. (२।६९।१८) असेच प्रकार रावणासंबंधीं स्वप्नांत पाहिल्याचें त्रिजटेनें सीतेला सांगून (५।२७) रामासंबंधीं याचे उलट प्रकार तिनें वर्णिले आहेत. हस्तिदंताच्या आकाशगामी शिबिकेंत राम बसला होता; श्वेतपुष्पें व श्वेतवस्त्रें लक्ष्मणानें धारण केलीं होतीं; श्वेतवस्त्र परिधान करून श्वेत पर्वतावर सीता बसली होती; गज लंकेवर उभा राहिला होता; वगैरे पाहिल्याचें तिनें सांगितलें. स्वप्नांत सुवर्णवृक्ष दिसणें मृत्युसूचक समजत असत. जटायूनें असे वृक्ष आपणास दिसूं लागल्याचें रामाला सांगितलें (३।६८।११) असून सीतेनें रावणाला उद्देशून बोलतांना शिवीप्रमाणें त्याचा उपयोग केला आहे. (३।५३।२१ व ३।४७।३८) स्वप्नांत वानर दिसणें अशुभसूचक समजत असत. (५।३४।२२ अशुभसूचक निमित्तांचा संग्रह तर फार मोठा आहे. आसमंतात् पक्ष्यांचा भयंकर शब्द होणें; क्रूर पशूंनीं उजवी घालणें; (१।७४।९-१०) आकाशांत गर्दभवर्णाचे मेघ गर्जना करीत फिरणें; रक्तवृष्टि होणें; (३।२४।४-९) खोंकड ओरडणें; (३।५७।२) हृदयाचा डावा भाग, डावा डोळा अथवा बाहु स्फुरण पावणें (३।५५।४); शरीराला कंप सुटणें; (३।६०।१) होमशालेंतील अग्नि हवन केलें तरी प्रदीप्त न होतां आंतून धूर येत राहणें; अग्निस्थानादि पवित्रस्थलीं सर्प दिसणें; हवनीय द्रव्यांना मुंग्या येणें; मायींचीं दुधें आटून जाणें; गज मदरहित होणें; अश्व दीनस्वरानें खेंकाळणें व त्यांना किती वैरण घातली तरी पुरेशी न होणें; गर्दभ, उंट व खेंचरें यांना कांपरें सुटून त्यांनीं अश्रु ढाळणें; कावळे घरांवर येऊन टोळ्याटोळ्यांनीं बसणें व त्यांनीं आक्रोश करणें; गिधाड घरावर बसणें; मांसभक्षक श्वापदें दारांवर ओरडणें; (६।१०।१५-२१)

वारे भयंकर वाहणें; पृथ्वी कंपित होणें; पर्वतशिखरें हालणें; वृक्ष उलथून पडणें; क्रूर श्वापदें सूर्याभिमुख ओरडणें; प्रकाशरहित चंद्राचा उदय होऊन त्याचे योगानें मनाला त्रास वाटणें; त्याचें मण्डल कृष्ण व आरक्तवर्णाचे किरणांनीं वेष्टित दिसणें; सूर्याभोंवतीं रुक्ष व आरक्तवर्ण खळें दिसणें; त्यावर नीलवर्णाचा डाग पडणें; धुरळा उडून नक्षत्रें निस्तेज दिसणें; काक, श्येन व गिधाड यांनीं घिरट्या घालणें; (६।२३।४-११) वाहनांच्या नेत्रांतून अश्रु गळणें; पशूंना भिन्न जातीची संतति होणें; भिन्नजातीय पशूंनीं सुरतक्रीडा करणें; कपोत पक्षी घरांतून फिरणें; पाळींव पक्ष्यांनीं चीची, कूची असे शब्द करणें (६।३५। २५-३३ ६।४१।१३-२१) बाहेर पडल्यावर रथावर गिधाड बसणें; समोर कबंध पडणें [६।५१।३१-३४]; योद्धे चालतांना अडखळणें (६।५३।१३-१४); मुखावरील कांति लुप्त होणें; शब्द अस्पष्ट येणें; (६।५५।११-१२) सारथ्याचे हातांतील चाबूक गळून पडणें; (६।५७।३६-४१ ६।६५।५०-५१) घोडे अडखळणें; [६।९५।४४-४७] योद्ध्याचा हात स्तंभित होणें; सूर्यावर विविध वर्णांचे डाग दिसणें; सारिकांनीं भयंकर शब्द करणें; [६।१०६।२१-२३ ७।४६।१४—१५ ) इतकीं अशुभसूचक दुश्चिन्हें रामायणांत प्रसंगानुसार वर्णिलेलीं आहेत. शुभसूचक निमित्तें विशेषशीं सांगितलेलीं नाहींत. यावरून समाजांतील त्याविषयींची श्रद्धा व्यक्त दिसून येते. कोणतेंहि कार्य करावयास जाणारा मनुष्य उत्साहानें प्रारंभ करितो व शुभसूचक निमित्तांनीं त्याचा उत्साह वृद्धिंगत होतो; आणि अशुभ निमित्ताचे वेळीं मात्र त्याच्या परीक्षेची खरी वेळा असते. कार्य सिद्धीस गेल्यावर पूर्वीचे शुभ शकुनांचें स्मरण राहात नाहीं व कार्यनाश झाल्यानें अशुभ निमित्तांचें विस्मरण होत नाहीं आणि यासाठीं अशुभसूचक निमित्तांचें वर्णन अधिक आणि विस्तारानें आलें आहे असें वाटतें.

## व्यसनें.

लोकांच्या नीतिमत्तेविषयीं सामान्यस्वरूप निर्दोष असलें तरी त्या वेळीं द्यूत, मद्य आणि वेश्या हीं व्यसनें लोकांत होतीं, असें कित्येक वर्णनांवरून दिसतें. द्यूताविषयीं प्रत्यक्ष निर्देश रामायणांत नाहीं; तथापि दृष्टान्तरूपानें

तो दोनदां आला आहे. मारुती रावणाच्या मंदिरांत सीताशोधार्थ गेला असतां “ तेथील सुवर्णाचे दीप महाधूर्त द्यूतकारानें द्यूत खेळून पराजित केल्यामुळें विचार करीत बसलेल्या सामान्य द्यूतकाराप्रमाणें ” त्याला दिसले, [ ५।९।३१ ] असें लिहिलें आहे. तसेंच मारुती अशोकवनिकेंत गेला असतां त्याच्या वेगानें पुष्कळ वृक्षांचीं पानें, फुलें व फळें गळून पडलीं आणि “ द्यूतांत पराजय झाल्यामुळें ज्याचे अंगावर वस्त्र आणि अलंकार राहिलेला नाहीं अशा द्यूतकाराप्रमाणें ते दिसूं लागले.’ ( ५।१४।१५ ) असें वर्णन आहे. मदिरेचें वर्णन याहून अधिक आणि स्पष्ट आहे. कैकेयीच्या वरांचें स्वरूप समजल्यावर दशरथानें तिची जी निंदा केली, तींत “ दृष्टीला मनोहर दिसणारी मदिरा प्याल्यावर मागाहून तींत विष असल्याचें पुरुषाला कळतें, तसें प्रथम तुला मी सती समजत होतों, पण तूं दुष्ट आहेस असा आतां माझा निश्चय झाला.” ( २।१२।७६ ) असे उद्गार त्यानें काढिले आहेत आणि “ ब्राह्मणानें मद्यपान केलें असतां ज्याप्रमाणें रस्त्यांत लोक त्याची छीःथू करितात, तशी ते आपली करितील.” ( २।१२।७८ ) असा दृष्टान्त दिला आहे. पुढें स्वतां वचनमुक्त होण्याची नवीन योजना राजानें केली व रामाला सर्व भोग्य वस्तु आणि सेवकादि यांसह अरण्यांत पाठवावयाचें अशी आज्ञा त्यानें केली, त्या वेळीं कैकेयीनें संतापून “ सार काढून घेतलेल्या सुरेप्रमाणें धनरहित आणि म्हणून चव नसलेलें शून्य राज्य भरत मुळींच स्वीकारणार नाहीं. ” ( २।३६।१२ ) असें स्पष्ट सांगितलें. राम वनांत गेल्यावर कौसल्येनें दशरथाला उद्देशून बोलतांना हीच उपमा दिली आहे. ( २।६१।१८ ) मद्यपानाचे व्यसनाविषयीं केवळ दृष्टान्तावरून येथें अनुमान करावयाचें आहे. पानभूमीचें वर्णन मिळाल्यावर या अनुमानाची अपेक्षा राहणार नाहीं. दशरथ मरण पावल्यावर भरतानें अयोध्येंत प्रवेश केला, तेव्हां त्याला ती नगरी कशी दिसली हें सांगतांना “ मद्यपान करणारांचा नाश होऊन मद्यरहित आणि फुटलेल्या पानपात्रांनीं भरलेल्या उध्वस्त व भग्न पानभूमीप्रमाणें ” ती दिसल्याचें सांगितलें आहे. [ २।११४।१४ ] या उपमेंत पानभूमि आणि मद्यपानाचे परिणाम बरोबर सांगितले आहेत. अयोध्येंत प्रवेश केला, तेव्हां तेथें पूर्वीप्रमाणें मदि-

रेचा मादक गंध मार्गांतून जातांना वाऱ्याबरोबर वाहून येत नसल्याचें [ २।११४।२० ] त्यानें वर्णन केलें आहे. शेवटच्या या वर्णनावरून मद्य-पानाविषयीं शंका रहात नाहीं. अरण्यांतून परत आल्यावर राज्याभिषेक होऊन एकदां सीतेसह राम अशोकवनिकेंत गेला व तेथें त्यानें तिला मैरेयसंज्ञक शुद्ध मद्य पाजिलें आहे आणि याच वेळीं " मद्यपान करून मत्त झालेल्या सुंदर आणि नृत्यगायनांत कुशल असलेल्या स्त्रिया रामासमीप नृत्य करूं लागल्या आहेत. " [ ७।४२।१८ व २० ] या दोनहि स्थलीं मद्यपान केल्याचे उल्लेख स्पष्ट आहेत. रामासमीप नृत्यगायन करणाऱ्या स्त्रिया राजवाड्यांतील दासी होत्या किंवा हा व्यवसाय करणाऱ्या इतर स्त्रिया होत्या, हें कळत नाहीं. रामाच्या यौवराज्याभिषेकाकरितां वसिष्ठांनीं जें साहित्य जमविण्याची आज्ञा केली त्यांत " सर्व प्रकारचा ताल धरणाऱ्या आणि सुंदर अलंकार घातलेल्या गणिका यांना वाड्याच्या दुसऱ्या चौकांत आणून बसविण्याविषयीं " आज्ञा केली आहे. ( २।३।१८ ) साहित्यसिद्धतेंत तर वसिष्ठांच्या भाषणांत वेश्यांचा पुनः उल्लेख आहे. [ २।१४।३९ ] वनांत गेल्यावर गुहाच्या प्रदेशांत असतां राम व सीता झोंपीं गेलीं; आणि लक्ष्मण गुहाला उद्देशून अयोध्येच्या स्थितीविषयीं वगैरे जें बोलला, त्यांत " उत्कृष्ट गणिकांनीं सुशोभित " [ गणिकावरशोभिताम् २।५१।२१ ] असें वर्णन केलें आहे. पहिल्या उल्लेखांतील गणिकांची वाड्यांत काम करण्याची नेमणूक असावी, असें दिसतें; आणि पुढील उल्लेखा-वरून त्यांचा स्वतंत्र वर्गहि दिसून येतो. गानकला कुलीन स्त्रियांनीं अभ्यासिली तरी नृत्यकलेचा अभ्यास त्यांनीं करणें अथवा स्वतंत्रपणें हा व्यवसाय करणें संभवनीय दिसत नाहीं. वेश्या असा स्पष्ट निर्देश येथें यासाठीं आहे आणि राजाश्रित दासींचे वेगळे निर्देश असल्यामुळें हा व्यवसाय स्वतंत्रपणें करणाऱ्या स्त्रिया होत्या, हें उघड आहे. मनुष्याच्या स्वभावाकडे पाहिलें तर केवळ नृत्यगानावर त्याचा निर्वाह होणें संभवत नाहीं आणि तो झाला तरी मनोविकारांचें दमन त्याबरोबर संभ-वत नाहीं. वेश्यागमन करून आपल्या सहधर्मचारिणीशीं वचनभ्रष्ट होणाऱ्या पुरुषांचे निर्देश रामायणांत नसले तरी मनुष्याचा स्वभाव किती युगांतरें झालीं तरी सारखाच. नीतिपरायण स्त्रीपुरुषांचें प्रमाण समाजाच्या उच्च अथवा अधो-

गतीला अनुसरून कमीअधिक होतें आणि समाजाची गति कळण्याचें हेंच साधन होय. सर्व समाज एकदम एका प्रमाणांत येणें शक्य नाहीं. वरील निर्देश केवळ नृत्यगायन करणाऱ्या वेश्यांचे म्हणून असले तरी त्यांवरून वेश्यागामी पुरुष आणि त्यांचें हें व्यसन हीं अनुमित होतात. एका स्थलीं तर याहून स्पष्ट निर्देश आहे. वेश्या या अर्थी तेथें "रूपाजीवा" (२।३६।३) असा शब्द योजिला आहे आणि या शब्दावरून त्यांचा उदरभरणाचा व्यवसाय कोणता हें कोणाला विचारावें लागत नाहीं. अशा रीतीनें हीं तीनही व्यसनें त्या वेळीं लोकांत होतीं. थोर लोक अशा व्यसनांपासून केव्हांहि अलिप्त असतात, तसे त्या वेळीं होते. भरत मातुलगृहांतून अयोध्येला आल्यावर त्यानें ज्या शपथा घेतल्या त्यांत पुढील शपथ आहे—"मद्यपान, स्त्रिया व द्यूत यांमध्यें नित्य आसक्त असल्याचें व कामक्रोधांनीं व्याप्त झाल्याचें पातक ज्याच्या अनुमतीनें राम वनांत गेला असेल त्याला लागेल." (२।७५।४१) यांत स्त्रियांविषयीं मोघम निर्देश आहे. आणि दुसरीं दोन व्यसनें स्पष्ट सांगितलीं आहेत. यांतील द्यूताचें व्यसन थोर लोकांपर्यंत पोंचलेलें दिसत नाहीं. सांप्रत घोड्यांच्या शर्यती वगैरे प्रकार राजाश्रय मिळून मोठ्या लोकांपर्यंत पोंचले असून सभ्यपणांत गणले जातात तशी द्यूतक्रीडा महाभारतकालीं मोठमोठ्या लोकांपर्यंत जाऊन पोंचली होती. रामायणकालीं द्यूताचा प्रसार इतका झालेला दिसत नाहीं.

## शपथ.

स्वतःच्या दोषराहित्याविषयीं इतरांचा संशय दूर करण्यासाठीं शपथ वाहण्याची पद्धति रामायणकालीं फार दिसून येते. शपथेचा प्रकार सांप्रतच्या न्यायमंदिरांतून प्रत्यहीं आपण पाहतों, त्या मानानें या पद्धतींत विशेष आहे, असें नाहीं. तथापि त्या वेळच्या शपथांचे प्रकार नानाविध आहेत. आणि शपथ वाहिलेली एकहि बाब मागाहून असत्य ठरलेली नाहीं. शपथेचा प्रकार प्रथम रामायणामध्यें यज्ञरक्षणासाठीं राजपुत्रांना मागण्याकरितां राजा दशरथाकडे विश्वामित्र आले त्या वेळीं दिसून येतो. त्यांचें उद्दिष्ट कळण्यापूर्वीं राजानें तें सिद्धीस नेण्याचें त्यांना प्रतिज्ञेनें सांगितलें. येथें शपथ असा स्पष्ट शब्द राजाचे भाषणांत नसला तरी त्याचे भाषणाचें धोरण शपथेचें आहे, हें साग्र वाचलें असतां

लक्षांत येईल. विश्वामित्राचें हृद्गत कळल्यावर राजा जेव्हां कांकूं करूं लागला तेव्हां मुनींनीं त्याला "आपली प्रतिज्ञा खरी कर" ( भव सत्यप्रतिश्रवः १।१९।३ ) असें सांगितलें. यावरून राजाच्या पूर्वीच्या भाषणाचें स्वरूप कळून येतें. विश्वामित्रांनींहि या वेळीं राजाला "पुत्रासंबंधीं शंका धरूं नको; मीं तुला प्रतिज्ञेनें सांगतों कीं, राक्षस मेले असें समज," ( १।१९।१४ ) असें सांगितलें. राजा आणि ऋषि या दोघांच्या येथील प्रतिज्ञा साध्या स्वरूपाच्या आहेत आणि यामुळें त्यांत शपथ असा स्पष्ट शब्द नाहीं. कैकेयी रुसून बसली असतां राजानें तिचें उद्दिष्ट परिपूर्ण करण्याचें तिला जें वचन दिलें तें त्यानें शपथपूर्वक दिलें आहे. "हे गर्विष्ठ कैकेयी, पुरुषश्रेष्ठ रामावांचून तुझ्यापेक्षां मला कोणीहि अधिक प्रिय नाहीं, हें तुला माहीत नाहीं काय? तो महात्मा राम रघुवंशांत श्रेष्ठ असून शत्रूंनीं जिंकण्यास अशक्य आहे. आणि माझें जीवित त्यावर आहे. त्या रामाशपथ मी सांगतों कीं, मी तुझा उद्देश सिद्धीला नेईन. तुझ्या मनांत काय असेल तें सांग. जो अल्पकालहि दृष्टीला पडला नाहीं तर मी निःसंशय जगणार नाहीं, त्या रामाशपथ मी सांगतों कीं, मी तुझें सांगणें शेवटास नेईन. स्वतःपेक्षां आणि इतर राजपुत्रांपेक्षां जो पुरुषश्रेष्ठ राम मला अधिक प्रिय आहे, त्या रामाशपथ सांगतों कीं, मी तुझे मनोरथ पूर्ण करीन." ( २।११।५ ) राजाच्या या भाषणांत त्याच्या समजुतीप्रमाणें कैकेयीला पटावें या दृष्टीनें प्रथम त्यानें रामाचें महत्त्व वर्णन करून त्याची शपथ घेतली आहे. येथील राजाचें आश्वासन पाहिलें म्हणजे या वचनासच अनुसरून कैकेयीनें आपलें उद्दिष्ट सांगितलें असतें तरी राजा वचनबद्ध झाल्यामुळें त्याला त्याप्रमाणें वागणें भाग होतें; मागील वर पुढें केव्हां तरी उपयोगीं पडतील म्हणून राखून ठेवितां आले असते. असो. यानंतर राजानें बोलाविल्यावरून राम तेथें भेटावयास आला. त्या वेळीं राजाची दीनस्थिति पाहून त्याविषयीं रामानें कैकेयीला विचारिलें आणि तिनें जेव्हां "त्याच्या मनांत कांहीं आहे, परंतु तुझ्या भीतीनें त्याला तें सांगवत नाहीं." [ २।१८।२० ] असें सांगितलें तेव्हां राजाची आज्ञा होईल त्याप्रमाणें आपण निःसंशय करूं अशी रामानें प्रतिज्ञा केली. [ २।१८।२९-३० ] रामाची प्रतिज्ञा दशरथाप्रमाणें साधी आहे. भरत

मातुलाकडून परत आल्यावर त्याला जेव्हां अयोध्येंतील वर्तमान कळलें, तेव्हां रामाला वनवासाला पाठविण्यांत आपल्या मातेचा कांहीं हेतु असला तरी आपली संमति तिला नाहीं हें लोकांना पटावें म्हणून त्यानें पुष्कळ शपथा घेतल्या आहेत. [ २।७५।२१–५८ ] रामाला वनवासाला ज्याच्या संमतीनें पाठविण्यांत आलें असेल त्याला अमुक अमुक कर्म केल्याचें पाप लागेल असें म्हणून नानाविध पातकावह कर्मांचा त्यानें उच्चार केला आहे. यांतील पातकांचें स्वरूप शास्त्रनिषिद्ध आचारांहून भिन्न आहे, असें नाहीं. आणि यासाठीं येथें त्यांचा निर्देश केला नाहीं. दिव्य हा शपथेचा अगदीं तीव्र प्रकार होय. सीतेनें दोन वेळां दिव्य केल्याचें रामायणांत वर्णिलें आहे. आणि दुसऱ्या वेळीं तर तिच्या प्रार्थनेप्रमाणें वसुंधरेनें तिला आपल्या पोटांत घेतलें आहे. दिव्याला लागणारी मनाची सिद्धता व श्रद्धा यावरून दिसते.

## स्त्रियांची स्थिति.

अजूनपर्यंत रामायणकालच्या समाजास्थितीचा सामान्यरीत्या विचार झाला. हा विचार करितांना पुरुष किंवा स्त्री हा भेद मनांत आणिलेला नाहीं. आतां स्त्रीसमाजासंबंधानें रामायणांतील विशेष उल्लेखांवरून काय ज्ञापन होतें, तें सांगावयाचें आहे. हल्लींच्या व त्या कालच्या स्त्रीसमाजांत साम्य व भेद कोठें आहे, हें पहावयाचें आहे. विहंगमदृष्टया पर्यालोचन केलें तर असें दिसून येईल कीं, प्रसिद्ध स्त्रीरत्नपंचकांतील कांहीं रत्नें त्या कालीं चमकत असून कांहींचा उदयहि व्हावयाचा होता. या गोष्टीचा विचार मनांत आल्याबरोबर याहून अधिक उज्ज्वल रीतीनें आम्ही वर्णन करणार तें काय असें वाटूं लागतें. त्या कालांतील सीता, सुमित्रा, कौसल्या, अनसूया इत्यादि स्त्रियांचीं नांवें घेतल्याबरोबर त्या कालांतील स्त्रीसमाजस्थितीची वाचकांस साक्ष पटणार आहे. स्त्रियांच्या उदार अंतःकरणाचें चित्र रामायणाइतकें प्राचीन वा अर्वाचीन ग्रंथांत क्वचित् उठलें असेल. रामायणांतील कैकेयी हें पात्र सोडून दिलें तर प्रत्येक स्त्रीपात्राचें चरित्र वर्णनीय झालें आहे, यांत शंका नाहीं. स्त्रियांचा मुख्य धर्म जें पातिव्रत्य तें प्रत्येकीनें पाळिलें असून, नायिकेनें तर त्याकरितां अरण्यवास स्वीकारिला आहे. थोर मनुष्यांची परीक्षा संकटकालीं होत असते. पित्राज्ञेनें रामाला वन-

वासाला जावयाचा प्रसंग आला असतां, आपणास बरोबर नेण्याबद्दल सीतेनें त्याची जी विनवणी केली आहे, ती वाचली म्हणजे तिच्या पातिव्रत्याची कांहींशी कल्पना होते. वनवास किती भयंकर आहे, त्याचें रामानें विस्तृत वर्णन तिला सांगितलें असतांहि तिनें भिऊन आपला आग्रह सोडिला नाहीं. या प्रसंगीं तिला पतीचा सहवास तरी अंतरला नव्हता; परंतु तिला पुढें जो वनवास पतकरावा लागला, त्या वेळीं पतीनें तिचा त्याग केलेला होता. तिच्या मनानें जरी ती शुद्ध होती तरी या वेळीं भयंकर लोकापवाद तिजवर आलेला होता. याशिवाय त्या वेळीं ती गर्भवती होती. अशा स्थितींतहि तिचें पतीवरील प्रेम कमी झालें नाहीं, ही विशेष महत्त्वाची, आश्चर्याची व प्रशंसनीय गोष्ट होय! अशा प्रेमळ पत्नीचा वियोग झाल्यावर रामासारख्या सत्त्वधीर पुरुषासहि वेड लागल्यासारखें झालें, यांत नवल तें काय? सीतेप्रमाणें इतर स्त्रियांचीं चरित्रें जरी विशेष पुढें आलेलीं नाहींत तरी त्यांच्याविषयीं रामायणांत जीं कांहीं वर्णनें आलीं आहेत तेवढींच् त्यांच्या चरित्राच्या पावित्र्याची साक्ष पटविण्यास पुरेशीं आहेत. रामायणांत **सीतेच्या बरोबरीचें पात्र सुमित्रा आहे.** लक्ष्मणाला रामाबरोबर वनांत जावयास संमति देऊन रामचरित्रांत तिनें आपलें नांव क़ायम करून ठेविलें आहे. वस्तुतः त्या वेळीं लक्ष्मणाला वनांत जाण्याचें कांहीं प्रयोजन नव्हतें; तथापि बंधुप्रेमानें रामाबरोबर वनांत जावयास तयार झालेल्या आपल्या पुत्रास सुमित्रेनें कांहींएक हरकत न घेतां उलट राम व सीता यांना दशरथाच्या व आपल्या स्थानीं कल्पून त्यांची शुश्रूषा करण्यास बजाविलें आहे. रामायणांतील स्त्रियांच्या अंतःकरणाची कांहींशी कल्पना सीता व सुमित्रा यांच्या या चित्रांवरून वाचकांस येईल, असा भरंवसा वाटतो.

## स्त्रियांचें अध्ययन.

आतां या स्त्रियांच्या शिक्षणाविषयीं थोडासा विचार करूं. वस्तुतः हा प्रश्न गौण आहे; परंतु सध्यांच्या कालानें त्याला विशेष महत्त्व व वेगळें स्वरूप प्राप्त झालें आहे. स्त्रीशिक्षणाचें नांव घेतल्याबरोबर भ्रकुटी संकुचित करणारी मंडळी जरी आतां कमी झाली असली तरी स्त्रीशिक्षणाची मर्यादा कोणती या बाबींत अद्यापि थोरथोर मंडळींत मतभेद आहे. रामायणांतील कांहीं उल्लेखांवरून

स्त्रीशिक्षणाविरुद्ध मंडळी त्या वेळीं होती, असें दिसून येत नाहीं. तथापि त्या वेळची स्त्रीशिक्षणपद्धति व मर्यादा सध्यांच्याहून भिन्न प्रकारची होती, हें निर्विवाद आहे. गर्गीसारख्या लोकोत्तर बुद्धीच्या किंवा त्याहून कमी प्रतीच्या विदुषी सर्वत्र पसरल्या होत्या, असें म्हणतां येत नाहीं. ज्या स्त्रियांचीं चरित्रें पुढें आलीं आहेत, त्यांवरून त्या अशिक्षित नव्हत्या, हें उघड आहे; परंतु गर्गी-सारख्या ब्रह्मवादिनी स्त्रियांची गोष्ट सोडून दिली तर सामान्यतः स्त्रीसमाजाला मिळत असलेलें शिक्षण विशिष्ट शास्त्रीय विषयांचें नव्हतें. रामायणांत किंवा इतर प्राचीन ग्रंथांत मोठमोठ्या ऋषींच्या आश्रमांचीं वर्णनें आहेत. या वर्णनांत त्या त्या आश्रमांतील विद्यार्थ्यांसंबंधीं प्रसंगविशेषीं उल्लेख असतात. विद्यार्थिनीं-संबंधीं उल्लेख आढळत नाहींत. त्या वेळचा एकेक आश्रम म्हणजे हल्लींची युनिव्हर्सिटी म्हणावयास हरकत नाहीं. स्त्रियांकरितां अशा तऱ्हेची वेगळी सार्वजनिक सोय होती, असेंहि दिसत नाहीं. असें असूनहि त्या सुशिक्षित होत्या, यावरून त्यांच्या शिक्षणाची सोय खासगी रीतीनें केली जात असावी. गर्गीसारख्या ब्रह्मवादिनी स्त्रिया ज्या निपजल्या, त्यांना मिळालेलें उच्च प्रतीचें शिक्षणहि असेंच खासगी रीतीनें असलें पाहिजे, असें म्हणणें भाग आहे. असल्या विदुषींचा उपयोग स्त्रीसमाजास होऊन त्यामध्यें तसल्या स्त्रिया निप-जणें शक्य आहे, किंबहुना निपजल्याहि असतील; तथापि पुरुषांप्रमाणें स्त्रियां-च्या शिक्षणासाठीं सार्वजनिक सोय नसल्याकारणानें विद्वान् पुरुषांच्या मानानें विदुषींची संख्या फार कमी आहे. हल्लींच्या स्त्रीसमाजाच्या स्थितीकडे पाहिलें असतां त्या मानानें त्या वेळचा स्त्रीसमाज शिक्षण व नीतिमत्ता या दोनहि बाबींत फार पुढें गेला होता, यांत शंका नाहीं. स्त्रीशिक्षणविषयींच्या हल्लींच्या कल्पने-प्रमाणें जरी त्या वेळीं स्त्रियांना शिक्षण मिळत नव्हतें तरी वैदिकधर्मानुयायांच्या राहणीस अनुसरून त्यांना आवश्यक असलेलें शिक्षण मिळत असे, ही अभि-मानास्पद गोष्ट होय.

वेगवेगळ्या शास्त्रांचें शिक्षण जरी सर्व स्त्रियांना सामान्यतः मिळत नव्हतें, तरी त्या वेळीं पुरुषांप्रमाणें स्त्रियाहि वेदाध्ययन करीत असत. सांप्रत वेदा-ध्ययन करणाऱ्याच्या मनाला व जनांला त्याविषयीं विशेष आदर न वाटतां तें

एका वर्गाच्या उदरनिर्वाहाचें साधन होऊन गेल्यामुळें त्याविषयीं येथें विशेष अभिमानानें उल्लेख करणें अवश्य आहे. लंकेमध्यें सीताशुद्धीचें काम करीत असतां बराच वेळ तिचा शोध न मिळाल्यामुळें मारुतीनें तर्क केला कीं:—

**संध्याकालमनाः श्यामा ध्रुवमेष्यति जानकी ।**
**नदीं चेमां शुभजलां संध्यार्थे वरवर्णिनी ॥** ५।१४।४९ ॥

" संध्या करण्याची वेळ झाली आहे हें मनांत आणून ती श्रेष्ठ स्त्री जानकी संध्या करण्यासाठीं या निर्मळ पाण्यानें युक्त असलेल्या नदीवर खातरीनें येईल. "

आणि त्याप्रमाणें तो तेथें तपास करीत राहिला. यावरून विहितकर्में नियमित वेळीं करण्याविषयीं इतक्या संकटकाळींहि सीता तत्पर होती, हें उघड होतें. टीकाकारांनीं मात्र या उघड गोष्टीकडे मुळींच लक्ष न देतां विनाकारण आपला गैरसमज करून घेतला आहे. स्त्रियांनीं वेदाध्ययन करावें ही गोष्ट त्यांना इतकी विपरीत वाटली आहे कीं, त्यांनीं या गोष्टीवर अकांडतांडव करून श्लोकाचा अर्थ फिरविण्याचा प्रयत्न केलेला आहे. एका टीकेंत खालील मजकूर आहे:—

**संध्या दिनरात्र्योः संधिरूपानुष्ठानकालो यस्य कर्मणस्तत्र मनो यस्याः सा । तथा संध्यार्थे संध्याकालक्रियमाणस्नानाद्यर्थे । ............तत्र कर्तव्यस्नानादौ चास्त्येव स्त्रीणामप्यधिकार इति कथं स्त्रीणां संध्यावंदनमिति परास्तम् । किंच सम्यग्भगवद्ध्यानस्यैव संध्यापदार्थत्वेनास्त्येव तत्र स्त्रिया अधिकारः । गायत्रीमंत्रेण तदर्थस्मरणपूर्वकध्याने तु द्विजस्यैवाधिकार इत्यलम् ।**

' संध्याकालमनाः ' म्हणजे दिवस आणि रात्र यांच्या संधिकालीं करावयाचें कर्म करण्याचें जिच्या मनांत आलें आहे ती. तसेंच ' संध्यार्थे ' म्हणजे [ वर लिहिलेल्या ] संधिकालीं करावयाचे जे स्नान वगैरे विधि ते करण्याकरितां. त्या वेळीं स्नान वगैरे विधि करण्याचा स्त्रियांना अधिकार असल्यामुळें, ' स्त्रियांनीं संध्या केली ' हें कसें, अशी जर कोणाला शंका येईल तर ती व्यर्थ होय.

किंवा ‘ संध्या ’ म्हणजे चांगल्या प्रकारें केलेलें परमेश्वराचें ध्यान. तेव्हां तें करण्याचा स्त्रियांना अधिकार आहेच. गायत्रीमंत्राचा अर्थ मनांत आणून त्याचें ध्यान करण्याचा अधिकार फक्त द्विजांचा आहे, ( स्त्रियांना तो अधिकार नाहीं.) ”

या टीकेंत ‘संध्यार्थे’ या पदाचा अर्थ “ संध्याकाळीं करावयास लागणारें जें स्नान त्याकरितां ” असा केला आहे. जर या श्लोकाचा अर्थ सरळ करून वेदाध्ययनाच्या अधिकाराविषयीं एवढें निष्फळ व्याख्यान टीकाकारानें दिलें नसतें तर संध्या करण्याबद्दल स्त्रियांनीं आग्रह धरिला असता अशी समजूत असल्यास न कळे! परंतु या टीकाकाराची ही चलाखी लटपटण्यासारखा जेव्हां प्रसंग आला तेव्हां त्यानें कसें समाधान केलें आहे पहा:—

**ततः स्वस्त्ययनं कृत्वा मंत्रविद् विजयैषिणी ॥४।१६।१२॥**

“ आपला पति जो वाली त्याला जय प्राप्त व्हावा यासाठीं त्या मंत्रवेत्त्या तारेनें त्याचें स्वस्त्ययन केलें.”

वालीची स्त्री जी तारा तिजविषयींचें हें वर्णन आहे. या श्लोकांत महर्षि वाल्मीकींनींच तारेला ‘ मंत्रविद् ’ असें विशेषण दिलें असल्यामुळें टीकाकाराचा निरुपाय होऊन तो म्हणतो:—

**मंत्रविद् स्वस्त्ययनमंत्रवेत्त्री । देवांशत्वात्तद्वेदनम् ।**

“ मंत्रविद् म्हणजे स्वस्त्ययनाचे मंत्र जाणणारी. तारा ही देवांश असल्यामुळें तिला मंत्र कळत होते. ”

तारा ही देवांश असल्यामुळें ती मंत्रवेत्री होती असें येथें समाधान केलें आहे. आश्चर्य हें कीं, टीकाकाराला तारेंत देवांश दिसला आणि सीतेंत दिसला नाहीं! सीतेविषयींच्या वरील श्लोकांत त्यानें जर असें समाधान दिलें असतें तर असे परस्परविरोध तरी उद्भवले नसते. सीतेनें वेदाध्ययन केल्याचें मान्य केल्यास कोणती हानि होईल असें टीकाकाराला वाटलें समजत नाहीं ! रामायणकालचा येथें विचार करावयाचा आहे व त्या वेळीं स्त्रिया वेदाध्ययन करीत असत ही गोष्ट इतर प्रमाणांवरून सिद्ध होत आहे. व्याकरणशास्त्रामध्यें स्त्रीप्रत्ययाविषयीं विचार करितांना वेदाध्ययन करणारी स्त्री या अर्थीं रूपें आलीं आहेत. ‘जातेर-

स्त्रीविषयादयोपधात्" या सूत्रावर वार्तिककारांनीं जाति शब्दाचा खुलासा करण्याकरितां वार्तिक केलें आहे.

**आकृतिग्रहणा जातिलिंगानां न च सर्वभाक् ।**
**सकृदाख्यातनिर्ग्राह्या गोत्रं च चरणैः सह ॥**

यांतील शेवटच्या चरणांत वरील विषय असून त्यावर कौमुदीकारांनीं

**अपत्यप्रत्ययांतः शाखाध्येतृवाची च शब्दो जातिकार्यं लभते ।**

"अपत्यप्रत्ययान्त आणि शाखांचें अध्ययन करणारा या अर्थी असलेल्या शब्दाला स्त्रीलिंगामध्यें जातिसंज्ञक शब्दाप्रमाणें प्रत्यय होतो." असें व्याख्यान केलें आहे. व 'बह्वृची। कठी।' अशीं वरील सूत्रानें होणारा 'ङीष' हा प्रत्यय करून उदाहरणें दिलीं आहेत. यांतील 'बह्वृची' या शब्दाचा अर्थ बह्वृच जो ऋग्वेद त्याचें अध्ययन करणारी स्त्री असा आहे. या शब्दावरून स्त्रिया वेदाध्ययन करीत, ही गोष्ट उघड होते. कौमुदीवर ज्ञानेन्द्रसरस्वतींची 'तत्त्वबोधिनी' म्हणून जी प्रख्यात टीका आहे तींत ही गोष्ट निःशंकपणें मान्य केली आहे.

**यद्यपि स्त्रीणामध्ययनं प्रतिषिद्धं तथापि पुराकल्पे ह्येतदासीत् ।**
**तदाह यमः—**

**पुराकल्पेषु नारीणां मौंजीबंधनमिष्यते ।**
**अध्यापनं च वेदानां सावित्रीवचनं तथा ॥ इति ॥**

"स्त्रियांना जरी अध्ययनाचा निषेध आहे तथापि पूर्वकल्पांत तो नव्हता." यमानें म्हटलें आहे—"पूर्वकल्पामध्यें स्त्रियांचें उपनयन करीत, त्या वेदांचें अध्यापन करीत व गायत्रीचा उपदेश करीत."

याशिवाय 'स्वतः अध्यापन करणारी' या अर्थी 'उपाध्यायी किंवा उपाध्याया' व 'स्वतः व्याख्यान करणारी' या अर्थी 'आचार्या' अशीं रूपें दिलीं आहेत. या विवेचनावरून आतां तरी या बाबींत कोणाची शंका उरणार नाहीं अशी आशा आहे.

हा पुरावा एका बाजूला ठेविला तरी याहून स्पष्ट पुरावा अन्यत्र सांपडतो. भरत रामाला परत आणण्याकरितां गेला, त्या वेळीं वाटेंत त्याची व निषादाधि-

पति गुहाची गांठ पडली. या वेळीं रामासंबंधीं तेथें घडलेली सर्व हकीगत गुहानें भरताला सांगितली. गुहाच्या या भाषणांत पुढील दोन श्लोक आहेतः—

**लक्ष्मणेन यदानीतं पीतं वारि महात्मना ।**
**औपवास्यं तदाकर्षीद्राघवः सहसीतया ॥ २।८७।१८ ॥**
**ततस्तु जलशेषेण लक्ष्मणोऽप्यकरोत्तदा ।**
**वाग्यतास्ते त्रयः संध्यां समुपासन्त संहिताः ॥ १९ ॥**

"लक्ष्मणानें आणिलेलें तें पाणी त्या महात्म्या रामानें सेवन केलें आणि त्या दिवशीं त्यानें आणि सीतेनें उपोषण केलें. नंतर उरलेलें पाणी लक्ष्मणानें सेवन केलें. नंतर त्या तिघांनीं मौन धारण करून संध्यावंदन केलें."

या श्लोकांत सांगितलेल्या हकीगतीवरून राम, लक्ष्मण व सीता या तिघांनीं संध्यावंदन केल्याचें स्पष्ट दिसून येतें. दोनहि श्लोकांत या तिघांशिवाय दुसऱ्या कोणाचा संबंध येत नाहीं. कांहीं टीकाकारांनीं तिसरा इसम सुमंत्र असावा, असें सुचविलें आहे. परंतु वरील उताऱ्यावरून यांत सुमंत्राचा संबंध येणें शक्य दिसत नाहीं. त्या सबंध सर्गांत सुमंत्राचें नांव नाहीं. मग तें टीकाकाराच्या भिडेकरितां लोकांनीं कसें मान्य करावें?

याविषयीं आणखी एक प्रमाण देऊन आटोपतें घेऊं. अरण्यांत पंचवटींत गेल्यावर एकदां हेमन्त ऋतु प्राप्त झाला असतां राम, लक्ष्मण व सीता हीं तीनहि गोदावरीवर स्नानाकरितां गेलीं. त्यांनीं स्नान केल्यावर आन्हिक कर्म केल्याचें सांगतांना संध्यावन्दनाबरोबर देवपितृतर्पणाचा अधिक उल्लेख आहे."(३।१६।४२) येथें संध्यावन्दन असें स्पष्ट म्हटलेलें नाहीं, तथापि सूर्य आणि इतर देवता यांचें स्तवन अर्थात् उपस्थान त्यांनीं केल्याचें सांगितलें आहे व त्या योगानें संध्यावन्दन निर्देशिल्यासारखें झालें आहे. तेथें तर या तिघांवाचून अन्य कोणी असण्याचा संभव नाहीं आणि याकरितां सीतेनें रामाप्रमाणें हीं सर्व कर्में केलीं हें उघड होत आहे.

वरील सर्व विवेचन प्रायः संध्यावन्दनाविषयीं आहे आणि यासाठीं त्यावरून वेदाध्ययनाविषयीं अनुमान करणें कोणाला अयुक्त वाटण्याचा संभव आहे, याकरितां यासंबंधीं अन्य प्रमाणें कांहीं असल्यास पाहूं. संध्यावन्दनाप्रमाणें

तत्कालीन स्त्रिया अग्निसेवा करीत असें दिसतें. वनवासाला निघण्यापूर्वी रामानें कौसल्येला आपण गेल्यावर कसें रहावें याविषयीं जे दोन शब्द सांगितले आहेत त्यांत देवतांची पूजा आणि ब्राह्मणांचा सत्कार यांबरोबर अग्निकार्याविषयीं उल्लेख आहे. (२।२४।२९) राम निघाला असतां मंगल व्हावें या हेतूनें तिनें ब्राह्मणांकडून हवन करविल्याचें लिहिलें आहे. (२।२५।२७) येथील हवन ब्राह्मणद्वारा असलें तरी तें कोणाच्या प्रेरणेनें केलेलें नसून स्वतां केलेलें आहे व यावरून वेदविहित अग्निसेवेविषयींच्या तिच्या श्रद्धेबरोबर तिच्या अध्ययनाची कल्पना होते. या वेळीं तिनें जें रक्षाबंधन केलें, ते मंत्र तिनें स्वतां म्हटले आहेत. (२।२५।२८) रामाला परत आणण्याकरितां भरत सैन्य आणि प्रजा यांसह अरण्यांत गेला, तेव्हां सर्व परिवार मागें ठेवून तो शत्रुघ्न व सुमंत यांसह पुढें गेला; या भेटींत रामाला पित्याचा मृत्यु कळल्यावर त्यानें पित्याला उद्देशून पिंडदान केलें व परत आश्रमीं गेला. मागून पुरोहित व कौसल्यादि राजमाता आश्रमाचा शोध काढीत येत असतां मार्गांत दर्भांवर दिलेले पिंड त्यांनीं अवलोकन केले, आणि त्यांकडे पाहून कौसल्या म्हणते:—

**श्रुतिस्तु खल्वियं सत्या लौकिकी प्रतिभाति मे ।**
**यदन्नः पुरुषो भवति तदन्नास्तस्य देवताः ॥२।१०४।१५॥**

" जें अन्न पुरुष भक्षण करितो तेंच अन्न त्यानें देवतांना द्यावयाचें असतें अशी श्रुति असून ती लोकांना पूर्ण परिचित आहे. ती सत्य असल्याचें खरोखर ( हे पिंड पाहून ) मला वाटत आहे. "

येथें कौसल्येनें श्रुति म्हणून दाखविली आहे व ती 'श्रुति' हा शब्द योजून म्हटली हें विशेष आहे. येथील श्रुतिशब्दाचा अर्थ कोणी ' म्हण ' असा करितात; परंतु म्हण या अर्थीं गाथा हा शब्द रामायणांत अन्यत्र आलेला आहे. (५।३४।६; ६।१८।२६; ६।१२६।२) एके स्थलीं "लौकिक प्रवाद" (२।३५।२८) असा शब्द योजिलेला आहे. हीच श्रुति पिंडदान करितेवेळीं रामाचे मुखीं आहे. (२।१०३।३०) पण तेथें श्रुति किंवा प्रवाद असें कांहीं म्हटलेलें नाहीं. कौसल्येनें या वेळीं श्रुति म्हटली त्याबरोबर तिचें धर्मशास्त्राचें मार्मिक अवलोकनहि व्यक्त होत आहे. राम वनांत गेल्यावर कौसल्येनें राजाला उद्देशून जें भाषण

केलें त्यांत तिनें कनिष्ठ बंधु जो भरत त्यानें उपभोगिलेल्या राज्याचा त्याचा ज्येष्ठ बंधु राम कसा स्वीकार करील? अशी शंका घेतली आहे. आणि याला दृष्टांत म्हणून "हवि, आज्य, पुरोडाश, कुश आणि खैराचे यूप हीं एकदां यज्ञामध्यें उपयोगांत आणिलीं असतां पुनः त्यांचा यज्ञांत उपयोग करीत नाहींत" (२।६१।१७) असें सांगितलें आहे. हा विषय उघड उघड धर्मशास्त्राचा आहे. रामाचें कृत्रिम शीर रावणानें सीतेला दाखविलें असतां रामाचा वध झाला असें समजून तिनें जो विलाप केला त्यांत एके स्थलीं ती म्हणतेः—

**संश्रुतं गृह्णता पाणिं चरिष्यामीति यत्त्वया ।**
**स्मर तन्नाम काकुत्स्थ नय मामपि दुःखिताम् ।** (६।३२।२१)

"हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, माझें पाणिग्रहण करितांना 'तुझ्यासहवर्तमान धर्मादिकांचें आचरण करीन' अशी जी तूं प्रतिज्ञा केलीस तिचें स्मरण कर आणि मज दुःखित स्त्रीला बरोबर घेऊन जा." सीतेचें हें भाषण पाणिग्रहण-मंत्राला उद्देशून असून "धर्मेऽर्थे कामे च नातिचरामि" ही प्रतिज्ञा येथें तिला अभिप्रेत आहे, हें उघड आहे. विवाहांतील ही प्रतिज्ञा प्रत्येक विवाहाचे वेळीं सर्वांना करावयाची असते, परंतु स्वतःला सुधारलेले मानणाऱ्या सांप्रतच्या जनांत ती म्हणते वेळीं तिकडे कोणाचें लक्ष असत नाहीं व महत्त्व वाटत नाहीं. मग पुढील आयुष्यांत तिचें पालन कसचें होणार? सीतेच्या वरील उद्गारांवरून धार्मिक विधि केवळ पुरोहितद्वारा न करितां स्त्रियाहि अर्थज्ञानपूर्वक त्यांत लक्ष देत असत, हें उघड होतें.

## पडद्याची चाल.

शिक्षणाच्या बाबतींत जरी स्त्रियांची उन्नत स्थिति होती तरी त्या वेळीं भरणाच्या परिषदांतून पुरुषांच्या बरोबरीनें बसून त्या आपलीं मतें प्रतिपादन करीत असत, असें दिसत नाहीं. म्हणजे त्या वेळीं मराठ्यांप्रमाणें गोषाची चाल होती असें नाहीं; तर ज्या तऱ्हेचें स्त्रीस्वातंत्र्य पाश्चात्य देशांत चालू आहे त्या तऱ्हेचें येथें नव्हतें. रावणवधानंतर सीता रामाकडे येत असतां ती वानरमंडळींतून पुढें येईना. हें पाहून कोणत्या प्रसंगीं स्त्रियांनीं पुरुषांच्या समाजांत येण्यास हरकत नाहीं, तें रामानें सांगितलें आहे.

**व्यसनेषु न कृच्छ्रेषु न युद्धेषु स्वयंवरे ।**
**न क्रतौ नो विवाहे वा दर्शनं दूष्यते स्त्रियः ॥६।११४।२८॥**

"संकट, विपत्ति, युद्ध, स्वयंवर, यज्ञ आणि विवाह या प्रसंगीं स्त्रियांचें दर्शन घडल्यास दोष लागत नाहीं."

या रामाच्या भाषणावरून त्या वेळीं भरणाऱ्या परिषदांतून त्या पुरुषांबरोबर बसत असें दिसत नाहीं. कारण उपरिनिर्दिष्ट प्रसंगांशिवाय अन्य प्रसंगीं त्या पुरुषांच्या समाजांत आल्याचें उदाहरण रामायणांत आढळत नाहीं. त्या वेळच्या या पद्धतीस अनुसरून सीता वनांत जाण्यास निघाली, त्या वेळीं लोकांच्या दृष्टीस पडली; त्यापूर्वीं सर्वांला तिचें दर्शन झालें नव्हतें. त्या वेळीं अयोध्येंतील प्रजाजनांनीं काढिलेले खालील उद्गार पहा:—

**या न शक्या पुरा द्रष्टुं भूतैराकाशगैरपि ।**
**तामद्य सीतां पश्यन्ति राजमार्गगता जनाः ॥१।३३।७॥**

"ज्या सीतेचें दर्शन आकाशांतून फिरणाऱ्या प्राण्यांनाहि पूर्वीं दुर्लभ होतें त्या सीतेला आज रस्त्यानें येणारेजाणारे कीं हो पहात आहेत!"

नागरिकांच्या या उद्गारांवरून सीतेचें दर्शन त्यांना दुर्लभ होतें, असें दिसत असलें तरी पडद्याची चाल त्यावरून अनुमानितां येणार नाहीं. या चालीचा उगम पातिव्रत्यपालनापासून झाला आहे, यांत शंका नाहीं. दुराचारी पुरुषांचे हातीं सत्ता गेली असतां व नीतिदृष्ट्या समाज दुर्बल झाला असतां समाजानें योजिलेल्या उपायांपैकीं निःशस्त्र प्रतिकारासारखा हा एक दुर्बल उपाय होय. रामायणकालाकडे पाहिलें तर अशा प्रतिकाराची आवश्यकता होती, असें वाटत नाहीं. सीता पूर्वीं लोकांच्या दृष्टीला पडत नसे असें जरी ती वनवासाला निघाली असतां नागरिक म्हणूं लागले, तरी तिनें या वेळीं तोंडावर वस्त्र घेऊन तें झांकून टाकिलें नव्हतें, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. रामाला वनवासाला पाठविण्यासंबंधीं जी राजवाड्यांत चर्चा झाली तींत राजाबरोबर त्याचे अमात्य होते व ते कैकेयीला उद्देशून बोलत होते. तसेंच रामाला परत आणण्याकरितां भरत गेला, त्याबरोबर सर्व राजमाता गेल्या होत्या. आणि भरद्वाजमुनींच्या आश्रमांत त्या गेल्या असतां भरतानें मुनींना त्यांची ओळख करून दिली. (२।९२।२०-

२७ ) वस्त्रावगुंठनाची चाल यावरून त्या वेळीं नव्हती हें उघड आहे. इतकेंच नव्हे तर " असें झाल्यावर " कांहीं दिवस बाहेर पडण्याचा सध्यां प्रतिबंध असतो तोहि त्या वेळीं होता असें दिसत नाहीं. स्त्रियांनीं पुरुषांच्या समाजांत येण्याचे प्रसंग रामानें सांगितलेल्या नियमांत आले आहेत व ते इतके पूर्ण आहेत कीं, त्यांवांचून पुरुषांचे समाजांत येण्याचा योग स्त्रियांना येण्याचा रामायणकालीं संभव दिसत नाहीं.पडद्याच्या पद्धतींत हा विवेक पूर्वी नव्हता व सध्यांहि नाहीं.वास्तविक पातिव्रत्याचें पालन स्त्रीवर जितकें अवलंबून आहे तितकेंच पुरुषांच्या समाजावर आहे. पातिव्रत्याचा भंग झाल्यानें स्त्री दूषित होते. पण तें पापकर्म करणारा पुरुष तिच्याबरोबर दूषित होतो, हें विसरतां नये; इतकेंच नव्हे तर समाजातील नीतिमत्ता भ्रष्ट झाल्याचें तो सिद्ध करून देत असतो. या दृष्टीनें पुरुषांच्या समाजांत स्त्रीनें येऊन दृष्टीला पडण्याचा प्रतिबंध करण्यापेक्षां स्त्रीकडे पुरुषानें पापदृष्टीनें पाहाण्याचा प्रतिबंध असणें अधिक सयुक्तिक होय. रामानें सांगितलेला जो नियम वर दिला आहे त्यांत त्या त्या प्रसंगीं स्त्रियांचें दर्शन दोषावह नाहीं ( न दर्शनं दूष्यते स्त्रियः । ) असें सांगितलें आहे. आणि अर्थात् हा नियम पुरुषांनीं पाळावयाचा आहे. वरील नियम सांगितल्यावर रामानें सीतेला पालखींतून उतरून पायांनीं चालत आपल्यापर्यंत आणण्याची आज्ञा केली. आणि " सर्व वानर तिला पाहूं देत " ( पश्यन्त्वेते वनौकसः ६।११४।३० ) असें सांगितलें. त्यावरून निमयाचें सत्यस्वरूप स्पष्ट होतें. सीतेचे अलंकार लक्ष्मणाला दाखविण्यांत आले तेव्हां त्यानें नित्य पादाभिवंदन करितेवेळीं पायांत असलेले नुपूर आपण पाहिले आहेत व ते मात्र ओळखितां येतात, असें सांगितल्याचें रामायणांत लिहिलें आहे. ( ४।६।२३ ) लक्ष्मणाची नीतिमत्ता त्याच्या या उद्गारांत भरलेली आहे, हें उघड आहे; पण त्याबरोबर स्त्रीकडे पुरुषानें पाहणें दोषावह मानीत असत, हा नियमहि त्यानें न बोलतां व्यक्त केला आहे. सीताशुद्ध्यर्थ मारुती रावणाचे मंदिरांत गेला असतां तेथें त्याच्या अनेक स्त्रिया त्यानें पाहिल्या, त्या वेळीं परदारावलोकनाचे योगानें आपल्या हातून धर्मलोप होत नाहींना? अशी शंका त्याला आली. ( ५।११।३९ ) आपली दृष्टि पापी नसल्यामुळें आपणाला दोष नाहीं, असें त्यानें लागलींच समाधान केलें आहे.

तथापि त्यावरून परस्त्रीकडे पाहण्याचा निषेध शास्त्रोपदिष्ट आहे, हें उघड होतें. पडद्याची चाल इष्ट असती तर अपवादभूत म्हणून सांगितलेले प्रसंग सांगावयाचें कारणच नव्हतें. अराजक राष्ट्राविषयींच्या वर्णनांत "अराजक राष्ट्रामध्यें सुवर्णालंकार घातलेल्या कुमारिका एकत्र जमून सायंकाळीं उद्यानांत क्रीडा करीत नाहींत; (२।६७।१७) विलासी पुरुष आपल्या स्त्रियांसह शीघ्रगामी यानांतून अरण्यांत जात नाहींत. (२।९७।१९)" असें लिहिलें आहे. यांत पडद्याचे चालीचा प्रत्यक्ष निषेध नसला तरी लोकांतील त्याविषयींची प्रवृत्ति कळून येते व ती कळण्याकरितांच हे उल्लेख अवतरिले आहेत.

## सहगमन.

रामायणांतील निरनिराळ्या स्थलीं असलेल्या पुराव्यांवरून स्त्रियांची त्या वेळची स्थिति कशा प्रकारची होती, हें दाखविण्याचा वर जो प्रयत्न केला आहे तो वाचून या विषयाची सामान्य कल्पना होण्यास हरकत नाहीं, असें वाटतें. आतां वैदिक धर्मास अनुसरून स्त्रियांचा मुख्य धर्म जें पातिव्रत्य तें रामायणकालीं कशा रीतीनें स्त्रिया पाळीत असत याचें विवेचन करण्याची जरूर आहे, असें आम्हांस वाटत नाहीं. या एका धर्माच्या बळावर हिंदुस्थानांतील स्त्रियांनीं आपलें नांव सर्व जगांत अजरामर करून ठेविलें आहे, आणि हा गुण आमच्या लोकांच्या नित्य परिचयाचा असल्यामुळें त्याबद्दल येथें दोन शब्द लिहिल्यासहि चर्वितचर्वण होण्याचा संभव आहे. आमच्याकडील स्त्रियांचें पातिव्रत्य इतक्या शिखरास पोंचलें होतें कीं, पतीमागें जिवंत राहणें अशक्य व अनुचित वाटून त्या पतीच्या शवाबरोबर आपलें शरीर जाळून घेत असत. जिवंत राहून आपलें आयुष्य परोपकारांत वेंचण्यानें पुण्य संपादन करितां येतें व हा मार्ग धर्मसंमत आहेच. असें असतांहि त्यांनीं हा भयंकर मार्ग स्वीकारिला, यांत त्यांच्या मनोवृत्तींचें रहस्य सांठविलें आहे. हा मार्ग चांगला किंवा रानटी होता, हें ठरविण्याचा अधिकार आम्हांला नाहीं. सहगमन करण्याच्या कल्पनेचा अतिरेक होऊन सहगमन करावयास लावण्याचा प्रघात पडला, ही गोष्ट कोणीहि पसंत करणार नाहीं व तिचा आम्ही येथें विचारहि करीत नाहीं. केवळ प्रेमातिरेकानें ज्या स्त्रिया सहगमन करीत असत, त्यांच्याविषयीं आपला

चांगला किंवा वाईट अभिप्राय देण्याची योग्यता नाहीं, एवढेंच आमचें म्हणणें आहे. कारण अंतकालीं चित्तवृत्तीची चंचलता नाहींशी होऊन शांति प्राप्त होणें योग्यांनाहि दुर्लभ असतें; याकरितां तशी शांति मिळून ज्यांना अंतकालीं स्थितप्रज्ञतेचा लाभ झाला त्या व्यक्तींचें पूर्वाचरण पापमय वा पुण्यमय कसेंहि असलें, तरी जगांत त्या वंद्य मानिल्या जातात. या गोष्टीकडे पाहून मग जर आमच्याकडील सहगमन करणाऱ्या स्त्रियांविषयीं विचार केला तर त्यांच्यावर रानटीपणाचा शिक्का मारण्याचें धाडस कोणाला करितां येणार नाहीं. रामायणांत अशा रीतीनें कोणीहि स्त्रीनें सहगमन केल्याचा उल्लेख नाहीं. तथापि कौसल्येच्या भाषणांत एके स्थलीं सहगमनाविषयींची कल्पना आलेली आहे:—

**साहमद्यैव दिष्टान्तं गमिष्यामि पतिव्रता ।**
**इदं शरीरमालिंग्य प्रवेक्ष्यामि हुताशनम् ॥२।६६।१२॥**

"मी पतिव्रता स्त्री आहें, तेव्हां मी आजच मृत्युलोकची वाट धरणार! या माझ्या पतीच्या देहाला आलिंगन देऊन मी अग्नीमध्यें प्रवेश करणार!"

असा उल्लेख असल्यामुळें रामायणकालीं स्त्रिया सहगमन करीत नसत, असें म्हणतां येत नाहीं.

नाहीं म्हणावयास उत्तरकाण्डांत एके स्थलीं सहगमनाचा उल्लेख आला आहे. हा भाग प्रक्षिप्त आहे, तथापि प्रक्षेपकाचे कालीं प्राचीन म्हणून मानिलेल्या कथेंतील एक प्रमाण असें तरी त्याला म्हणतां येईल व या दृष्टीनें आम्ही तें येथें देणार आहों. कुशध्वजाची कन्या वेदवती रावणाच्या दृष्टीस पडली असतां तो काममोहित झाला व त्यानें विचारिल्यावरून तिनें त्याला आपला वृत्तान्त सांगितला. वेदवतीच्या सौन्दर्याला मोहित होऊन तिच्या पित्याकडे कित्येक देवदैत्यकांनीं मागणी केली असतां विष्णूवांचून अन्य कोणालाहि ही कन्या द्यावयाची नाहीं, असें त्यानें सर्वांना सांगितलें. त्याचें हें भाषण ऐकून शंभुनामक दैत्य क्रुद्ध झाला व त्यानें कुशध्वज निजला असतां त्याचा वध केला. त्या वेळीं त्याची स्त्री म्हणजे वेदवतीची माता हिनें सहगमन केलें, असें तिच्या तोंडच्या वृत्तान्तांत लिहिलें आहे. ( ७।१७।१५ ) रामायणकालांतील स्त्रीच्या सहगमनाविषयीं असा उल्लेख रामायणांत नाहीं. तथापि कौस-

त्येच्या वरील उद्गारांवरून ही पद्धति त्या वेळीं माहीत नसून मागाहून एकदम प्रचारांत आली, असें अनुमान करितां येणार नाहीं.

## स्त्रियांचा अधिकार आणि सामान्य स्थिति.

रामायणकालीन स्त्रियांची योग्यता कोणत्या प्रकारची होती हें येथपर्यंत केलेल्या विवेचनावरून वाचकांस कळण्यासारखें आहे. तथापि समाजांत वा कुटुंबांत त्यांचा अधिकार काय होता, हें त्यावरून समजणार नाहीं, तें आतां पाहूं. सांप्रत अनिष्ट वाटणाऱ्या आणि त्या वेळीं प्रचारांत असलेल्या एका चालीचा या प्रसंगीं प्रथम उल्लेख करणें भाग आहे. ही चाल म्हणजे दासी आणि दास यांच्या दानाची होय. विवाह म्हणजे कन्येच्या पित्यानें कन्येचें वराला दान करणें असा ज्या समाजांत प्रघात आहे, त्या समाजानें या पद्धती-कडे वक्रदृष्टीनें पाहण्याचें वास्तविक प्रयोजन नाहीं. कारण प्रस्तुत पद्धतींत जर कांहीं अनिष्ट असेल तर तें उभयत्र आहे. तसेंच या दानांत केवळ दासी नसून दासहि आहेत. रामानें वनांत निघतेवेळीं जीं दानें केलीं, त्यांत कित्येक ब्राह्मणांना त्यानें दासी व दास यांचें दान केल्याचें वर्णन आहे. ( २।३२।१९) आणि राजाच्या और्ध्वदेहिकाचे वेळीं भरतानें जीं दानें केलीं, त्यांत हें एक दान आहे. (२।७७।३ ) विवाहानंतर सीता सासरीं येऊं लागली असतां जन-कानें तिच्याबरोबर कित्येक दास आणि दासी दिल्या आहेत. (१।७४।१५) जनकाचें हें उपायन होय. या उपायनांत चारी कन्यांबरोबर शंभर कन्या दिल्याचें लिहिलें आहे. या कन्या म्हणजे सख्यांच्या पाठराखणी होत. दासी व दास यांचें दान करण्यांत आलें, याहून त्यांविषयीं रामायणांत अधिक उल्लेख नाहीं. दान केल्यानंतर या वर्गाचें पोषण दान घेणारानें करावयाचें असणें साहजिक आहे. पण या वर्गाची ऐहिक वा पारमार्थिक उन्नति होण्याचें कांहीं साधन होतें किंवा नाहीं, हें कळत नाहीं. दासी आणि दास यांचे उल्लेख एकत्र आहेत आणि तें जर कुटुंब असेल—आणि तसें संभवनीय आहे—तर कुल निर्दोष राखतां येण्यासारखें आहे. मात्र पाश्चात्यांच्या विक्रीच्या पद्धतींत व या पद्धतींत फार अंतर आहे. अशा दासांकडून शक्तीबाहेर कामें करवून घेऊन पोषणाचें कार्य पदरचें द्रव्य न वेंचतां परभारें करावयाची पद्धति पाश्चा-

त्यांकडे होती, पण इकडील पद्धतींत तसा प्रकार दिसत नाहीं. आपल्यासारखा एक मनुष्य आणि त्याचें दान याहून त्यांत कांहीं अनिष्ट दिसत नाहीं. उलट या दासदासींचा यजमानाविषयीं आदर असे. यजमानाचें हित रक्षण करण्यांत हा वर्ग कसा तयार असे याचें मंथरादासीचें कारस्थान हें एक उत्तम उदाहरण आहे. अर्थात् हीं दानें म्हणजे पोषण करणारे यजमान बदलणें होय. आमच्या विवाहसंस्थेमध्यें कन्येचें दान शास्त्रतः होत असलें तरी त्यांत याहून अधिक काय आहे ? विवाहसंस्था कशी आणि केव्हां झाली हें कळण्यास मार्ग नाहीं, तथापि ती कृत्रिम आहे, हें निर्विवाद आहे. महाभारताचे आदिपर्वांत कुंती आणि पाण्डु यांचा संवाद असून त्यांत पूर्वीं स्त्रीपुरुषांना विवाहबंधन नव्हतें, असें सांगितलें आहे. दीर्घतमा नामक ऋषीनें हें बंधन घातलें आहे. स्त्रीपुरुषांचा समागम निसर्गनियमांस अनुसरून होतो; परंतु समागमाचें फल जी संतति तिचें संगोपन व संवर्धन करण्याचा भार स्त्रीवर साहजिक पडतो. कारण उत्पादनाचें प्रत्यक्ष कार्य स्त्रीकडे असतें. फलाची ही विषम वांटणी निसर्गानें केली आहे आणि विवाहसंस्था ही मनुष्यानें तिचा प्रतिकार करण्याचा केलेला प्रयत्न होय. अपत्यसंगोपन हें स्वतःच्या कृतीचें फल म्हणून स्त्री व पुरुष या दोघांनीं करावयाचें आहे; परंतु पुरुषाला निसर्गानें बंधन मुळींच ठेविलेलें नाहीं आणि हें बंधन पुरुषाला घालण्याचा विवाहसंस्थेचा हेतु आहे. अपत्यसंगोपनाबरोबर स्त्रीच्या पोषणाचा भार पुढें येतो व तो पुरुषानें घ्यावयाचा असतो आणि हा भार चिरकाल त्यानें धारण करावा म्हणून पुरुषाप्रमाणें स्त्रीलाहि हें बंधन विवाहसंस्थेनें घातलें आहे व तें पुरुषाहून वेगळ्या स्वरूपाचें आहे. स्वतःच्या किंवा अपत्यांच्या संगोपनाचा भार स्त्रीवर न ठेवितां त्याची वांटणी कशी करावयाची तें मनूनें पुढील श्लोकांत व्यक्त केलें आहे.

**बाल्ये पितुर्वशे तिष्ठेत् पाणिग्राहस्य यौवने ।**
**पुत्राणां भर्तरि प्रेते न भजेत् स्त्री स्वतंत्रताम् ॥१।५।१४४॥**

"लहानपणीं स्त्रीनें पित्यापाशीं, तरुणपणीं पतीपाशीं व पति मरण पावला असतां पुत्रापाशीं रहावें; स्वतंत्रपणें राहूं नये."

स्त्रीच्या पालनपोषणाचा भार तिच्या आयुष्यांत कशा कशा क्रमानें आणि कोणावर येतो, हें यांत सांगितलें आहे. आणि अंत्यचरणाचा अर्थ पूर्वींच्या तीन चरणांना अनुसरून, तिनें स्वतंत्रपणें राहूं नये, म्हणजे तिच्या पालनपोषणाचा भार ज्यांवर शास्त्रकारांनीं सोंपविला आहे त्यांनीं तो प्रामाणिकपणें पाळावयाचा आहे, असा आहे. या नियमांत स्त्रीचे पालक तीन सांगितले आहेत. यांतील पुढील दोन विवाहबंधनानें प्राप्त झालेले आहेत. तथापि प्रथमचा पालक माता-पित्यांच्या विवाहबंधनानें पुढें आला आहे. या मालकांचे अभावीं स्त्रीचें पालन पतीचे भाऊबंद, तदभावीं माहेरचीं माणसें व तदभावीं राजा यांनीं करावयाचें असें नारदस्मृतींत सांगितलें आहे. पालनपोषणाची ही वांटणी आहे. **स्त्रीच्या स्वातंत्र्यावर घाला स्मृतिकारांनीं घातला म्हणून बुजण्याचें कारण नाहीं.** या वांटणीचा उल्लेख कौसल्येच्या भाषणांत आला आहे. पुरुषावरील हा भार त्याला जड होऊं नये म्हणून पति हें स्त्रीला दैवत व त्याची सेवा हें तिचें कर्तव्य आहे, असा नियम या विवाहबंधनाचे निमित्तानें शास्त्रकारांनीं सांगितला आहे. पोषणाची वांटणी व हा नियम यांचा संयोग कौसल्येच्या भाषणांत दृष्टीस पडतो. राम वनांत गेल्यावर कौसल्या राजाला म्हणते:—

**गतिरेका पतिर्नार्या द्वितीया गतिरात्मजः ।**
**तृतीया ज्ञातयो राजंश्चतुर्थी नैव विद्यते ॥२।६१।२४॥**

" हे राजा, स्त्रीला पति ही पहिली, पुत्र ही दुसरी व ज्ञाति ही तिसरी अशा तीन गति शास्त्रानें सांगितल्या आहेत. चवथी गति स्त्रीला सांगितलेली नाहीं."

आपला एकुलता एक पुत्र वनांत निघाला असतां कौसल्येला फार दुःख झालें, तरी तिची मुख्य गति—पति—विद्यमान असल्यामुळें ती पुत्राबरोबर वनांत गेली नाहीं; आणि याच कारणाकरितां सीता तिनें पतीबरोबर वनवास करावा अशी कैकेयीची अट नसतां व राम नको म्हणत असतां त्याचेबरोबर वनांत निघून गेली. विवाहबंधन कृत्रिम आहे, हें खरें; तथापि साहचर्योत्पन्न प्रेमाचे योगानें **तें निसर्गासारखें दृढ होऊन जातें.**

पति हें स्त्रीनें दैवत मानून त्याची सेवा करावी व तिचें पालन पतीनें करावें असा हा परस्पर विनिमय झाला, व तो सरळ आहे. पण हा विनिमय प्रेमा-

वांचून उभयपक्षीं सुखावह होणें शक्य नाहीं. रामाच्या चरित्रांत या विनिमयाचें इष्ट स्वरूप दृग्गोचर होतें; तर दशरथाचे चरित्रांत त्याची विरुद्ध बाजू दृग्गोचर होते. दशरथानें साडेतीनशें स्त्रियांशीं विवाह केले होते. विवाहांतील त्यांचे पोषणाची अट सांभाळण्यास तो समर्थ होता, हें खरें; परंतु त्याच्या या व्यवहारांत प्रेमाची अगदीं दुर्दशा झाली होती. पति हें शास्त्रोपदिष्ट दैवत म्हणून त्याविषयीं जरी स्त्रियांनीं निष्ठा ठेविली तरी त्याचें खरें प्रेम त्या सर्वांवर असणें शक्य नव्हतें. कैकेयीवर राजाचें प्रेम होतें, पण तिच्या जगद्विख्यात पराक्रमामुळें राजाचें मन तिजविषयीं अगदीं विटून गेलें व तिजबरोबर आपण कां विवाह केला असें त्याला होऊन गेलें! (२।४२।८) परस्पर स्त्रियांमध्येंहि यामुळें वैषम्य वाटत असे व कौसल्या सर्वांत ज्येष्ठ असतां तिचा सवतींकडून छल होत असे. अनेक-पत्नीविवाहाचें हें एकच उदाहरण रामायणांत आहे. या कामीं धर्मशास्त्रानें निर्बंध ठेविला नाहीं व यामुळें तो शक्य झाला, हें खरें. तथापि हा प्रकार इष्ट मानणारे पुरुष रामायणकालीं विशेष दिसत नाहींत; आणि इष्ट वाटला तरी त्याविषयीं सामर्थ्य असणारे पुरुष त्याहून विरळा, हें विसरतां नये.

भर्त्याचे मागें स्त्रीचे पालन पुत्रानें करावयाचें अशी व्यवस्था धर्मशास्त्रानें केली असली तरी विधवांची स्थिति कशी होती याचें निरीक्षण करणें अवश्य आहे. विधवांचे धर्म किंवा त्यांची स्थिति यांविषयीं प्रत्यक्ष वर्णन रामायणांत नाहीं व तसा प्रसंगहि त्यांत नाहीं. केवळ अनुमानावर अवलंबून राहावयाचें आहे. पतीवांचून राहणें स्त्रीला दुःखमय होणें साहजिक आहे. राम वनांत जाऊं लागला असतां तो नियतकालिक वियोग सीतेला सहन न होतां ती बरोबर जाण्यास सिद्ध झाली. पतीवांचून राहणें स्वर्गांतहि असलें तरी आपणास दुःखमय वाटत असल्याचें सांगून, मला पतीचे सहवासांत अरण्यहि सुखमय वाटेल असें तिनें आश्वासन दिलें. (२।३०।१०-१०) यावरून चिरकालिक विरह स्त्रीला किती असह्य होईल याची कल्पना करावी. दुःखमय आयुष्य कंठण्याचा हा प्रसंग तिचा तिनें सोसावयाचा आहे; पण त्यांच्या पोषणाचा प्रश्न याहून वेगळा आहे. राम वनांत निघाला व राज्याभिषेक भरताला व्हावयाचा, तेव्हां हा प्रश्न कौसल्येपुढें साहजिक आला. कौसल्या या वेळीं विधवा नसली तरी पुढील

अनिष्ट प्रसंग लक्षांत घेऊन या वेळीं तिचे स्वतःचे म्हणून एक हजार गांव असल्याचें लक्ष्मणानें आपल्या भाषणांत सांगितलें आहे. ( २।३१।२२ ) हे गांव तिला तिचे पित्याकडून का पतीकडून मिळाले, हें कळत नाहीं. पण ते गांव म्हणजे तिचें स्त्रीधन होय, यांत संशय नाहीं. सुमित्रेपाशीं मात्र अशा प्रकारें स्त्रीधन दिसत नाहीं व यासाठीं कौसल्येनेंच तिची व्यवस्था करावयाची योजना रामानें केलेली आहे. राजस्त्रियांचे कामीं पोषणाचा प्रश्न तादृश महत्त्वाचा नाहीं. कारण सर्वभावीं पोषणाचा भार राजावर असल्यामुळें तो त्यांचे बाबींतहि पडला असता; तथापि स्त्रीधनाची ही योजना त्या वेळीं शास्त्रग्रंथांपुरती नसून प्रचारांत होती, यांत शंका नाहीं.

विवाहबंधनाचे निमित्तानें पोषणाच्या प्रश्नाला आम्हीं प्राधान्य दिलें असलें तरी तें तत्त्वदृष्टया होय व त्यामुळें स्त्रीसमाजाची गणना पोष्यवर्गांत आम्ही करितों किंवा त्या वेळीं करीत, असें कोणीं समजूं नये. पोषणाचा भार स्त्रीवर न ठेवण्यांत तिचें चारित्र्य शुद्ध रहावें, हाच शास्त्रकारांचा हेतु आहे. " न भजेत् स्त्री स्वतंत्रताम्" असें म्हणणारा मनु " यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः " असें म्हणतो आणि दोन्ही वचनें एकत्र ठेविलीं म्हणजे मनु व शास्त्रकार यांवर रागावण्याचें कारण नाहीं. स्त्रीची योग्यता कुटुंबांत पुरुषाचे बरोबरीची आहे आणि या दृष्टीनें राम वनांत निघते वेळीं वसिष्ठऋषींनीं रामाचे अभावीं सीतेला राज्याभिषेक करावा, अशी कल्पना सुचविली आहे.

आत्मा हि दाराः सर्वेषां दारसंग्रहवर्तिनाम् ।
आत्मेयमिति रामस्य पालयिष्यति मेदिनीम् ॥ २।३७।२४ ॥

" सर्व गृहस्थाश्रमी पुरुषांचा स्त्री हा आत्मा आहे. तेव्हां सीता ही रामाचा आत्मा असल्यामुळें तीच पृथ्वीचें पालन करील. "

कैकेयीनें वर मागतांना रामाला वनांत पाठविण्याचा व त्याबरोबर भरताला गादीवर बसविण्याचा असे दोन वर एकदम मागितले व ते वसिष्ठांच्या वरील कल्पनेला वाव राहूं नये अशा दूरदृष्टीनेंच होत, यांत शंका नको. वसिष्ठांच्या हें मागून लक्ष्यांत आलें व त्यांनीं रामाबरोबर सर्व प्रजा अरण्यांत जाईल, असें कैकेयीला सांगून शून्य अयोध्येचें राज्य मग तूं कर, असें बजाविलें. (२।३७।

२८) दोनहि स्थळीं पतीच्या स्थानीं पत्नीनें राज्य चालविण्याची कल्पना आपणांस घ्यावयाची आहे, व पुढेंमागें तीं कृतींत आल्याचें उदाहरण न मिळालें तरी ती कल्पना संभवनीय म्हणून पुढें आली, इतकें येथें लक्षांत घेणें अवश्य आहे. कैकेयीनें आपल्या वरांविषयीं राजाजवळ गोष्ट काढिली, तेव्हां त्यानें केलेल्या भाषणांतहि ही कल्पना आली आहे. राम वनांत गेल्यावर आपण फार काळ जगणार नाहीं व मग विधवा होऊन पुत्रांसह तुला हें राज्य चालवावें लागेल, असें दशरथानें तिला सांगितलें आहे. ( २।१२।७५ ) दशरथानें हे उद्गार संतापानें काढिलेले असले तरी राज्य चालविण्याची स्त्रीची पात्रता त्यांत ध्वनित झाली आहे व तीच आम्हांला दाखवावयाची आहे. विधवा स्त्रीचे राज्याची कल्पना प्रत्यक्ष कृतींत आल्याचें उदाहरण रामायणांत नाहीं व अन्यत्रहि नाहीं. तापसीप्रमाणें त्यांनीं आयुष्य कंठण्याची पद्धति धर्मशास्त्रावरून दिसते व रामायणाचीहि त्याला पुष्टि मिळते. राम वनवासाला जाण्यापूर्वीं सीतेला भेटावयास आला असतां आपण वनांत गेल्यावर तिनें कसें वागावें, याचा उपदेश त्यानें तिला केला, तो तिनें व्रतस्थ रहावें, अशा स्वरूपाचा आहे. ( २।२६।२९ ) तिची ही वागणूक पति प्रवासाला गेल्यावरची आहे. गतभर्तृकांची वागणूक कांहीं भिन्न असणें साहजिक आहे; तथापि त्यांचें मुख्य स्वरूप सारखेंच असणार. त्यांनीं तापसींप्रमाणें रहावयाचें म्हणजे अलंकारांचा त्याग करून वल्कलें परिधान करावयाचीं. सीता वल्कलें नेसूं लागली असतां तिला नाथहीन स्त्रीची उपमा दिली आहे. ( २।३८।१ ) यावरून तीं वस्त्रें विधवा स्त्रिया परिधान करीत असत, असें दिसतें. विधवांच्या विरूपकरणाविषयीं रामायणांत आधार नाहीं. दशरथाच्या मृत्यूनंतर भरत मातुलाकडून राजवाड्यांत आला असतां त्यानें मातेला राजा कोठें आहे, वगैरे प्रश्न केले आहेत. ( २।७२।११–१४ ) तिच्या वेषावरून पित्याचे मृत्यूचा संशय त्याला आला नाहीं, हें उघड आहे. पण विधवा कुंकू लावीत नसतील असें यावरून वाटत नाहीं, असा रा. ब. महाजनी यांनीं येथें संशय प्रदर्शित केला आहे,* तो सयुक्तिक दिसत नाहीं. अरण्यांत गेल्यावर रामानें हेमंताचें

* रामायणकालीन लोकस्थिति, पृ. ४७.

वर्णन केलें आहे, त्यांत सूर्य दक्षिणेकडे गेल्यामुळें उत्तरदिशा तिलकहीन स्त्रीप्रमाणें दिसूं लागल्याचें लिहिलें आहे. ( ३।१६।८ ) सौभाग्यवती स्त्रिया तिलक लावीत असत, तेव्हां उपमा देतांना कपाळीं तिलक नसलेली सौभाग्यवती स्त्री कवीनें कल्पनेनें निर्माण केली, असें म्हणणें अनुचित होय. ती विशोभित दिसत असल्याचें सांगण्यांतच ती सौभाग्यवती नसल्याचें ध्वनित केलें आहे. सुवासिनी स्त्रिया गालावर आणखी तिलक लावीत असत; सीतेच्या गालावरचा तिलक पुसून गेला असतां रामानें मनःशिलेचा तिलक तेथें लाविला व ही खुणेची कथा म्हणून सीतेनें रामाला सांगण्याकरितां मारुतीजवळ सांगितली. ( ५।४०।९ )

## उपसंहार.

रामायणकालीं समाजाची स्थिति कशा प्रकारची होती याचें शक्य तितकें साविस्तर विवेचन येथपर्यंत केलें आहे. लोक संपन्न, नीतिमान् व धर्मपरायण होते असें सामान्य स्वरूप रामायणांत कोठें कोठें निर्देशिलेलें आहे; तथापि त्याच्या योगानें यथार्थ ज्ञान न होतां जिज्ञासा वाढत जाते. यासाठीं विवेचनाचा हा प्रयत्न यथामति केला आहे. लोकस्थितीचे द्योतक असे प्रत्यक्ष निर्देश थोडे असून अप्रत्यक्ष निर्देश त्यांहून अधिक आहेत व यामुळें अनुमानांवर सर्व विवेचनाची उभारणी प्रायः करावी लागली आहे. लोकांची राजकीय उन्नति, आधिभौतिक शास्त्रांतील प्रगति, त्यांचे व्यवसाय, धर्मनिष्ठा, त्यांतील समजुती याविषयींचें यथार्थ ज्ञान त्यावरून कोणालाहि होण्यासारखें आहे. शास्त्रांतील नियम सर्वांना कळत असतात; तथापि ते कृतींत कसे आणावे अर्थात् अपवादांसह त्यांची संगति कशी लावावयाची याचें ज्ञान रामचरित्रासारखा इतिहास पुढें असल्यावांचून कळत नाहीं. सत्य भाषणाविषयीं सर्व धर्मांची एकवाक्यता आहे; पण कित्येक वेळां सत्य भाषणानें पुण्यापेक्षां पाप जोडलें जाण्याचा अधिक संभव असतो. अशा प्रसंगीं विचारी पुरुषानें पुष्कळ पुण्यांत थोडें पाप जिरवून टाकावें लागतें. रामाचें नांव सत्यवादी म्हणून प्रसिद्ध आहे व आपण तसे असल्याचे उद्गार रामानें काढिलेले रामायणांत पुष्कळ मिळतील; पण ज्या वेळीं अरण्यांत असतां शूर्पणखा त्याजकडे आली आणि "सीतेला आपण खाऊन

टाकितें व तूं आपल्याशीं विवाह कर" असें सांगूं लागली, त्या वेळीं तो प्रसंग टाळावा या हेतूनें रामानें तिला 'आपला धाकटा भाऊ लक्ष्मण अविवाहित आहे त्याजकडे जा' अशी सूचना केली.(३।१८।३) रामाच्या कल्पनेप्रमाणें हा प्रसंग कांहीं वेळ टळला व ती लक्ष्मणाकडे गेल्यावर आला. तेव्हां सत्य भाषणाविषयींचा हा कृतींत उतरलेला अपवाद पाहिला म्हणजे त्याचें महत्त्व लक्षांत येतें. हाच प्रकार इतर बाबींविषयीं समजावयाचा आहे. इतिहासांतील वैभव आणि उन्नति प्रस्तुत स्थितींत कोणाला उपयोगीं पडतील असें नाहीं व अशी दीर्घ शंका कोणी काढील, असें वाटत नाहीं. तथापि इतिहास, विशेषतः आपल्या पूर्वजांचा इतिहास—पुढील पिढीला मार्गदर्शक होत असतो आणि अवनत स्थितींतहि आशेचा किरण तो दाखवूं शकतो. पूर्वजांचे थोरवीकडे पाहून स्वस्थ बसण्यांत किंवा हळहळण्यांत कांहीं अर्थ नसतो; तिचें ज्ञान झालें असतां आपली न्यूनता कळते व ती दूर करणें संभवनीय आहे ही गोष्ट लक्षांत येते. मनाची ही भावना हाच पुढील प्रयत्नांचा पाया होय.

---

# भाग तिसरा.



## रामायणांतील राक्षस.



रामायणांतील बऱ्याच भूमिकांचें काम राक्षस व वानर यांजकडे आहे. या दोनहि जातींविषयीं, विशेषतः राक्षसांविषयीं सांप्रत नाना तऱ्हेच्या समजुती प्रचलित असल्यामुळें त्यांविषयीं रामायणांत काय लिहिलें आहे तें शोधकदृष्ट्या पाहिल्याशिवाय वस्तुस्थिति कळणें शक्य नाहीं. राक्षसी प्रकृतीचे मनुष्य असंख्य असले तरी स्पष्टपणें ज्याला राक्षस म्हणतां येईल असा कोणताहि प्राणी सध्यां जगांत नाहीं. यामुळें राक्षस म्हटला म्हणजे विक्राळ स्वरूपाचा, अनेक हातांचा, विचित्र तोंडाचा, क्रूरकर्मा पुरुष लोकांच्या दृष्टीपुढें यावयाचा ही अगदीं ठरलेली गोष्ट आहे. अशा समजुती होण्याचें कारण लोकांचा दृष्टिदोषच आहे असें म्हणतां येत नाहीं. निरनिराळ्या पुराणांतून व खुद्द रामायणांतहि राक्षसांचीं अशा तऱ्हेचीं वर्णनें आलेलीं आहेत. या वर्णनाच्या बाबींत जर इतर पुराणांशीं रामायणाची तुलना केली तर रामायणाचें पारडें हलकें असल्यामुळें वरच जाईल. रामायणाच्या या विशिष्ट गुणावरच प्रस्तुत भागाचा पाया उभारलेला आहे. समाजांत रूढ असलेल्या समजुतीविरुद्ध असें राक्षसांचें वर्णन रामायणाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि प्राचीन ग्रंथांत नाहीं, असें विधान केल्यास अतिशयोक्ति होईल, असें वाटत नाहीं. राक्षसांच्या भयंकर स्वरूपाविषयीं पौराणिक वर्णनाशीं सदृश असें वर्णन रामायणांत अगदीं थोडक्या स्थळीं आहे, विरुद्ध स्थलांचीं संख्या त्यांहून पुष्कळ पटीनें अधिक आहे.

### रावणाचें स्वरूप.

रामायणांतील मुख्य पात्र जें रावण त्याविषयीं प्रचलित असलेल्या कल्पना किती विलक्षण आहेत! वीस हातांचें व दहा मस्तकांचें त्याचें भयंकर स्वरूप त्याचें नांव घेतल्याबरोबर मनांत येतें! परंतु खुद्द रामायणांत काय सांगितलें आहे याचा कोणीं विचार केला आहे काय? सबंध रामायणांत रावणाच्या या

घोर स्वरूपाचें वर्णन अगदीं थोडक्या स्थलीं आहे. एका स्थलीं मात्र अगदीं विलक्षण वर्णन आहे. त्या स्वरूपाची मात्र कल्पना लोकांच्या मनांतहि आली नसेल!

**यश्चैष नानाविधघोररूपैर्व्याघ्रोष्ट्रनागेन्द्रमृगाश्ववक्त्रैः ।**
**भूतैर्भृतो भाति विवृत्तनेत्रैर्योऽसौ सुराणामपि दर्पहन्ता ॥६।५९।२३॥**

" देवांचाहि गर्व नाहींसा करणारा रावण तो हा होय. याला वाघ, उंट, हत्ती, हरिण आणि घोडा यांच्याप्रमाणें तोंड असून त्यानें नानाप्रकारचीं भयंकर रूपें धारण केलीं आहेत. याच्या भोंवतीं पुष्कळ भूतें असून त्याचे डोळे वटारले आहेत. "

हें वर्णन ज्या सर्गांत आलें आहे तो सर्ग किती विश्वासार्ह आहे, याचा विचार यापुढें यावयाचा आहे. वर्णनाचा मासला वाचकांना कळण्याकरितां वर दिला आहे. याशिवाय फार तर चारदोन स्थलीं रावणाच्या दहा तोंडांचें व वीस हातांचें वर्णन आहे. इतर स्थलीं रावणाच्या स्वरूपाचें वर्णन मनुष्यांप्रमाणें साधें आहे. सुन्दरकांडाच्या दहाव्या सर्गांत मारुतीनें रावणाला अवलोकन केलें त्या वेळच्या स्वरूपाचें वर्णन दिलें आहे. या वेळीं रावण आपल्या वाडयांत निजला असल्यामुळें मारुतीला त्याच्या स्वरूपाचें निष्प्रतिबंध निरीक्षण करितां आलें असल्यामुळें या वर्णनाला विशेष महत्त्व आहे.

**काञ्चनांगदसंनद्धौ ददर्श स महात्मनः ।**
**विक्षिप्तौ राक्षसेन्द्रस्य भुजाविन्द्रध्वजोपमौ ॥ १५ ॥**
**ऐरावतविषाणाग्रैरापीडनकृतव्रणौ ।**
**वज्रोल्लिखितपीनांसौ विष्णुचक्रपरिक्षतौ ॥ १६ ॥**
**पीनौ समसुजातांसौ संगतौ बलसंयुतौ ।**
**सुलक्षणनखांगुष्ठौ स्वंगुलीयकलक्षितौ ॥ १७ ॥**
**संवृतौ परिघाकारौ वृत्तौ करिकरोपमौ ।**
**विक्षिप्तौ शयने शुभ्रे पंचशीर्षाविवोरगौ ॥ १८ ॥**
**शशक्षतजकल्पेन सुशीतेन सुगंधिना ।**
**चंदनेन परार्ध्येन स्वनुलिप्तौ स्वलंकृतौ ॥ १९ ॥**

उत्तमस्त्रीविमृदितौ गंधोत्तमनिषेवितौ ।
यक्षपन्नगगंधर्वदेवदानवराविणौ ॥ २० ॥
ददर्श स कपिस्तस्य बाहू शयनसंस्थितौ ।
मदरस्यान्तरे सुप्तौ महाही रुषिताविव ॥ २१ ॥
ताभ्यां स परिपूर्णाभ्यां भुजाभ्यां राक्षसेश्वरः ।
शुशुभेऽचलसंकाशः शृंगाभ्यामिव मंदरः ॥ २२ ॥

"त्या महात्म्या राक्षसाधिपति रावणाचे इंद्रध्वजाप्रमाणें पसरलेले दोन हात मारुतीनें पाहिले. त्या हातांत सोन्याचीं बाहुभूषणें घातलीं होतीं. ऐरावतानें आपल्या दंताग्रानें त्याच्या हातांवर जखमा केल्या होत्या. त्यांचे व्रण त्यांवर होते. इंद्राच्या वज्राचे ओरखडे त्याच्या पुष्ट खांद्यावर उठले होते. विष्णूच्या चक्रानें केलेल्या जखमा त्यांवर दिसत होत्या. त्याचे दोनहि हात पुष्ट असून त्याचे दोनहि खांदे सारखे आणि बलिष्ठ होते. त्याच्या नखांवर आणि आंगठ्यांवर चांगलीं लक्षणें होतीं आणि उत्कृष्ट उत्कृष्ट आंगठ्या त्याच्या बोटांत घातल्या होत्या. त्याचे दोनहि हातांवर आच्छादन घातलें होतें आणि ते आडसरांप्रमाणें असून हत्तीच्या सोंडेसारखे वाटोळे होते. पांच फडा असलेले दोन साप जसे असावेत त्याप्रमाणें ते दोन हात त्या शुभ्र अंथरुणावर पसरले होते. सशाच्या रक्ताप्रमाणें लाल, शीतल आणि सुगंधि अशा उत्कृष्ट चंदनाची उटी त्यांवर लविली असून त्यांवर उत्कृष्ट अलंकार घातले होते. उत्तम स्त्रियांनीं त्यांचें मर्दन केलें होतें. सुगंधि द्रव्यें त्यांना लाविलीं होतीं. यक्ष, नाग, गंधर्व, देव आणि दैत्य यांना त्यांचें भय वाटत असे. रागावलेले दोन साप ज्याप्रमाणें मंदरपर्वताच्या गुहेमध्यें निजले असावे त्याप्रमाणें अंथरुणावर पसरलेले त्याचे ते दोन हात दिसत होते, असें त्या मारुतीनें पाहिलें. मंदरपर्वत ज्याप्रमाणें त्याच्यावरील दोन शिखरांनीं शोभावा, त्याप्रमाणें पर्वताप्रमाणें धिप्पाड असलेल्या त्या राक्षसाधिपति रावणाला त्याच्या त्या प्रचंड हातांनीं शोभा आली होती."

तसेंच रावण गोपुरावर बसला असतां त्यावर सुग्रीवानें एकदम हल्ला केला त्या वेळच्या युद्धांत रावणाच्या हातांचें वर्णन आहे.

**इत्युक्त्वोत्थाय तं क्षिप्रं बाहुभ्यामाक्षिपत्तले ।**
**कंदुवत्स समुत्थाय बाहुभ्यामाक्षिपद् हरिः ॥६।४०।१३॥**

" असें बोलून रावण उठला आणि दोनहि हातांनीं त्या सुग्रीवाला त्यानें एकदम जमिनीवर पाडिलें; इतक्यांत सुग्रीवहि चेंडूप्रमाणें वर उठला आणि त्यानें त्याला आपल्या दोन हातांनीं जमिनीवर पाडिलें."

रावण मृत झाल्यावर बिभीषण शोकग्रस्त होऊन त्याचें वर्णन करितोः—

**निक्षिप्य दीर्घौ निश्चेष्टौ भुजावंगदभूषितौ ॥६।१०९।३॥**

"बाहुभूषणें घातलेले तुझे दोनहि लांब हात जमिनीवर निश्चेष्ट पडले आहेत."

रावणाच्या हातांसंबंधीं रामायणांत ज्या स्थलीं उल्लेख आले आहेत तीं वर दिलीं आहेत. कांहीं स्थलें प्रमादानें द्यावयाचीं राहिलीं असलीं तरी वर दिलेल्या उताऱ्यांवरून अशा वर्णनांचें सामान्य स्वरूप समजण्यास मुळींच कठीण पडणार नाहीं. आतां मुखाचें वर्णन कसें केलें आहे, तें पाहूं.

मारुतीनें रावणाच्या वाड्यांत रात्रीं प्रवेश केला होता, त्या वेळीं तेथील सर्व मंडळी निजलेली होती. या प्रसंगीं त्यानें तेथें अवलोकन केलेल्या स्थितीच्या वर्णनांत एका स्थलीं खालील श्लोक आहे.

**रावणाननशंकाश्च काश्चिद्रावणयोषितः ।**
**मुखानि च सपत्नीनामुपाजिघ्रन्पुनःपुनः ॥५।९।५७॥**

" रावणाच्या कांहीं स्त्रिया (झोंपेमध्यें) रावणाचें तोंड असें समजून आपल्या सवतींच्या तोंडांचा वारंवार वास घेऊं लागल्या."

रावणस्त्रियांच्या या वर्णनावरून त्याचें मुख एक असल्याचें सिद्ध होतें. जागृतींत ज्या गोष्टीचा अनुभव असतो त्याहून विपरीत गोष्टी स्वप्नांत येणें शक्य नाहीं. जर जागृतींत रावणाच्या दहा मुखांचें दर्शन त्यांना नित्य होत असतें तर सपत्नीच्या मुखाच्या स्पर्शानें रावणाच्या दहा मुखांचा त्यांना भास होणें अशक्य आहे. शिवाय रावणाचें हें एक मुखहि त्याच्या स्त्रियांहून फार मोठें नव्हतें, असें या वर्णनावरून उघड दिसतें.

इंद्रजिताचा वध झाल्यावर रावणाच्या क्रोधाचें वर्णन आहे त्यांतः—

**कोपाद्विजृंभमाणस्य वक्त्राद्व्यक्तमिव ज्वलन् ।**
**उत्पपात सधूमाग्निर्वृत्रस्य वदनादिव ॥६।९२।१८॥**
**तस्य प्रकृत्या रक्ते च रक्ते क्रोधाग्निनापि च ।**
**रावणस्य महाघोरे दीप्ते नेत्रे बभूवतुः ॥२०॥**
**तस्य क्रुद्धस्य नेत्राभ्यां प्रापतन्नश्रुबिन्दवः ।**
**दीप्ताभ्यामिव दीपाभ्यां सार्चिषः स्नेहबिन्दवः ॥२२॥**

'वृत्रासुराच्या तोंडांतून ज्याप्रमाणें अग्नि आणि धूर बाहेर आला त्याप्रमाणें तो रावण रागारागानें जांभया देऊं लागला असतां त्याच्या तोंडांतून अग्नि आणि धूर स्पष्टपणें बाहेर पडला. त्याचे डोळे आधींच लाल होते; त्यांत त्याला या वेळीं संताप आला असल्यामुळें ते अधिक लाल झाले आणि भयंकर व देदीप्यमान दिसूं लागले. अशा रीतीनें तो रागावला असतां ज्याप्रमाणें दिव्यांतून जळजळीत तेलाचे बिंदु खालीं पडावे त्याप्रमाणें त्याच्या दोनहि डोळ्यांतून अश्रुबिंदु गळूं लागले."

यांत रावणाला एक तोंड व दोन नेत्र असल्याचें स्पष्ट लिहिलें आहे.

सीता रावणाला रागानें म्हणते:—

**इमे ते नयने क्रूरे विकृते कृष्णपिंगले ।**
**क्षितौ न पतिते कस्मान्मामनार्य निरीक्षतः ॥५।२२।१८॥**
**तस्य धर्मात्मनः पत्नीं स्नुषां दशरथस्य च ।**
**कथं व्याहरतो मां ते न जिव्हा पाप शीर्यति ॥१९॥**

"हे अनार्या रावणा, माझ्याकडे तूं पहात आहेस. तेव्हां तुझे हे क्रूर, विक्राळ, काळे आणि पिंगट असलेले दोन डोळे गळून जमिनीवर कसे पडत नाहींत? अरे, मीं त्या धर्मात्म्या रामाची स्त्री आणि राजा दशरथ याची सून आहें. मला तूं अशा रीतीनें बोलत आहेस, तेव्हां तुझ्या त्या जिभेचे तुकडे कसे होत नाहींत?"

यांत रावणाला दोन नेत्र व एक जिव्हा होती असें सीता म्हणत आहे. यापुढें खुद्द महर्षींनीं केलेलें वर्णन आहे. त्यांत दोन नेत्र, दोन बाहु व दोन कुंडलें यांचा उल्लेख आलेला आहे:—

**सीताया वचनं श्रुत्वा रावणो राक्षसाधिपः ।**
**विवृत्य नयने क्रूरे जानकीमन्ववैक्षत ॥२३॥**
**ताभ्यां स परिपूर्णाभ्यां भुजाभ्यां राक्षसेश्वरः ।**
**शुशुभे चलसंकाशः श्रृंगाभ्यामिव मंदरः ॥ २७॥**
**तरुणादित्यवर्णाभ्यां कुंडलाभ्यां विभूषितः ।**
**रक्तपल्लवपुष्पाभ्यामशोकाभ्यामिवाचलः ॥२८॥**

"सीतेचें हें भाषण कानीं पडतांच तो राक्षसाधिपति रावण डोळे वटारून तिच्याकडे पाहूं लागला. मंदरपर्वत त्याच्या दोन शिखरांनीं ज्याप्रमाणें शोभावा त्याप्रमाणें पर्वताप्रमाणें धिप्पाड असलेल्या त्या राक्षसाधिपति रावणाला त्याच्या त्या दोन प्रचंड हातांनीं शोभा आली होती. बालसूर्याप्रमाणें तेजस्वी असलेलीं दोन कुंडलें त्याच्या दोन कानांत होतीं; आणि तांबडीं पानें व फुलें असलेले दोन अशोक वृक्ष पर्वतावर असतां पर्वताला जशी शोभा येते त्याप्रमाणें त्या कुंडलांच्या योगानें त्याला शोभा आली होती."

मारुतीनें परत आल्यावर लंकेकडील हकीगत सांगतांना सीता आणि रावण यांचें संभाषण वर दिल्याप्रमाणेंच सांगितलें आहे. दोनहि स्थलांतील वर्णनें सारखीं आहेत. क्वचित् स्थलीं असलेला फेरफार शाब्दिक आहे.

वर दिलेलें दोन बाहूंचें वर्णन रावणाच्या वीस बाहूंपैकीं दोहोंचें आहे, असें कदाचित् कोणी म्हणतील, तर त्याचें स्पष्टीकरण खालील श्लोकांत आहे:—

**नयनं चास्फुरद्वामं वामो बाहुरकम्पत ।**
**विवर्णवदनश्चासीत्किंचिदभ्रश्यत स्वनः ॥६।९५।४६॥**

"त्याचा डावा डोळा व डावा हात असे स्फुरण पावूं लागले, त्याचें तोंड फिकें झालें व त्याचा स्वर कांहींसा कमी झाला."

या श्लोकांत 'वाम बाहु' व 'वाम नेत्र' असा एकवचनीं निर्देश असल्या-मुळें वरील शंकेला मुळींच जागा उरत नाहीं. जर त्याला अनेक नेत्र किंवा अनेक बाहु असते तर एका बाजूच्या अवयवांना सारखेच विकार झाले असते व त्या अवयवांचा बहुवचनीं निर्देश केला असता. रावणाला एकच शिर अस-ल्याचें दोन नेत्रांच्या वरील उल्लेखावरून उघड होतें. तथापि अशा तऱ्हेचा

स्पष्ट निर्देश दाखविल्यावर अनुमानाची काय जरूर आहे? रावण युद्धाला आला असतां राम त्याला म्हणतोः—

**अद्य ते मच्छरैश्छिन्नं शिरो ज्वलितकुण्डलम् ।**
**क्रव्यादा व्यपकर्षन्तु विकीर्णं रणपांसुषु ॥६।१०३२।०॥**

"तेजस्वी कुंडलें घातलेलें तुझें हें शिर आज माझ्या बाणांनीं गळून पडो आणि रणांगणावरील धुळीनें तें भरलें असतां राक्षस ओढून नेवोत."

यापुढें १०६ व्या सर्गांत रावणाला झालेल्या शकुनांच्या वर्णनांत खालील श्लोक आहेः——

**गृध्रैरनुगताश्चास्य वमन्तो ज्वलनं मुखैः ।**
**प्रणेदुर्मुखमीक्षन्त्यः संरब्धमशिवं शिवाः ॥२८॥**

"रावणाच्या तोंडाकडे पाहून आपल्या तोंडानें ज्वाला टाकीत आणि अशुभ शब्द करीत भालू वेगावेगानें जाऊं लागल्या. त्यांच्यामागून गिधाडें जाऊं लागलीं."

सर्ग १०७ वा यांत रावणवधसमयींच्या वर्णनांत खालील श्लोक आहेतः——

**रावणस्य शिरोऽछिन्दच्छ्रीमज्ज्वलितकुण्डलम् ।**
**तच्छिरः पतितं भूमौ दृष्टं लोकैस्त्रिभिस्तदा ॥५४॥**
**तस्यैव सदृशं चान्यद्रावणस्योत्थितं शिरः ।**
**तत्क्षिप्रं क्षिप्रहस्तेन रामेण क्षिप्रकारिणा ॥५५॥**
**द्वितीयं रावणशिरश्छिन्नं संयति सायकैः ।**
**छिन्नमात्रं च तच्छीर्षं पुनरेव प्रदृश्यते ॥५६॥**
**तदप्यशनिसंकाशैश्छिन्नं रामस्य सायकैः ।**
**एवमेव शतं छिन्नं शिरसां तुल्यवर्चसाम् ॥५७॥**

"तेजस्वी कुंडलें घातलेलें आणि सुंदर असलेलें त्याचें शिर रामानें तोडिलेलें आणि तें जमिनीवर पडलें असतां त्रैलोक्यानें पाहिलें. ( इतक्यांत ) त्याप्रमाणेंच दुसरें शिर रावणाच्या शिराच्या ठिकाणीं उत्पन्न झालें. हेंहि शिर त्वरित कार्य करणाऱ्या हस्तलाघवी रामानें बाणांनीं तोडिलें. परंतु पुनः एक शिर तेथें दिसूं लागलें. वज्राप्रमाणें तीक्ष्ण असलेल्या बाणांनीं रामानें तेंहि तोडून काढिलें. याप्रमाणें एकसारखीं तेजस्वी असलेलीं शंभर शिरें रामानें तोडिलीं."

या वर्णनांत 'रावणाचें एक शिर पाडिल्यावर तेथें दुसरें उत्पन्न होऊं लागलें व अशा रीतीनें रामानें त्याचीं शंभर शिरें भूमीवर पाडिलीं,' असें लिहिलें आहे. एक शिर पाडिल्यावर त्या स्थलीं कितीहि शिरें उत्पन्न झालीं असलीं तरी मूळचें त्याला एकच शिर होतें, ही गोष्ट वरील वर्णनावरूनहि निर्विवाद सिद्ध होते. रावणाला एकच शिर असल्याबद्दल, रावणस्त्रियांनीं शोक केला त्याच्या वर्णनांत अनेक उल्लेख आहेत. ते वाचल्यावर वाचकांना या बाबतींत शंका उरेल, असें वाटत नाहीं.

हतस्य वदनं दृष्ट्वा काचिन्मोहमुपागमत् ॥६।११०।९॥
काचिदंके शिरः कृत्वा रुरोद मुखमीक्षती ॥
स्नापयन्ती मुखं बाष्पैस्तुषारैरिव पंकजम् ॥१०॥
हा राजन्सुकुमारं ते सुभ्रु सुत्वक्समुन्नतम् ॥६।१११।३४॥
कान्तिश्रीद्युतिभिस्तुल्यमिन्दुपद्मदिवाकरैः।
किरीटकूटोज्ज्वलितं ताम्रास्यं दीप्तकुण्डलम् ॥३५॥
मदव्याकुललोलाक्षं भूत्वा यत्पानभूमिषु ।
विविधस्रग्धरे चारु वल्गुस्मितकथं शुभम् ॥३६॥
तदेवाद्य तवैवं हि वक्त्रं न भ्राजते प्रभो।
रामसायकनिर्भिन्नं रक्तं रुधिरविस्रवैः ॥३७॥
विशीर्णमेदोमास्तिष्कं रूक्षं स्यंदनरेणुभिः ।

"रावण मृत होऊन पडला असतां त्याचें तोंड पाहून एका स्त्रीला मूर्च्छा आली. एकीनें त्याचें शिर आपल्या मांडीवर घेतलें आणि त्याच्या तोंडाकडे पाहून ती आक्रोश करूं लागली. ज्याप्रमाणें तुषार कमलावर पडून त्याला स्नान घडावें त्याप्रमाणें आपल्या अश्रूंनीं ती त्याच्या मुखाला स्नान घालीत होती. "हे राजा! तुझें मुख सुकुमार असून तुझ्या भिवया चांगल्या होत्या. तुझें शरीर सुंदर दिसत असून तुझें नाक उत्कृष्ट होतें. तुझ्या मुखाची कांति चंद्राप्रमाणें होती. कमलाप्रमाणें तें शोभत होतें; व त्याचें तेज सूर्याप्रमाणें होतें. किरीटावरील टोंकांनीं तें उज्वल दिसत होतें. तुझे ओठ लाल असून तुझ्या कानांत तेजस्वी कुंडलें होतीं. पानभूमीच्या ठिकाणीं मदाच्या योगानें तुझे डोळे व्याकुळ आणि

चंचल होत असत. नानाप्रकारच्या माळांनीं तुझें मुख सुंदर दिसे आणि अशा त्या शुभ मुखानें तूं हंसत हंसत सुंदर भाषण करीत होतास. तेंच हें तुझें मुख रामाच्या बाणांनीं फुटून रक्तबंबाळ झालें आहे व त्यामुळें त्याची शोभा नाहींशी झाली आहे. रथांच्या योगानें उडालेली धूळ त्यावर बसून तें रूक्ष झालें आहे व त्यांतील मेद व मज्जा हीं बाहेर पडलीं आहेत.'

रावणाच्या स्वरूपाविषयीं रामायणांत जेथें जेथें उल्लेख आहे तीं बहुतेक स्थलें वर उतरून घेतलीं आहेत. "दशग्रीव, दशानन, दशकंठ" इत्यादि शब्दांनीं जरी रावणाचा उल्लेख पुष्कळ स्थलीं केलेला आहे तरी त्याच्या स्वरूपाचें वर्णन वर दिल्याप्रमाणें असल्यामुळें या विशेषणाचा येथें शब्दार्थ ग्रहण करितां येत नाहीं. एका टीकाकारानें वरील वर्णनें लक्षांत घेऊन—

"**भुजद्वयमेव सर्वदा। युद्धादौ स्वेच्छया दश-( विंशति ? ) भुजत्वमिति द्विवचनम्।**"

"( त्यावरून ) त्याला नेहमीं दोनच हात असत. युद्ध वगैरे प्रसंगीं आपल्या इच्छेप्रमाणें तो दहा ( वीस ? ) हात धारण करीत असे; आणि यास अनुसरूनच वर दोन हातांचें वर्णन आहे."

अशी टीका करून पर्यायानें आमच्या म्हणण्यास पुष्टि दिली आहे. रावण निजला असतां, युद्ध करीत असतां, रागावला असतां व मृत झाल्यावर त्याचें स्वरूप कसें होतें, याचें वर्णन वरील उताऱ्यांत पूर्णपणें येऊन गेलें आहे. वरील टीकेंत टीकाकारानें जी तोड काढिली आहे, ती अगदीं निराधार आहे. वरील उताऱ्यांत युद्धाच्या वेळच्या त्याच्या स्वरूपाचें वर्णन येऊन गेलें आहे, त्यांत अशा रीतीनें त्यानें स्वरूप बदलल्याचा एकहि उल्लेख नाहीं. आपल्या इच्छेनें तो आपलें स्वरूप बदलित असे, असा जरी टीकाकारानें शेरा दिला आहे, तरी वरील एकाहि प्रसंगीं त्याला इच्छा होऊं नये, हें आश्चर्य नव्हे काय?

रावणाच्या लोकविश्रुत कुरूपतेचा याप्रमाणें निर्णय झाला; तथापि तो एकंदरींत शरीरानें धिप्पाड, काटक, बलिष्ठ व अगदीं काळ्या वर्णाचा किंवा महर्षि वाल्मीकींच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे "नीलांजनचयोपम" होता, यांत शंका नाहीं. त्याच्या सामर्थ्यानुरूप त्याचें शरीर मोठें असलें पाहिजे, हें उघड

आहे. हा मोठेपणा लोकांत असलेल्या समजुतीप्रमाणें कल्पनातीत मात्र नव्हता. कारण ज्या वेळीं सीतेच्या शोधार्थ रावणाच्या वाड्यांत रात्रौ सर्व मंडळी निजली असतां मारुतीनें प्रवेश केला, त्या वेळीं त्यानें पाहिलेल्या स्थितीचें वर्णन करितांनाः--

**तासां मध्ये महाबाहुः शुशुभे राक्षसेश्वरः ।**
**गोष्ठे महति मुख्यानां गवां मध्ये वृषो यथा ॥ ५।११।११ ॥**

" एकाद्या मोठ्या गोठ्यामध्यें श्रेष्ठ गायींच्या मध्यभागीं जसा बैल शोभावा, त्याप्रमाणें त्या स्त्रियांमध्यें तो राक्षसाधिपति रावण शोभत होता. "

असें लिहिलें आहे. गायींच्या कळपामध्यें ज्याप्रमाणें पोळ असावा, त्याप्रमाणें त्या सर्व स्त्रियांमध्यें रावण शोभत होता, अशी त्याला येथें उपमा दिली आहे.

## इतर राक्षसांचें स्वरूप.

रावणाच्या स्वरूपासंबंधीं समाजांत ज्या प्रकारच्या समजुती प्रचलित आहेत, त्याच प्रकारच्या समजुती इतर राक्षसांसंबंधीं रूढ झालेल्या आहेत. कुंभकर्णासंबंधीं खुद्द रामायणांत विलक्षण वर्णन आहे.

**धनुःशतपरीणाहः स षट्शतसमुच्छ्रितः ।**
**रौद्रः शकटचक्राक्षो महापर्वतसंनिभः ॥ ६।६५।४७ ॥**

" त्या कुंभकर्णाची रुंदी शंभर धनुष्यें होती, आणि उंची सहाशें धनुष्यें होती. त्याचे डोळे गाडीच्या चाकाएवढे होते व तो पर्वताप्रमाणें धिप्पाड असून उग्र दिसत होता. "

हें वर्णन अन्यत्र असलेल्या वर्णनांशीं ताडून पाहूं लागलें तर अगदीं फिकें पडतें. अतिकाय या राक्षसाचें नांव रामायणांत कांहीं वेळ आलेलें आहे. हा ज्या वेळीं युद्धासाठीं समरभूमीवर आला, त्या वेळीं त्याचें वर्णन देतांनाः—

**दृष्ट्वा तद्देहमाहात्म्यं कुंभकर्णोऽयमुत्थितः ।**
**भयार्ता वानराः सर्वे संश्रयन्ते परस्परम् ॥ ६।७०।७ ॥**

" त्या अतिकायाचा प्रचंड देह पाहून, हा कुंभकर्णच पुनः उठून आला

आहे काय, अशी शंका वानरांना येऊन ते भ्याले व एकमेकांना कवटाळूं लागले. ”

असें लिहिलें आहे. या श्लोकांत कुंभकर्ण व अतिकाय यांचें साम्य दाखविलें आहे. अतिकाय हा एक सामान्य राक्षस होता. त्याशीं कुंभकर्णाचें सादृश्य दाखविलें असल्यामुळें तोहि सामान्य राक्षसाप्रमाणें होता, हें उघड होतें. सामान्य राक्षसाचें स्वरूप कशाप्रकारचें होतें, त्याचा उलगडा यापुढें करणार आहों.

इंद्रजिताचा पराक्रम रामायणाच्या वाचकांना विदित आहेच. त्याचा पराक्रम व त्याची राक्षसांत असलेली गणना हीं लक्षांत येतांच त्याचाहि देह प्रचंड असावा, असा ग्रह होतो; परंतु रामायणांत एका स्थलीं त्याचें बिभीषणाशीं साम्य दाखविलें आहे. बिभीषण वानरांकडे येत असतांना त्यांना काय भास झाला, त्याचें वर्णन केलें आहे:—

**तं दृष्ट्वा त्वरितं यान्तं नीलांजनचयोपमम् ।**
**वानरा दुद्रुवुः सर्वे मन्यमानास्तु रावणिम् ॥ ६।४९।३२ ॥**

“ तो बिभीषण त्वरेनें तिकडे येत असतां एकाद्या काजळाच्या पर्वताप्रमाणें दिसत होता. त्याला पाहून सर्व वानरांना तो इंद्राजित् येत आहे, असें वाटलें व ते भिऊन पळूं लागले. ”

बिभीषणाविषयीं लोकांत इतका गैरसमज नसल्यामुळें त्याशीं इंद्रजिताची तुलना केलेली पाहून इंद्रजिताच्या स्वरूपाची योग्य कल्पना वाचकांना करितां येईल. आतां बिभीषणाचें स्वरूप कसें होतें, हें पाहूं. बिभीषण राक्षसकुलांत उत्पन्न झालेला होता, तरी तो रामाला येऊन मिळाल्यामुळें त्याच्या स्वरूपाविषयीं लोकांत रावणाप्रमाणें गैरसमज उत्पन्न झालेला नाहीं. बिभीषणाकडे ज्या दृष्टीनें पाहण्यांत येतें, त्याच दृष्टीनें जर एकंदर राक्षसकुलाकडे पाहूं लागलें तर असले गैरसमज राहणार नाहींत. प्रमुख राक्षसांच्या स्वरूपाविषयीं रामायणांत काय सांगितलें आहे, तें वरील विवेचनांत येऊन गेलें आहे. आतां सामान्यतः राक्षसांविषयीं काय सांगितलें आहे, त्याचा विचार करूं. ज्या वेळीं वानर मनुष्यरूपानें युद्ध करूं लागले, त्या वेळीं सर्व वानरांना रामानें आज्ञा केली—

**न चैवं मानुषं रूपं कार्यं हरिभिराहवे ।**
**एषा भवतु नः संज्ञा युद्धेऽस्मिन्वानरे बले ॥ ६।३७।३३ ॥**
**वानरा एव वश्चिह्नं स्वजनेऽस्मिन्भविष्यति ।**
**वयं तु मानुषेणैव सप्त योत्स्यामहे परान् ॥ ३४ ॥**
**अहमेव सह भ्रात्रा लक्ष्मणेन महौजसा ।**
**आत्मना पंचमश्चायं सखा मम बिभीषणः ॥ ३५ ॥**

" युद्धामध्यें वानरांनीं मनुष्यरूप धारण करून युद्ध करूं नये. या युद्धामध्यें वानरसैन्याची ही खूण असूं द्या. म्हणजे या खुणेवरून आपणांला आपणांकडील योद्धा कोणता, हें कळेल. आम्ही सातजण म्हणजे मी, माझा भाऊ महापराक्रमी लक्ष्मण, माझा मित्र बिभीषण व त्याचे चार मंत्री एवढे मात्र मनुष्यरूपानें शत्रूंशीं युद्ध करूं. "

मनुष्यरूप धारण करून वानर लढूं लागले तर सर्वांचीं रूपें सारखीं होतील व वानर तेवढा आपल्या पक्षाचा अशी जी आपल्या पक्षाचा वीर ओळखण्याची खूण आहे, ती नाहींशी होऊन राक्षसांचा वध करितांना तत्सदृश जे मनुष्यदेहधारी वानर त्यांचाहि चुकून आपल्या हातून वध होईल, अशी भीति वरील श्लोकांत रामानें दर्शविली आहे. मनुष्यदेहधारी वानर व राक्षस यांचें साम्य दर्शविलें असल्यामुळें राक्षसांविषयीं लोकांत असलेली समजूत किती अन्यथा आहे, हें वेगळें सिद्ध करण्याची जरूर नाहीं. एका टीकाकारानेंहि वरील श्लोकांवरील टीकेंत हाच निष्कर्ष काढिलेला आहे, तो वाचकांकरितां खालीं देतों.—

**अथ वानराणामपि कामरूपतया रूपान्तरकरणे युद्धे स्वीयपरकीयविवेका संभवादाह–न चैवेति । संज्ञा नित्यवानररूपधारणसंकेतः । एवं चास्मान्सप्त हित्वा मनुष्याकारो निःशंकं वध्यः । राक्षसामपि संस्थानं मनुष्यवदेवेति इत एव ज्ञायते ॥**

" आतां वानरांनीं जर मायेनें रूप बदललें, तर युद्धाचे वेळीं आपलेकडील कोण व शत्रूकडील कोण हें ओळखतां येणार नाहीं. यासाठीं वरील भाषण

रामानें केलें आहे. 'संज्ञा' म्हणजे नेहमीं वानररूपानें युद्ध करणें अशी खूण. म्हणजे अशा रीतीनें आम्ही सात इसम सोडून दुसरा कोणी जर मनुष्य असेल तर त्याचा निःशंकपणें आम्हांस वध करितां येईल. यावरून राक्षसांचीं रूपें मनुष्यांप्रमाणें होतीं, असें दिसतें."

वरील श्लोकांत बिभीषणाचें जे चार अमात्य सांगितले आहेत, ते राक्षसच असल्याबद्दल उत्तरकांडांत कथा आहे. याकरितां ते राक्षस नसावेत अशी शंका घेण्याचें कारण नाहीं. श्लोकांत त्यांची थोडक्यांत माहिती दिली आहे:—

**अनलश्चानिलश्चैव हरः संपातिरेव च ।**
**एते बिभीषणामात्या मालेयास्ते निशाचराः ॥७।५।४५॥**

"अनल, अनिल, हर व संपाति हे राक्षस बिभीषणाचे मंत्री होते व ते माली नामक राक्षसाचे पुत्र होते."

या एकंदर विवेचनावरून राक्षसांविषयीं असलेला गैरसमज बराच दूर होईल अशी आशा आहे.

रावणाची स्त्री मंदोदरी ही एक राक्षसी होती, याविषयीं वाद नाहीं. मारुती सीताशुध्यर्थ लंकेंत गेला असतां रावणाचे वाड्यांत रात्रीं गुप्तपणें शिरला. तेथें त्यानें मंदोदरीला एका शय्येवर निजलेली अवलोकन केली. तिचा वर्ण गौर असून तिचे अंगावर पुष्कळ अलंकार घातलेले होते व आपल्या कांतीच्या योगानें ती त्या मंदिराला शोभा आणीत होती, असें येथें वर्णन केलें आहे. (५।१०।५१) तिला पाहून मारुतीला "ही सीता नसेल ना?" असा संशय आला. (५।१०।५३) सीता रावणाचे अंतःपुरांत अशा रीतीनें येऊन निजणें शक्य नाहीं असें म्हणून त्यानें लागलींच आपल्या संशयाचें निराकरण केलें. तथापि त्याला संशय आला, यावरून मनुष्य व राक्षस यांतील स्वरूपसादृश्य त्याला पटलें होतें असें दिसून येतें व तेंच आम्हांला दाखवावयाचें आहे.

## लोकांतील समजुतीला रामायणांतील आधार.

राक्षसांचें स्वरूप भयंकर असावयाचें अशी जी लोकांत समजूत आहे तिला पुराणांतील वर्णनें कारण आहेत, तशीं रामायणांतील वर्णनेंहि आहेत. रामायणांतील वर्णनें अल्प असलीं तरी पौराणिक वर्णनांत त्यांचे योगानें भर पडते,

हें विसरतां येत नाहीं. त्राटिकेचें वर्णन करितांना ती शरीरानें विशाल असून तिचें तोंड विक्राळ असल्याचें लिहिलें आहे. ( १।२५।१२ ) अयोमुखीचें उदर लांब होतें; दाढा तीक्ष्ण होत्या; शरीर उन्नत होतें; त्वचा कठीण होती; आकार फार स्थूल असून केंस मोकळे सुटलेले होते, असें सांगितलें आहे. ( ३।६९।१२-१३ ) अशोकवनिकेंत सीतेभोंवतीं असलेल्या राक्षसींचें वर्णन सुंदरकांडांत दोन वेळां आलेलें आहे. या राक्षसींपैकीं कोणाला एकच डोळा तर कोणाला एकच कान होता. कोणाचे कान वस्त्राप्रमाणें पांघरतां येतील इतके लांब होते तर कोणाला मुळींच नव्हते; कोणाला शंकूप्रमाणें होते. कोणाचें नाकाचीं भोंकें वर असल्यामुळें श्वासोच्छ्वास मस्तकांतून चालला होता. कोणाचें मस्तक मोठें तर कोणाची मान बारीक होती. कोणाचे केंस मुळींच गेले होते तर कोणाचे केंसांचे योगानें आयती घोंगडी बनली होती. कोणाचे कान व कपाळ लांब तर कोणाचें उदर व स्तन लांब होते. कोणाचे ओंठ खालीं लोंबत होते तर कोणाचे हनुवटीला जखडलेले होते; एकीचें मुख लांब तर एकीचे गुडघे लांब; कोणी खुजी तर कोणी ढांगळ; कोणी कुबडी तर कोणी वांकडी; कोणी ठेंगणी तर कोणी भयंकर होती; कित्येकांचीं तोंडें वाघ, म्हैस, सुकळी, कोल्हा, हत्ती, उंट, घोडा यांप्रमाणें होतीं. कोणाला एकच हात तर कोणाला एकच पाय होता. अशा अनेक राक्षसी तेथें जमल्या होत्या. ( ५।१७ व ५।१२ ) येथील वर्णन भयंकर आणि अगदीं हिडिस आहे. रावणानें सीतेला भिवविण्याकरितां एकादें महारोग्यांचें रुग्णालय तर उघडलें नसेलना, असें या वर्णनांतील हिडिसपणा पाहून वाटतें. रामाला पाहून शूर्पणखा काममोहित झाली, असें सांगतांना महर्षींनीं दोघांचें स्वरूपांतील वैषम्य प्रत्येक अवयवाची क्रमानें तुलना करून दाखविलें आहे. यांत शूर्पणखेचें मुख विक्राळ, उदर विशाल, नेत्र विरूप, केंस पिंगट, मुद्रा कुरूप, स्वर भयंकर, स्वभाव उग्र, वयानें वृद्ध, भाषण कुटिल आणि वागणूक दुष्ट असल्याचें सांगितलें आहे. ( ३।१७।९-११ ) नखांचें वर्णन यांत नाहीं, तें नांवांत व्यक्त झालें आहे म्हणून गाळलें किंवा काय तें कळत नाहीं. स्वरूपासंबंधीं

अशीं वर्णनें एकदां ऐकल्यावर रामायणांतील अन्य स्थलीं असलेलीं वर्णनें ऐकून समजूत कशी पालटणार ?

## नांवांतच उग्रता.

पण स्वरूपाचें हें वर्णन बाजूला ठेविलें आणि केवळ नांवें पाहिलीं तरी पुढील समजुतीचा पाया आधीं घातला जातो, त्याला काय करावयाचें ? नांवावरून व्यक्तीविषयीं कल्पना करणें अयुक्त खरें; तथापि त्याचा परिणाम प्रारंभीं अल्प तरी होतो, हें नाकारतां येत नाहीं; आणि हा परिणाम तदनुरूप वर्णनाचे योगानें दृढ होतो. राक्षसांच्या मूर्तींतील व कृतींतील उग्रता प्रथम नांवांत दिसूं लागते. रावण म्हणजे गर्जना करणारा, कुंभकर्ण म्हणजे कुंभाप्रमाणें कान असलेला, बिभीषण म्हणजे भयंकर, त्रिशिरा म्हणजे तीन मस्तकांचा, खर म्हणजे गर्दभ, दूषण म्हणजे दुष्ट अशीं रामायणांतील मुख्य पात्रांचीं विचित्र नांवें आहेत. आतां इतर नांवें कशीं आहेत, तें पाहूं. लंकादहन करिते वेळीं मारुतीनें जीं कित्येक राक्षसांचीं घरें दग्ध केलीं, त्यांत प्रहस्त, महापार्श्व, वज्रदंष्ट्र, जंबुमाली, रश्मिकेतु, सूर्यशत्रु, ऱ्हस्वकर्ण, दंष्ट्र, रोमश, युद्धोन्मत्त, ध्वजग्रीव, विद्युज्जिव्ह, हस्तिमुख, कराल, विशाल, शोणिताक्ष, मकराक्ष, नरांतक, कुंभ, निकुंभ, यज्ञशत्रु, ब्रह्मशत्रु इतकीं राक्षसांचीं नांवें आहेत. ( ५।५४।८-१५ ) दुर्मुख, ( ६।८।६ ), वज्रहनु ( ६।८।२१ ), रभस, सुप्तघ्न, यज्ञकोप, महोदर, अग्निकेतु, विरूपाक्ष, धूम्राक्ष, ( ६।९।१-४ ) मित्रघ्न, वज्रमुष्टि, अशनिप्रभ, (६।४३।११-१२ ) कुंभहनु, महानाद, ( ६।५७।३१ ), संऱ्हादी, विकट, प्रजंघ, द्विजिव्ह, चक्रमाली, देवांतक, ( ६।८९।११-१४ ) इतकीं प्रसंगानुसार अन्यत्र आढळतात. राक्षसांचीं हीं नांवें रामायणांतील इतर नांवांहून अगदीं वेगळ्या प्रकारचीं आहेत. कांहीं नांवांवरून स्वरूपाचा तर कांहींवरून पराक्रमाचा बोध होतो. या पराक्रमांत कांहीं क्रौर्यदर्शक व कांहीं वैरदर्शक आहेत आणि स्वरूपबोधक नांवें कुरूपताबोधक आहेत. वास्तविक नांवांवरून स्वरूपाची वा कृतीची कल्पना करणें चुकीचें आहे. कृति व आकृति यांशीं विसंगत नांवें पुष्कळ असतात.

**विद्याधरो यथा मूर्खो जन्मांधश्च दिवाकरः ।**
**लक्ष्मीधरो दरिद्रश्च त्रयस्ते नामधारकाः ॥**

" विद्याधर मूर्ख असावा, दिवाकर जन्मांध असावा, व लक्ष्मीधर दरिद्री असावा; म्हणजे हे तीनहि केवळ नामधारी होत."

अशा रीतीनें विसंगत नांवांचा प्रत्यय आपणांस पुष्कळ येतो. तथापि राक्षसांचीं बहुतेक नांवें अशा प्रकारचीं आहेत व तदनुरूप कृति व आकृति यांचीं वर्णनें आढळतात; मग तीं विसंगत तरी कशीं म्हणावयाचीं ? राक्षसांचीं हीं सर्व नांवें मूळचीं त्यांचीं नसून काल्पनिक आहेत, असा रा. ब. वैद्य यांचा तर्क* आहे व त्यांनीं रामायणांत आलेलें ' सालकंटकटा ' हें राक्षसांच्या मूळ भाषेंतील नांव म्हणून उदाहरणार्थ दिलें आहे. इतर नांवांहून हें नांव भिन्न दिसतें, यांत शंका नाहीं. तथापि याला कसलाहि आधार नाहीं; या सालकंटकटा नांवाला आमच्या लोकांनीं दिलेलें दुसरें नांव आढळत नाहीं व रावणादिकांचें त्यांच्या भाषेंतील रा. ब. वैद्य म्हणतात तसें खरें नांव मिळत नाहीं; मग केवळ तर्कावर सर्व पाया कसा टिकणार ? विचित्र अर्थ असलेलीं नांवें स्वतः त्यांनीं कशीं ठेविलीं असतील अशी येथें शंका आहे; पण आम्हां सुधारलेले म्हणविणाऱ्या माणसांत धोंडू, भिकू अशीं नांवें असतात. त्या आणि या प्रवृत्तींत भेद काय ?

ब्राह्मणादि वर्णांशीं या राक्षसांचा द्वेष होता व तद्बोधक नांवें त्यांत आहेत. कित्येक नांवें आपणांस कुरूपतादर्शक वाटतात, तीं ( शोणिताक्ष, हस्तिमुख, महोदर वगैरे ) त्यांच्या समजुतीप्रमाणें पराक्रमाचीं दर्शक म्हणून त्यांनीं ठेविलीं असतील. रावणानें आपलें नांव सीतेला पळवून नेण्याकरितां तो गेला असतां कसें सांगितलें आहे, पहा !

**भ्राता वैश्रवणस्याऽहं सापत्नो वरवर्णिनि ।**
**रावणो नाम भद्रं ते दशग्रीवः प्रतापवान् ॥ ३।४८।२ ॥**

" हे सुंदरि, तुझें देव बरें करो. मी कुबेराचा सापत्न बंधु असून माझें नांव रावण आहे. पराक्रमी दशग्रीव असें मला म्हणतात. "

---

*Riddle of the रामायण, पृ. १९७

रावणाच्या या भाषणावरून त्याचें हें नांव मूळचें असल्याचेंच दिसतें व दशग्रीव वगैरे नांवें पराक्रमदर्शक म्हणून आणखीं मिळालेलीं * दिसतात. एके स्थलीं तर रावणानें आपल्या नांवाची व्युत्पत्ति "शत्रुरावण, शत्रूंना ओरडावयास, हाहाकार करावयास लावणारा." अशा प्रकारें असल्याची स्वतः ध्वनित केली आहे. (५।२३।८) तेव्हां नांवांत आम्हांला वाटणारी उग्रता अथवा विचित्रता त्यांना स्वतःला मान्य आहे, असें होत नाहीं काय? किंबहुना त्यांना तीं भूषणभूत वाटत होतीं असेंच म्हटलें पाहिजे. मात्र हा भेद व तन्निमित्त सूचित होणारी त्यांची प्रवृत्ति लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

## नामानुरूप कृति.

राक्षसांच्या स्वरूपाविषयीं लोकांत जी कल्पना आहे तिला आधार त्यांच्या स्वरूपाचीं वर्णनें हा असला तरी त्यांच्या कृतींच्या वर्णनानें तिला दृढता आली आहे. त्याचें स्वरूप आपणांला प्रत्यक्ष पहावयाला मिळत नाहीं हें खरें, आणि त्यांविषयीं जिज्ञासा होण्याला कारण तेंच आहे. तथापि त्यांचे पराक्रम वर्णन केलेले पाहिले म्हणजे स्वरूपाची सामान्य कल्पना डोळ्यापुढें उभी रहाते. राम, लक्ष्मण, जनक, वसिष्ठ, विश्वामित्र वगैरे पूर्वीं न पाहिलेल्या आणि मूळ चित्रें उपलब्ध नसलेल्या व्यक्तींचीं चित्रें अगदीं भिन्न प्रकारचीं जीं चित्रकार काढितात तीं केवळ त्यांच्या कृतींचीं वर्णनें ऐकून, हें उघड आहे. राक्षसांविषयींचीं अशींच चित्रें चित्रकार काढितात व लोकांच्या कल्पनेशीं तीं मिळतीं असतात. राक्षसांचीं काल्पनिक चित्रें उग्र आणि विक्राळ उठण्याला त्यांची कोणती कृति कारण झाली आहे, हें आतां पाहूं. विश्वामित्रांनीं केलेल्या ताटकेच्या वर्णनांत ती मनुष्यभक्षण करीत असल्याचें लिहिलें आहे. ( १।२५।१४ ) मनुष्यभक्षणाचा परिणाम देशच्या देश उध्वस्त होणें, हा आहे व तो दक्षिणेकडे जाणवूं लागल्याचें तेथेंच सांगितलें आहे. रावणाचा मामा मारीच हा दंडकारण्यांत राह-

---

*किलेक वेळां मूळ नांव व त्याचें वरच्यासारखें विशेषण ग्रंथांत एकत्र असलें म्हणजे तीं नांवें भिन्न आहेत किंवा काय असा संशय येतो. सीताशुद्ध्यर्थ गेलेला मारुती अशोक वनिकेंत शिंशपा वृक्षावर बसला असतां तेथें रावणाची स्वारी आली. येथील वर्णनांत शंकुकर्ण नामक स्वतंत्र राक्षस कल्पून अर्थ केला आहे. पण पूर्वापर ग्रंथ पाहतां या नांवाचा राक्षस तेथें असल्याचें दिसत नाहीं.

णाऱ्या तपस्वी ब्राह्मणांना मारून त्यांचें मांसभक्षण करीत असे (३।३८।३) व रक्तप्राशन करीत असे. (३।३९।५) सुग्रीवाशीं सख्य करण्याविषयीं रामाला सांगतांना कबंधानें सुग्रीवाला नरमांसभक्षकांविषयीं विशेष माहिती असल्याचें कारण सांगून रावणाचा हा आहार ध्वनित केला आहे. (३।७२।२३) रावणानें सीतेला वश होण्याकरितां दोन महिन्यांची जी मुदत दिली, त्या वेळीं मुदत भरेपर्यंत वश न झाल्यास आपल्या न्याहारीकरितां आचारी तुझे चिरून तुकडे करितील, अशी धमकी दिली आहे. (५।२२।९) रावणाचे मंदिरांत सीता न दिसल्यामुळें मारुती चिंताक्रान्त झाला व रावणानें अथवा त्याच्या स्त्रियांनीं तिला भक्षण तर केलें नसेल ना? अशी त्याला शंका आली. (५।१३।१२) मनुष्यमांसभक्षणाप्रमाणें त्यांचा यज्ञयाग उध्वस्त करण्याचा दुसरा उद्योग असे. विश्वामित्र यज्ञानुष्ठानाला बसले असतां मारीच व सुबाहु यांनीं वेदीवर रक्ताची वृष्टि केली. (१।३०।१२) राम चित्रकूटीं रहात असतां खर राक्षसाला तें सहन झालें नाहीं व तेथील तपस्वी जनांना तो फार पीडा देऊं लागला. तो व त्याचे अनुयायी उग्ररूपें धारण करून त्यांना भिववीत; यज्ञाला प्रारंभ झाल्यावर स्रुची वगैरे पात्रें उपडीं करीत; अग्नीवर उदक सिंचन करीत व कलश फोडून टाकीत. (२।११६।१४,१७) रावणानें तर परस्त्रिया हरण करणें व त्यांचा उपभोग घेणें हा राक्षसांचा स्वधर्म असल्याचें सांगितलें आहे. (५।२०।५) रावणाच्या या धर्मकल्पनेप्रमाणें त्यानें अनेक स्त्रिया हरण करून आणिल्या व आपल्या अंतःपुरांत ठेविल्या होत्या; सीताहरणाचा प्रयत्न हा त्याचा शेवटचा होय व त्यांतच त्याचा शेवट झाला. वरील उद्गार त्यानें सीतेशीं अशोकवनिकेंत बोलत असतां काढिले आहेत.

## मनुष्यांशीं तुलना—नीतिकल्पना.

नरमांसभक्षण व परस्त्रीहरण अशा प्रकारचीं राक्षसांचीं कृत्यें वाचलीं म्हणजे त्यांना नीतिकल्पनांचा गंध नसावा असें वाटतें; परंतु रामायणांत कित्येक स्थलीं अगदीं याच्या विरुद्ध उल्लेख आहेत. सीताहरणाची योजना ठरविण्यासाठीं रावण मारीचाकडे गेला असतां त्यानें पुष्कळ उपदेश करून रावणाला या कृत्यापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. मारिचाचे भाषणांत पुष्कळ नीतिवचनें आहेत.

" हे राजा, तुझ्या अंतःपुरांत हजारों स्त्रिया आहेत; तेव्हां तूं स्वतःचे स्त्रियांशीं रत हो. परस्त्रीगमनाहून अधिक मोठें पातक नाहीं." ( ३।३८।३२ ) रावणाच्या या पातकामुळें संसर्गतः सर्व राक्षसांचा नाश कसा होईल हें त्यानें एक मार्मिक दृष्टांत देऊन सांगितलें आहे. " सर्प ज्यांत आहेत अशा सरोवरांतील मासे स्वतः पाप न करितां शुद्ध आचरणानें रहात असले तरी सर्पांचा नाश करावयास लोक आले असतां त्यांचेबरोबर माशांचाहि ते नाश करून टाकितात; सर्पसंसर्ग त्यांना अशा प्रकारें ज्याप्रमाणें बाधतो, त्याप्रमाणें पापकर्म न करितां शुद्ध आचरणानें वागणारे पुरुष पापी लोकांच्या संसर्गानें असतील तर तो संसर्ग त्यांना बाधतो व ते नाश पावतात." ( ३।३८।२६ ) खरादिकांच्या वधाचें वृत्त रावणाला कळविण्याकरितां शूर्पणखा आली, त्या वेळीं तिनें रावणाची विषयोपभोगांत आसक्त होऊन राज्यकारभाराकडे दुर्लक्ष केल्याबद्दल फार निर्भर्त्सना केली आहे. ( ३।३३ ) तिचा रावणावरील मुख्य आक्षेप जनस्थानामध्यें खरादि राक्षसांचा वध एकट्या रामानें केला असून त्याची वार्ता चारांचे द्वारां रावणाला कळावयाची असतां कळली नाहीं व त्याबद्दल उपाययोजना करावयाची ती यामुळें त्याला करितां आली नाहीं, हा होता. उपाययोजना राजाकडून वेळेवर न झाल्यास त्या कार्याचा व क्रमानें त्या राज्याचा नाश होतो, असें तिनें सांगितलें असून राज्याचा विस्तार मोठा झाला तरी त्याचें रक्षण करितां न आल्यास समुद्रांत बुडालेल्या पर्वताप्रमाणें त्या राज्याचें तेज पडत नाहीं असें तिनें रावणाला बजाविलें आहे. ( ३।३३ )

मारिचानें रावणाला उपदेश केला त्यांत प्रथम परस्त्रीहरणाबद्दल त्याला दोष दिल्यावर अशी उपाययोजना त्याला सुचविणाऱ्या मंत्र्यांना दोष दिला आहे. राजा क्रूर, उद्धत व प्रजांशीं फार प्रतिकूल वागत असेल तर त्याचे हातून प्रजांचें पालन होणें शक्य नाहीं आणि याकरितां मंत्र्यांनीं तीक्ष्ण उपाययोजना राजाला सुचविली असतां त्यामुळें त्या योजनेचा व त्याबरोबर राज्याचा कसा नाश होतो हें त्यानें रथाचा दृष्टांत देऊन सुचविलें आहे. रथांत रथी व सारथि दोघे असतात; सारथि विषम मार्गानें रथ नेऊं लागला म्हणजे रथाबरोबर सारथि

व रथी दोनहि नाश पावतात, हें ठरलेलें आहे. तीव्र उपाययोजना करणारे राजे असले तरी राज्याची समृद्धि होणें शक्य नाहीं. मृगांचे कळपाचें रक्षण करण्याकरितां व्याध ठेविला असतां त्यांची ज्याप्रमाणें अवस्था होते त्याप्रमाणें त्या राज्याची स्थिति होते. रावणाहून बलानें कमी असलेल्या त्याच्या कित्येक शत्रूंना तो एखाद्या बलिष्ठ पुरुषाचे तावडींत सांपडून नाश पावावा अशी इच्छा होऊन त्यांनीं ही योजना केली नसेल ना ? अशी शंका मारिचानें घेऊन या वेळीं रावणाचे मंत्र्यांनीं त्याला या योजनेपासून परावृत्त करावयाचा असें त्याचें म्हणणें आहे. कारण धर्म, अर्थ, काम व कीर्ति हीं मंत्र्याला राजापासूनच प्राप्त होत असतात.

सुग्रीवाशीं सख्य करण्याची कल्पना प्रथम रामाला कबंधानें सुचविली. राजकारणामध्यें संधि, विग्रह, यान, आसन, द्वैधीभाव व समाश्रय अशा सहा युक्त्या आहेत. यांपैकीं शेवटची युक्ति समाश्रय ही रामाला करणें आवश्यक होय, असें सांगून समदुःखी म्हणून त्यानें सुग्रीवाचें नांव रामाला सुचविलें आहे. (३।७२।८।९) राम लंकेवर स्वारी करणार असें निश्चित कळल्यावर रावणानें आपल्या मंत्र्यांची सभा भरविली व त्यांना आतां काय उपाय योजावयाचा तें सुचविण्याविषयीं विनंति केली. उत्तम, मध्यम व अधम असे तीन प्रकारचे पुरुष, तसे तीन प्रकारचे मंत्र असतात, असें प्रथम सांगून रावणानें त्यांचीं लक्षणें त्यांना सांगितलीं आणि शेवटीं मागलापुढला विचार आधीं करून मग कार्यारंभ करणें इष्ट वाटतें असें म्हणून त्यांना उपाय काय योजावे असा प्रश्न केला. (६।६) रावणाला या वेळीं सर्व मंत्र्यांनीं युद्धाची सिद्धता करण्याला सुचविलें. बिभीषणानें मात्र विरुद्ध मत दिलें. साम, दाम व भेद या तीन उपायांनीं जें साध्य होण्यासारखें नसेल त्यासाठीं दंड हा शेवटचा उपाय आहे; व हा उपाय योजिला तरी शत्रु सावध नसतां, दुसऱ्याचे कचाट्यांत गावला असतां अथवा दैव प्रतिकूल असतां त्यानें इष्टसिद्धि होऊं शकते. लंकेवरील संकट टाळण्यास सीतेला मुकाट्यानें परत पोंचविणें, हा उत्तम उपाय असल्याचें बिभीषणानें सुचविलें. (६।९।१६) हा उपाय इष्ट व शक्य असल्यामुळें शेवटचा उपाय योजण्याची आवश्यकता नाहीं व शत्रूची स्थिति पाहतां तो उपाय योजिला तरी त्यांत यश येण्याचा संभव नाहीं, असें त्याचें म्हणणें

होतें. कुंभकर्णाला उठविल्यावर रावणानें आपल्या सभेमध्यें त्याला बोलावून सर्व वृत्तांत सांगितला. सीताहरणाचे कामीं तो प्रारंभापासून विरुद्ध होता व यासाठीं पूर्वींच्या आपल्या त्या विचाराची आठवण त्यानें रावणाला दिली. तो रावणाकरितां रणभूमीवर लढण्यासाठीं निघून गेला, तरी या वेळीं पूर्वींच्या आपल्या विचाराप्रमाणें राजा वागला नाहीं म्हणून हा अनर्थ ओढवला असें त्यानें बजावलें आणि सीताहरणाचे कामीं संमति देणारे त्याचे मंत्री दुष्ट अतएव त्याज्य होत असें मारीचाप्रमाणें स्पष्टपणें सांगितलें.

नीतिकथनाचे रामायणांतील जे प्रसंग येथवर सांगितले ते पाहिले असतां राक्षसांची कल्पना मनुष्यांहून भिन्न होती, असें वाटत नाहीं. राजनीतिविषयींचें विवेचन वरील प्रकरणांत अधिक आलें आहे, हें खरें; कारण ते प्रसंग रामायणांत अधिक आले आहेत. तथापि सामान्य नीति त्यांतहि ध्वनित झाली आहे. परस्त्रीहरण निंद्य असल्याविषयीं सर्वांची एकवाक्यता दिसत आहे. रावणानें हें निंद्यकर्म या वेळीं केलें इतकेंच नव्हे तर परदारापहाराचा त्याला नाद होता, हें त्याच्या सर्व चरित्रावरून कळणारें आहे. पापकर्म करणारे पुरुष सर्व काळीं असावयाचे **व पाप एकदां करूं लागलें म्हणजे पुढेंपुढें त्याविषयीं प्रथम वाटणारी भीति कमीकमी वाटूं लागते,** असा जगाचा अनुभव आहे. पाप हें वाईट आहे, तें करूं नये, हें त्याला कळत असतें. परंतु इंद्रियसंयमन न साधल्यामुळें तो पाप करूं लागतो व प्रथम भीति वाटण्याचें कारण हेंच होय. पापाविषयीं शंका मनांत न येतां तें करणें हा प्रकार मात्र वेगळा आहे. आणि दोनहि प्रकार राक्षसांमध्यें आढळून येतात. परस्त्रीहरण हें पाप आहे, याविषयीं त्यांचें ऐकमत्य दिसतें; पण नरमांसभक्षणांत त्यांना पाप वाटत नसे. नरमांस हा त्यांचा आहार होता. अर्थात् त्याच्या संपादनासाठीं प्रयत्न करणें त्यांना प्राप्त होतें. मांसाहार करणारे पुरुष मांसाकरितां ज्याप्रमाणें नानाविध पशूंचा वध करितात, त्याप्रमाणें ते मनुष्यांचा वध करीत. प्राणिकोटींत श्रेष्ठ म्हणून व आपलेपणा वाटून मनुष्याची हत्या ऐकून आपल्या अंगावर कांटा उभा राहतो. पण तत्त्वदृष्ट्या त्यांत भेद काय आहे? " मृग धांवत असतां, त्रस्त झाले असता, विश्वासानें स्वस्थ बसले असतां, दुसऱ्या मृगांशीं टक्कर देत असतां, सावध असतां

अथवा असावध असतां मांसभक्षक पुरुष चोरून अथवा उघडपणें त्यांचा वध करीत असतात. कोणत्याहि प्रकारें मृगांचा वध करण्यांत दोष नाहीं." ( ४।१८।३९, ४० ) असें वालिवधाचे वेळीं स्वतःचे कृतीचें समर्थन करितांना रामानें त्याला सांगितलें आहे. हाच न्याय रावणाचे तोंडीं घातल्यास त्यांत अयुक्त तें काय आहे? त्यांच्या नरमांसभक्षणाचें आम्हीं समर्थन करीत आहों असें नाहीं व तशी शंका कोणी सुज्ञ पुरुष घेणारहि नाहीं. आमचें विवेचन तत्त्वदृष्ट्या आहे. राक्षसांचा आहार व त्यानिमित्त त्यांच्या उद्योगांत दिसून येणारी क्रूरता पाहिली म्हणजे त्यांना नीतीची कल्पना नसावी असें जें वाटतें तें कसें अयुक्त आहे, हें आम्हांला येथें दाखवावयाचें आहे. ते नरमांसभक्षण करीत असले तरी त्यांचे उद्योग स्वतःच्या प्रदेशांत व स्वतःच्या ज्ञातिबांधवांमध्यें दिसून येत नाहींत, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. रावणाचा उन्मत्तपणा व अनीतिपर वर्तन यांचा निषेध करणारा व तो ऐकत नाहीं असें पाहून त्याचा प्रतिकार करण्याकरितां शत्रूकडे जाऊन मिळणारा प्रत्यक्ष त्याचा भाऊ बिभीषण हा एक राक्षस होता, हें विसरतां नये. बिभीषणाचा हा उद्योग पाहून रावणानें त्याची निर्भर्त्सना केली, त्यांत आपल्या पक्षांतील लोक स्वार्थलोभानें शत्रूला जाऊन मिळतात व आपल्या पक्षाचा कसा घात करितात हें एक मार्मिक दृष्टांत देऊन त्यानें व्यक्त केलें आहे व तें मूळांत वाचण्यासारखें आहे. ( ६।१८ ) एकंदरींत राक्षसांच्या नीतिविषयक कल्पना मनुष्यांच्याहून भिन्न दिसत नाहींत. राक्षसांचें वैशिष्ट्य दाखवावयाचें तर तें एका बाबीविषयीं दाखवितां येईल. व ती बाब म्हटली म्हणजे कपट ही होय. सामान्य व्यवहार असो वा युद्धासारखा दारुण प्रसंग असो, कपटाविषयीं त्यांना शंका वाटत नसे. कपटानें युद्ध करण्याविषयीं त्यांची प्रसिद्धि होती. कपटाबरोबर असत्यवादित्व आवश्यक असतें, हें सांगावयास नको. कपट हें त्यांच्या इतकें आंगवळणीं पडलें होतें कीं, त्याविषयीं त्यांना शंका वाटत नसे. आणि यामुळें तद्विषयक साधक वा बाधक चर्चा रामायणांत कोठें आढळून येत नाहीं.

## धर्म आणि आचार.

राक्षसांच्या नीतिविषयक कल्पना वाचल्या म्हणजे त्यांचा धर्म कोणता, हा

प्रश्न उपस्थित होतो. प्राचीनकालीं नीति व धर्म यांचा व्यवहार अभेदानें होत असे; अर्थात् नीतिविषयक कल्पना इतर मनुष्यजातीशीं अभिन्न असल्यामुळें धर्म अभिन्न असावा, असें वाटतें. याविषयीं स्पष्ट उल्लेख रामायणांत नाहीं व प्रमाणें पाहिलीं तर तीं प्रबल नाहींत. वेदग्रंथांचें अध्ययन ते करीत व याविषयीं पूर्वीं विवेचन आलें आहे; पण वेद प्रमाण मानीत असतां मनुष्यमांसभक्षणाकडे त्यांची प्रवृत्ति कां व्हावी, हें एक गूढ आहे व तें उकलत नाहीं. वैदिक धर्म व आचार त्यांना मान्य असावयाचे म्हणजे त्यांमध्यें वर्णव्यवस्था असणें साहजिक दिसतें. वर्णांविषयीं शोध केल्यास ब्रह्मराक्षस म्हणून निर्देश आढळतो व तो राक्षसांतील ब्राह्मणवर्णाचा असावा, असें वाटतें. अश्वमेधाची सिद्धता करण्यास सांगतांना राजा दशरथानें " विद्वान् विद्वान् ब्रह्मराक्षस क्रतूमध्यें कोठें न्यून पडतें तें पहात असतात. " ( १।८।१८ ) असें सांगितलें आहे. सीताशुद्ध्यर्थ मारुती लंकेंत गेला असतां उत्तररात्रीं ब्रह्मराक्षसांचा वेदघोष त्याचे कानीं आल्याचें वर्णन आहे. ( ५।१८।२ ) मायामय सीतेचा वध करण्यास इंद्रजित उद्युक्त झाला असतां मारुतीनें त्याची जी निंदा केली आहे त्यांत " ब्रह्मर्षींच्या कुलांत तूं जन्माला आला आहेस. " (६।८१।१९) अशी त्याला आठवण दिली आहे. याप्रमाणें राक्षसांतील ब्राह्मणवर्णाचे निर्देश रामायणांत आहेत; पण इतर वर्णांचा निर्देश एकहि मिळत नाहीं. त्या वेळीं कित्येक ब्राह्मण अस्त्रविद्येंत प्रवीण होते, हें अगस्त्यऋषींनीं रामाला अस्त्रें दिलीं त्यावरून अनुमानितां येतें, पण त्या वेळचा एकहि ब्राह्मण कोणत्याहि राज्याचा अधिपति म्हणून काम करणारा आढळत नाहीं. पण राक्षसांतील रावण हा ब्राह्मण होता व एका विशाल राज्याचा अधिपति होता. ब्रह्मराक्षस हा ब्राह्मणवर्णाचा निर्देश धरिला तर सध्यांप्रमाणें ब्राह्मण व ब्राह्मणेतर असे दोन वर्ण त्या वेळीं राक्षसांमध्यें होते, असें म्हणतां येईल. राक्षसांच्या आचारांविषयींहि रामायणांत निर्देश फार नाहींत. रावणाचे और्ध्वदेहिकाचा निर्देश महत्त्वाचा आहे. ( ६।१११ ) पण त्याबरोबर विराधराक्षसानें आपणाला पुरून टाकण्याविषयीं रामाला केलेली सूचना ( ३।४।२२,२३ ) दृष्टीआड करितां येत नाहीं. " राक्षस गतप्राण झाले असतां त्यांना पुरून टाकणें हा सनातन धर्म

आहे व अशा प्रकारें त्यांना पुरून टाकिलें असतां त्यांना सनातनलोक प्राप्त होतात, असें तो सांगत आहे. कबंधाची कल्पना उभयान्वयी आहे. त्यानें रामाला आपणास खळग्यांत घालून दग्ध करण्यास सांगितलें आहे. ( ३।७१।३१ ) अशा रीतीनें राक्षसांतील प्रेतकार्याचे तीन प्रकार रामायणांत दिसून येतात. राक्षसांचे इतर संस्कार किंवा आचार यांविषयीं रामायणांत उल्लेख नाहीं. बिभीषणाला रावणवधानंतर रामानें करविलेला अभिषेक रामाच्या राज्याभिषेकाप्रमाणें वर्णिलेला आहे. या अभिषेकाकरितां सुवर्णकलशांतून वानरांनीं समुद्राचें उदक आणिलें व लक्ष्मणानें बिभीषणाला श्रेष्ठ आसनावर बसवून अभिषेक केला. हा अभिषेक समंत्रक करण्यांत आल्याचें सांगितलें आहे. ( ६।११२।१४,१६ ) बिभीषणाची गांठ प्रथम पडली, त्या वेळीं रामानें त्याला असाच लक्ष्मणाकडून अभिषेक करविला होता; पण त्याचें वर्णन अभिषेकनिर्देशाहून अधिक नाहीं. ( ६।१९।२६ ) हा अभिषेक त्याला वचन देण्यापुरता होता. असो. सीतेला लंकेंत आणिल्यावर रावणानें तिला प्रथम आपलें वैभव दाखविलें व तिला वश करण्याचा प्रयत्न केला; या वेळीं सीता रडूं लागली असतां रावणानें आपलें आचरण धर्मविहित कसें आहे, हें सांगण्याचा प्रयत्न केला आहे. तो म्हणतोः—

**अलं व्रीडेन वैदेहि धर्मलोपकृतेन ते ।**
**आर्षोऽयं देवि निष्पन्दो यस्त्वामभिभविष्यति ॥३।५५।३४॥**

"हे सीते, भर्त्याचा त्याग करून परपुरुषाचा स्वीकार केल्यानें धर्माचा लोप होईल असें वाटून तूं लाजत आहेत; तरी ही लाज आतां पुरे. तुझा व माझा जो संबंध आहे, तो वेदप्रतिपादितच आहे."

वेदविहित धर्मानुरूप आपला दोघांचा संबंध होत आहे असा रावणाचें म्हणण्याचा भाव आहे. विवाहाचे आठ भेदांपैकीं राक्षसविवाह येथें रावणाला अभिप्रेत आहे, असें दिसतें व टीकाकारहि तसें म्हणतात. राक्षसविवाहाचें लक्षण मनुस्मृतीमध्यें पुढीलप्रमाणें आहे—

**हत्वा छित्वा च भित्वा च क्रोशन्तीं रुदतीं गृहात्**
**प्रसह्य कन्याहरणं राक्षसो विधिरुच्यते ॥३।३३॥**

" कन्येच्या पित्रादिकांना (आवश्यकता असेल तर) मारून तोडून गृहादिकांचा भंग करून, कन्या रडत आणि ओरडत असतां बलात्कारानें तिचें हरण करणें याला राक्षसविधि म्हणतात."

मनूचें हें लक्षण आपल्या संबंधाला जुळत आहे; आणि हा विधि धर्माला अनुसरून असल्यामुळें धर्मलोपाची शंका नको, असें रावणाचें म्हणणें आहे. या प्रतिपादनांत रावणानें थोडें कपट केलें आहे. राक्षसविधीमध्यें बलात्कारानें हरण विहित असलें तरी तें कन्येचें होय; विवाहित स्त्रीचें नव्हे, हें बिसरतां नये. रावणाचे भाषणांत मनूचा उल्लेख नसला तरी त्यानें " आर्ष–(ऋषिर्वेदः)– वेदप्रतिपादित धर्म " म्हणून त्याविषयीं सांगितलें आहे. आणि मनूनें परंपरा-प्राप्त असलेले आचार सांगितले आहेत हें लक्षांत घेतलें म्हणजे त्याचे नांवाचा उल्लेख नसला तरी त्याचें महत्त्व नाहीं. हा विधि क्षत्रियांना विहित आहे. परंतु रावण आपल्याला राक्षस म्हणवीत असल्यामुळें नामानुरूप हा संबंध म्हणून धर्म्य असें सांगण्याचा त्याचा उद्देश दिसतो. शास्त्रविधीला अनुसरून त्यानें कन्याहरण या पूर्वीं पुष्कळ वेळां केलें होतें. सीताशुद्ध्यर्थ मारुती लंकेंत रावणाच्या वाड्यांत फिरत असतां त्या निमित्तानें जें वाड्याचें वर्णन आलें आहे त्यांत पळवून आणिलेल्या अनेक राजकन्या तेथें असल्याचें लिहिलें आहे.(५।९।६) या कन्यांविषयीं सांगतांना पुढें राजर्षि, ब्राह्मण, दैत्य, गंधर्व व राक्षस यांच्या कन्या त्यांत होत्या व त्या त्याला वश झाल्या होत्या आणि कित्येक तर आपण होऊन त्याकडे आल्या होत्या असें वर्णन केलें आहे. (५।९।६८–६९) सीतेप्रमाणें शेवटपर्यंत धैर्यानें आपलें शील संभाळणारी स्त्री त्यांत एकहि नव्हती, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. मायेनें रामाचें शिर निर्माण करून तें सीतेला दाखवून राम युद्धांत मृत झाला असें भासविण्याचा व कित्येक वेळां भिवविण्याचा असे जे तिला वश करण्याकरितां म्हणून रावणानें प्रयत्न केले त्यांची यावरून संगति लागते. अशा प्रकारचे प्रयत्न यापूर्वीं त्यानें अनेकदां करून त्यांत यश संपादिलें होतें व तेंच या वेळीं फिरून यत्न करून पाहण्यास कारण झालें. त्याच्या या कपटी स्वभावाला अनुसरून सीतेचें हरण धर्मानुरूप असल्याचें तिला भासविण्याचा त्यानें या वेळीं प्रयत्न केला. तथापि जो धर्म व जे आचार ब्राह्मणादि वर्णांना

मान्य होते ते राक्षसांना माहीत होते, एवढें अनुमान त्याच्या म्हणण्यावरून करणें अयुक्त होणार नाहीं. हें पूर्वी दिलेल्या प्रमाणाला पोषक आहे. मात्र अशा प्रकारें धर्म एक असतां दोहोंमध्यें द्वेष कां असावा, हें कळत नाहीं.

## मनुष्यांशीं तुलना–तपश्चर्या व उपासना.

ब्राह्मणादिकांप्रमाणें या राक्षसांची तपश्चर्या करण्याकडे प्रवृत्ति होती; परंतु तपाचें साध्य मात्र एक म्हणतां येत नाहीं. मोठमोठ्या ऋषींना तपश्चर्या करून जसें महत्त्व प्राप्त झालें, तसें राक्षसांपैकीं कोणीं मिळविलेलें नाहीं. स्वतांचे ऐश्वर्याची अभिवृद्धि हा अथवा अशा प्रकारचे त्यांचे तपश्चर्येंतील उद्देश असत. निर्हेतुक तपश्चर्या एकानेंहि केलेली नाहीं; किंबहुना त्याची त्यांना कल्पनाहि दिसत नाहीं. वेदांतील तत्त्वज्ञान त्यांनीं आकलन केलेलें नव्हतें, अथवा स्वतंत्रपणें त्याविषयीं विचार केलेला नव्हता. यामुळें भौतिक ऐश्वर्याचें क्षणिकत्व त्यांना वाटत नसून तें अक्षय्य असें समजून ते चालत असत. जन्म झाला त्यापक्षीं मृत्यु अपरिहार्य आहे, असें त्यांना वाटत नसे व यासाठीं तो टाळण्याकरितां पुष्कळ राक्षसांनीं तपश्चर्येचा मार्ग स्वीकारला होता. मृत्यु चुकवितां येणार नाहीं, असें वरप्रदान देणाऱ्या देवतेनें सांगितलें तरी त्याविषयीं स्वतांशीं विचार न करितां कोणत्या प्रकारें मृत्यु येऊं नये हें तरी वरप्रदान म्हणून देवापाशीं मागत असत; आणि या मागणींत प्रत्यक्ष अमरत्व असाध्य म्हणून स्पष्टपणें न मागतां अशी क्लृप्ति योजीत असत कीं, मृत्यूचीं सर्व कारणें व साधनें त्यांतून आपोआप गळलीं जावीं. विराधानें तपश्चर्या करून शस्त्राचे योगानें आपला वध होऊं नये व शरीरावर छेद होऊं नये असे वर मिळविले होते. ( ३।३।६ ) रावणानें कित्येक वर्षें तपश्चर्या केली आणि ब्रह्मदेवाकडून देव आणि असुर यांपासून अभय मिळविलें ( ६।९२।२६ ). कोणी राक्षस अशा प्रकारें तपश्चर्या करून अक्षय्य शस्त्र अथवा भाता मिळवीत तर कोणी कवच मिळवीत. ऐहिक ऐश्वर्यापलीकडे एकाचीहि गति झालेली दिसत नाहीं. उपासना कोणाची करीत असत, याविषयीं रामायणांत वर्णन नसलें तरी बहुतेकांनीं ब्रह्मदेवाला प्रसन्न केल्याचें दिसून येतें. देव आणि असुर यांमध्यें परस्परद्वेष कितीहि तीव्र असला तरी ब्रह्मदेवांविषयीं सर्वांचा आदर

सारखा होता. हिंदु आणि मुसलमान यांमध्यें कितीहि तंटे होवोत **महात्मा गांधींविषयीं** सध्यां ज्याप्रमाणें सर्वांचा आदर सारखा आढळतो, त्याप्रमाणें ब्रह्मदेवाची त्या वेळीं स्थिति होती. कडक नियम पाळून देह झिजवावा आणि अशी तपश्चर्या करून ब्रह्मदेवाचा प्रसाद संपादावा हा एक त्या वेळच्या प्रमुख असुरांचा आवडता व्यवसाय होऊन राहिला होता. कांहीं काल उग्र तप केल्यावर ब्रह्मदेव बहुधा प्रसन्न होत असे. आणि भक्ताचे तोंडून वर बाहेर पडला म्हणजे त्याचा परिणाम पुढेंमागें काय होणार याचा विचार करावयाची आवश्यकता न वाटून ब्रह्मदेवाचे तोंडून "तथास्तु" अशीं अक्षरें तत्काल बाहेर पडत असत. अशा वरप्रदानाचे निस्तरणीनें बहुतेक पुराणें भरून गेलीं आहेत व रामायण हेंहि त्याहून वेगळें म्हणतां येणार नाहीं. असो. राक्षसांची उपास्यदेवता म्हणून देवी निकुंभिलेचा उल्लेख रामायणांत आला आहे. सीतेला भिवविण्याकरितां राक्षसींचा जो एक कळप रावणानें अशोकवनिकेंत ठेविला होता, त्यांपैकीं एका राक्षसीनें तिला खाऊन टाकण्याची कल्पना सुचविली व दुसरी तिला अनुमोदन देतांना "सर्वदुःखविनाशक सुरा सत्वर आणवा व मग आपण या मनुष्यमांसाचें सेवन करून निकुंभिला देवीपुढें नृत्य करूं" (५।२४।४७) असें सांगूं लागली. या देवीला उद्देशून इंद्रजितानें अग्नीमध्यें हवन केल्याचें (६।८२।२४) व त्याविषयीं बिभीषणानें रामाला सूचना दिल्याचें (६।८४।१४) लिहिलें आहे. निकुंभिलेला उद्देशून करावयाचें हवन समाप्त होण्यापूर्वी इंद्रजिताशीं जो युद्ध करावयास येईल त्याचे हातून त्याला मृत्यु येईल अशी ब्रह्मदेवानें त्याला दिलेल्या वरामध्यें अट होती; (६।८५।१४) व बिभीषणाचे सूचनेवरून ही वेळ लक्ष्मणानें संभाळिली. ही देवी कोण वगैरे माहिती रामायणांत नाहीं.

## मनुष्यांशीं तुलना–वैभव आणि व्यवस्था.

रावणानें सीतेला घेऊन लंकेंत प्रवेश केला, त्या निमित्तानें लंकेचें जें वर्णन केलेलें आहे त्यांत तींत मार्ग विशाल असून तिला अनेक वेशी होत्या, असें सांगितलें आहे. (३।५४।१२) लंकेभोंवतीं तिचे संरक्षणाकरितां खंदक खणिले असून कित्येक धनुर्धारी राक्षस फिरते ठेविले होते. तींतील वाडे पर्वतप्राय

विशाल असून ते पताकांनीं सुशोभित दिसत असत. सुवर्णाचीं दिव्य तोरणें मधून मधून लाविलेलीं होतीं (५।२।१४।१८). कित्येक वाडे सातसात-आठआठ मजली होते. (५।२।५०) राजवाडयाच्या खिडक्या हस्तिदंत किंवा रुपें यांच्या असून वर सोन्याचीं जाळीं सोडलेलीं होतीं. भूमीवर चुन्यांत रत्नें बसवून ती विचित्र केलेली होती. (३।५५।१०।११) रावण सीतेला आपलें वैभव दाखविण्याकरितां म्हणून वाडयांत घेऊन आला व जिना चढून वर गेला. हा जिना सोन्याचा होता. (३।५५।९) रावणाच्या वाडयांचें व लंकेंतील अपार वैभवाचें वर्णन सुन्दरकांडाचे प्रारंभीं फार आलेलें आहे. येथें कित्येक स्थलीं अत्युक्ति नाहीं असें नाहीं. तथापि अत्युक्तीला झाला तरी कसला तरी आधार लागतो. आणखी सध्यांच्या आमच्या दरिद्री दृष्टीला वैभवाचीं वर्णनें असंभवनीय वाटूं लागतात; पण त्यास उपाय नाहीं. दृष्टींतील हा दोष नष्ट होण्यास अवधिहि थोडा पुरणार नाहीं. तेव्हां रामायणांतील लंकेच्या वर्णनाची चिकित्सा करून त्यांतील ग्राह्याग्राह्य भागाचा विवेक करीत राहण्यापेक्षां जिज्ञासु वाचकांसाठीं सुंदरकांडाकडे बोट दाखवून मोकळें व्हावें असें वाटतें.

लंकेच्या संरक्षणाची व्यवस्था अर्धीअधिक निसर्गानें केली होती. तें एक द्वीप असल्यामुळें तिच्या चारी बाजूंनीं विशाल सागर पसरलेला होता व सागर तरून जाण्यासारखें साधन तेथें कोणतेंहि नसल्यामुळें ती स्वभावतः निर्भय झाली होती. लंकेच्या या नैसर्गिक सुरक्षिततेमुळें पुष्कळ लोकांना पीडा देऊन व शेवटीं रामपत्नी पळवूनहि रावणाला स्वतांच्या अथवा राज्याच्या सुरक्षिततेविषयीं काळजी वाटली नाहीं किंवा विशेष व्यवस्था करावी लागली नाहीं. द्वीपांतील ज्या मुख्य नगरींत रावण रहात असे, तिचेभोंवतीं तट व खंदक केलेले होते. नगरींत प्रवेश करण्यास चार बाजूंनीं चार विशाल द्वारें होतीं. या द्वारांवर बाण व पाषाण फेंकण्याचीं मोठमोठीं यंत्रें असून शत्रु आल्यास त्याला त्यांचे योगानें बाहेरच्या बाहेर पिटाळतां येत असे. खंदकांतून वर नगरीकडे जाण्यास चार मार्ग होते. शत्रु आला असतां या मार्गानें पुढें जाऊन त्याला तोंड देतां येत असे व तो त्याहूनहि पुढें आल्यास यंत्राचे योगानें ते

मार्ग खंदकांत नाहींसे करून टाकीत असत. चारी द्वारांवर सशस्त्र सैन्य नित्य सिद्ध असे. रावण स्वतां या सेनेची पाहणी वरचेवर करीत असे. ( ६।३।११–२० ).

रामायणांत रामाचें समग्र चरित्र देण्याचा महर्षींचा उद्देश दिसूत येतो, तसा रावणाचें चरित्र देण्याचा नव्हता. यामुळें लंकेचें वर्णन रामचरित्रांत त्याचा संबंध आहे तो कळण्यास आवश्यक तितकें त्यांनीं केलेलें आहे. मारुतीनें लंकेंत प्रवेश केला त्या निमित्तानें व युद्धाचे निमित्तानें लंकेंतील वैभव आणि व्यवस्था यांचें वर्णन रामायणांत आलें आहे; अर्थात् आमचे जिज्ञासेचे दृष्टीनें तें त्रोटक आहे. रावणानें राज्याची व्यवस्था कशा प्रकारें ठेविली होती, आपल्या प्रजेचें संरक्षण तो कशा रीतीनें करीत असे वगैरे प्रश्न आपल्यापुढें उभे राहतात; परंतु त्याचें समाधानकारक उत्तर देण्यासारखें रामायणांत साधन नाहीं. याविषयीं लिहिण्याचा महर्षींचा उद्देशच दिसत नाहीं; मग त्यासंबंधीं वर्णन कसचें असणार ?

## मनुष्यांशीं तुलना–विद्यासंपादन.

राक्षसांच्या विद्वत्तेविषयीं रामायणांत बरेच उल्लेख आहेत. विश्वामित्र यज्ञ-रक्षणाकरितां रामाला नेण्याकरितां आले, त्या वेळीं त्यांनीं मारीच व सुबाहु यांचा " सुशिक्षितौ " असें विशेषण लावून उल्लेख केला आहे. ( बालकांड १९।५ ) सीताशुद्ध्यर्थ मारुती लंकेंत गेला असतां तेथील वर्णनांतः—

**षडंगवेदविदुषां क्रतुप्रवरयाजिनाम् ।**
**शुश्राव ब्रह्मघोषान्स विरात्रे ब्रह्मराक्षसाम् ॥ ५।१८।२ ॥**

" सहा अंगांसह वेदांचें ज्ञान असलेले व मोठमोठे यज्ञ करणारे ब्रह्मराक्षस उत्तररात्रीं वेद म्हणूं लागले, त्याचा घोष त्याचे कानीं आला. "

असा श्लोक दिला आहे. बिभीषण रावणाकडे गेला तेव्हां तेथील स्थितीचें वर्णनः—

**पुण्यान्पुण्याहघोषांश्च वेदविद्भिरुदाहृतान् ।**
**शुश्राव स महातेजा भ्रातुर्विजयसंश्रितान् ॥ ६।१०।८ ॥**

" आपला भाऊ जो रावण त्याचा विजय होणार असें सुचविणारे पुण्य-

कारक पुण्याहघोष वेदवेत्ते राक्षस करीत होते, ते त्या महातेजस्वी बिभीषणानें ऐकिले. ”

या श्लोकानें दिलें आहे. राक्षसाधिपति रावण हा अग्निहोत्री, असें युद्धकांडांत सांगितलें असून त्याच्या प्रेताचें दहन करितेवेळीं त्याचीं अग्निहोत्राचीं उपकरणें त्यावर ठेविल्याचें त्यांत वर्णन आहे. वेदांचीं पदें पाडून म्हणावयाची जी पद्धति सांप्रत प्रचारांत आहे, तिचा आद्यप्रवर्तक रावण होय, अशी आख्यायिका आहे. रावणाचें वेदांवर एक भाष्यहि असल्याचें सांगतात.

रावणाचा पुत्र अतिकाय याला कोणत्या विद्या अवगत होत्या, याविषयीं बिभीषणानें रामाजवळ वर्णन करितांना “ तो अश्वारोहण, गजारोहण, तरवार, धनुष्य व त्याचें कर्षण यांत निपुण असून, साम, दाम, भेद, राजनीति व मंत्र ( मसलत ) यांत निष्णात आहे. ” ( ६।७१।२९ ) असें सांगितलें आहे. अतिकायाचे या विद्वत्तेवरून मनुष्यांप्रमाणें राजाला आवश्यक असलेल्या विद्या व कला राक्षसांतहि आवश्यक मानीत असत, असें उघड दिसतें. रावणाशीं कुंभकर्णाचें जें भाषण युद्धार्थ बाहेर पडण्यापूर्वीं झालें, त्यांत राजनीतिशास्त्र व अर्थशास्त्र यांचा उल्लेख आला आहे. ( ६।६३।१४–१६ ) कुंभकर्णाचे भाषणानंतर महोदरानें भाषण केलें असून त्यांत धर्म, अर्थ, काम व मोक्ष ( निःश्रेयस ) यांचा उल्लेख व तद्विषयक चर्चा आहे. ( ६।६४ ) राक्षसांमधील विद्वत्तेविषयींच्या या उल्लेखांवरून मनुष्यांशीं तुलना करूं लागल्यास त्यांत न्यूनता दिसून येत नाहीं.

## मनुष्यांशीं तुलना–युद्धपद्धति.

राक्षसांनीं केलेल्या युद्धांचीं वर्णनें पाहतां अस्त्रविद्येंत मनुष्यांशीं त्यांचा फारसा भेद दिसून येत नाहीं. धनुर्विद्येंत ते प्रवीण असले तरी बाणापेक्षां गदा, शक्ति इत्यादि आयुधांकडे त्यांची अधिक प्रवृत्ति दिसते. विश्वामित्रांनीं रामाला उपदेश करितांना नानाविध अस्त्रांचा जो संग्रह सांगितला आहे, त्यांपैकीं एकहि अस्त्र कोणी राक्षसानें मिळविल्याचें रामायणांत वर्णन नाहीं. त्या वेळीं प्रचलित असलेलीं शस्त्रें व स्वतःचें शारीरिक सामर्थ्य यांचे योगानें वैभव संपादन करून विलास भोगावे, यापलीकडे त्यांची दृष्टि नव्हती व तीस अनुसरून अस्त्रविद्येंत

अधिक भर घालण्याची आवश्यकता स्वतांचे सामर्थ्यापुढें त्यांना वाटली नाहीं, असें वाटतें. ते युद्धामध्यें शस्त्रास्त्रांबरोबर वृक्षपाषाणादिकांचा उपयोग नित्य करीत असत. रामाशीं झालेल्या युद्धांत रावणाच्या राक्षससेनेनें या साधनांचे योगानें वानरसेनेवर हल्ले केल्याचीं वर्णनें आहेत. निःशस्त्रांशीं युद्ध करितांना या साधनांचा उपयोग करून बलाधिपत्याचे योगानें विजय मिळवितां येतो, हें खरें; तथापि प्रतिपक्षी सशस्त्र असल्यास तेथें असलीं साधनें निरुपयोगी ठरतात. राम व लक्ष्मण या दोघां वीरांनीं विश्वामित्राचे यज्ञाचें संरक्षण केलें; तसेंच जनस्थानांत खरादि राक्षसांचा त्यांच्या सेनेसह रामानें आपल्या बाणांचे योगानें धुव्वा उडवून दिला, त्याचें रहस्य राक्षसांच्या अस्त्रविद्येंतील अल्पसंतोषांत आहे. वृक्षपाषाणादिकांचे प्रहार प्रतिपक्षी दूर असतां त्यावर विशेषसे करितां येत नाहींत; दूर असलेल्या शत्रूचा समाचार बाणांच्या योगानें घेतां येतो व त्यानें वृक्षपाषाणादिकांचे प्रहार केले तरी त्याचा उपयोग होत नाहीं. खरादिकांनीं शस्त्रें ग्रहण केलीं होतीं, हे खरें; तथापि रामबाणांपुढें त्यांचें सामर्थ्य टिकलें नाहीं. अस्त्रविद्येंतील प्रगतीकडे त्यांचें अहंमन्यतेमुळें तादृश लक्ष नव्हतें. उलट मनुष्यांनीं मात्र वृक्षपाषाणादिकांचा युद्धांत उपयोग केल्याचें वर्णन कोठेंहि आढळत नाहीं.

अस्त्रविद्येंतील ही उणीव ते मायाबलानें भरून काढीत असत. सशस्त्र योद्धा असो वा तपस्वी ऋषि असो, राक्षसांच्या या मायाबलाची त्यांना भीति वाटत असे. विश्वामित्र मखरक्षणार्थ राम-लक्ष्मणांला मागण्याकरितां दशरथाकडे आले असतां राजानें त्यांना बरोबर न पाठविण्याविषयीं जीं कारणें सांगितलीं, त्यांत ‘ राक्षस कपटानें युद्ध करितात, ’ (१।२०।८) हें प्रथम सांगितलें आहे. मायाबलाचे योगानें ते रूपांतर करीत असत किंवा गुप्तपणें शत्रूवर हल्ले करीत असत आणि शत्रु समोर न दिसल्यामुळें प्रतिकार करणें अशक्य होत असे. राक्षस शत्रूवर अदृश्य राहून हल्ले करीत असत म्हणजे काय करीत असत, हें कळण्यास मार्ग नाहीं. इंद्रजितानें अशा प्रकारें युद्ध केल्याचें वर्णन आहे. परंतु तेथें आकाशांतून तो अस्त्रवृष्टि करीत असे, असें सांगितलें आहे व येथें विमानांत बसून फार दूर गेल्यास तें संभवनीय आहे. स्वतः बिभीषण या मायाबलांत प्रवीण होता व प्रतिपक्षाकडील

मायाबल ओळखून त्याचा प्रतिकार करण्याचे कामीं रामाला त्याचा फार उपयोग झाला. इंद्रजितानें लक्ष्मणाशीं कपटयुद्ध केलें, त्या वेळीं रामानें बिभीषणाला त्याचेबरोबर यासाठींच दिला होता. (६।८५)

राजा दशरथाचे सैन्यांत ज्याप्रमाणें रथी, पदाती वगैरे विभाग होते, त्याप्रमाणें राक्षसांच्या सेनेचेहि विभाग होते. त्यांच्या सेनेंत उंट, खेचरें व गदर्भ यांचा वाहनें म्हणून मोठा संग्रह होता. (६।१०।१८) रावणाच्या रथाला तो युद्धार्थ आला त्या वेळीं आठ घोडे जोडिलेले होते. (६।९५।३३) रावण सीताहरणार्थ दंडकारण्यांत आला, त्या वेळीं तेथें त्याचे रथाला खर जोडिलेले होते. अतिकायाचे रथाला तर एक हजार अश्व जोडिले असल्याचें वर्णन आहे. (६।७१।१२) ही उघड उघड अत्युक्ति आहे. कारण त्याचे रथावर चार सारथि असल्याचें तेथेंच सांगितलें आहे. (६।७१।२९) सैन्यावर बलाध्यक्ष म्हणून अधिकारी असे व त्याच्या आज्ञेप्रमाणें सेनेच्या हालचाली होत असत. सशस्त्र सेना लंकेच्या रक्षणार्थ सिद्ध असे असें जरी सांगितलें आहे, तरी युद्धाचे वेळीं तेवढ्या सेनेनें काम न भागल्यास बलाध्यक्षाचे द्वारां राक्षसांची रिक्रूट भरती करीत असत. नित्य सिद्ध असलेली सेना युद्धांत कामास आल्यामुळें शेवटीं युद्धाकरितां सैन्याची आवश्यकता भासून रावणानें याप्रमाणें सेना गोळा केल्याचें वर्णन आहे. (६।९५।२३) सेनेसंबंधाचीं वर्णनें पाहिलीं म्हणजे राक्षसांचें म्हणून त्यांत कांहीं वैशिष्ट्य दिसत नाहीं.

## मनुष्यांशीं तुलना–सामान्य निरीक्षण.

राक्षसांच्या वैभवाची कल्पना येण्यासाठीं लंकेचें वर्णन पहाण्याची सूचना पूर्वीं वाचकांस केली आहे. तें वाचूं लागलें असतां त्यामधील ललितकलाप्रावीण्याची कल्पना होऊं लागते. स्त्रियांचे अलंकाराचे उल्लेख पाहिले म्हणजे त्यांत मनुष्यांप्रमाणें नुपूरें, मोत्यांचे हार, कमरपट्टे, कुंडलें, बाहुभूषणें, किरीट इत्यादिकांचे निर्देश आहेत. कुंडलें धारण करण्याची पद्धति राक्षसांमध्यें विशेष दिसून येते. युद्धानिमित्त रणांगणावर आलेल्या वीरांच्या वर्णनांत कुंडलांचा निर्देश बहुधा प्रत्येक वेळीं आलेला आहे.

रावण हा कुशल गवई होता, अशी कथा आहे; व तीस अनुसरून त्याचे

वाड्यांत नृत्य व वाद्य यांत कुशल असलेल्या स्त्रिया पुष्कळ असल्याचें वर्णन रामायणांत आहे. ( ५।१०।३२ ) येथें वीणा, मंकुक ( ? ), पटह ( डगा ), विपंची (सतार), मृदंग, डिंडिम, आडंबर इतक्या वाद्यांचा उल्लेख आहे. त्यावरून हीं वाद्यें वाजविणारे कुशल राक्षस व राक्षसी रावणाचे पदरीं होत्या असें सूचित होतें. स्वतः रावणाचें या कलेंतील प्रावीण्य त्यानें एके प्रसंगीं काढिलेल्या उद्गारावरून दिसतें. रावणाचा दूत शुक रामाच्या सेनेची टेहेळणी करून परत आल्यावर सीता परत देण्याविषयीं त्याला सांगूं लागला असतां तो म्हणतो— " बाणरूप खुंट्या पिरगळून वाजविले जाणारें, आर्तजनविलापरूप मंद्रस्वरानें आणि नाराचतलध्वनिरूप तारस्वरानें युक्त असलेलें चापमय वीणावाद्य रणनदीरूप क्रीडास्थानीं अवगाहन करून मी वाजवीन. " ( ६।२४।४६,४५ )

रावणाचे अंतःपुरांतील स्त्रियांचे वर्णनांत त्यांचे वस्त्रांविषयीं सांगतांना त्यांच्या श्वासाबरोबर तीं हालत असल्याचें लिहिलें आहे व यावरून तीं मृदु व बारीक सुताचीं असावींत, असें दिसतें. ( ६।११।३२ ) शुभ्रवस्त्रांचें वर्णन करितांना एके स्थलीं शरदृतूंतील अभ्र किंवा हंसपंक्ति यांची उपमा दिली आहे. ( ६।६९।३६ ) सुंदरकांडांत सीता व रावण यांचा जो संवाद आहे, त्यांत त्यांचें वस्त्र रक्तवर्णाचें असल्याचें सांगितलें आहे. ( ५।२२।२५ )

दुःस्वप्नाविषयींची कल्पना मनुष्य व राक्षस यांची एक असल्याचें मागील प्रकरणांत सांगितलें आहे. लंकेंतील अशुभसूचक उत्पातांचें वर्णन माल्यवान् राक्षसाचे भाषणांत आलें आहे. ( ६।३६ ) व ते मनुष्यांतील समजुतींहून भिन्न नाहींत.

राक्षसांतील व्यसनांविषयीं रामायणांत जे निर्देश आहेत त्यांवरून परदारहरण व मद्यपान हीं दोन व्यसनें अनुमित होतात. रावणाचें परदारहरण प्रसिद्ध आहे आणि रामायणांतील सीताहरणाचा त्याचा प्रयत्न शेवटचा होय. मारुतीनें रावणाचे वाड्यांत प्रवेश केला, त्या वेळच्या वर्णनांत तेथील सर्व स्त्रिया मद्यपान करून धुंद होऊन पडल्याचें सांगितलें आहे. ( ५।९।३४ ) त्यांनीं शर्करासवाचें पान केल्याचें पुढें वर्णन आहे. [५।९।५६] पुढें प्रत्यक्ष पानभूमीचें वर्णन आहे व त्यांत माध्वीक, पुष्पासव व फलासव यांचा अधिक

निर्देश असून हीं मद्यें सुवर्णकलशांतून ठेविलेलीं होतीं. प्राशनाकरितां स्फटिकाचीं पात्रें व सोन्याच्या झाऱ्या असत. मनुष्यांतील याविषयींचें अनुमान पूर्वी केलें आहे; तथापि रावणाच्या वाड्यांत असलेली पानभूमि व तिचें वर्णन पाहून राक्षसांमध्यें हें व्यसन कळसास पोंचलें होतें, असें दिसतें.

## स्त्रियांची स्थिति.

राक्षसांतील स्त्रियांचे स्थितीविषयीं विशेष कांहीं सांगतां येण्यासारखें नाहीं. कारण त्यांच्याविषयीं म्हणून वेगळें वर्णन असण्याचा रामायणांत प्रसंग नाहीं. ताटका व शूर्पणखा यांचीं रामायणांतील वर्णनें पाहून त्यांच्या स्थितीविषयीं अनुमान कसलें करावयाचें? मंदोदरीला पाहून मारुतीला ती सीता असावी असा संशय आल्याचें पूर्वी दाखविलें असून त्यावरून तिचे व त्याबरोबर राक्षसींचे स्वरूपाविषयीं कल्पना होण्यासारखी आहे. अशोकवनिकेंत सीतेला कित्येक राक्षसी भिववीत असल्याचें सांगितलें आहे व त्यांत एक तरी त्रिजटा तिला धीर देणारी वर्णिलेली आहे.

पडद्याच्या चालीविषयींची आमच्या समाजांत त्या वेळीं कल्पना नव्हती असें मागील प्रकरणांत दाखविलें आहे. परंतु या चालीचा प्रसार राक्षसांत होता असें दिसतें. रावणाचा वध झाल्यानंतर त्याच्या प्रेतापाशीं सर्व स्त्रिया जमल्या असतां त्यांतील मंदोदरीनें केलेल्या विलापांत पुढील उद्गार आहेत. "हे प्रभो, मी नगरद्वारापासून पायांनींच येथपर्यंत चालत आलें व अवगुंठन (पदर) घेतलें नाहीं म्हणून तुला राग तर नाहींना आला? तुझें स्त्रियांवर फार प्रेम असून या तुझ्या स्त्रिया लाज व अवगुंठन दोनहि टाकून बाहेर पडल्या आहेत; त्याला पाहून तुला राग कसा येत नाहीं बरें?" (६।१११।६१–६२) रावणानें पुष्कळ स्त्रियांवर बलात्कार केले व अंतःपुरांत पुष्कळ स्त्रिया जमविल्या, यावरून राक्षसांचा सामान्य स्वभाव अनुमित होतो. परस्त्रीकडे पाहण्यांत दोष मानणाऱ्या समाजांत स्त्रियांच्या चारित्र्यरक्षणाकरितां वेगळा उपाय योजण्याची अपेक्षाच राहात नाहीं. राक्षससमाजांतील स्त्रियांचें अवगुंठन हा एक त्यांच्या चारित्र्यरक्षणाचा उपाय होता. वास्तविक असा उपाय योजावयाची पाळी येणें पुरुषांच्या मानसिक दौर्बल्याचें द्योतक असून समाजाची अधोगति सूचित करणारें आहे.

रावणादिकांचे उद्योग वाचले म्हणजे असले उपाय त्यांच्या समाजांत त्यांना योजावे लागले यांत नवल नाहीं. मात्र एवढें खरें कीं, त्या समाजांतहि पुरुषांपेक्षां स्त्रियांना स्वतःचे चारित्र्यरक्षणाची त्या वेळीं आवश्यकता वाटत होती. इंग्लंडांतील एका स्त्रीनें ज्याप्रमाणें अमेरिकेंत गेल्यावर आपल्या देशांत व्यभिचार हा गुन्हा मानीत नाहींत असें निःशंकपणें सांगितलें असल्याचें नुकतेंच बाहेर आलें आहे, तितकी मानसिक उन्नति (?) त्या वेळीं राक्षससमाजांत झाली नव्हती, यांत शंका नाहीं.

सहगमनाची चाल अथवा कल्पनाहि राक्षससमाजांत दिसून येत नाहीं. मंदोदरीविलापांत "तुज नाथाचा वियोग झाल्यामुळें मला आतां अक्षय्य रडत बसावें लागणार" (५।१११।५) असें तिचें भाषण दिलें आहे व त्यावरून सहगमनाचा अभाव सूचित होतो.

स्त्रियांचे अलंकाराविषयींचे निर्देश पूर्वीं पुरुषांचे अलंकारांबरोबर आले आहेत. त्या मस्तकीं तिलक धारण करीत असत. (५।९।४५) व ही पद्धति मनुष्यसमाजाशीं सारखी दिसून येते.

## मनुष्यादिकांशीं संबंध.

राक्षसांचे आहारांत नरमांसाची गणना होत असल्याचें रामायणावरून दाखविलें आहे; तेव्हां मनुष्यांचा त्यांच्याशीं भक्ष्यपदार्थांहून अधिक संबंध कसला असावयाचा, असें वाटतें, व या दृष्टीनें तें खरेंहि आहे;, तथापि या दृष्टीनें रामायणांत काय सांगितलें आहे, तें आतां पाहूं. मारुतीनें अशोकवनिकेंत प्रवेश केला, त्यानिमित्त तिचें विस्तृत वर्णन आलें असून त्यांत पुढील श्लोक आहेः—

**प्रहृष्टमनुजां काले मृगपक्षिमदाकुलाम्।**
**मत्तबर्हिणसंघुष्टां नानाद्विजगणायुताम्॥** ५।१४।८॥

"तींतील सर्व लोक आनंदित होते; मत्त झालेल्या पशुपक्ष्यांनीं ती व्याप्त होती; मत्त झालेल्या मयूरांचा शब्द तेथें सारखा ऐकूं येत होता व नाना प्रकारचे पक्षी तेथें संचार करीत होते."

येथें 'मनुज' शब्दाचा स्पष्ट उल्लेख आहे व त्यांत लंकेंत मनुष्यांचीं

वस्ती होती, इतकेंच नव्हे, तर ती भक्ष्यपदार्थांचा संग्रह या दृष्टीनें केलेली नसून आनंदांत होती, असें सांगितलें आहे.

प्रहस्त राक्षस युद्धार्थ बाहेर पडला तेव्हां त्याच्या आज्ञेप्रमाणें बलाध्यक्षानें एका मुहूर्तामध्यें राक्षसांची सेना गोळा केली व

**हुताशनं तर्पयतां ब्राह्मणांश्च नमस्यताम् ।**
**आज्यगंधप्रतिवहः सुरभिर्मारुतो ववौ ॥६।५७।२२॥**

" ब्राह्मणांना नमस्कार करून ते ( राक्षस ) अग्नीमध्यें हवन करूं लागले असतां आज्य गंधानें युक्त असा सुगंधि वायु वाहूं लागला. "

येथें ब्राह्मणवर्गाचा निर्देश असून राक्षस त्यांना श्रद्धापूर्वक वंदन करीत असल्याचें सांगितलें आहे. येथें राक्षसांचा निर्देश पूर्वी व पुढें स्पष्ट शब्दांनीं वेगवेगळा केला आहे. राक्षसांत ब्रह्मराक्षस म्हणून वेगळा वर्ग असून तो त्या समाजांतील ब्राह्मणवर्ग असावा, अशी कल्पना आम्हीं पूर्वी केली आहे व तीस अनुसरून हा राक्षसांतील ब्राह्मणवर्ग असेल, असें म्हणतां येण्यासारखें आहे; तथापि मनुष्यवस्तीविषयींचा मागील उल्लेख स्पष्ट आहे व येथें " ब्रह्मराक्षस " असें मागीलप्रमाणें म्हटलेलें नाहीं. हा ब्राह्मणवर्गाचा उल्लेख असावा अशी कल्पना आम्हीं केली आहे.

रामपत्नी सीता परत द्यावी असा उपदेश करण्याकरितां बिभीषण रावणाकडे आला त्या वेळीं तेथें—

**पूजितान् दधिपात्रैश्च सर्पिर्भिः सुमतोऽक्षतैः ।**
**मंत्रवेदविदो विप्रान् ददर्श स महाबलः ॥ ६।१०।९**

" दधिपात्रें, घृत, पुष्पें व अक्षता यांनीं ज्यांचें पूजन केलेलें आहे असे मंत्रवेत्ते व वेदवेत्ते ब्राह्मण त्या बलाढ्य बिभीषणानें अवलोकन केले. " युद्धांत विजय प्राप्त व्हावा म्हणून रावणानें पुण्याहवाचनादि करविलीं, त्यानिमित्त ब्राह्मणांची पूजा या वेळीं केलेली होती.

लक्ष्मणानें इंद्रजिताचा वध केल्यावर सर्वांना आनंद झाला, असें सांगितलें असून त्यापुढें—

**ऊचुश्च सहितास्तुष्टा देवगंधर्वदानवाः ।**
**विज्वराः शांतकलुषा ब्राह्मणा विचरन्त्विति ॥६।९०।९१॥**

" देव, गंधर्व व दानव संतुष्ट होऊन एकत्र जमले व ( आतां ) ब्राह्मण निर्भय व निश्चित होत्साते संचार करोत, असें म्हणाले. " असें वर्णन आहे. येथें ब्राह्मणांचा निर्देश स्पष्ट आहे व इंद्रजिताचा वध होऊन ब्राह्मण निर्भय झाले असें देवादिक म्हणूं लागल्याचें सांगून त्यापूर्वी ब्राह्मणांना त्यापासून पीडा होत असल्याचें सूचित केलें आहे. अर्थात् हे ब्राह्मण म्हणजे राक्षसांतील ब्राह्मण—ब्रह्मराक्षस—नव्हत हें उघड आहे. पूर्वी रावणादिकांनीं ब्राह्मणांची केलेली पूजा व येथें ध्वनित होणारी पीडा एकत्र ठेविली म्हणजे " हा घोटाळा काय ? " असा प्रश्न उपस्थित झाल्यावांचून रहात नाहीं. पण विचार केला तर हा प्रश्न जेथल्या तेथें जिरून जाण्यासारखा आहे. ब्राह्मण म्हटला म्हणजे वसिष्ठ-वामदेवाची मूर्ति व राक्षस म्हटला म्हणजे भयंकर स्वरूपाचा क्रूर प्राणी अशी जी कल्पना आमच्या अंतःकरणांत दृढ होऊन राहिली आहे, ती याला कारण आहे. वास्तविक ही समजूत सर्वथा मिथ्या नाहीं अथवा सर्वथा सत्य नाहीं. वस्तुस्थिति या दोहोंमध्यें लोंबकळत राहिली आहे. **वसिष्ठांसारखे अधिकारी ब्राह्मण त्या कालीं होते, तसे दक्षिणा घेऊन रावणासारख्या, लोकांना उपद्रव देणाऱ्या राजाचें अभीष्ट चिंतन करणारे ब्राह्मणहि होते.** एकमेकांच्या अगदीं विरुद्ध टोंकाला असलेल्या या दोन प्रकारच्या ब्राह्मणवर्गाची परंपरा प्रमाणांत न्यूनाधिक्य होत होत अजूनपर्यंत चालत आली आहे. मुसलमानी अमदानींत दिल्लीश्वराची जगदीश्वराशीं तुलना करणारे ब्राह्मण होते; तीच परंपरा "श्रीकोपनी विजयते रणरंगधीरः " अशा प्रकारें विजयचिंतन करीत बाळंभट्टानें जिवंत ठेविली व ती मृत झाल्याची वार्ता कोठें अद्यापि श्रुत झाली नाहीं. तेव्हां रावणाचें अभीष्ट चिंतन करणारे, त्याचेकरितां अनुष्ठान करणारे ब्राह्मण त्यावेळीं असले तर त्यांत नवल नाहीं.

राक्षसांचा मनुष्यसमाजाशीं येथपर्यंत दाखविलेला संबंध सहवासाचा झाला; या दोन समाजांत शरीरसंबंध होत असे किंवा काय, तें आतां पाहूं. इंद्रजिताच्या स्त्रिया सर्व राक्षसकन्या असल्याचें वर्णन आहे (६।९२।१२), तर रावणानें ज्या

स्त्रिया जमविल्या होत्या त्यांत देव, गंधर्व व नाग यांच्या कन्या असल्याचें सांगितलें आहे. (६।२२।४६) सीतेचा त्यानें अपहार केला; यावरून येथें स्पष्ट निर्देश नसला तरी मनुष्यकन्यांशीं त्याचा संबंध अनुमित होतो. रामाचें स्वरूप पाहून शूर्पणखा काममोहित झाली, यावरूनहि हा संबंध संभवनीय व म्हणून विद्यमान होता, असें मानण्यास अडचण नाहीं. रावण ब्रह्मर्षीचे कुलांत उत्पन्न झाल्याचें मागें सांगितलें आहे व मायावी सीतेचा इंद्रजित् वध करूं लागला असतां मारुतीनें त्याची जी निर्भर्त्सना केली तींत त्याला "ब्रह्मर्षिकुलामध्यें राक्षसयोनींत तूं उत्पन्न झाला आहेस" (६।८१।१९) असें सांगितलें आहे. म्हणजे रावण राक्षस असला तरी त्याचें ब्रह्मर्षिकुल तोंपर्यंत अबाधित राहिलें होतें व तशी सर्वांची समजूत होती याविषयीं वाद नाहीं. मात्र वरील राक्षसयोनीच्या निर्देशावरून त्याची माता राक्षसकुलांतील असल्याचें सूचित होतें. रावणादिकांचें जें पूर्ववृत्त उत्तरकांडांत आलें आहे, त्यांत रावणाची माता सुमालीनामक राक्षसाची कन्या कैकसी सांगितली आहे. (७।९) व हिला पुलस्त्यपुत्र विश्रवा नामक मुनीपासून रावणादि संतति झाली. ऋषि व राक्षस यांचे या संबंधावरून वरील अनुमानास दृढता येते. तसेंच विश्रवा मुनीनेंहि या कैकसीला ती दारुण वेळीं (सायंकाळीं) त्यांशीं संगत झाली म्हणून दारुण असे राक्षस पुत्र होतील, असें सांगितलें. (७।९।२३) येथें उत्पत्ति मनुष्यापासून सांगितली म्हणून राक्षसांशीं मनुष्यांचा संबंध व अभेद दिसतो, तर राक्षसाचा म्हणून विशेष निर्देश केला आहे याकरितां भेदाची प्रतीति येते.

## अभेददर्शन.

स्वतः राक्षसांची आपल्या जातीविषयीं काय समजूत होती, तें पाहणें या कामीं अवश्य आहे. शूर्पणखा खरादींचा वध झाल्यावर रावणाकडे जाऊन त्याची निंदा करितांना तिनें राजाचे—नराधिपाचे—धर्माचें विवेचन केलें आहे. तिचे भाषणांतील मनुष्यविषयक निर्देश राक्षसांशीं अभेदानें केलेले असल्यामुळें महत्त्वाचे आहेत. याकरितां ते मूळांतून उद्धृत करून देणें अवश्य आहे. ती म्हणतेः—

**अयुक्तचारं दुर्दर्शमस्वाधीनं नराधिपम् ।**
**वर्जयन्ति नरा दूरान्नदीपंकमिव द्विपाः ॥३।३३।५॥**

ये न रक्षन्ति विषयमस्वाधीननराधिपाः ।
ते न वृद्ध्या प्रकाशन्ते गिरयः सागरे यथा ॥८॥
येषां चाराश्च कोशश्च नयश्च जयतां वर ।
अस्वाधीना नरेन्द्राणां प्राकृतैस्ते जनैः समाः ॥ ९ ॥
यस्मात् पश्यन्ति दूरस्थान् सर्वानर्थान्नराधिपाः ।
चारेण तस्मादुच्यन्ते राजानो दीर्घचक्षुषः ॥ १० ॥
अतिमानिनमग्राह्यमात्मसंभावितं नरम् ।
क्रोधनं व्यसने हन्ति स्वजनोऽपि नराधिपम् ॥ १६ ॥

" ज्या राजाचे पदरीं चार नाहींत, ज्याचें दर्शन होण्याला प्रजेला फार प्रयास पडतात व ज्याचीं इंद्रियें स्वाधीन नाहींत त्या राजाचा, हत्ती ज्याप्रमाणें नदींतील चिखल दूर उडवून त्याचा त्याग करितात त्याप्रमाणें प्रजाजन त्याग करितात."

" जे **नराधिपति** इंद्रियाधीन होऊन गेल्यामुळें आपल्या देशाचें रक्षण करीत नाहींत त्यांची समृद्धि केवढी असली तरी समुद्रांत बुडालेल्या पर्वताप्रमाणें तिचे योगानें ते प्रकाशित होत नाहींत."

" शत्रूंना जिंकणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या हे राजा, ज्या **नराधिपतींचीं** चार, कोश व नीति हीं ताब्यांत नाहींत ते सर्व सामान्य मनुष्याप्रमाणें समजावयाचे."

" चारांच्या द्वारें दूरदूरच्या सर्व गोष्टी **नराधिपतींना** कळत असतात व म्हणून त्यांना दीर्घदृष्टि म्हणतात."

" जो **नराधिपति** अतिशय मानी, जवळ जाण्यास अयोग्य असलेला, स्वतःला मोठा समजणारा व अति रागीट आहे, त्याजवर संकट आलें असतां स्वजनहि त्याचा वध करितात."

सीतेचा अपहार करून रावण तिला घेऊन जात असतां मार्गांत जटायूनें त्याला अडथळा केला, त्या वेळीं रावणाला उद्देशून तो म्हणतोः—

" हे सौम्य रावणा, ज्याखालीं चिरडून जाण्याची पाळी येणार नाहीं, असा

भार **मनुष्यानें** उचलावा; व अन्नहि ज्याचे योगानें रोग उत्पन्न होणार नाहीं व जें पचेल, तेंच खावें." (३।५०।१८)

"मृत्यूचा समय आला असतां ज्या पातकावर कर्माचें अवलंबन करून **पुरुष** आपला नाश करून घेतो तें कर्म तूं केलें आहेस." (३।५१।३१)

सीतेला लंकेंत गेल्यावर रावणानें प्रथम तिला आपल्या वाड्यांत ठेविलें होतें. तेथें तिचा त्याशीं जो संवाद झाला त्यांत ती म्हणते:—

"कालाचे प्रेरणेनें जेव्हां प्राण्याचा नाश होण्याचा समय येतो तेव्हां कालाधीन झालेल्या **मनुष्यांना** कार्याकार्य कळेनासें होऊन त्यांचे हातून प्रमाद घडतात." (३।५६।१६)

अशोकवनिकेंत शिंशपा वृक्षावर गुप्तपणें बसून मारुतीनें सीता व रावण यांमधील जो संवाद ऐकिला, त्यांत पुढील वाक्य स्वतः रावणाच्या तोंडीं आहे:—

"मनुष्याचा काम हाच खरोखर घातक आहे; कारण त्याचे योगानें ज्या व्यक्तीचे ठिकाणीं तो बद्ध होऊन जातो ती क्रोध करण्यास योग्य असली तरी तिचेविषयीं त्याचे मनांत दया व प्रेम हीं उत्पन्न होतात." (५।२२।४)

रामाची वानरसेना लंकेशीं आली असतां रावणानें आपल्या मंत्र्यांची परिषद भरविली. तींत भाषण करितांना प्रथम पुरुषांचे तीन भेद त्यानें सांगितले व त्यांचीं लक्षणें सांगतांना तो म्हणतो:—

"(पूर्वोक्त योग्य पुरुषांचें) मत घेऊन जो कार्याला प्रारंभ करितो व दैव अनुकूल असतां यत्न करितो तो **पुरुष** श्रेष्ठ होय. जो कार्याविषयीं अथवा धर्माविषयीं एकटाच विचार करितो व कार्ये एकट्यानें करूं लागतो तो **पुरुष** मध्यम होय. गुणदोषांचा विचार न करितां व दैवाचे अनुकुलतेचीहि अपेक्षा न करितां जो कार्याची उपेक्षा करितो, (करूं लागतो, पण तिकडे लक्ष देत नाहीं) तो **पुरुष** अधम होय." (६।६।८–१०)

बिभीषण रामाकडे येऊन मिळण्यापूर्वीं रावणाची निर्भत्सना करितांना म्हणतो:—

"शूर, बलिष्ठ व अस्त्रवेत्ते **पुरुष** असले तरी कालाच्या तावडींत सांपडले म्हणजे संग्रामामध्यें वाळूच्या बंधाऱ्याप्रमाणें खचून जातात."(६।१६।२४–११)

कुंभकर्ण जागृत झाल्यावर रावणाचे अविचारी कृत्याबद्दल त्यानें त्याला दोष दिला व त्याला त्याचे मंत्र्यांनीं योग्य उपदेश केला नाहीं, असें सांगितलें. या वेळीं त्याचें भाषण श्रवण करून महोदर रावणाच्या कृतीचें समर्थन करितांना म्हणतो:—

" वृद्धसमागम न केलेल्या व म्हणून असंस्कृत बुद्धीनें युक्त असलेल्या केवळ बलाढ्य **पुरुषाला** जें करितां येणें शक्य नाहीं, तें कर्म कोणता बरें पुरुष करील? '( ६।६४।१६ )

रामायणांतील निरनिराळ्या पात्रांनीं निरनिराळ्या प्रसंगीं काढिलेले उद्गार वर अवतरिले आहेत. वरील सर्व वचनें सामान्यत: नीतिपर आहेत व तीं सर्व मनुष्यजातीविषयीं तसा स्पष्ट निर्देश करून सांगितलेलीं आहेत, हा त्यांत विशेष आहे. पंचतंत्रादिकांतून कोल्ह्याकुत्र्यांच्या कथा सांगतांना त्यांचे तोंडीं अशीं सुभाषितें पुष्कळ आलीं आहेत व त्यांतून अशा प्रकारें मनुष्यविषयक निर्देश स्पष्ट असतात, तसे येथेंहि आहेत. तथापि त्या कथा बोलूनचालून कल्पित व रामायणांतील कथा ऐतिहासिक, हें विसरतां नये. रामायणांतील वर अवतरिलेल्या वचनांकडे ऐतिहासिकदृष्ट्या पाहूं लागलें म्हणजे त्यांत राक्षसांविषयीं मनुष्य या नात्यानें विचार केलेला आहे, हें लक्षांत आल्यावांचून रहात नाहीं. वरील वचनांतील कांहीं खुद्द राक्षसांचे तोंडचीं आहेत व कांहीं सीता, जटायु वगैरे राक्षसेतरांच्या तोंडचीं आहेत; आणि यावरून राक्षस स्वत:ला मनुष्यांपैकीं मानीत होते व इतरांची समजूत तशीच होती, असें दिसून येतें.

## मनुष्यांशीं भेद व त्यांविषयीं तिरस्कार.

राक्षसांची गणना याप्रमाणें मनुष्यजातींत होत असल्याचें दिसून आलें तरी त्यांचा इतर मनुष्यांविषयींचा द्वेष त्यांच्या कृतींत व उक्तींत दिसत असे हें येथें नमूद करणें अवश्य आहे. अशोक वनिकेंत सीतेचें मन वळविण्याचा प्रयत्न करितांना रावणानें तेथें मनुष्य किंवा राक्षस कोणी नाहींत असें सांगितलें आहे. ( ५।२०।४ ) तेथील राक्षसींनीं तिला रावणाचें ऐश्वर्य वर्णन करून व राम राज्यापासून भ्रष्ट झाल्याची तिला आठवण देऊन अजूनहि त्या मनुष्य रामाची तिनें इच्छा करावी, हें बरें नव्हे असें तिला बजाविलें आहे. ( ६।२४-

३–५ ) यावर सीतेनें त्यांना मनुष्यस्त्री राक्षसाची भार्या होणें उचित नव्हे, (५।२४।८) असें उघड उत्तर दिलें आहे. राक्षसींनीं अतिशय त्रास दिला, तेव्हां तर तिनें मनुष्यपणाला व पारतंत्र्याला धिक्कार व्यक्त केला आहे. (५।२५।२०) या सर्व वचनांमध्यें मनुष्य व राक्षस यांमधील भेद व्यक्त केला आहे आणि यांतील प्रारंभींचीं राक्षसांचे तोंडचीं व पुढचीं सीतेच्या तोंडचीं आहेत. कांहीं स्थलीं तर या भेदाची परिणति तिरस्कारांत झाली आहे. मारीचानें रावणाला उपदेश करून त्याच्या दुष्ट योजनेपासून त्याला परावृत्त करण्याचा प्रयत्न केला असतां रावण त्याला उत्तर करितो–

**तव वाक्यैर्न मां शक्यं भेत्तुं रामस्य संयुगे ।**
**मूर्खस्य पापशीलस्य मनुष्यस्य विशेषतः ॥३।४०।४॥**

" मूर्ख, पापी व विशेषतः मनुष्य असा जो राम त्याशीं संग्राम करण्याचा जो मी निश्चय केला आहे, त्यापासून तुझ्या भाषणानें मी परावृत्त होणें शक्य नाहीं. "

पंचवटींतील आश्रमांत रावण प्रथम यतिवेषानें आला व मग आपलें खरें रूप प्रकट केल्यावर सीतेला आपल्या ऐश्वर्याचें वर्णन सांगूं लागला. त्यांत शेवटीं त्यानें " आपल्याशीं लंकेंत राहिल्यास तुला मानवी स्त्रियांचें व मनुष्य रामाचें स्मरणहि होणार नाहीं, असें सांगितलें [ ३।४८।१३–१४ ] आहे. युद्धापूर्वीं रावणानें भरविलेल्या परिषदेंत प्रहस्तानें तर "देव, दानव, गंधर्व, पिशाच, पक्षी व नाग यांना संग्रामामध्यें सहज जिंकतां येईल, मग या मानवांची कथा काय?" [ ६।८।२ ] असे उद्गार काढिले आहेत. या सर्व वचनांवरून राक्षसांना आपल्यामध्यें मनुष्यांहून कांहीं विशेष आहे असें वाटत असे, हें उघड आहे.

## उपसंहार.

रामायणांत राक्षसांचें स्वरूप, विद्या, नीतिकल्पना, कृति, आचार, धर्म वगैरे संबंधीं जें कांहीं विशेष सांगितलें आहे, त्याचा एकत्र संग्रह येथवर केला व त्याबरोबर मनुष्यांशीं त्यांची तुलना करून त्यांत सादृश्य व भेद कोठें दिसतो त्याचें निरूपण केलें, राक्षसांविषयीं वास्तविक स्थिति काय होती, हें यावरून

आपणांस अनुमानानें जाणावयाचें आहे. पौराणिक कथा व लोकांतील प्रचलित समजुती यांवरून राक्षसांचें स्वरूप व संस्कृति यांविषयीं आपल्या अंत:पटावर जें भेसुर चित्र रेखाटलेलें आहे त्यांतील भेसुरपणा अंशत: तरी वरील विवेचन वाचून कमी व्हावा अशी आशा आहे. हा भेसुरपणा सर्वथा नाहींसा व्हावा असा यत्न करितां येण्यासारखा नाहीं. कारण लोकांमध्यें तो दृढ होण्यास रामायणानें अगदीं हातभार लाविला नाहीं, असें नाहीं. मात्र या कामीं रामायणाचा आधार थोडा असून त्यानें विरोधच केला आहे. त्यांचें नरमांसभक्षण व इतर अत्याचार हे लपवितां येणार नसून त्यांच्या या कृतीनेंच त्यांच्या चित्रावर लाल रंग सारविला आहे व त्यांचें स्वरूप भेसुर करून टाकिलें आहे. तथापि त्यांच्या नीतिकल्पना, समाजव्यवस्था, आचार यांविषयींची माहिती पाहिली असतां राक्षस ही एक रानटी जात होती, असें मानणें धाडसाचें होणार आहे. तरी मानवी समाजाशीं या सर्व बाबींत त्यांची एकरूपता होती, असें मात्र नव्हे. इतर मनुष्यजातीशीं ते द्वेष करीत असले तरी ते त्यांच्याशीं मिसळत व संबंध ठेवीत असत. स्पष्टपणें बोलावयाचें म्हणजे त्यांचा रानटीपणा सुधारलेला होता व हाच या दोन समाजांमध्यें भेद होता. मनुष्यांहून त्यांची जाति भिन्न नव्हती; तथापि वरील भेद त्यांमध्यें उज्ज्वल होता व त्याची जाणीव उभय पक्षांला होती. स्वतांला सुधारलेले समजणाऱ्या सभ्यांच्या समाजांत असे भेद पुष्कळ दिसतात व त्याचें आपणांस विशेष कांहीं वाटत नाहीं; पण येथें ते स्वतांची मनुष्यांमध्यें गणना करीत व मनुष्यांविषयीं तुच्छता दर्शवीत असें जें त्यांचें वर्णन आहे तें वाचलें म्हणजे भेद व ऐक्य यांच्या या विचित्र मिश्रणाचें आश्चर्य वाटून मन गोंधळून जातें. मनुष्यत्व हें दोहोंचें अधिष्ठान एक असतां त्यांमध्यें भेद वा द्वेष असावा, हें आश्चर्य वाटण्याचें खरें कारण होय. रामायणांतील वरील विवेचन लक्षपूर्वक पाहिल्यास हें कोडें उलगडतां येण्यासारखें आहे. इतर मनुष्यजातीशीं तुलनेनें किंवा स्पर्धेनें बोलावयाचा प्रसंग असतां मात्र या भेदाची प्रतीति दिसून येते व स्वतांच्या समाजाविषयीं सामान्यपणें बोलावयाचें असतां या भेदाची आठवणहि वक्त्याला झालेली दिसत नाहीं. आपल्या धर्मबांधवांचा ऱ्हास होऊं लागला असतां त्यांना सावरण्याकरितां यत्न करितेवेळीं सनातनी व समाजी एक असतात,

नाहीं तर अन्य वेळीं त्यांमध्यें भेद असतो, त्यासारखा जवळजवळ हा प्रकार आहे. दोन समाजांतील दिसणाऱ्या भेदांचा याप्रमाणें उलगडा झाला म्हणजे अभेदाची संगति लागते व तो पटूं लागतो. राक्षसांविषयींच्या परंपरागत कल्पनेवरून त्या जातीचा प्राणी आतां नष्ट झाला असावा अशी आपली समजूत होते. परंतु वरील विवेचनावरून मनुष्यप्राण्यांचा तो एक वर्ग होता, असें लक्षांत आलें असतां त्याचा शोध पृथ्वीच्या पाठीवर कोठेंतरी अज्ञात प्रदेशांत करावयाचा नसून आपल्यांतच करावयाचा आहे, हें कळून चुकतें. अभेदाची प्रतीति आल्यावर अधिक लिहावयाचें प्रयोजन काय ?



# भाग ४ था.

## रामायणांतील वानर.

रामायणांत रामानें रावणाबरोबर युद्ध केल्याची जी मुख्य कथा आहे तींत रामाला वानरांनीं साहाय्य केल्याचें सांगितलें आहे. रामायणांतील राक्षसांविषयीं मागील प्रकरणांत निरूपण केलें आहे, त्याचा उपक्रम करितांना वानरांचा उल्लेख आम्हीं केला आहे. आमच्या दृष्टीनें दोनहि प्राणी अद्भुत वाटले तरी त्या दोहोंमध्यें भेद आहे व यामुळें वानरांविषयींचें विवेचन पृथक् करणें भाग आहे. राक्षसजातीचा प्राणी आज आमच्यापुढें विद्यमान नाहीं, तर वानरांचे कळपच्या कळप आम्हांला नित्य आढळतात. राक्षसांविषयीं अद्भुत कथा रामायणाहून इतर ग्रंथांत पुष्कळ आहेत, तर वानरांविषयीं एकहि कथा अन्यत्र मिळत नाहीं. राक्षस हा प्राणी भयंकर वाटला तरी त्याला मनुष्याप्रमाणें सर्व अवयव व त्यांनीं करावयाचीं कार्यें संभवनीय वाटतात व तीं पटतात; परंतु आपल्यापुढें दिसणाऱ्या वानरांची गणना आपण पशूंमध्यें करितों. अशा प्रकारें दोहोंमध्यें भेद आहे. वानरांची आम्हीं पशूंत गणना केली तरी त्यांनीं रामाला साहाय्य केलें, यामुळें त्यांविषयीं मनाची भावना अगदीं भिन्न आहे. वानरांतील ज्याचें रामाला प्रामुख्यानें साहाय्य झालें त्या मारुतीचा समावेश आमच्या देवतांमध्यें आम्हीं केला आहे. तेव्हां हे प्राणी होते तरी कोण, हें आतां पहावयाचें आहे.

### वानरांचें स्वरूप.

प्रथम वानरांच्या स्वरूपाविषयीं रामायणांत काय लिहिलें आहे, तें पाहूं. राक्षसांचे स्वरूपाविषयीं मागील प्रकरणांत जें विवेचन केलें आहे त्यांत हा विषय ओघाबरोबर आला आहे. वानर मनुष्यरूपानें युद्ध करूं लागले तर त्या वेळीं दोनहि पक्षांतील लोकांच्या स्वरूपांत साम्य झाल्यामुळें आपला कोण व शत्रूकडील कोण हें ओळखण्याची पंचाईत पडूं लागेल, याकरितां वानर तेवढा आपल्या पक्षाचा अशी खूण असावी व आपल्या पक्षांत राम, लक्ष्मण, बिभीषण व त्याचे चार

अमात्य यांवाचून आठवा मनुष्य असूं नये, आणि म्हणून वानरांनीं मनुष्यरूप धारण करूं नये अशी सूचना रामानें वानरांना केल्याचें मागें सांगितलें आहे. या सूचनेवरून वानर व मनुष्य यांमध्यें स्वरूपतः साम्य नव्हतें हें स्पष्ट आहे. यावरून त्यांचें स्वरूप कसें होतें हें कळलें असें नाहीं; त्याकरितां रामायणांत अन्यत्र काय वर्णन केलें आहे, तें पाहणें अवश्य आहे.

सध्यां आपण वानरांची जी जात पाहतों तींत व रामायणांतील वानरजातींत बरेंच साम्य दिसून येतें. दोहोंसहि पुच्छ व अंगावर सर्वत्र लोम आहेत. वालि-वधानंतर त्यानें रामाची जी निर्भर्त्सना केली, तींत त्यानें प्रथमच "माझें चर्म धारण करण्यास योग्य नाहीं; केंस व अस्थि हींहि वर्ज्य मानिलीं आहेत." "माझे केंस व अस्थि यांना लोक स्पर्शहि करीत नाहींत." ( ४।१७।३८ ते ४० ) याप्रमाणें उद्गार काढिले आहेत. यांत अंगावरील लोमांचा स्पष्ट उल्लेख आहे.

वालीबरोबर युद्ध करण्याकरितां सुग्रीव दुसऱ्यानें बाहेर पडला, त्या वेळीं त्याचें वर्णन करितांना त्याचे अंगचा वर्ण सुवर्णाप्रमाणें पिंगट असल्याचें लिहिलें आहे. [ ४।१४।१९ ] यापुढील वालीच्या वर्णनांतहि त्याच्या देहाची कांति सुवर्णाप्रमाणें असल्याचें सांगितलें आहे. [ ४।१२।३ ]

लंकेंत मारुतीला शत्रूकडील हेर म्हणून धरिल्यावर त्याची सर्व नगरींतून राक्षसांनीं धिंड काढिली. या वेळीं हें वृत्त अशोकवनिकेंत असलेल्या सीतेला राक्षसींनीं कळवितांना "तुझ्यावरोबर संवाद करीत असलेला ताम्रमुख कपि" असें वर्णन केलें आहे. [ ५।५३।२४ ]

मारुतीला लंकेंत धरिल्यावर त्याचे पुच्छाला वस्त्रें गुंडाळून आग लावण्यांत आल्याची कथा आहे. (५।५३) व तीवरून वानरांना पुच्छ होतें, यांत शंका नाहीं. समुद्रावरून उड्डाण करितांना तर त्याचें पुच्छ अग्रभागीं आंकडी वळून उभारल्यामुळें इंद्रध्वजाप्रमाणें दिसूं लागल्याचें लिहिलें आहे. (५।१।५९)

सध्यांचे वानर ज्याप्रमाणें चार पायांनीं उड्या मारीत चालतात त्याप्रमाणें ते चालत असत, असें कोठें वर्णन आहे, तर कोठें ते दोन पायांनीं चालल्याचें वर्णन आहे. पुढील स्थलें पहाः—

"लहानमोठ्या उड्या मारीत व गर्जना करीत ते वानर अभ्रें सूर्यासमोर येतात त्याप्रमाणें सुग्रीवासमोर येऊन राहिले." (४।३९।४३)

"वानरांची सेना जात असतां त्यांच्या हातापायांचे पंज्यांनीं भयंकर धूळ उडाल्यामुळें सूर्याची प्रभा कुंठित झाली व भूप्रदेश दिसेनासा झाला."(६।४।५८)

सारण रावणाला वानरसेनेंतील वीरांना दाखवीत त्यांविषयीं माहिती सांगतांना म्हणतोः–"ज्याच्याहून श्रेष्ठ रूप चतुष्पाद प्राण्यांमध्यें नाहीं तो सन्नाद-नामक वानरांचा पितामह होय." (६।२७।१८)

वालीचें प्रेत एका शिबिकेंत घालून (मूळांतील वर्णनावरून ती सध्यांच्या मेण्याप्रमाणें असावी) कांहीं वानरांनीं नेल्याचें वर्णन आहे. (४।२५।३८) शिबिका वाहण्याचें काम वानरांनीं केलें यावरून त्यांची चालण्याची पद्धति मनुष्यांप्रमाणें दोन पायांचे आधारावर होती, हें उघड आहे.

तारा विलाप करितांना एके स्थलीं म्हणते–"हे राजाधिराज, ज्यांना उड्या मारितां येत नाहींत अशा या वानरस्त्रिया तुझ्याकरितां पायांनीं चालत चालत फार दूर आल्या आहेत, हें तुझ्या कसें लक्षांत येत नाहीं?" (४।२५।४४)

सेतूवरून प्रयाण करितेवेळीं राम म्हणतो, "ऐरावतावर आरूढ होऊन जाणाऱ्या इंद्राप्रमाणें मी हनुमंतावर आरूढ होऊन सैन्याला हर्षवीत हर्षवीत त्याचे मध्यभागीं वाहून जाईन." (६।४।१९) पुढील श्लोकांत लक्ष्मण अंगदावर आरोहण करील, असें सांगितलें आहे. वानरसेना चालूं लागली, तिचें वर्णन पुढीलप्रमाणें आहे. "कांहींजण भूमीवर पुच्छें आपटूं लागले; कांहीं-जण जातांजातां हात लांब करून पर्वत फोडूं लागले; कांहीं वृक्ष मोडूं लागले." (६।४।६६) सुग्रीवाचे अभिषेकसामुग्रींत पादुका सांगितल्या आहेत व त्यावरून चालतांना ते त्या पायांत घालीत, असें दिसतें. रावणवधानंतर सीतेकडे तें आनंदवृत्त कळविण्याकरितां गेलेला हनुमान तिचेसमोर हात जोडून नम्रपणें उभा राहिल्याचें सांगितलें आहे. (६।११३।२७) वानरांच्या स्वरूपांविषयींचे रामायणांतील जे उल्लेख वर दिले आहेत त्यांवरून त्याविषयीं निश्चित अनुमान करितां आलें नाहीं तरी कांहीं तरी पुसट कल्पना होण्यास अडचण

नाहीं. सध्यांचे वानर व मनुष्य या दोहोंशीं सादृश्य वरील अवतरणांत सूचित होतें व निश्चित कल्पना न येण्याचें कारण हेंच आहे.

## व्यवस्था आणि व्यवहार.

हे वानर हल्लींप्रमाणें केवळ झाडांवर रहात नसत. मनुष्यांप्रमाणें त्यांनाहि घरें होतीं. हीं घरें म्हणजे पक्ष्यांप्रमाणें केवळ घरटीं नसून मोठीं आणि सुंदर होतीं. "**या वानरश्रेष्ठांचीं मोठीं व मजबूत घरें** लक्ष्मणानें राजमार्गानें जातांना पाहिलीं." ( ४।३३।१२ )

सुग्रीवाच्या वाड्याला तर सात चौक असून त्यांपुढें त्याचें अंतःपुर होतें, असें वर्णन आहे. " (त्या वाडयाचे) **सात चौक** ओलांडून धर्मात्मा लक्ष्मण पुढें गेला. या सात चौकांत **यानें** व **आसनें** जागोजाग होतीं. यापुढें सुग्रीवाचें विस्तीर्ण **अंतःपुर** असून त्याचा बंदोबस्त उत्तम प्रकारें केलेला होता." (४।३३।१९).

हल्लींचे वानर दिगंबरवृत्तीनें अरण्यांत फिरत असतात; रामायणांतील वानरांत वस्त्रें वापरण्याची चाल होती, असें दिसतें. वालि व सुग्रीव यांचें युद्ध झालें, त्याचें वर्णन देतांना "सुग्रीव युद्धासाठीं तयार होऊन आला व त्यानें **नेसण घट्ट केलें**. ( काचा मारिला? )" ( ४।१६।१६ ) असें लिहिलें आहे. तसेंच मारुती लंकेहून परत येतांना त्याचें वस्त्र पांढरें होतें, असें वर्णन आहे:— "नाना प्रकारचीं पुष्कळ अभ्रें आकाशांत असून त्यांतून हा मारुती पांढरें **वस्त्र नेसलेला** दिसत होता." ( ५।५७।९ )

सुग्रीव आपली दुःखाची कहाणी सांगतांना म्हणतोः—"असें बोलून त्या वालीनें मनांत कोणतीहि शंका न आणितां मला **एका वस्त्रानिशीं** घालवून दिलें." ( ४।१०।२६ )

तसेंच पुढील उतारा पहा:—"नंतर तो सुग्रीव शोकाच्या योगानें संतप्त होऊन **ओल्या वस्त्रानेंच** बसला असतां त्याचे वानर मंत्री त्याच्या भोंवतीं येऊन उभे राहिले." ( ४।२६।१ )

सीताशुद्धीनंतर मारुती महेंद्रपर्वतीं परत आला तेव्हां तेथें त्याची वाट पहात वृक्षाचे अग्रभागीं बसलेले अंगदादि वानर आनंदित होऊन आपली **उज्वल वस्त्रें** हालवूं लागले, असें वर्णन आहे. [ ५।५७।२७ ]

या सर्व उल्लेखांवरून ते मनुष्यांप्रमाणें वस्त्रें वापरीत असत, यांत मुळींच शंका रहात नाहीं. त्या वेळच्या वानरांना मनुष्यांप्रमाणें बसण्यास आसनें, पलंग वगैरे लागत असून सुग्रीवाच्या वाड्यांत लक्ष्मण गेला तेव्हां तीं चोहोंकडे ठेविलीं होतीं, असें वर्णन आहे. **सोन्याचे व रुप्याचे पलंग** तसेंच उत्तम प्रकारच्या **बैठकी** जागोजाग पुष्कळ ठेविलेल्या असून त्यांवर उत्तम प्रकारचीं **आस्तरणें** घातलेलीं होतीं." [ ४।३३।२५ ]

वस्त्राप्रमाणें त्या वेळच्या वानरांना भूषणें वापरण्याची, वाद्यें वाजविण्याची वगैरे माहिती होती. किष्किंधेचें वर्णन करितांना राम लक्ष्मणाला म्हणतो "हे विजयिश्रेष्ठा, **मृदंग, आडंबर** इ. घेऊन वानर गात व वाजवीत आहेत व त्याचा हा ध्वनि ऐकूं येत आहे." [ ४।२७।२७ ].

लक्ष्मण रामाचा निरोप सुग्रीवाला कळविण्याकरितां गेला, त्या वेळीं त्यानें तेथें काय पाहिलें तें लिहितांना "सौंदर्य व तारुण्य यांच्यायोगानें मुसमुसलेल्या निरनिराळ्या स्वरूपाच्या पुष्कळ स्त्रिया महापराक्रमी लक्ष्मणानें सुग्रीवाच्या घरीं पाहिल्या. त्या स्त्रिया कुलीन असून त्यांतील कांहींजणींनीं **पुष्पमाला** धारण केल्या होत्या. कांहीं जणी माळा करीत होत्या; त्यांच्या अंगावर उत्तम उत्तम **अलंकार** घातलेले होते." "नंतर **तोरड्यांचा** व **कमरपट्ट्यांचा** ध्वनि त्या लक्ष्मणाच्या कानीं आला, तेव्हां तो लज्जित झाला." ४।३३।२२,२३,२५ हे श्लोक दिले आहेत. या श्लोकांत वानरस्त्रिया सुस्वरूप होत्या, असें वर्णन आहे.

वालि दुंदुभीबरोबर युद्धाकरितां उभा राहिला, तेव्हां पित्यानें दिलेली **सुवर्ण-माला** त्यानें धारण केली होती, असें सांगितलें आहे. [ ४।११।३९ ] या मालेचे उल्लेख अन्यत्रहि आहेत. [ ४।११।६१ ] [ ४।१७।३५।१६ ]

रामानें तालवृक्षांचा भेद केला, त्या वेळीं सुग्रीवानें अंगावर **अलंकार** धारण केले होते, असें वर्णन आहे. [ ४।१२।६ ]

वालीशीं आपलें वैर कसें पडलें तो वृत्तांत सुग्रीवानें रामाला निवेदन केला, त्यांत एके स्थलीं तो म्हणतो–" तेव्हां नम्र होऊन हे प्रभो, मी आपल्या **मुकु-**

**टानें** त्याच्या पायाला स्पर्शहि केला. तथापि क्रोधामुळें वालीनें मजवर कृपा केली नाहीं." [ ४।९।२६ ]

वालि भूमीवर पडल्यावर त्याचे भाषणांत अंगद **सुवर्णाचें बाहुभूषण** धारण करीत असल्याचें तो सांगत आहे. [४।१८।५२ ]

वालि मरण पावल्यावर त्याचे प्रेतकार्याकरितां "फुलें, नानाविध वस्त्रें, घृत, तेल, सुगंधी द्रव्यें आणि इतरहि आवश्यक साहित्य आणण्याची आज्ञा" लक्ष्मणानें अंगदाला केली [ ४।२५।१६ ] व वालीचें प्रेत **शिबिकेंत** ठेविण्यापूर्वी त्यावर **फुलें, वस्त्रें** व **अलंकार** घातले, [ ४।२५।२९ ] असें वर्णन आहे.

रावणवधानंतर बिभीषणानें सर्व वानरांना **रत्नें** व **द्रव्य** पारितोषिक म्हणून दिल्याचें सांगितलें असून (६।९।२२।११) रामानेंहि राज्याभिषेकानंतर वानरांना नानाविध अलंकार पारितोषिक म्हणून दिल्याचें लिहिलें आहे. (६।१२८। ७९-८९) सुग्रीवाचें प्रतिज्ञापालनाकडे लक्ष नाहीं असें पाहून मारुतीनें त्याला जो उपदेश केला, त्यांत कोशाचा उल्लेख स्पष्ट आहे. तो म्हणतो "हे भूपाला, **कोश, सैन्य,** मित्र आणि मन हीं ज्याचीं सारखीं ( स्वाधीन ) असतात त्याला मोठ्या राज्याचें आधिपत्य प्राप्त होतें." (४।२९।१२).

लक्ष्मण क्रुद्ध झाला असतां त्याचें सांत्वन करण्याकरितां गेलेली तारा त्याला म्हणते, "रामाचें प्रिय करण्याकरितां रुमा, मी, अंगद, **धन, धान्य व पशु** या सर्वांचाहि सुग्रीव त्याग करील असें मला वाटतें." [४।३५।१३] समुद्राचें विशाल स्वरूप पाहून त्याचें उल्लंघन कसें करावें या विचारानें सर्व वानर चिंतातुर होऊन बसले असतां अंगद म्हणतो—"कोणाच्या बरें प्रसादामुळें **भार्या, पुत्र व आमचीं गृहें** येथून आमचें कार्य सिद्धीस गेल्यावर आम्हीं सुखानें अवलोकन करूं?" (४।६४।१७) वरील अवतरणांत आलेल्या वर्णनांवरून त्या वानरांची संग्रहबुद्धि लक्षांत येते. सध्यां आपणांला दिसणाऱ्या वानरांत ही संग्रहबुद्धि मुळींच नाहीं व हा भेद महत्त्वाचा आहे.

संग्रहबुद्धीच्या निमित्तानें संरक्षणाची आवश्यकता वाटूं लागते व त्याकरितां व्यवस्थितपणा आणण्याच्या निमित्तानें व्यक्तीचा व समाजाचा प्रपंच जन्मास येतो. वानरांच्या घरांचीं वर्णनें वर आलीं आहेत. घरांच्या पुढील पायरी

गांव व नगरें यांची. नगरीविषयींचा उल्लेख वालिवधानंतर वानरांचे भाषणांत आला आहे. (४।१९।:४) तसेंच पुढें मारुतीनें रामाशीं सुग्रीवाकरितां **नगरांत प्रवेश** करण्याची अनुज्ञा मागितली आहे. (४।२६।५) नगरीच्या पुढील पायरी राज्याची. रामाच्या प्रसादानें **कपिराज्य** सुग्रीवाला मिळाल्याचें त्याचे स्वतांचे (४।३६।५) व तारेच्या भाषणांत (४।३५।५] आलें आहे.

वानरांचे राज्यव्यवस्थेविषयीं आवश्यक ती माहिती रामायणावरून देतां येण्यासारखी नाहीं. राज्यव्यवस्थेविषयीं कित्येक अंगांचे कोठें कोठें निर्देश आहेत, तेवढ्यावरच संतोष मानणें भाग आहे. सुग्रीवानें रामाला आपला वृत्तांत सांगितला, तेव्हां त्यानें केलेल्या भाषणांत पिता मरण पावल्यावर मंत्र्यांनीं त्याला गादीवर बसविल्याचें सांगितलें आहे. ( ४।९।२ ) मारुती लंकेंत गेल्यावर रावणाला न कळतां सीता शोधून कशी काढावी, असा विचार करूं लागला व पंडितंमन्य दूत स्वामिकार्याचा घात करितात असें मनांत आणून कोणाला उमगूं नये म्हणून त्यानें लघुरूप धारण केल्याचें सांगितलें आहे. (.५।२।३८ ) अशोक वनिकेंत गेल्यावर त्यानें मनांत चालविलेल्या विचारांतहि हे दूतविषयक विचार पुन: आले आहेत. ( ५।३०।३७, ३८ ) वालीबरोबर युद्ध करण्याकरितां पुनः सुग्रीव गेला त्या वेळीं एकदां पराभव पावूनहि तो युद्धास आल्याचें पाहून त्याला कोणाचें तरी साह्य मिळालें असावें, अशी शंका तारेला आली व तिनें रामाचें साह्य त्याला मिळाल्याविषयीं चारांकडून आलेली वार्ता अंगदानें आपणास कळविली असें पतीला कळविलें. ( ४।१५।१६ ) लक्ष्मणाबरोबर रामानें पाठविलेला कठोर संदेश पोंचतांच **सुग्रीवाची स्वारी शिबिकेंत** बसून रामाकडे जाण्याकरितां बाहेर पडली, तेव्हां पुढें शंख, भेरी वगैरे **वाद्यें वाजत होतीं** व **बंदिजन ललकारत होते,** असें वर्णन आलें आहे. ( ४।३८।१२ )

सुग्रीवाला राज्याभिषेक केला तो वानरांनींच समंत्रक केला आहे. “ प्रथम त्यांनीं त्या सुग्रीवाला मंत्र म्हणून एका आसनावर पूर्वेकडे तोंड करून बसविलें. आंसपासचीं तीर्थें, नद्या, नद व समुद्र यांचें निर्मळ उदक आणून त्या वानरश्रेष्ठांनीं सुवर्णकुंभांमध्यें ठेविलें होतें. गज, गवाक्ष, गवय, शरभ, गंधमाधन, मैंद, द्विविद, हनुमान् व जांबवान् यांनीं तें उदक बैलांचीं शुभकारक शिंगें व

**सुवर्णकलश** यांत घेऊन त्या निर्मल व सुगंधी उदकानें महर्षींनीं सांगितलेल्या विधीप्रमाणें अष्टवसूंनीं इंद्राला अभिषेक केला, तसा त्या **सुग्रीवाला अभिषेक केला.** " ५।२६।३२ ते ३६.

या अभिषेकाचे वेळीं मंत्र म्हणावयाचें काम कांहीं वानरांनीं केल्याचें तेथें स्पष्ट लिहिलें आहे. हा अभिषेक त्यांनीं सोन्याच्या कुंभांनीं केला. यावरून सोनें मातीसारखें लेखणाऱ्या हल्लींच्या वानरांहून ते वेगळे होते, ही गोष्ट स्पष्ट होते. तसेंच या अभिषेकाच्या वेळीं **रामाभिषेकाच्या वेळेप्रमाणेंच** " वर सुवर्णाचें काम केलेलें श्वेतछत्र, सुवर्णदंडयुक्त चवऱ्या, रत्नें, शुभ्र वस्त्रें, सुगंधी द्रव्यें, अक्षता, सुवर्ण, दहीं, तूप, व्याघ्रचर्म, उत्कृष्ट पादुका " वगैरे **सामान** आणावें लागल्याचें लिहिलें आहे. ( ४।२६ पहा. ) तसेंच सोळा कन्या आणविल्याचें वर्णन केलें आहे. या कन्या अर्थात् वानर-कन्याच असणार !

रावणवधानंतर अयोध्येला परत येण्याला निघण्यापूर्वीं बिभीषणानें रामाजवळ येऊन आपल्याकडील स्त्रिया सुगंधित तेलें वगैरे लावून स्नान घालतील असें सांगून संमति मागितली. त्या वेळीं रामानें त्याला भरताची भेट होईपर्यंत हे उपचार नकोत, असें सांगितलें. पण प्रथम सुग्रीवादि प्रमुख **वानरांला विधिपूर्वक स्नान** घालवावें अशी विनंति केली. ( ६।१२१ ) येथें त्यांच्या स्नानाविषयीं पुढें वर्णन नसलें तरी अंगाला सुगंधी द्रव्यें लावून स्नान करण्याची वानरांची पात्रता रामाचे भाषणांत व्यक्त झाली आहे व तेवढीच आम्हांला दाखवावयाची आहे.

वानरांच्या समाजांतील व्यवस्था व त्यांचा नित्याचा व्यवहार यांविषयींची कल्पना वरील विवेचनावरून येऊन त्यांचें मनुष्यांशीं कसें व किती सादृश्य होतें, हें सहज अनुमानितां येण्यासारखें आहे.

## धार्मिक व सामाजिक आचार.

सीताशुद्ध्यर्थ गेलेला मारुती अशोकवनिकेंत बसला व तिला कोठें शोधावी असा विचार करीत शिंशपा वृक्षावर बसला असतां एक सरोवर त्याच्या दृष्टीस पडलें व त्यांतील निर्मल उदक पाहून सायंकाळीं संध्या करण्याकरितां सीता

तेथें येईल अशी कल्पना त्यानें केली व तो वाट पहात बसला. [५।१४।४९] असें वर्णन आहे. येथें वानरांची संध्या अनुमानितां येत नसली तरी त्याचे मनांत अशी कल्पना येणें हेंहि महत्त्वाचें आहे. वालीचे संध्यावंदनाचें तर स्पष्ट वर्णन उत्तरकांडांत आलें आहे. [७।३४]

मारुती लंकेंतून परत आल्यावर तेथील सर्व वृत्तांत त्यानें अंगदादि वानरांना निवेदन केला. त्यांत सीता कशी कृश झाली आहे, हें सांगतांना त्यानें प्रतिपदेच्या दिवशीं नित्य अध्ययन करणाऱ्या विद्यार्थ्यांचे विद्येप्रमाणें कृश झाली आहे, असा दृष्टांत दिला आहे. [५।५९।३२] या दृष्टांतांत त्याचे मार्मिकतेबरोबर प्रतिपदेचे दिवशीं अध्यन करण्याचा धर्मशास्त्रानें केलेला निषेध त्याला माहीत होता, हें व्यक्त होत आहे.

सीताशुद्ध्यर्थ गेलेले वानर सीतेचा शोध लागला नाहीं व सुग्रीवानें दिलेली मुदत उरली नाहीं, असें पाहून समुद्रतीरीं प्रायोपवेशनाचे उद्देशानें आले व तेथें आल्यावर त्यांनीं दर्भ दक्षिणाग्र पसरले व त्यांवर आचमन करून पूर्वेकडे तोंड करून मरण्याचे सिद्धतेनें बसले, [४।५५।१९।२०] असें वर्णन आहे. यांतील दर्भ दक्षिणाग्र पसरणें, आचमन व प्राङ्मुख उपवेशन हीं सर्व धर्मशास्त्राभिज्ञतेचीं द्योतक होत.

राम व सुग्रीव यांची गांठ पडून परस्परांचें वृत्त परस्परांस कळल्यावर त्यांनीं हातांत हात घालून सख्य संपादन केलें [४।५।११] व त्याला दृढता येण्याकरितां मारुतीनें अग्नि सिद्ध करून तो दोघांचेमध्यें ठेविला व नंतर त्या उभयतांनीं अग्नीला प्रदक्षिणा केली आणि अशा रीतीनें एकमेकांची मैत्री संपादन केली. [४।५।१६]

वालिवधानंतर त्याचेकरितां विलाप करणाऱ्या अंगदादिकांचें सांत्वन करून रामानें प्रेतदहन करण्याची सूचना केली. त्याप्रमाणें वालीचें प्रेत शिबिकेंत घालून नेण्यांत आलें. चंदनादि काष्ठांची चिता त्याचेकरितां रचून ठेविलेली होती. प्रेताबरोबर पोंचविण्याकरितां ताराप्रभृति वानरी गेल्या होत्या. प्रेत चितेवर ठेविल्यावर त्याला अंगदानें अग्नि दिला व उलटी प्रदक्षिणा घातली.

सर्व वानरांनीं वालीचे नांवानें उदक दिलें. ( ४।२५ ) वालीचें प्रेतकार्य अगदीं मनुष्याप्रमाणें असून त्यांत सर्व धार्मिक विधि केल्याचें दिसत आहे.

वानरांतील विवाहसंस्काराविषयीं रामायणांत स्पष्ट निर्देश नाहीं. तथापि विवाहाचें बंधन त्यांमध्यें होतें याविषयीं शंका नाहीं. सध्यां आपणांला दिसणारे वानर पाहून रामायणकालच्या वानरांमध्यें

**पशूंचिया विवाहासी । कामु झाला स्वयें जोशी ॥**

असा ज्ञानेश्वरांनीं वर्णन केल्याप्रमाणें विवाहसंबंध असावा, अशी आपली कल्पना होते; परंतु या कल्पनेला रामायणांत आधार नाहीं. पुष्पक विमानांत बसून राम परत अयोध्येकडे येत असतां मार्गांत किष्किंधा लागली; तेथें सीतेनें रामाला " सुग्रीवाच्या ताराप्रभृति भार्या व इतर वानरश्रेष्ठांच्या स्त्रिया यांना बरोबर घेऊन अयोध्या नगरींत प्रवेश करण्याची आपली इच्छा आहे " ( ६।१२३।२५ ) असें सांगितलें व त्याप्रमाणें रामानें सुग्रीवाला आज्ञा केली असतां तो किष्किंधा नगरींत गेला व त्यानें सुचविल्याप्रमाणें तारेनें वानरांच्या स्त्रिया (वानराणां तु योषितः ६।१२३।३३) बरोबर घेऊन ती विमानांत जाऊन बसली. तेथें वानरजातीच्या स्त्रिया—वानरी—सीतेनें बोलाविलेल्या नसून विशिष्ट वानरांच्या स्त्रियांना म्हणून तिचें बोलावणें होतें. ज्या वानरींच्या पतींनीं तिजकरितां रणांगणावर आपले देह झिजविले त्यांच्या स्त्रियांविषयीं सीतेला अगत्य वाटणें साहजिक आहे. वानरांमध्यें विवाहबंधन नसतें तर पतिपत्नीसंबंध असण्याचें कारण नव्हतें व तो नसल्यावर सीतेला त्यांविषयीं अगत्य वाटण्याचें मुळींच कारण नव्हतें. वालिवधानंतर वानरसेना पळूं लागली असतां तारेनें त्यांना पळण्याचें कारण विचारिलें व तें—वालिवध—कळविल्यावर त्यांनीं तिनें स्वतांचें व पुत्राचें रक्षण व्हावें याकरितां काय करावें या विषयीं सांगतांना किष्किंधानगरींत असलेल्या " सपत्नीक व अपत्नीक वानरांविषयीं" उल्लेख आला आहे. ( ४।१९।१६) पतीकरितां विलाप करितांना तारा म्हणते—" पति मरण पावल्यावर मग ती स्त्री पुत्रवती असो अथवा तिच्याजवळ विपुल धनधान्य असो; तिला ज्ञानी लोक विधवा असें म्हणतात " [४।२३।१२] या तिच्या भाषणांतहि पतिपत्नीसंबंध व्यक्त झाला आहे. ती पुढें पतीस म्हणते।

"आपण संग्रामयज्ञ करून त्या अवभृथामध्यें रामबाणरूप उदकानें मज पत्नीला बरोबर न घेतां एकट्यानें कसें बरें स्नान केलें?" [४।२३।२७] यज्ञाचे समाप्तीचे वेळीं यजमानानें पत्नीसह करावयाच्या अवभृथस्नानाचा येथील उल्लेख पतिपत्नीसंबंधाची दृढता सूचित करीत असून वानरांमध्यें यज्ञयागादिकांचा प्रसार कसा होता हेंहि त्यावरून सूचित होत आहे. असो. पतिपत्नीसंबंधांतील धर्मबंधन मात्र वानरांमध्यें तितकें दृढ दिसत नाहीं. वालीनें सुग्रीवाची पत्नी तो जिवंत असतां उठविली व वालि मरण पावल्यावर त्याची स्त्री जी तारा तिच्याशीं सुग्रीवानें संबंध ठेविला, यांतच त्यांचें धर्मबंधनाचें शैथिल्य व्यक्त झालें आहे. वालीकरितां विलाप करणारी तारा मागाहून सुग्रीवावर अनुरक्त होते, त्याचेकरितां लक्ष्मणाचें सांत्वन करण्यास पुढें जाते! असा सर्व गोंधळ आहे. ज्येष्ठ भ्रात्याची स्त्री अर्थात् धर्मतः ती माता म्हणून तिच्याशीं संबंध ठेविला याकरितां अंगदाला मात्र फार खेद वाटत होता. [४।५५।३]

सीताशुद्ध्यर्थ गेलेला मारुती लंकेंतील रावणाचा वाडा शोधिल्यावर तिचा शोध न लागल्यामुळें निराश होऊन आतां परत कसें जावें असा विचार करूं लागला. त्यानें येथें चालविलेल्या विचारपरंपरेंत वानप्रस्थाश्रमाचा उल्लेख आहे. तो म्हणतोः—

**हस्तादानो मुखादानो नियतो वृक्षमूलिकः ।**
**वानप्रस्थो भविष्यामि अदृष्ट्वा जनकात्मजाम् ॥५।१३।३८॥**

"जनककन्या सीता दृष्टीला पडली नाहीं तर मी [इकडेच] वानप्रस्थाश्रमाचा स्वीकार करून वृक्षमूलाच्या आश्रयानें राहीन. इंद्रियें स्वाधीन ठेवून हातावर किंवा मुखांत पडेल त्या फलमूलांवर उपजीविका करीन."

येथें आश्रमाचा स्पष्ट निर्देश असून आश्रमधर्मांचा उल्लेख बरोबर केला आहे आणि प्राचीन ग्रंथांतील निवडक शब्दांची त्यांत कुशलतेनें योजना केलेली आहे.

सीताशुद्ध्यर्थ मारुती निघाला असतां रामानें त्याला त्याचे कार्यांत यश मिळावें म्हणून सर्व वानर मंगल करितील [४।६७।२३] असें आश्वासन दिलें

आहे. महेंद्र पर्वतावरून उड्डाण करितांना प्रारंभीं मारुतीनें मंगलसिद्ध्यर्थ प्रथम सूर्यादि देवतांना पूर्वाभिमुख होऊन वंदन केलें आहे. [५।१।८].

रामाची आज्ञा घेऊन सुग्रीवानें किष्किंधेंत प्रवेश केला असतां त्याला अवलोकन करितांच सचिवांनीं त्याला प्रणाम करून पृथ्वीवर साष्टांग नमस्कार घातले व सुग्रीवानेंहि त्यांना वर उठविलें. वाली पतन पावल्यावर तारा व अंगद तेथें आलीं. तारेच्या आज्ञेनें अंगदानें वंदन केलें. येथील वर्णन पुढीलप्रमाणें आहे:—

> एवमुक्तः समुत्थाय जग्राह चरणौ पितुः ।
> भुजाभ्यां पीनवृत्ताभ्यामंगदोऽहमिति ब्रुवन् ॥४।२३।२४॥
> अभिवादयमानं त्वामंगदं त्वं यथा पुरा ।
> दीर्घायुर्भव पुत्रेति किमर्थं नाभिभाषते ॥२५॥

याप्रमाणें [तारेनें] सांगितलें असतां अंगद उठला आणि "मी अंगद आहें" असें म्हणत म्हणत त्यानें आपल्या पुष्ट व वर्तुल हातांनीं पित्याचे चरण धरिले. [ तेव्हां वाली कांहीं बोलत नाहीं असें पाहून तारा म्हणाली ] अंगद, आपणांला अभिवादन करीत असतां आपण पूर्वीप्रमाणें त्याला " हे पुत्रा, दीर्घायु हो" असा आशीर्वाद कां बरें देत नाहीं? येथील अभिवादन व प्रत्यभिवादन यांचे प्रकार शास्त्रोक्तविध्यनुरूप आहेत, हें विशेष आहे. वडील वगैरे पूज्य व्यक्तींना वंदन करिते वेळीं वंदन करणारानें आपलें नांव घेऊन वंदन करावें, असा जो नियम मनूनें दिला आहे (२।१२२) व जो आमचे समाजांत प्राचीन कालापासून प्रचलित आहे त्याची छाया अंगदाचे वरील वर्णनांत पडली असल्याचें उघड दिसत आहे.

वालिवधानंतर तारा, अंगद व सुग्रीव वगैरे यांनीं त्याचेकरितां शोक केल्यावर त्यांचें सांत्वन करीत राम म्हणतो, " शोकाचे योगानें मृताला सद्गति प्राप्त होत नाहीं; लोकव्यवहाराला अनुसरून वागलें पाहिजे व तुम्हीं तदनुरूप कांहीं काल शोकहि केला; तेव्हां यानंतर जें कांहीं कर्तव्य असेल तें करा." [४।२५।२–३] आतेष्टांचे मृत्यूनंतर मृताकरितां शोक करावयाचा लोकव्यवहार येथें अनुवादिला आहे.

स्त्रिया परपुरुषांचे दृष्टीला पडूं न देण्याची पद्धति वानरांमध्यें असल्याचें दिसतें. लक्ष्मण आल्यावर सुग्रीवानें तारादि वानरींना जाण्यास सांगितलें व आपल्या सेवकांस हांक मारिली त्या वेळीं स्त्रिया दृष्टीस पडण्यास ज्यांना प्रतिबंध नव्हता असे सेवक लगेच आंत आले व हात जोडून उभे राहिले [४।३८।८] असें सांगितलें आहे. अर्थात् हे सेवक अगदीं घरगुती असावेत व इतर सेवकांना स्त्रिया आंत असतां येण्यास प्रतिबंध असावा. यांत पडद्याचे चालीचा उगम दिसतो. तथापि ही चाल वानरांत विशेष प्रसृत होती असें म्हणवत नाहीं. लक्ष्मण येत असल्याचें समजतांच तारादि वानरींना बाजूला करणाऱ्या सुग्रीवानें लक्ष्मण क्रुद्ध झाला असतां त्याचें सांत्वन करण्याचें काम तिजवर सोंपविलें होतें. मग हा प्रतिबंध कोठें गेला?

सीताशुद्ध्यर्थ सुग्रीवानें बोलाविलेले वानर राजदर्शनाकरितां आले तेव्हां बरोबर नानाविध उपायनें घेऊन आले होते व त्या सर्वांचा सुग्रीवानें स्वीकार केला. [४।३८।१] राजा, देवता व गुरु यांच्या दर्शनाला रिकाम्या हातानें जाऊं नये असा नियम आहे, व तदनुरूप हें त्यांचें वर्तन होतें हें उघड आहे.

## विद्यासंपादन.

वानरांना कोणत्या विद्या अवगत होत्या, हेंहि रामायणांतील कोठें तरी केलेल्या निर्देशावरून अनुमानावयाचें आहे. मारुतीला सुग्रीवानें रामाकडे पाठविलें, तेव्हां त्यानें त्याशीं जें भाषण केलें तें ऐकून रामानें त्याची फार प्रशंसा केली व तो म्हणाला, " ऋग्वेद, यजुर्वेद किंवा सामवेद ज्याला येत नसेल त्याला असें भाषण करितां येणार नाहीं. खरोखर यानें सर्व व्याकरणाचें अध्ययन केलें आहे. ( कारण ) त्यानें पुष्कळ भाषण केलें तरी त्यांत एकहि प्रमाद दिसला नाहीं. ( ४।३।२६, २८ ) सुग्रीवाला राज्याभिषेक केला तो वानरांनीं मंत्र म्हणून केल्याचें पूर्वीं सांगितलें असून त्यावरून त्यांचें वेदाध्ययन सूचित होत आहे. वालि पतन पावल्यावर त्यानें रामाला उद्देशून जें भाषण केलें त्यांत रामाचें वर्तन नीति व धर्म या दोनहि दृष्टया पाहिलें तरी कसें अयुक्त आहे, हें त्यानें स्पष्टपणें रामाला सांगितलें असून त्याच्या भाषणांत कित्येक धर्मशास्त्रांतील वचनें संगृहित केलेलीं आहेत. त्यांचे कोटिक्रम निरुत्तर करणारे आहेत.

बिभीषण रामाकडे आला असतां त्याला आपण आपल्या पक्षांत घ्यावा किंवा कसें याविषयीं वानरमंडळींत चर्चा होऊं लागली. यानिमित्त वानरांनीं आपापलीं जीं मतें सांगितलीं तीं मुळांतून वाचण्यासारखीं आहेत. ( ६।१७ ) शत्रुपक्षाकडील हा हेर असावा अशीच सर्वांनीं शंका घेतली आहे. यांतील जांबवानाचें भाषण शास्त्रबुद्ध्या विचार करून केलेलें होतें. ( ६।१७।४५ ) यांतील मैंद वानर नयापनयकोविद ( ६।१७।४७ ) म्हटला आहे.

. लक्ष्मण मूर्च्छित पडला त्या वेळीं रामपक्षाकडील सर्व मंडळी घाबरून गेली; त्या वेळीं सुषेणानें त्याचें मुख पाहून तो मरण पावलेला नाहीं, असें सर्वांना सांगून धीर दिला. त्यानें लक्ष्मणाचे जिवंतपणाचीं लक्षणें म्हणून हात, मुख व नेत्र यांचीं प्रसन्नता सांगितली आहे. व यापुढें " त्याचीं गात्रें शिथिल होऊन तो निजल्यासारखा भूतलावर पडला आहे व त्याचें हृदय एकसारखें धडधड उडत आहे, (६।१०१।२४-२७)" असें दाखवून तो जिवंत आहे हें त्यानें सर्वांना पटवून दिलें आहे. यावरून वानरांचें शारीरज्ञान स्पष्ट होत आहे. याच सुषेणानें लक्ष्मणाला नस्य देऊन मूर्च्छेंतून उठविल्याचें वर्णन पुढें आलें आहे व तें त्यांच्या ओषधीज्ञानाचें द्योतक होय.

रामायणांत सांगितलेले वानर सुशिक्षित होते एवढेंच नव्हे तर त्यांच्या स्त्रियाहि सुशिक्षित होत्या, असें दिसतें. सुग्रीव विलासांत गुंग झाल्याचें पाहून रामानें लक्ष्मणाबरोबर त्याला निकराचा निरोप पाठविला होता. हा निरोप सुग्रीवाला कळविण्याकरितां लक्ष्पण रागावून आला त्या वेळीं त्याचा कोप शांत करण्याचें महत्त्वाचें काम सुग्रीवानें तारेकडे सोपविलें होतें. हें काम तिनें उत्तम रीतीनें बजाविल्यावर सुग्रीवाची स्वारी बाहेर पडली. या प्रसंगीं तिनें केलेलें भाषण फार उत्कृष्ट आहे. त्यांत लक्ष्मणाचा थोडासा गौरव, सुग्रीवाची थोडीशी निंदा; क्षमा करावी म्हणून नम्रपणें केलेली प्रार्थना हीं असून त्यामुळें लक्ष्मणासारख्या रागीट पुरुषाचा कोप शांत झाला ही एकच गोष्ट तिच्या भाषणाच्या उत्कृष्टपणाची साक्ष देण्यास पुरेशी आहे. तिनें वेदाध्ययनहि केलें असल्याचा रामायणांत उल्लेख आहे. सुग्रीवानें युद्धार्थ आव्हान केलें असतां वालि युद्ध करण्यासाठीं आपल्या घराबाहेर पडूं लागला त्या वेळीं " नंतर भर्त्याला विजय मिळावा या

हेतूनें त्या मंत्रवेत्त्या तारेनें स्वस्त्ययन केलें. " ( ४।१६।२२ ) असें वर्णन आहे. या श्लोकांत तिला **मंत्रवित्** हें विशेषण लावून तिनें वेदाध्ययन केल्याचें सूचित केलें आहे.

तारेचा अधिकार केवढा होता हें वालीनें मृत्युपूर्वी सुग्रीवाला जो उपदेश केला त्यांतील त्याचे उद्गारांवरून दिसून येईल. तो म्हणतो, " ही सुषेणकन्या तारा सूक्ष्म गोष्टीचा निर्णय करण्याविषयीं आणि नाना प्रकारचीं संकटें आलीं असतां त्यांतून पार पडण्याचे उपाय जाणण्याविषयीं सर्व प्रकारें अतिशय समर्थ आहे. ही जें चांगलें म्हणेल तें तूं निःशंक करीत जा. तारेनें एकादी गोष्ट योग्य आहे म्हणून ठरविली म्हणजे त्यांत अपाय होण्याची भीति नाहीं. " [ ४।२२ १३, १४ ] यावरून वानरांतील स्त्रिया व पुरुष दोनहि चांगलीं सुशिक्षित असून त्या वेळीं प्रचलित असलेल्या सर्व शास्त्रांत त्यांची गति होती, असें उघड आहे.

## आहार.

राक्षसांचा नरमांसभक्षण हा जसा विशेष आहे, तसा वानरांचा फलमूलांवर निर्वाह हा विशेष सांगतां येण्यासारखा आहे. वालि रामबाणानें विद्ध होऊन पडला असतां त्यानें रामाला उद्देशून जें भाषण केलें त्यांत त्यानें " आपण वनांत राहून **फलमूलांवर उपजीविका करणारे वानर** " ( ४।१७।२६ ) असें म्हटलें असून हा " आपला नैसर्गिक धर्म " ( एषा प्रकृतिरस्माकम् ४।१७।-३० ) असल्याचें त्यानें पुढें सांगितलें आहे. इतर मनुष्यसमाजांत त्या वेळीं मांसभक्षणाची जशी प्रवृत्ति होती, तशी वानरांत असल्याचें दिसून येत नाहीं. फलमूलांवर त्यांची उपजीविका होत असे असें वालीनें म्हटलें असलें तरी तारेच्या भाषणांत आलेला (४।३५।१३) धान्याचा संग्रह येथें विसरतां येत नाहीं. अर्थात् धान्य हेंहि त्यांचें एक उपजीविकेचें साधन होतें. त्यांचे **मांसभक्षणाचा उल्लेख मात्र कोठें मिळत नाहीं.**

## व्यसनें.

वानरांतील व्यसनांविषयीं विशेष सांगतां येण्यासारखें वर्णन रामायणांत नाहीं, हें खरें; तथापि त्यांतील मद्यपानाचा उल्लेख महत्त्वाचा आहे. मद्यपानाचें व्यसन

त्या वेळच्या वानरांना माहीत होतें. या व्यसनाचा प्रचार जरी त्यांच्यांत जारीनें झाला नव्हता, तरी कांहीं वानरांना हें व्यसन लागलें होतें, यांत शंका नाहीं. हें व्यसन असलेल्यांची त्या वेळीं अप्रतिष्ठा होत असे, हें वेगळें सांगावयास नकोच. सुग्रीवाची किष्किंधेच्या गादीवर पुनः प्रतिष्ठा झाली, त्या वेळीं त्याला व त्याच्या बरोबरच्या कांहीं वानरांना हें व्यसन लागलें होतें. त्यामुळेंच त्याला रामाशीं केलेल्या प्रतिज्ञेचें स्मरण राहिलें नाहीं. रामानें सुग्रीवाच्या या दरबाराचें वर्णन केलें आहे, तें असें—" आपल्या अमात्यांसहवर्तमान हा सुग्रीव नेहमीं पान करीत असतो. " (४।३०।९) यांतच सुग्रीवाच्या स्त्रीलंपटतेचा उल्लेख करण्यासारखा आहे. सुग्रीवाची स्त्री पूर्वीं वालीनें उठविली व मग वालीची तारा सुग्रीवानें उठविली. या दोन स्त्रिया सुग्रीवापाशीं असून आणखी कांहीं वानरी होत्या, त्या वेगळ्याच. राज्य प्राप्त झाल्यावर वालीची भीति नष्ट झाल्यामुळें तो विलासांत गुंग होऊन गेला व आपली प्रतिज्ञा विसरला. शेवटीं लक्ष्मणाचे धनुष्याचा टणत्कार ऐकतांच त्याचे डोळे उघडले.

## युध्दपध्दति.

रावणाच्या विशाल सेनेवर वानरांचें साहाय्य घेऊन रामानें विजय मिळविला; तेव्हां वानरांची युद्ध करण्याची पद्धति कशी होती, याविषयीं वाचकांचे मनांत जिज्ञासा उत्पन्न होणें साहजिक आहे. युद्ध करावयाचें म्हणजे शस्त्रसामुग्री आधीं पुढें येते. वानरांचे शस्त्रसामुग्रीचें वर्णन मारुतीनें सीतेला आश्वासन देतांना " **नखें आणि दंष्ट्रा** " हीं ज्यांचीं आयुधें आहेत, सिंह आणि व्याघ्र याप्रमाणें ज्यांचे पराक्रम आहेत व गजेंद्रासारखीं ज्यांचीं शरीरें आहेत असे वीर वानर येथें जुळलेले तुझ्या लवकरच दृष्टीस पडतील. " [ ५।३९।४९ ] असें केलें आहे. अकंपन रणभूमीवर आपल्या सारथ्यास उद्देशून म्हणतो, " भयंकर कोप असलेले हे बलाढय वानर वृक्ष व पर्वत हीं आयुधें घेऊन माझ्या सन्मुख उभे आहेत. " [ ६।१२६।४ ] प्रहस्त युद्धार्थ आला त्या वेळीं " युद्ध करण्याच्या इच्छेनें वानरांनीं प्रफुल्लित वृक्ष, पर्वत आणि प्रचंड शिला हातांमध्यें घेतल्या, " ( ६।५८।९ ) व ते रणभूमीवर आले. कुंभकर्ण युद्धार्थ आला, त्या वेळीं वानरांना युद्धाकरितां सज्ज राहण्याची रामानें जी आज्ञा केली तींत वान-

रांचीं शस्त्रें-पर्वतशिखरें, वृक्ष व शिला-गोळा करण्यास सांगितलें आहे. [ ६।६१।३६ ] वानरांच्या वरील आयुधांपैकीं नख व दंष्ट्रा हीं निसर्गदत्त असून वृक्ष, पाषाण हीं स्वसंपादित आहेत. राक्षसांशीं वानरांनीं केलेलें युद्ध प्रायः हींच शस्त्रें घेऊन केलें आहे. मनुष्य व राक्षस या दोनहि समाजांमध्यें शस्त्रयुद्धाचीं पद्धति प्रचलित असतां त्यांच्याप्रमाणें कोणीहि वानरानें तींत प्रावीण्य संपादिल्याचें दिसत नाहीं. वानरांना शस्त्राचें ज्ञान मुळींच नव्हतें, असें नाहीं. कारण लक्ष्मणानें रामाचा तीव्र संदेश कळविल्यावर सुग्रीवाची स्वारी जेव्हां रामाकडे समारंभानें येण्यास निघाली तेव्हां शस्त्रें हातांत धारण करून पुष्कळ वानर बरोबर चालले होते, [ ४।३८।१५ ] असें वर्णन आहे. हीं शस्त्रें बहुधा शोभेचीं असावींत. त्यांचे युद्धाच्या सामुग्रींत शस्त्रास्त्रांचें वर्णन मुळींच नसून युद्धांत कोणी त्यांचा उपयोग केल्याचें दिसत नाहीं. वानरांनीं शस्त्र घेऊन युद्ध केल्याचें वर्णन रामायणांत आहे. परंतु तें त्यांनीं रणांगणावर शत्रुपक्षाकडील वीरांचें शस्त्र घेऊन केलेलें आहे. अंगद व वज्रदंष्ट्र यांचें युद्ध झालें, त्यांत वज्रदंष्ट्राचेंच खड्ग त्याजबरोबर युद्ध करीत असतां अंगदानें मोठ्या कौशल्यानें घेतलें व त्याचें शिर उडविलें आहे. ( ६।५४।३४ ) देवांतकादिकांशीं युद्ध झालें त्यांत कित्येक वानर राक्षसांचीं शस्त्रें हातांतून काढून घेऊन त्यांना प्रहार करीत असत. ( ६।६९।५९ ) अंगदाचें शोणिताक्षाशीं युद्ध झालें तेव्हां शोणिताक्ष हातांत ढाल तरवार घेऊन अंगावर गेला असतां अंगदानें त्याचें शस्त्र हिसकून घेऊन त्याचेवर प्रहार केले व त्याचे तुकडेतुकडे करून टाकिले. ( ६।७६।१० ) सुग्रीव आणि महोदर यांचें युद्ध झालें त्या वेळीं सुग्रीवानें रणभूमीवर पडलेला एक परिघ घेऊन त्याचे रथाचे घोडे मारिले; महोदरानें गदा फेकिली असतां हाच परिघ उभारून त्यानें आपलें संरक्षण केलें व दोनहि आयुधें मोडून पडलीं. शेवटीं दोघांनीं रणभूमीवर जवळ असलेल्या तरवारी घेतल्या व या युद्धांत सुग्रीवाचे हातून तो मरण पावला. ( ६।९७ ) वानरांनीं हातांत शस्त्र घेऊन युद्ध केल्याचें वर्णन रामायणांत एवढेंच आहे व यांतील एकाहि प्रसंगीं वानरांनीं स्वतःचें शस्त्र उपयोगांत आणिल्याचें दिसत नाहीं व हें दाखविण्याकरितांच वरील युद्धाविषयींची माहिती

जरा विस्तृत दिली आहे. त्यांनीं शस्त्र हातांत घेतल्यावर त्यांचा उपयोग मोठ्या कौशल्यानें–नित्य वापरणारांच्या बरोबरीनें–केला, हेंहि त्यावरून स्पष्ट दिसत आहे. शस्त्र धारण करण्याची शक्ति अंगांत आहे, तें वापरण्याचें कौशल्य भरपूर आहे आणि शस्त्र मात्र हातांत नाहीं व केव्हां केव्हां आलें तरी तें दुसऱ्याचें उसनें घेतलेलें–अर्थात् तो परत केव्हां काढून घेईल याचा नियम नसल्यामुळें त्यावरील स्वतःची सत्ता संशयित–अशा स्थितींत शस्त्रधारणांत कुशल अशा राक्षसांबरोबर युद्ध करून त्यांना जय मिळाला हा दैवयोग, दुसरें काय? राम व लक्ष्मण यांचेबरोबर स्वतःची सेना नव्हती या दृष्टीनें त्यांनीं वानरांची ही विशाल सेना संपादन केली, हें खरें; परंतु या निःशस्त्र वानरांचें साहाय्य मिळाल्यामुळें त्यांना राक्षसांवर विजय मिळवितां आला असें विधान विचार करून पाहूं लागलें तर वस्तुस्थितीचा विपर्यास करणारें आहे, असें वाटल्यावांचून रहात नाहीं. राम व लक्ष्मण यांचें युद्धकौशल्य या कामीं खरें उपयोगीं पडलें आहे. वानरांचा उपयोग त्यांना मुळींच झाला नाहीं, असें आमचें म्हणणें नाहीं. विजयप्राप्तीला खरें कारण कोणतें याचा शोध करूं लागलें तर वानरांकडे अंगुलिनिर्देश न करितां तो रामबाणांकडेच करावा लागेल, इतकेंच आम्हांला दाखवावयाचें आहे. पण आम्हांला राहून राहून आश्चर्य वाटतें कीं, मनुष्य व राक्षस या दोन शस्त्रधारी समाजांचा चिरकाल सहवास असतां या वानरांना शस्त्रसंग्रहाची बुद्धि कशी झाली नाहीं? मनुष्यांपासून त्यांना उपद्रव नसला तरी राक्षसांपासून तो होत असला पाहिजे; निदान त्यांचा ऋषिजनांला चाललेला उपद्रव पाहून तरी स्वतःचे समाजाला तो होण्याचा संभव आहे, इतकें त्यांच्या लक्षांत येणें अवश्य होतें. ही आवश्यकता पूर्वीं त्यांच्या लक्षांत आली असती तर त्यांनीं शस्त्रसंग्रह कधींच केला असता व रामायणांतील सर्व इतिहास संक्षिप्तच झाला असता. या प्रसंगीं प्रत्येक महाराष्ट्रियापुढें मराठेशाहीचा शेवटचा इतिहास उभा राहिल्यावांचून राहणार नाहीं. टोपीवाल्यांकडे शस्त्रांमध्यें विविध सुधारणा झाल्या व लांब पल्ल्याच्या तोफा निघूं लागल्या आणि लष्करांत शिस्तीची पद्धति प्रचलित झाली, तरी पेशव्यांकडील अधिकारी टोपीवाल्यांपैकीं एका समाजाकडून–पोर्तुगीजांकडून शस्त्रसामुग्री आणवीत व आपल्या सेनेमध्यें त्यांच्याप्रमाणें सुधारणा व्हावी म्हणून तीवर त्यांचेपैकीं एकादा अधिकारी

नेमीत असत. त्यांच्याप्रमाणें येथेंच शस्त्रें करण्याची व्यवस्था पेशव्यांनीं केली नाहीं किंवा सेनेंत सुधारणा व्हावी म्हणून आपला अधिकारी त्यांजकडे शिकण्यापुरता पाठवून त्याचे द्वारां ती करण्याचा प्रयत्न केला नाहीं. वानरांच्या रामायणकालीन इतिहासाची ही पुनरावृत्तिच झाली म्हणावयाची. मात्र वानरांला रामबाणांचें साहाय्य मिळाल्यामुळें त्यांना विजयप्राप्ति झाली आणि इकडे पेशवाई त्यांतच लयास गेली, एवढा दोहोंमध्यें भेद आहे. पण वानरांना त्या वेळीं विजय मिळाला तरी ही न्यूनता लपवितां कशी येईल? बाकी शस्त्रग्रहण त्यांनीं केलें नसलें तरी सेनेची व्यवस्था त्यांनीं उत्तम ठेविली व लंकेवर कोणत्या बाजूनें कसे हल्ले करावयाचे ही योजना ते पूर्वीं करीत असत व या दृष्टीनें त्यांनीं राक्षसांच्या बरोबरीनें काम केलें. सागराच्या तीरीं आल्यावर मैंद व द्विविद या दोघां वानरांनीं सर्व सेनेची रचना केल्याचें रामायणांत वर्णन आहे. (६।५।२) राक्षस शस्त्र धारण करीत असले तरी वृक्षपाषाणांचा उपयोग तेहि करीत असत व या बाबींत दोन्ही पक्षांची पात्रता सारखी होती, असें म्हणतां येईल.

## उभयपक्षांचा अभेदानुभव.

वानरांचा व्यवहार, आचार, व्यवस्था, आहार वगैरे बाबींविषयीं रामायणांत काय सांगितलें आहे, याचें सूक्ष्मदृष्ट्या निरीक्षण करून आतांपर्यंत जें विवेचन केलें त्यावरून मनुष्यांशीं त्यांचें बरेंचसें सादृश्य दिसून येतें; तथापि यावरून मनुष्यसमाजाशीं त्यांचा संबंध किती व कशा प्रकारचा होता हें कळलेलें नाहीं. यासाठीं त्याविषयीं विवेचन करणें अवश्य आहे. वालि व सुग्रीव हे वानरांचे अधिपति म्हणून प्रसिद्ध आहेत व त्यांचें कपिराज्य म्हणून प्रसिद्ध असल्याचें पूर्वीं दाखविलें आहे. दोनहि नांवें पाहिलीं तर राजा व प्रजा दोनहि वानर असणें संभवनीय आहे. पण हें अनुमान प्रत्येक वेळीं संभवतें काय? इंग्रजांचें राज्य हिंदुस्थानावर आहे म्हणून येथील प्रजा कोठें इंग्रज झाली आहे? इतिहासांतील प्रसिद्ध ब्राह्मणी राज्याचा अधिपति ब्राह्मण कोठें होता? तेव्हां अधिपति वानर असला म्हणून प्रजा भिन्न जातीची नसेल असें तरी कसें म्हणावें? वालीशीं आपला द्वेष कां उद्भवला याचा जो इतिहास सुग्रीवानें रामाला सांगि-

तला आहे. त्यांत त्यानें वालि दुंदुभिपुत्र मायावी याबरोबर युद्ध करीत बिळांत शिरला व पुष्कळ काळ बाहेर आला नाहीं, असें पाहून तो गत झाला असें **पौर व मंत्री** यांना वाटलें व त्यांनीं आपल्याला गादीवर बसविलें, (४।१०।६) असें म्हटलें आहे. येथील पौर शब्दावरून वालीची प्रजा केवळ वनेचर होती, असें म्हणवत नाहीं. याच इतिहासांत वालीची सुग्रीवानें जी प्रार्थना केली त्यांतहि "तुझ्या विरहामुळें (मंत्र्यांनीं) राज्याचे ठिकाणीं माझी योजना केली व आतां **अमात्य व पौर** यांसह निष्कंटक असलेलें हें राज्य ठेवीप्रमाणें मजकडे असलेलें मीं तुझ्या स्वाधीन करितों. मीं पायां पडतों व हात जोडून सांगतों कीं, राज्यावर राजा कोणी नाहीं असें पाहून, त्यावर कोणी स्वारी करूं नये याकरितां **पौर व मंत्री** यांनीं बलात्कारानें माझी राज्यावर स्थापना केली." (४ १०।८-१०) असें त्यानें म्हटलें असून त्यांत पौरांचा उल्लेख दोन वेळां आला आहे. वालीबरोबर युद्ध करण्याकरितां जेव्हां हा मायावी प्रथम आला व त्यानें वालीला आव्हान केलें, तेव्हां रात्रीची वेळ असून **लोक झोंपीं गेले होते,** (सुप्ते जने ४।९।५) असें वर्णन आहे. वालीकरितां तारा शोक करीत असतां म्हणते "हे राजा, तुझे **मंत्री** तसेंच **नगरींतील सर्व लोक** (पुरवर्तिजनः) तुझ्या भोंवतीं राहून शोक करीत आहेत". (३।२५।४६) सुग्रीवाला वालिवधानंतर जो राज्याभिषेक झाला त्या प्रसंगीं तर हा निर्देश अधिक स्पष्ट आहे.

> **ततस्ते वानरश्रेष्ठमभिषेक्तुं यथाविधि ।**
> **रत्नैर्वस्त्रैश्च भक्ष्यैश्च तोषयित्वा द्विजर्षभान् ॥ ४।२६।२९ ॥**
> **ततः कुशपरिस्तीर्णं समिद्धं जातवेदसम्**
> **मंत्रपूतेन हविषा हुत्वा मंत्रविदो जनाः ॥ ३० ॥**

"नंतर त्यांनीं वानरश्रेष्ठ सुग्रीवाला यथाविधि अभिषेक करण्याकरितां रत्नें, वस्त्रें, व भक्ष्य पदार्थ **श्रेष्ठ ब्राह्मणांना** समर्पण करून त्यांना संतुष्ट केलें. दर्भांचीं परिस्तरणें घालून प्रज्वलित झालेल्या अग्नीमध्यें मंत्रवेत्त्या **जनांनीं** समंत्रक हवि समर्पण केले." यांतहि जनशब्द एकदां आला आहे; तथापि द्विजर्षभ हा शब्द पूर्वीं आला आहे व त्यानें पूर्वापर जनशब्दानें कोण घ्यावयाचे याचा उलगडा केला आहे. या ब्राह्मणांना अभिषेकाकरितां मुद्दाम लांबून

बोलावून आणिले होते, असें म्हणवत नाहीं. तेव्हां या कपिराज्यांत वानर पुष्कळ असले तरी मनुष्यवस्ती तुरळक होती, हें निर्विवाद आहे. मनुष्यवस्ती पुष्कळ होती असें मात्र म्हणतां येत नाहीं. कारण तसें असतें तर यापूर्वीं किंवा पुढें रामाला कोणी मनुष्य भेटल्याचें वर्णन रामायणांत नाहीं. वरील जन-शब्दावरून मनुष्यवस्तीचें अनुमान न करण्याचें कारण हेंच होय; आणि द्विज-र्षभ शब्द मिळेपर्यंत आम्हांलाहि तें निश्चयानें सांगतां येईना. कारण वानरांची वस्ती तेथें फार. यामुळें जन शब्द त्यांविषयींहि योजिलेला असणें संभवनीय आहे. स्वतः वानर आपण मनुष्यांप्रमाणें व्यवहार करीत असत, इतकेंच नव्हे तर मनुष्य या भावनेनें व्यवहार करीत असत. रामलक्ष्मण पंपातीरीं आल्याचें जेव्हां सुग्रीवानें पाहिलें, तेव्हां हे वालीनें आपणाला मारण्याकरितां कोणी पाठविलेले वीर असावे अशी त्याला शंका आली. यावेळीं त्याचा मारुतीशीं जो संवाद झाला त्यांत त्याचे तोंडीं पुढील वाक्य आहेः—

**अरयश्च मनुष्येण विज्ञेयाश्छन्नचारिणः ।**
**विश्वस्तानामविश्वस्ताश्छिद्रेषु प्रहरन्त्यपि ॥** ४।२।२२ ॥
**कृत्येषु वाली मेधावी राजानो बहुदर्शिनः ।**
**भवन्ति परहन्तारस्ते ज्ञेयाः प्राकृतैर्नरैः ॥** २३ ॥

कपटानें संचार करणारे शत्रु कोणते तें **मनुष्यानें** समजून घेणें अवश्य आहे. कारण विश्वासानें स्वस्थ राहिलें असतां त्याचें छिद्र पाहून हे विश्वास-घातकी त्यावर प्रहारहि करितात. आपलें कार्य सिद्धीस नेण्याचे कामीं वालि मोठा बुद्धिमान् आहे आणि दीर्घदर्शी राजे लोक ( कोणताहि उपाय योजून ) शत्रूचा नाश करितात. याकरितां **सामान्य मनुष्यांचे द्वारा** त्यांचें खरें स्वरूप ओळखिलें पाहिजे." येथें सुग्रीवानें आपणाला आलेली शंका कशी सयुक्तिक आहे हें दाखवितांना मनुष्यांविषयीं स्पष्ट निर्देश करून व्यवहारांतील सामान्य नियम सांगितले आहेत व हे नियम आपण बरोबर पाळीत असल्याचें त्यानें मारु-तीला सुचविलें आहे. अर्थात् मनुष्यांहून आपण भिन्न आहों अशी त्याची भावना होती, असें कसें म्हणावें ?

मारुतीनें लंकादहन केल्यावर आपलें पुच्छ समुद्रांत बुडवून अग्नि शांत

केला व लंकेकडे तो पाहूं लागला; चोहोंकडे अग्नि लागल्यामुळें राक्षस त्रस्त होऊन पळत सुटलेले त्याच्या दृष्टीला पडले आणि इतक्यांत त्याला सीता लंकेंत असल्याचें लक्षांत आलें. लंका दग्ध झाली तर सीता त्यांत जिवंत कशी राहणार, अशी त्याला शंका आली व आपण होऊन आपले कार्याचा घात केला, असें त्याचें मन त्याला खाऊं लागलें. तो आपल्या क्रोधाचा धिक्कार करीत मनाशीं म्हणतो:—

**क्रुद्धः पापं न कुर्यात् कः क्रुद्धो हन्याद् गुरूनपि ।**
**क्रुद्धः परुषया वाचा नरः साधूनधिक्षिपेत् ॥५।५५।४॥**
**यः समुत्पतितं क्रोधं क्षमयैव निरस्यति ।**
**यथोरगस्त्वचं जीर्णां स वै पुरुष उच्यते ॥ ६ ॥**

" क्रोध आला असतां कोणता **मनुष्य** पाप करणार नाहीं? क्रुद्ध पुरुष गुरूंचाहि वध करील; आणि कठोर भाषण करून सज्जनांचा अपमान करील. ( तेव्हां ) सर्प ज्याप्रमाणें आपली जीर्ण त्वचा—मेंग—टाकून देतो त्याप्रमाणें क्रोध उत्पन्न झाला असतां क्षमेच्या योगानें जो त्याचा त्याग करितो त्याला **पुरुष** असें म्हणतात. "

रावणाविषयीं क्रोध आला व त्याचे भरांत आपले कार्याचा घात केला आणि क्रोध आला असतां मनुष्याचे हातून असे प्रमाद होतात असें म्हणून 'क्रोधाचें निरसन क्षमेनें करणारा मात्र खरा पुरुष ' अशी मारुतीनें पुढें व्याख्या केली. स्वतांच्या व्याख्येप्रमाणें खरा पुरुष म्हणवून घेण्याजोगें वर्तन आपल्या हातून झालें नाहीं व क्षमेनें क्रोधाचें आपण निरसन केलें असतें तर मात्र ती पात्रता आपल्या आंगीं आली असती असें मारुतीचें येथें अनुतापात्मक भाषण आहे. अर्थात् आपल्या अंगींची क्षमेची ही न्यूनता दूर केल्यास आपण खरा पुरुष आहों असें मारुती येथें स्वतां म्हणत आहे, असें सिद्ध होत नाहीं काय?

सीतेचा शोध लावून मारुती परत आला व त्यानें रामाला सर्व वृत्तांत निवेदन केला. तो श्रवण करून रामानें त्याची प्रशंसा करितांना पुढील उद्गार काढिले आहेत,

**भृत्यकार्यं हनुमता सुग्रीवस्य कृतं महत् ।**
**एवं विधाय स्वबलं सदृशं विक्रमस्य च ॥६।१।६ ॥**
**यो हि भृत्यो नियुक्तः सन्भर्त्रा कर्मणि दुष्करे ।**
**कुर्यात्तदनुरागेण तमाहुः पुरुषोत्तमम् ॥ ७ ॥**

" हनुमानानें आपल्या पराक्रमाला अनुरूप असें मोठ्या शक्तीचें भृत्य या नात्यानें कर्तव्य असलेलें सुग्रीवाचें मोठें कार्य केलें आहे. कारण यजमानानें दुर्घट कार्याकडे योजना केली असतां त्यावर प्रेम असल्यामुळें तें जो सिद्धीला नेतो, तो उत्तम पुरुष ( सेवक ) होय. " यापुढें रामानें मध्यम व अधम सेवकांचीं लक्षणें सांगितलीं आहेत. सुग्रीवाचा सेवक या नात्यानें मारुतीनें जें कार्य केलें त्याबद्दल त्याची प्रशंसा करितांना रामानें उत्तम सेवकांमध्यें त्याची गणना केली आहे. आणि यानिमित्त त्रिविध सेवकांचीं जीं लक्षणें रामानें सांगितलीं आहेत व तीं सर्व मनुष्यांना उद्देशून केलेलीं आहेत. मग मनुष्य व वानर यांमध्यें रामाला भेद वाटत होता, असें कसें म्हणावें ?

वर दिलेल्या अवतरणांतील प्रारंभींचीं दोन स्वतां वानरांचे तोंडचीं व तिसरें रामाचे तोंडचें आहे; तीनहि स्थलीं वानरांविषयीं मनुष्य या भावनेनें वक्त्यानें आपले विचार प्रकट केले आहेत. वानर व मनुष्य या दोनहि समाजांत परस्परांविषयीं काय वाटत होतें, हें यावरून उघड कळणारें आहे.

वानरांविषयीं मनुष्य या भावनेनें त्या वेळीं रामादिकांनीं त्यांशीं व्यवहार केला, इतकेंच नव्हे तर रामानें सुग्रीवाला आपला मित्र, आपला बंधु मानिल्याचें लिहिलें आहे. अग्नीचे साक्षीनें सख्य ठरल्यावर राम शोक करूं लागला असतां सुग्रीवानें त्याला धीर दिला. तेव्हां रामानें सुग्रीवाला **आलिंगन** देऊन " हे मित्रा ! तूं सांत्वन केल्यामुळें मी आतां सावध झालों आहें. खरोखर, विशेषेंकरून अशा वेळीं अशा प्रकारचा बंधु दुर्लभ आहे. " ( ४।७।१८ ) असे उद्गार काढिले. मनुष्य या भावनेपेक्षां रामानें एका वानराला बंधुत्वाचा मान देणें अधिक महत्त्वाचें आहे. ही बंधुभावना केवळ शब्दांत व्यक्त झाली नसून त्याच वेळीं आलिंगनांत ती परिणत झाली व पुढील सर्व रामायणाचें चित्र तिनें रेखाटिलें आहे. रामानें सुग्रीवाला आलिंगन देण्याचा योग वालीला युद्धार्थ बोलाव-

ण्यास सुग्रीव निघाला त्या वेळीं ( ४।१२।१२ ) व लक्ष्मणाबरोबर रामानें पाठविलेला कठोर संदेश पोंचून तो भेटीकरितां रामाचे निवासस्थानाकडे आला, त्या वेळीं ( ४।३८।१९ ) याप्रमाणें पुनः आला आहे. सीताशुद्धीनंतर मारुतीनें रामाकडे येऊन सर्व वृत्तांत निवेदन केल्यावर त्यानें संतुष्ट होऊन याप्रमाणें मारुतीला आलिंगन दिलें आहे. ( ६।१।१४ ) अयोध्येला परत आल्यावर तर भरतानें सुग्रीव, जांबवान्, अंगद, मैंद, द्विविद, नील, ऋषभ, सुषेण, नल, गवाक्ष, गंधमादन, शरभ व पनस या सर्व वानरांना आलिंगन दिल्याचें लिहिलें आहे. ( ६।१२७।४२, ४३ ) आलिंगन हें प्रेमभावाचें द्योतक आहे व त्याबरोबर सजातीयत्वाचें तें द्योतक आहे आणि यासाठीं त्याचा येथें उल्लेख केला आहे. आपल्या टॉमीला मांडीवर घेऊन त्याला भांड्यांतून नित्य चहा पाजणारे हरीचे लाल सध्यां पुष्कळ आढळतात व त्यांची कृति आमचे अनुमानास बाधक आहे, हें खरें; तथापि हे प्रकार केवळ अंधानुकरणानें चालू आहेत, याहून त्याला महत्त्व नाहीं हें विसरतां नये. आपण रामायणकालाविषयीं चर्चा करीत आहोंत व रामानें एकाद्या पशूवर प्रेम करून त्याला आलिंगन द्यावें व वाल्मीकींसारख्या तपस्वी पुरुषानें त्याचें काव्यांत वर्णन करावें या गोष्टी संभवनीय आहेत काय, हें येथें आपण विचारांत घ्यावयास नको काय?

मनुष्य व वानर यांमधील अभेदभाव येथपर्यंत बाह्यतः झाला. आतां शरीरसंबंधाकडे वळूं. अभेदभावाची सिद्धता शरीरसंबंधाचें प्रमाण मिळाल्यावर वेगळी काय दाखवावयाची? राम अयोध्येला परत येत असल्याचें शुभवर्तमान पुढें कळविण्याकरितां मारुती भरताकडे गेला. त्या वेळीं भरतानें संतुष्ट होऊन त्याला ज्या देणग्या दिल्या त्यांचें पुढीलप्रमाणें वर्णन आहे. भरत म्हणतो:—

**गवां शतसहस्रं च ग्रामाणां च शतं परम्।**
**सकुंडलाः शुभाचारा भार्याः कन्यास्तु षोडश॥** ६।१२५।४५
**हेमवर्णाः सुनासोरूः शशिसौम्याननाः स्त्रियः।**
**सर्वाभरणसंपन्नाः संपन्नाः कुलजातिभिः॥ ४६॥**

"एक लक्ष गाई, शंभर उत्कृष्ट गांव आणि कुंडलें व सर्व भूषणें यांनीं युक्त असलेल्या कुलीन, जातिवंत, शुभाचरणी, उत्कृष्ट नासिका, मांड्या, चंद्रा-

प्रमाणें सौम्य मुख व सुवर्णतुल्य कंठ यांनीं संपन्न असलेल्या सोळा कन्या भार्या म्हणून ( तुला अर्पण करितों.) " मारुतीनें या देणग्यांचा स्वीकार केला किंवा नाहीं हें रामायणांत पुढें सांगितलेलें नाहीं; आणि आम्हांला त्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. या देणग्यांत भार्या करण्याकरितां म्हणून भरतानें मारुतीला सोळा कन्या देऊं केल्या होत्या, एवढें आम्हांला दाखवावयाचें आहे. मनुष्य व वानर यांमधील शरीरसंबंधाची संभवनीयता यांत व्यक्त झाली. आतां या कन्या वानरजातीच्या असतील अशी कल्पना करून संगति लावितां येण्यासारखी आहे; पण तशी कल्पना करण्याला वानरांविषयींच्या भेदभावनेवांचून दुसरें कारण दिसत नाहीं. भरतानें वानरकन्यांचा संग्रह करून ठेविल्याचें रामायणांत सांगितलेलें नाहीं आणि अशा संग्रहावांचून एकदम इतका पुरवठा आयत्या वेळीं त्यानें कसा करावयाचा ? दोन जातींमधील शरीरसंबंध शक्य मानिला म्हणजे हा प्रश्न आपोआप सुटणारा आहे व तसा सोडविणें हें सयुक्तिक आहे.

पण या प्रश्नाचें उत्तर स्वतां मारुतीनें रामायणांत एके प्रसंगीं दिलें आहे. रावणाचें अंत:पुरांत रात्रौ संचार करीत असतां मारुतीनें अनेक स्त्रिया रावणानें पळवून आणिलेल्या व त्याचे भोंवतीं स्वस्थपणें झोंपी गेलेल्या अवलोकन केल्या. या प्रसंगीं परदारावलोकनाचें पाप आपल्या हातून सीताशुद्धीच्या निमित्तानें घडलें अशी मारुतीला शंका आली. या शंकेचें निरसन लागलींच त्यानें आपल्या मनांत केलें. त्या स्त्रियांकडे आपण पाहिलें तरी आपल्या मनांत कोणताहि विकार उपजलेला नाहीं, विकाराचा उद्भव हें पापाचें खरें कारण व लक्षण आहे, तेव्हां पापाविषयींची आपली शंका उगाच आहे, असें त्यानें आपल्या मनाचें समाधान करून घेतलें. (५।११।३८-४३) रावणाच्या अंत:पुरांत देव, दानव, गंधर्व, नाग वगैरे सर्व जातींच्या सुंदर स्त्रिया होत्या. या सर्व स्त्रिया मानवी स्त्रियांप्रमाणें होत्या किंवा काय हा प्रश्न येथें उद्भवण्यासारखा आहे; तथापि त्याचें उत्तर अन्य तऱ्हेनें देतां येईल. यांतील मंदोदरीला पाहून ती सीता नसेलना ? असा संशय मारुतीला आला असें येथें सांगितलें आहे. अर्थात् मंदोदरी मनुष्यस्त्रीप्रमाणें होती हें निर्विवाद आहे आणि याविषयीं मागील प्रकर-

णांत विवेचन आलें आहे. इतर स्त्रियांविषयीं प्रत्यक्ष वर्णन रामायणांत नसलें तरी त्या साहचर्यात् मानवी स्त्रीयांप्रमाणें असणार हें सांगावयास नको. या स्त्रियांकडे अवलोकन केल्याबद्दल मारुतीला पापशंका आली असल्याचें वर सांगितलें आहे. मारुतीनें आपल्या मनाचें समाधान कसेंहि केलेलें असो; त्यांना पाहून मनांत विकार उत्पन्न होण्याचा संभव त्याला वाटला व हाच सजातीयत्वाचा द्योतक आहे.

येथपर्यंत वानरांना मनुष्यत्वाची भावना स्वतांविषयीं वाटत होती असें दाखविलें. आतां मनुष्यांना या वानरांविषयीं काय वाटत होतें, हें पाहूं. रामाचा संदेश कळविण्याकरितां ज्या वेळीं लक्ष्मण किष्किंधानगरींतील सुग्रीवाचे गृहाकडे गेला त्या वेळीं आंत प्रवेश करितांच त्याला अनेक स्त्रिया दृष्टीस पडल्या. या स्त्रिया सुंदर असून त्यांनीं अंगावर अनेक अलंकार धारण केले होते. या स्त्रिया माला गुंफणें वगैरे कामें करीत होत्या व यावरून त्या दासी असाव्या, असें वाटतें. यापुढें गेल्यावर तोरडयांचा व कमरपट्टयांचा ध्वनि त्याचे कानीं पडला व तो लज्जित होऊन पुढें न जातां आपण आल्याची वार्ता कळविण्याकरितां तेथेंच धनुष्याचा टणत्कार करीत उभा राहिला. लक्ष्मणाच्या या वर्तनाविषयीं रामायणांत "सुग्रीवाचे हातून रामकार्य न झाल्याकारणानें तो महापराक्रमी लक्ष्मण क्रुद्ध झाला होता, तरी सदाचार लक्षांत आणून अंतःपुरांत प्रवेश न करितां परत फिरला व स्त्रीजनरहित अशा प्रदेशांत जाऊन उभा राहिला." (४।३३।२७) असें वर्णन आहे. सुग्रीवाच्या अंतःपुरांतील स्त्रियांकडे पाहून लक्ष्मणाला त्या वानरी असल्यास लाज वाटण्याचें कारण काय? सध्यांचे वानर दिगंबर वृत्तीनें नित्य फिरत असतात त्यांतील वानरींना पाहून कोणाला लाज वाटते? शरीरसंबंध निसर्गतः असेल तेथें लाज वाटण्याचा संभव असतो, हें सांगावयास नको.

रावणवधानंतर सीतेला रामानें आपल्यापुढें बोलावून आणिली आणि तिला उद्देशून जें भाषण केलें त्यांत त्याचे तोंडीं पुढील उद्गार आहेत. "ज्यासाठीं मीं तुला जिंकिली तो माझा हेतु सिद्धीस गेला आहे. माझी तुजवर आसक्ति नाहीं. तूं (आतां) हवी तिकडे जा. हे भद्रे, मनांत पक्का निश्चय करून ही गोष्ट

मीं तुला सांगितली आहे. तुझ्या मनांत येईल तर तूं लक्ष्मणापाशीं अगर भरतापाशीं रहा. अथवा हे सीते, शत्रुघ्न, सुग्रीव अगर बिभीषण राक्षस यांपैकीं कोणापाशींहि रहावें असें तुला वाटत असेल तर तसें कर. (६।११५।२१,२२,२३)

यांत रामानें सीतेला हव्या त्या पुरुषाचा आश्रय करण्यास सांगितलें असून त्यांत विशेष हें आहे कीं, इतर मनुष्यांबरोबर त्यानें सुग्रीवाचेंहि नांव घेतलें आहे. तिनें सुग्रीवाचा आश्रय केला नाहीं आणि रामाचें भाषण केवळ तिनें दिव्य करून आपली शुद्धता लोकांस पटवावी यासाठीं होतें हा भाग वेगळा; परंतु या गोष्टीचा संभव रामाच्या भाषणावरून सिद्ध होतो हेंच आम्हांला दाखवावयाचें आहे.

तसेंच सुग्रीवाला गादीवर बसविल्यानंतर आपलें अरण्यवासाचें व्रत पाळण्याकरितां राम किष्किंधानगरींत राहिला नाहीं हीहि महत्त्वाची गोष्ट आहे. इतर वन्य पशूंतच वानरांची गणना होत असती तर तेथें राहूनहि रामाच्या अरण्यवासाच्या प्रतिज्ञेला बाध आला नसता. वानरांला ते आपल्या बरोबरीचे समजत असत आणि याकरितां रामाला त्यांच्या नगरींत राहतां आलें नाहीं हें उघड आहे.

## तर मग भेद कोठें?

अभेदभावना पटली म्हणजे तिची सिद्धता करावी लागत नाहीं; आणि तिची सिद्धता करावी लागणें यांतच भेदाचें बीज असतें. कारण अभेद दाखवावयाचा म्हणजे दोन भिन्न पदार्थ पुढें असावे लागतात व त्यांतील भेद हा खरा नसून तो भेदाचा भास आहे, असें दाखवावयाचें असतें व हीच अभेदाची सिद्धि होय. रामायणकालीं असलेले वानर व मनुष्य यांतील अभेद कसा दिसून येतो हें येथपर्यंत दाखविलें. आतां प्रश्न असा उपस्थित होतो कीं, दोनहि समाज अशा प्रकारें अभेदानें जर वागत होते तर मग भेद कोठें होता? अभेदनिरूपणावरून उपस्थित होणाऱ्या या प्रश्नाविषयीं आतां विचार करूं. त्यांमध्यें स्वरूपतः भेद होता, असें पूर्वीं सांगितलें आहे. आतां दुसरा भेद सांगावयाचा म्हणजे ते स्वतां आपला अधिकार मनुष्यांहून कमी समजत असत हा होय. राम व लक्ष्मण पंपातीरीं आले असतां ते वालीनें पाठविलेले कोणीतरी

असावे, अशी शंका सुग्रीवाला येऊन तो भिऊन गेला. या वेळीं त्याच्या शंकेचें निरसन करीत मारुती त्याला म्हणतो " हे वानरा, चंचल अंतःकरणामुळें ज्या अर्थीं तूं बुद्धीचा दृढ निश्चय करीत नाहींस त्याअर्थीं तुझें **शाखामृगत्व** व्यक्त झालें आहे. " ( ४।२।१७ )

राम सीतेकरितां शोक करीत असतां त्याला धीर देत सुग्रीव म्हणतो " मीं **यःकश्चित वानर** असतां त्या प्रियेबद्दल शोक करीत नाहीं; मग महात्मा, सुशिक्षित, धैर्यवान् आणि उदार अशा तुझी गोष्ट पाहिजे कशाला? ( ४।७।७ )

वालिवधाचें समर्थन करितांना राम म्हणतो " धर्मवेत्ते राजर्षि मृगयेला जात असतात. (हें मृगवध निर्दोष मानण्यास प्रमाण आहे;) आणि म्हणून तूं प्रतिपक्षाशीं युद्ध करीत असून माझ्याशीं जरी युद्ध करीत नव्हतास, तरी **शाखामृग** असल्यामुळें हे वानरा, मीं तुझा युद्धामध्यें बाणानें वध केला आहे."(४।१८।४१)

याच प्रसंगीं आपल्या कृतीविषयीं थोडा खेद वाटून सुग्रीव म्हणतो, " भाऊ या नात्यानें करावयाचें कर्तव्य वालीनें केलें असून श्रेष्ठपणा आणि धर्म यांचें रक्षण केलें आणि मी तर काम, क्रोध व **कपित्व** यांचें प्रदर्शन केलें. " ( ४।२४।१२ )

लंकदहनानंतर सीतेविषयीं मनांत शंका येऊन मारुती खिन्न होऊन म्हणतो " त्रैलोक्यामध्यें प्रसिद्ध असलेला **वानरांचा अव्यवस्थितपणा** मात्र क्रोधरूप दोषामुळें खरोखर मीं दर्शविला आहे. " ( ६।५५।१५ )

वरील अवतरणांत एक रामाचे भाषणांतील असून इतर वानरांचे भाषणांतील आहेत व या सर्वांतहि मनुष्यांहून वानरांची योग्यता कमी दाखविली आहे. इतकेंच नव्हे तर त्यांतील विचार वानरांचीं पशूमध्यें गणना करून प्रकट केलेले आहेत.

कुंभकर्ण युद्धार्थ रणभूमीवर आला, त्या वेळीं प्रथम त्यानें वानरांचा नाश करण्याचें मनांत आणिलें आणि लागलींच आपले खरे शत्रु वानर नसून रामलक्ष्मण होत, याचें स्मरण होऊन तो म्हणतो " वनचर वानरांनीं खरोखर माझा कांहीं अपराध केलेला नाहीं. आमच्यासारख्यांच्या **नगरींचें व उद्यानांचें ही जाति म्हणजे एक भूषण होय.** " ( ६।६९।४४ ) कुंभकर्णाचे

हे उद्गार वानरांविषयींच्या पशुभावनेला पोषक आहेत. वानरांचे स्वरूपाविषयीं पूर्वीं जें निरूपण केलें आहे त्यांत त्यांना पुच्छ व अंगावर सर्वत्र लोम असल्याचें दाखविलें आहे आणि सध्यांचे वानरजातीशीं त्यांचें सादृश्य त्यावरून उघड दिसत आहे. इतर वर्णन मात्र पशूंशीं सदृश नसून तें मनुष्यांशीं अधिक सदृश आहे.

## उपसंहार.

रामायणांतील वानरांविषयींचे उभयविध उल्लेख पाहिले म्हणजे वानरांविषयीं यथार्थ कल्पना होण्यापेक्षां मनाचा गोंधळ मात्र होऊन जातो. वानर हें नांव ऐकतांच सध्यांचे पशु वानर आपल्यापुढें उभे राहतात. परंतु रामायणांतील कांहीं वर्णन दोहोंच्या स्वरूपांतील सादृश्य दाखविणारें असून विरुद्ध वर्णनें त्याहून अधिक आहेत. रामायणवर्णित वानर ही मनुष्यांची एक जात म्हणावी तर पशुत्वदर्शक वर्णन त्याला बाधक आहे; आणि त्यांना पशु म्हणावें तर त्यांचा व्यवहार व आचार मनुष्यांप्रमाणें असल्याचा सांगितला आहे. तेव्हां या दोन वर्णनांची संगति कशी लावावयाची? प्रथम हें लक्षांत घेणें अवश्य आहे कीं, अशा प्रसंगीं मूल ग्रंथांतील सर्व वर्णनांची सर्वथा संगति लावितां येणें शक्य नाहीं; संगति लावावयाची म्हणजे त्यांतील कांहीं भाग गौण व कांहीं मुख्य मानिला पाहिजे आणि मुख्याचें ग्रहण करून गौणाचा गौण म्हणून त्याग केला पाहिजे. वानरांविषयींच्या उभयविध वर्णनांमध्यें मुख्य भाग व गौण भाग कोणता, हें ठरवावयाचें म्हणजे प्रथम ते पशु होते किंवा काय हें पाहिलें पाहिजे व त्याचा निश्चय झाला म्हणजे त्या धोरणानें गौणमुख्यनिर्णय करून सर्व वर्णनांची संगति लावितां येण्यासारखी आहे.

रामायणांतील वानर पशु असावेत असें आपणांस नांवावरून वाटत, इतकेंच नव्हे तर त्यांचें पुच्छ पाहिलें म्हणजे ही कल्पना दृढ होते. कांहीं स्थलीं त्यांना शाखामृग म्हणून त्यांची पशूंमध्यें गणना केलेली आहे. पण रामायणवर्णित वानरांचे इतर सर्व व्यवहार बाजूला ठेविले तरी वाचेनें आपले विचार व्यक्त करण्याचा जो मनुष्याचा विशेष तो त्यांमध्यें उघडपणें दिसून येतो. रामायणांत इतर पशूंचीं वर्णनें आहेत, त्यांत बोलणाऱ्या पशूंची एकहि जात सांगितलेली

नाहीं. मायामृगानें रामाप्रमाणें स्वर काढून लक्ष्मणाला हांका मारिल्याचें वर्णन आहे. परंतु ती राक्षसाची माया असल्याचें तेथें सांगितलें आहे. तेव्हां पशुत्वद्योतक वर्णन गौण मानून याची संगति लावणें भाग आहे. दुसरें असें कीं, रामाला साह्य करणारे जे सुग्रीवादि—कीं ज्यांची गणना पशूंमध्यें करावी का मनुष्यांमध्यें करावी असा संशय पडला आहे—त्यांवांचून उघडपणें पशूंमध्यें गणिलेल्या वानरांचें वर्णन रामायणांत वेगळें आलें आहे. या वानरांचा इतर वन्य पशूंबरोबर निर्देश केलेला आहे व यावरून त्यांची गणना पशूंमध्यें करून तें वर्णन केलेलें आहे, हें सरळ दिसतें. भरद्वाजमुनींच्या आश्रमांतून राम चित्रकूटीं रहावयास गेले. मुनींचा आश्रम अयोध्येपासून फार दूर नसल्यामुळें तिकडील मंडळी भेटावयास वरचेवर येण्याचा संभव आहे, याकरितां रामानें मुनींनाच पुढें कोठें रहावें असा प्रश्न केला. या वेळीं मुनींनीं रामाला चित्रकूटाची प्रशंसा केली. मुनींच्या प्रशंसापर भाषणांत पुढील श्लोक आहे.

**गोलांगूलानुचरितो वानरर्क्षनिषेवितः ।**
**चित्रकूट इति ख्यातो गंधमादनसंनिभः ॥ २।५४।२९ ॥**

" तो पर्वत गंधमादनाप्रमाणें असून त्याला चित्रकूट असें म्हणतात. तेथें गोलांगूल संचार करीत असून त्यावर **वानर व अस्वलें** यांची वस्ती आहे." येथें वानरांची गणना वन्यपशूंमध्यें केलेली आहे, हें अस्वल व गोलांगूल यांचे साहचर्यावरून उघड दिसतें. चित्रकूटीं राम रहावयास गेल्यावर तेथें वानर पुष्कळ असतां त्यांतील एकाशींहि रामादिकांचें संभाषण झाल्याचें रामायणांत वर्णन नाहीं. उल्लेखाचा अभाव हें प्रमाण नव्हे, हें खरें; तथापि किष्किंधेमधील वानरांना राहण्यास घरें असावीं; त्यांनीं मनुष्यांप्रमाणें बोलावें; वस्त्रें, अलंकार धारण करावे; आणि चित्रकूटावरील वानरांनीं मात्र इतर वन्यपशूंबरोबर रहावें हें वैषम्य कसें लपवितां येईल? चित्रकूटावरील वानरांला रहाण्यास घरें होतीं असें म्हणावें तर एकाहि वानरानें रामाचें आदरातिथ्य कसें केलें नाहीं? आणि घरें बांधून राहणाऱ्या वानरांची तेथें वस्ती होती असें मानिलें तर वनवासव्रताचा भंग होऊं नये म्हणून किष्किंधानगरींत ज्या रामानें वस्ती केली नाहीं त्याला चित्रकूटावर वानरांची वस्ती असतां कसें राहतां आलें? येथें वानरांची

वस्ती होती व तेथें राहून रामाचें वनवासव्रत अखंड राहूं शकलें, त्यापक्षीं हे वानर पशूंपैकीं होते, हें निर्विवाद आहे.

नरवानर व पशुवानर हे भिन्न होते हें किष्किंधेच्या वर्णनांत याहून स्पष्ट झालें आहे. वालिवधानंतर सुग्रीवाला राज्याभिषेक करण्याकरितां मारुतीनें रामाकडे येऊन संमति मागितली व ती मागतांना बरोबरच त्या समारंभाकरितां नगरीमध्यें यावें अशी विनंति केली. या वेळीं रामानें " आपल्याला पित्याची आज्ञा पार पाडावयाची आहे व त्याकरितां चौदा वर्षें पूर्ण होईपर्यंत ग्राम अथवा पुर यांमध्यें प्रवेश करावयाचा नाहीं " असें सांगितलें. ( ४।२६।९,१० ) किष्किंधेंतील वानर व इतर मनुष्यसमाज यांमध्यें रामाला भेद वाटत नसल्यामुळें रामाला व्रतभंगाची भीति वाटली, हें येथें उघड आहे व तसें अनुमान पूर्वीं आम्हीं केलें आहे. पण व्रतभंग होऊं नये म्हणून किष्किंधेंत प्रवेश न करितां प्रस्रवणपर्वताचा रामानें आश्रय केला, तेथें काय होतें? पुढील वर्णन पहा:—

**अभिषिक्ते तु सुग्रीवे प्रविष्टे वानरे गुहाम् ।**
**आजगाम सहभ्रात्रा रामः प्रस्रवणं गिरिम् ॥ ४।२७।१ ॥**
**शार्दूलमृगसंघुष्टं सिंहैर्भीमरवैर्वृतम् ।**
**नानागुल्मलतागूढं बहुपादपसंकुलम् ॥ २ ॥**
**ऋक्षवानरगोपुच्छैर्मार्जारैश्च निषेवितम् ॥**

" सुग्रीव गुहेमध्यें प्रविष्ट होऊन त्याला राज्याभिषेक झाल्यावर भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान राम प्रस्रवण पर्वतावर आले. तो पर्वत व्याघ्र व मृग यांचे शब्दांनीं नादित झालेला होता. भयंकर गर्जना करणाऱ्या सिंहांनीं व्याप्त झाला होता; नाना प्रकारच्या सांकरांनीं व वेलींनीं तो झांकलेला होता; अनेक वृक्षांनीं तो गजबजलेला होता; ऋक्ष, वानर, गोपुच्छ व मार्जार यांनीं त्याचा आश्रय केलेला होता. " येथील वर्णनांत या पर्वतावर वानर असल्याचें स्पष्ट सांगितलें आहे. एकादा कुशल टीकाकार वानरांची वस्ती येथें नसून ते केवल तेथें संचार करीत असावे अशी कल्पना करील, तर तसें मानण्यासहि " त्या पर्वताचा त्या वानरांनीं आश्रय केला होता " असें म्हटलें असल्यामुळें वाव राहिलेला नाहीं. प्रस्रवणावरील हे वानर जर किष्किंधेंतील वानरांप्रमाणें असते तर येथें रामानें

रहावयास जावें हें उचित दिसत नाहीं. पर्वतावरील वानर पशु होते व यामुळें तेथें रामानें वास केला हें उघड आहे.

नरवानर व **पशुवानर** यांमधील विवेक रामाच्या या वर्तनावरून अनुमानिला आहे; आणि तो त्या वेळीं नित्य परिचयांतील असावा असें दिसतें. कारण या नरवानरांविषयीं रामायणांत अपूर्वताबुद्धीनें वर्णन केलेलें नाहीं. किष्किंधेकडे येईपर्यंत रामाला या नरवानरांपैकीं कोणी आढळला नव्हता. सीतेला घेऊन रावण लंकेकडे जात असतां मार्गांत एका पर्वतशिखरावर पांच वानर बसलेले तिनें अवलोकन केले; तेव्हां तिनें आपलें रेशमी वस्त्र व अलंकार रावणाची दृष्टि चुकवून या वानरांकडे फेंकून दिले. आपल्या अपहाराची वार्ता त्यांजकडून तरी या निमित्तानें रामाला कळूं शकेल, अशा कल्पनेनें तिनें हा यत्न केला ( ३।-५४।१–३ ), व तिच्या कल्पनेप्रमाणें पुढें घडूनहि आलें. हे वानर पशूंपैकीं असते तर त्यांजकडे वस्त्रें व भूषणें टाकिलीं तरी त्यांचे ठायीं संग्रहबुद्धि व बोलण्याची शक्ति नसल्यामुळें त्यांजकडून स्वतांचें वृत्त रामाला कळण्याचा संभव नाहीं, हें सीतेला सहज लक्षांत येण्यासारखें होतें. सीतेला रावण नेत असतां त्यापूर्वीं पुष्कळ पशुपक्ष्यांनीं पाहिलें होतें; पण त्यांजकडून रामाला काय वृत्तांत कळला तो सहज अनुमानितां येईल. त्यांजकडून वृत्तांत कळण्यासारखा असता तर सीतेला वरील योजना कां करावी लागली असती ? रामानें सीतेचा शोध नद्या, पर्वत, वृक्ष इत्यादिकांकडून प्रश्न विचारून विचारून केला असें रामायणांत वर्णन आहे व रामानें प्रश्न विचारिले असतां मृग दक्षिणेकडे तोंड करितात तेव्हां तिला कोणीतरी त्या दिशेकडे नेली असावी, असा लक्ष्मणानें तर्क केल्याचें सांगितलें आहे. ( ३।६४।२२ ) तथापि हें वर्णन अलंकारिक असून ऐतिहासिक दृष्ट्या त्याला तादृश्य महत्त्व नाहीं, हें सांगावयास नको. या अलंकारिक वृत्तांतांतहि त्या पशूंनीं रामाला मुक्यानें करावयाच्या खुणांपलीकडे कांहीं कळविलें नाहीं, हें लक्षांत ठेविण्यासारखें आहे. रामाला वृत्तांत कळविण्याची पात्रता वरील वानरांकडे पाहतांच सीतेला पटली व हाच त्या वानरांचा विशेष होय. पशुवानरांहून या वानरांमध्यें असलेला हा गुणविशेष सीतेच्या लक्षांत

त्यांजकडे पाहतांच आला व यावरून हा विशेष त्यांच्या नित्य परिचयांतील असावा, असें वर अनुमानिलें आहे.

वानर या नांवाचे पण नर व पशु या दोहोंमध्यें मोडले जाणारे दोन जातीचे प्राणी महाभारतामध्येंहि उल्लेखिलेले आहेत व त्यामुळें रामायणावरून अनुमानिलेल्या आमच्या कल्पनेला दृढता येणारी आहे. वनपर्वांतील तीर्थयात्रेच्या वर्णनाचे निमित्तानें हे उल्लेख आलेले आहेत. पुढील पंक्ति पहाः—

**विद्याधरसमाकीर्णान् युतान् वानरकिन्नरैः ।**
**तथा किंपुरुषैश्चैव गंधर्वैश्च समंततः ॥ १४५।१४ ॥**
**मयूरैश्चमरैश्चैव वानरैरुरुभिस्तथा ।**
**वराहैर्गवयैश्चैव महिषैश्च समावृतान् ॥ १५ ॥**
**नदीजालसमाकीर्णान्नानापक्षियुतान् बहून् ।**
**नानाविधमृगैर्जुष्टान् वानरैश्चोपशोभितान् ॥ १६ ॥**

पहिल्या श्लोकांत गंधर्व, विद्याधर, किंनर यांबरोबर वानरांचा उल्लेख आलेला आहे व गंधर्वादिकांची गणना मनुष्यांचे बरोबरीनें कोणालाहि करावी लागणार आहे; निदान गंधर्वादिकांना कोणी पशुकोटींत ढकलण्याचें धाडस करणार नाहीं, हें निश्चित होय. पुढील श्लोकांत वानरांचा उल्लेख दोनदां आलेला असून त्याबरोबर मोर, मृग, वराह व महिष इत्यादिकांचा उल्लेख आलेला आहे. यांपैकीं एकटा मोर हा पक्षी असून इतर सर्व पशु आहेत. अशा प्रकारें वानरांचा निर्देश दोन स्थलीं असल्यानें या दोन भेदांचें अस्तित्व व जाणीव प्राचीन कालीं होती, यांत शंका नाहीं.

मनुष्यांतील व पशूंतील वानरांचे हे दोन भेद लक्षांत आले म्हणजे रामायणांतील वानरांचें कोडें लवकर उकलतां येण्यासारखें आहे. रामाला ज्या वानरांनीं साहय्य केलें व ज्यांच्या व्यवहारादिकांविषयींची रामायणांतील वर्णनें पाहून आपणांस मनुष्यांशीं त्यांचें सादृश्य दिसूं लागतें ते वानर पशूंपैकीं नसून मनुष्यां-

* हें अवतरण गणपत कृष्णाजींचें प्रतीवरून घेतलें आहे. कुंभकोण प्रतींत हे श्लोक पाठभेदानें मिळतात. येथील चर्चा वानरांविषयीं आहे व त्याच स्थलीं या प्रतींत भिन्न पाठ आहे, हें आम्हीं नमूद करून ठेवितों. तथापि त्यापेक्षां या पाठांत द्विरुक्ति कमी व याकरितां हाच पाठ आम्हांला युक्त वाटत आहे.

पैकीं होते, हें उघड आहे. मात्र इतर मनुष्यसमाजाप्रमाणें या वानर नांवानें गणिलेल्या मनुष्यसमाजाची सुधारणा झाली नव्हती. त्यांच्यांतील हें वैगुण्य रामायणांतील वर्णनें वाचूं लागलें असतां वारंवार प्रत्ययास येत असतें. युद्धपद्धतीची चर्चा करितांना त्यांची पद्धति इतर मनुष्यसमाजाचे मानानें किती मागासलेली होती, हें मागें सांगितलें आहे. त्यांच्या बुद्धिमांद्याविषयीं एक गोष्ट सांगितल्यास पुरे होणारी आहे. कुंभकर्ण युद्धार्थ रणभूमीवर आला असतां सर्व वानर पळूं लागले; तेव्हां रामानें प्रश्न केल्यावरून बिभीषणानें त्याविषयीं सर्व वृत्तांत सांगितला. वानर पळून जाऊं नयेत याकरितां या वेळीं बिभीषणानें एक युक्ति सुचविली. तो म्हणाला कीं, " पुढें येत असलेला कोणी राक्षस नसून तें एक यंत्र उभारलेलें आहे, असें सर्व वानरांना कळवा म्हणजे तें खरें वाटून वानर निर्भय होतील." ( ६।६२।३३ ) या युक्तीचा उपयोग खरोखर कितपत झाला हें रामायणांत सांगितलेलें नाहीं. तथापि ही युक्ति योजिली असतां उपयोग होण्याचा संभव बिभीषणाला वाटला व सर्व श्रोत्यांना तो पटला हें त्यांच्या बुद्धिमांद्याचें उत्तम द्योतक आहे. मात्र हें बुद्धिमांद्य सर्वच वानरांचे ठायीं होतें असें नव्हे. सुग्रीव, मारुती, अंगद यांसारखे कांहीं बुद्धिमान् व चतुर वानर त्यांत होते. सामान्य वानरांचे ठायीं बुद्धिमांद्य होतें व तें इतर मनुष्यांशीं तुलना केली असतां विशेष होतें; तथापि सुग्रीवादिकांकडे पाहिलें म्हणजे ते प्रगतीचे मार्गास लागले होते, असें म्हणावयास अडचण नाहीं.

इतर मनुष्यसमाज व वानर यांमध्यें बोलण्याचा व्यवहार होत होता तरी वानरांच्या व त्यांच्या भाषेंत कांहीं भेद असावा, असें वाटतें. अशोकवनिकेंतील शिंशपा वृक्षावर बसून मारुती सीतेशीं कसें बोलावें असा विचार करीत असतां मनांत म्हणतोः--

**यदि वाचं प्रदास्यामि द्विजातिरिव संस्कृताम् ।**
**रावणं मन्यमाना मां सीता भीता भविष्यति** ॥ ५।३०।१८ ॥

" द्विजातीप्रमाणें जर मी शुद्ध बोलूं लागलों तर सीतेला हा रावण आला असें वाटून ती भिऊन जाईल."

येथें मूळांत संस्कृत वाणी असा निर्देश आहे पण तो प्राकृत भाषेच्या अपे-

क्षेनें वाटणाऱ्या संस्कृत भाषेचा नव्हे. संस्कार जीवर झाले आहेत अशी अर्थात् शुद्ध भाषा इतकाच अर्थ येथें अभिप्रेत दिसतो. मारुतीनें विचार करून शेवटीं द्विजातीप्रमाणें शुद्ध भाषेनें बोलण्याचें ठरविलें. त्याच्या कल्पनेप्रमाणें सीतेला प्रथम शंका आली; परंतु रामचरित्र सांगून व रामनामांकित आंगठी तिला दाखवून तिची शंका त्यानें दूर केली. मारुतीचे वरील विचारपरिवर्तनामुळें वानरांची स्वतांची भाषा रामायणांत ग्रथित झाली नाहीं, त्यास उपाय नाहीं; तथापि त्याचे विचारांमुळें वानरांची आपापसांत बोलण्याची भाषा वेगळी होती व मारुतीला दोनहि अवगत होत्या, हें उघड झालें आहे. आमचे सध्यांचे मराठीं भाषेंत तत्त्वतः भाषा एक असली तरी प्रांतवार व जातवार अशा बोलण्याच्या निरनिराळ्या पद्धति प्रचारांत आहेत व रामायणकालांतील भाषांचा हा भेद या प्रकारचा असावा, असें वाटतें.

वानर हा मनुष्यसमाजांतील एक वर्ग असावा असें म्हटलें तरी त्याला वानर हें पशूंतील एका वर्गाला असलेलें नांव कसें प्राप्त झालें? अशी शंका येथें सहज मनांत येते. तेव्हां तीविषयीं आतां विचार करूं. या संज्ञाप्राप्तीविषयींचा इतिहास रामायणांत अथवा अन्य ग्रंथांत सांगितलेला नाहीं; केवळ तर्कावर हा इतिहास सांगावयाचा आहे. अशीं नांवें प्रायः दोन वर्णांतील सादृश्यानिमित्त प्राप्त होत असतात. कोळी हें नाव मनुष्यांतील एका वर्गाला व एका प्राण्याला असल्याचें प्रसिद्ध आहे. दोघांचे उदरार्थ व्यवसायांमध्यें बाह्यतः सादृश्य आहे. व दोघांनाहि एक नांव पडण्याचें कारण हें होय. कोळी हा प्राणी घरांत अथवा वृक्षादिकांवर तंतू ताणून जाळीं विणितो व त्यांत प्राणी गावले असतां ते धरून भक्षण करितो. तर कोळी जातीचा मनुष्य पाण्यामध्यें जाळीं सोडून त्यांत मासे धरितो व त्यांवर उदरनिर्वाह करितो. दोघांचेंहि निर्वाहाचें साधन एक आहे व त्यांत लहानमोठेपणापुरता भेद आहे आणि याकरितां दोघांसहि कोळी हें एक नांव आहे. संस्कृत भाषेंत दोघांसहि त्यांच्या जाळ्यावरून जालिक असें नांव आहे. घरांतून मातीचे घडे बांधणारी कुंभारीण माशी व मातीचे घडे करून त्यांवर निर्वाह करणारा कुंभार यांचें नांव याप्रमाणेंच एक आहे. कूर्म हें नांव कांसवाचें व खाण्याचा एक कंद ( कणगरें ) याचें आहे व सूकर हें नांव डुक-

राचें व त्याच नांवानें मराठींतहि प्रसिद्ध असलेल्या एका कंदाचें आहे. एकादशीचे दिवशीं भोजनाचा निषेध करितांना त्याबरोबर शास्त्रकारांनीं या दोनहि कंदांचा निषेध केलेला आहे.

**एकादश्यां न भुंजीत न खादेत् कूर्मसूकरौ ॥**

हीं दोनहि नांवें आकृतिसादृश्याचीं द्योतक आहेत. तेव्हां वानर हें नांव कोणत्या तरी सादृश्याचे निमित्तानें पशूंतील एका वर्गाला मूळचें असतां मनुष्यांतील एका वर्गाला प्राप्त झालें आहे, असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं; किंवा वानरांची विशेष वस्ती असलेल्या प्रदेशाला त्यांचें नांव प्राप्त झालें असावें व त्यानिमित्त त्या प्रदेशांत राहणारे मनुष्यवर्गाला तें नांव मिळालें असावें. रहावयाचे प्रदेशाचे निमित्तानें त्यांतील मनुष्यांना तें नांव मिळाल्याचीं उदाहरणें प्राचीन व अर्वाचीन इतिहासांत असून प्रचलित वाङ्मयांतहि पुष्कळ आहेत. रामायणकालच्या या दोन वर्गांत फलमूलांवर निर्वाह करण्यापुरतें तरी सादृश्य सहज दिसणारें आहे. कदाचित् आणखी कांहीं बाबींत त्यांमध्यें सादृश्य पूर्वींचे कालीं असून तें रामायणकालीं लुप्त होत होत नांवापुरतें राहिलें असेल. कोणत्या तरी सादृश्याचे निमित्तानें त्यांना हें नांव मिळालें असो अथवा दुसऱ्या कांहीं निमित्तानें तें मिळालें असो, तें मूळचें पशूचें या वर्गाला मागाहून मिळालें आहे, यांत शंका नाहीं.

वानर हा मनुष्यांतील एक वर्ग होता, असें ठरविण्याचा किती अट्टाहास केला, तरी त्यांचें पशुत्वद्योतक पुच्छ विसरतां येत नाहीं. रामायणांत त्यांचे पुच्छाचें वर्णन आहे. तेव्हां त्याचें काय करावयाचें, हा प्रश्न सोडविणें भाग आहे. हें वर्णन अलंकारिक आहे, असें मानणें किंवा सपुच्छ अशा मनुष्यजातीचें त्या कालीं अस्तित्व गृहीत धरणें हे दोनच उपाय या कामीं आहेत. हें वर्णन अलंकारिक मानून ज्यांचें समाधान होत असेल, त्यांनीं तें करून घ्यावें आणि त्यासाठीं अधिक चर्चा करावयास नको. सपुच्छ मनुष्यांचा वर्ग मात्र गृहीत धरण्यास कांहीं तरी प्रमाण शोधणें अवश्य आहे. बॅ. सावरकर यांची अंदमानाच्या बंदिवासांतील वृत्तान्ताची जी एक लेखमाला केसरींत प्रसिद्ध होत आहे, तींत सपुच्छ असा मनुष्यवर्ग तेथें असल्याचें त्यांनीं लिहिलें आहे.

वंगदेशांत मुरारीगुप्त नांवाचा एक मोठा कवि व पंडित होऊन गेला. हा मारुतीचा अवतार अशी समजूत आहे आणि त्याला पुच्छ होतें व तें एका ब्राह्मणानें आपल्या कुटुंबांतील मंडळींसुद्धां स्वतां पाहिल्याचें ३५० वर्षांपूर्वीं झालेल्या "वैष्णववंदना" नामक एका वंगकाव्यांत लिहिलें आहे.* तसेंच हिंदुस्थानांतील एका राजघराण्यांत गादीवर बसतेवेळीं पुच्छ धारण करण्याची चाल आहे.* रामायणांतील वानरांचें पुच्छ पाहून त्यांना मनुष्यांतील एक वर्ग मानणें कठीण वाटतें, यासाठीं सपुच्छ मनुष्यवर्गाचें हें वर्णन दिलें आहे. आमचेकडील एकाद्या प्रांतांत असा एकादा वर्ग आढळला असता, म्हणजे हा प्रश्न उपस्थित झाला नसता, आणि यामुळें वरील माहिती वाचूनहि कित्येकांच्या मनाचें समाधान होईल, असें नाहीं; तथापि सपुच्छ मनुष्याचें रामायणांतील वर्णन पाहून त्याकडे प्रथम अपूर्वतेनें व हळूहळू असंभवनीय म्हणून पहावयाचें कारण नाहीं, एवढें तरी वरील माहिती वाचून म्हणतां येईल.

इतर मनुष्यसमाजाशीं सर्व प्रकारें सादृश्य असतां स्वतांला त्यांनीं कमी लेखावें, हें जरा चमत्कारिक दिसतें; निदान मारुतीसारख्या त्यांतील प्रमुखांचे ठायीं तर तें विशेष विपरीत वाटतें. येथें ही शंका संभवनीय आहे; पण अशा उद्गारांकडे आपण वेगळ्या दृष्टीनें पाहिल्यास ती निरस्त होण्यासारखी आहे. अशा प्रसंगीं कपित्वाचा निर्देश नामतः सदृश असलेल्या पशूंतील कमीपणा मनांत आणून वक्त्यानें श्रोत्याला हिणविण्याकरितां व स्वतांविषयीं केला असेल तेथें खेदानें केला आहे, असें दिसतें आणि असें म्हटल्यास त्यांत विसंगतता येत नाहीं. या दृष्टीनें पूर्वीं दिलेलीं अवतरणें वाचकांनीं या प्रसंगीं अवश्य वाचून पहावीं. सुग्रीव रामलक्ष्मणांला प्रथमच पाहिल्यावर भिऊन गेला असतां त्याला मारुतीनें धीर दिला व त्या वेळीं त्यानें केलेल्या भाषणांत अंतःकरणाचे चंचलपणामुळें शाखामृगत्व त्यानें व्यक्त केल्याचें म्हटलें आहे. याप्रमाणें पुढील अवतरणांतहि कांहीं तरी दुर्गुणानिमित्त कपित्वाचा निर्देश आलेला आहे. एकाद्याची निंदा करावयाची असतां पशूची उपमा देण्याची पद्धति व्यवहारांतहि आहे. येथें प्रकार थोडा वेगळा आहे. त्यांचें वानर हें नांव व पशु-

* Bengali Ramayanas by रायसाहेब दिनेशचंद्र सेन, पृ. ५२.

वानरांतील वैगुण्याचे वरच्यासारखे त्यांच्याशीं तुलना करून केलेले निर्देश असें दुहेरी सादृश्य येथें आहे व तेंच शंकेला कारण होत आहे. सुग्रीव वानर-जातीचा व तदनुरूप बुद्धीचें वैगुण्य हीं पाहून नांवाप्रमाणें त्यानें कपित्व प्रदर्शित केलें, असें मारुतीचें म्हणणें वरील स्थलीं आहे, असें ध्यानीं घेतलें असतां त्यांत विसंगतता रहात नाहीं व शंका येत नाहीं. मारुतीच्या या निंदात्मक उद्गारांतहि सुग्रीव हा वानरजातीचा नव्हे, असा ध्वनि निघत आहे. सुग्रीवाचे या बुद्धिचापल्यामुळें कपित्व व्यक्त झालें. अर्थात् स्थिर बुद्धीनें तो वागूं लागल्यावर त्याचें कपित्व राहणार नाहीं, असाच मारुतीच्या म्हणण्याचा भाव होत नाहीं काय ? कपित्व नाहींसें झाल्यावर त्याचें खरें स्वरूप--मानवी स्वरूप—उघड दिसूं लागावयाचें, हें सांगावयास नको.

एका प्रक्षेपकानें तर हा वाद एके स्थलीं स्पष्ट शब्दानें मिटवून टाकिला आहे. वालिवधानंतर तारेनें विलाप केला, त्यांत प्रथम रामाला उद्देशून ती म्हणते:—

**त्वमात्तबाणासनचापपाणिर्महाबलः संहननोपपन्नः ।**
**मनुष्यदेहाभ्युदयं विहाय दिव्येन देहाभ्युदयेन युक्तः॥ ४।२४।३२॥**

" तूं हातामध्यें धनुष्य व बाण धारण केले आहेस; महाबलाढ्य आहेस; तुझें शरीरहि बांधेसूद आहे व तुझ्यापासून वध पावलेला वालि **मनुष्य-देहामध्यें** प्राप्त होणाऱ्या सुखाचा त्याग करून दिव्य देहानें प्राप्त होणाऱ्या सुखाचा उपभोग घेत आहे. " मनुष्यदेहाचा निर्देश करून येथें तर वाली हा मनुष्य का पशु अशी शंका घेण्यास अवकाशहि ठेविलेला नाहीं. हा भाग मूळांतील नसला तरी प्रक्षेपकाचे मतें या दोन भिन्न जाती नव्हत्या असें अनुमान यावरून उघड होत नाहीं काय?

मनुष्य व वानर यांची तुलना करितांना वानरांचें स्वरूप व त्यांना स्वतांविषयीं वाटणारा कमीपणा या दोन बाबींचा विरोध येत होता व तो दूर झाल्यावर वानर हा मनुष्यांतील एक वर्ग होता, असें उघड झालें आहे. उत्क्रांतिवादाचे तत्त्वाप्रमाणें पाहूं गेलें तर वानर हा मनुष्याचा पूर्वज असल्याचें कळून येतें. या वादाशीं आम्हांला प्रस्तुत कांहीं कर्तव्य नाहीं. दोन जातींतील सादृश्य कोठ-

पर्यंत येतें एवढें सांगण्यापुरता त्याचा निर्देश येथें केला आहे. रामायणकालीं या दोन जातींचें सादृश्य सर्वांना परिचित होतें आणि मनुष्यांतील व पशूंतील वानर हा भेद त्यांना कळत होता. या दोन बाबी नित्य परिचयांतील आहेत, व मूळांतील वर्णन या दृष्टीनें लिहिलेलें आहे असें लक्षांत ठेवून तें वाचावें म्हणजे तादृश शंका उपस्थित होत नाहीं.



# भाग ५ वा.

## दंतकथा आणि रामायण.

रामचंद्राच्या चरित्रासारखें पवित्र चरित्र कोणाला बरें वेड लावणार नाहीं ! महर्षि वाल्मीकिसारख्यांच्या वाणींतून निर्माण झाल्यामुळें त्याला दुहेरी महत्त्व आलें आहे. एकाद्या उत्कृष्ट प्रतिभासंपन्न कवीच्या कल्पनासृष्टीतहि ज्या प्रकारचे उदार विचार सुचणें अशक्य आहे ते या चरित्रांत निसर्गतः येऊन गेले आहेत. रामायणांतील प्रत्येक पात्रानें आपापले विशिष्ट गुण अगदीं शिखरास नेऊन पोंचविले आहेत. भिन्न भिन्न गुणांची ही उत्कटताच रामचरित्र सर्व जगाच्या प्रेमास पात्र होण्याचें कारण होय. हिंदुस्थानांतील आबालवृद्धांचें या चरित्रावर प्रेम बसलें आहे, यांत कांहीं विशेष नाहीं. परंतु ते अन्यधर्मीयांना प्रिय झालें आहे ही महत्त्वाची गोष्ट आहे. वैदिकधर्मी लोकांना तें त्याच्या दैविकपणानें आवडणें संभवनीय आहे. वस्तुतः रामचरित्रावर दैविकपणा आरोपून त्याची श्रेष्ठता दाखविण्याची जरूर नाहीं. तें स्वभावतःच अधिक पवित्र आहे. रामचरित्राच्या या पावित्र्यामुळें विचारी मनुष्याची श्रद्धा त्यावर सहज बसेल, ही गोष्ट खरी आहे; तथापि हिंदुस्थानांतील अज्ञसमाजाची श्रद्धा त्यांतील दैविकपणामुळें त्यावर बसली आहे हें कोणीहि अमान्य करणार नाहीं. अद्भुत कथांवर अज्ञसमाजाची जशी श्रद्धा बसते त्याप्रमाणें खऱ्या उदार कथांवर बसत नाहीं. महाराष्ट्राच्या इतिहासांत समर्थांनीं जी कामगिरी बजाविली आहे त्याबद्दल त्यांजवर अज्ञसमाजाची किंवा खुद्द त्यांचे संप्रदायी म्हणविणारांची पूज्यबुद्धि आहे, असें म्हणतां येणार नाहीं—किंबहुना या कामगिरीची त्यांना ओळखहि नसेल; तर त्यांविषयीं समाजांत जी पूज्यबुद्धि आहे, ती त्यांविषयीं बखरींतून वर्णिलेले अद्भुत चमत्कार ऐकून उत्पन्न झालेली आहे. रामचरित्रालाहि हेंच तत्त्व लागू होईल. रामचरित्रांतील उदात्त कथाभागापेक्षां तो विष्णूचा अवतार होता, या गोष्टीमुळें अज्ञसमाजाची त्यावर श्रद्धा आहे. रामचरित्रांतील कथानकाविषयीं नाना तऱ्हेच्या अद्भुत कथा लोकांत पसरलेल्या आहेत, हेंच

त्याचें स्पष्ट उदाहरण होय. अशा कथांविषयीं अल्पसें विवेचन या भागांत करावयाचें आहे.

## रामजन्मापूर्वी रामायण.

रामायण हा ग्रंथ वाल्मीकिमहर्षींनीं लिहून ठेविला होता व त्याप्रमाणें पुढें रामचरित्र घडून आलें, असा लोकांचा समज आहे. हा समज अतिशय प्राचीन काळापासून चालत आला आहे. वाल्मीकिरामायणाशिवाय रामचरित्रावर जेवढे म्हणून ग्रंथ आहेत तेवढ्या सर्वांमध्यें प्रसंगीं या समजुतीचाच अनुवाद केलेला आहे; आणि अशा रीतीनें या समजुतीचें दृढीकरणच होत गेलें आहे. वाल्मीकिरामायणांत या समजुतीला मुळींच आधार नाहीं. उलट सर्व प्रमाणें तिच्याविरुद्ध सांपडतात. एकदां नारदमुनींना वाल्मीकींनीं " सांप्रत चांगला राजा कोण आहे ? " असा प्रश्न केला असतां नारदांनीं त्यांना रामाचें नांव सांगून त्याचें चरित्र कथन केलें. पुढें वाल्मीकि तमसा नदीवर गेले असतां झाडावर बसलेल्या क्रौंचपक्ष्याच्या जोडप्यापैकीं एकाचा एका व्याधानें वध केल्याचें त्यांनीं पाहिलें, तेव्हां त्या पक्ष्याच्या करुणास्पद स्थितीनें त्यांच्या मनाला कळवळा आला व त्यांनीं व्याधाला शाप दिला. हा शाप म्हणजे " मा निषाद " हा प्रसिद्ध श्लोक आहे. या शापामुळें त्यांचें मन उद्विग्न झालें. इतक्यांत ब्रह्मदेव तेथें येऊन नारदांनीं सांगितल्याप्रमाणें रामचरित्र करण्यास आज्ञा केली. त्याप्रमाणें वाल्मीकींनीं रामायण रचिलें. अशी रामायणाच्या उत्पत्तीची कथा आहे. खुद्द वाल्मीकींनाहि रामजन्मापूर्वी आपण रामायण केलें, असा अभिमान दिसत नाहीं. नारदांना वाल्मीकींनीं प्रश्न केला तो असा होता:—

**को न्वस्मिन्सांप्रतं लोके गुणवान्कश्च वीर्यवान् ॥**

" या जगामध्यें सांप्रत सर्वगुणसंपन्न व महापराक्रमी असा पुरुष कोण आहे ?"

हा प्रश्न रामायण होण्यापूर्वींचा आहे, हें निर्विवाद आहे. यांतील 'सांप्रतम् " या शब्दाला विशेष महत्त्व आहे. " सांप्रत गुणवान् कोण आहे ? " असा प्रश्न केला असतां पुढें होणाऱ्या मनुष्याचें नांव कोणी घेईल काय ? ज्यापक्षीं नारदांनीं रामचंद्राचें नांव सांगितलें त्यापक्षीं त्या वेळीं रामराज्य चालू असलें पाहिजे, हें उघड आहे. नारदांनीं सांगितलेलें रामचरित्र हीच गोष्ट स्पष्ट

कारितें. या चरित्रांतील सर्व पदें भूतकाळीं असून पुढें राज्यांतील स्थिति मात्र भविष्यत्काळीं वर्णिली आहे. रामायणांतील मुख्य कथांचा क्रमानें निर्देश करीत करीत नारद म्हणतातः—

> **नन्दिग्रामे जटां हित्वा भ्रातृभिः सहितोऽनघः ।**
> **रामः सीतामनुप्राप्य राज्यं पुनरवाप्तवान् ॥१।१।८९॥**
> **प्रहृष्टमुदितो लोकस्तुष्टः पुष्टः सुधार्मिकः ।**
> **निरामयो ह्यरोगश्च दुर्भिक्षभयवर्जितः ॥९०॥**
> **न पुत्रमरणं केचिद् द्रक्ष्यन्ति पुरुषाः क्वचित् ।**
> **नार्यश्चाविधवा नित्यं भविष्यन्ति पतिव्रताः ॥९१॥**

"नंदिग्रामीं आल्यावर त्यानें जटांचा त्याग केला; आणि अशा रीतीनें सीता प्राप्त झाल्यावर भ्रात्यांसहवर्तमान त्या रामाला राज्य प्राप्त झालें. या राज्यामध्यें लोक आनंदी, संतुष्ट, पुष्ट, धर्मनिष्ठ व निरोगी असून त्यांना दुष्काळाची भीति नाहीं. याप्रमाणेंच या राज्यामध्यें कोणाहि पुरुषाला आपल्या पुत्राचा मृत्यु पाहण्याचा प्रसंग येणार नाहीं. स्त्रियांना वैधव्याची प्राप्ति होणार नाहीं व त्या नित्य पतिव्रता राहतील."

याधरून वाल्मीकींनीं नारदाला केलेला प्रश्न राम गादीवर बसल्यानंतर बरेच दिवसांनीं केला असला पाहिजे. अर्थात् रामायणरचनेचा काल रामजन्मापूर्वी येत नाहीं.

ब्रह्मदेवांनीं नारदांनीं सांगितलेल्या चरित्राकडे हवाला
लिहिण्याची आज्ञा केली व वर दिला तो असाः—

> **धर्मात्मनो भगवतो लोके रामस्य धीमतः**
> **वृत्तं कथय धीरस्य यथा ते नारदाच्छ्रुतम् ॥१।२।३२॥**
> **रहस्यं च प्रकाशं च यद्वृत्तं तस्य धीमतः ।**
> **रामस्य सहसौमित्रे राक्षसानां च सर्वशः ॥३३॥**
> **वैदेह्याश्चैव यद्वृत्तं प्रकाशं यदि वा रहः ।**
> **तच्चाप्यविदितं सर्वं विदितं ते भविष्यति ॥३४॥**

"या लोकामध्यें धर्मात्मा, धीर व बुद्धिमान् असलेल्या भगवान् रामचंद्राचें

जें चरित्र नारदापासून तूं श्रवण केलेंस तें तूं वर्णन कर. तो बुद्धिमान् राम, लक्ष्मण राक्षस व सीता यांचें प्रसिद्ध किंवा अप्रसिद्ध असलेलें सर्व चरित्र तुला कळून येईल."

या तीन श्लोकांत "वृत्तम्" हा शब्द फार महत्त्वाचा आहे. या शब्दावरून रामायण करण्यापूर्वी रामचरित्र झालें असल्याचें दिसून येतें.

## वाल्या कोळ्याचे वाल्मीकि.

महर्षि वाल्मीकि हे जातीचे शूद्र असून प्रारंभीं वाटमाऱ्याचा धंदा करून निर्वाह करीत असत, अशी कथा आहे. यांची एकदां नारदमुनींशीं गांठ पडली असतां त्यांनीं याला 'तुझ्या पापकर्माचें फल भोगावयास तुझे कोणी वाटेकरी आहेत काय?' असा प्रश्न केला. नारदांचे प्रश्नाचें उत्तर देण्यापूर्वी तो प्रथम घरीं आला व त्यानें नारदांनीं सुचविलेला प्रश्न आपल्या स्त्रीपुत्रादिकांस केला. त्यांनीं त्याला सरळपणें 'आपण प्राप्त होणाऱ्या भाग्याचे वांटेकरी आहों; पापें करील तीं ज्याचीं तो भरील,' असें सांगितलें. तेव्हां त्याला पश्चात्ताप झाला व तो नारदाला शरण गेला. नारदांनीं त्याला रामनामाचा उपदेश केला. नाममंत्राचा जप करीत तो तेथेंच राहिला असतां त्यावर वल्मीकें—वारुळें—वाढलीं. पुढें नारद त्या मार्गानें येत असतां त्यांना रामनामाचा मधुर ध्वनि ऐकूं आला व त्यांनीं हें वारूळ पाहून त्यांत शोध केला तों त्याला पूर्ण सिद्ध झालेली आपल्या शिष्याची स्वारी दृष्टीस पडली. वल्मीकांतून बाहेर पडल्यामुळें त्याला वाल्मीकि नांव पडलें. यांनींच पुढें रामायणाची रचना केली. वाल्मीकीचें पूर्ववृत्त दंतकथेमध्यें याप्रमाणें सांगितलें आहे. शूद्राला याच जन्मांत आचरण सुधारून ब्राह्मण होतां येतें असें यावरून दिसतें; व चातुर्वर्ण्याविषयीं लिहितांना हें प्रमाण पुष्कळ विद्वानांनीं दिलें आहे.

स्वामी विवेकानंद यांनीं आपल्या रामायणावरील व्याख्यानांत ही कथा रसाळ धाटणीनें अधिक मोहक करून सांगितली आहे. कोठें तर ते मूळचे ब्राह्मण असून कोणा किराताचे संगतीनें त्यांना वाटमाऱ्याचे धंद्याचा नाद लागला होता, असें सांगितलें आहे. जातींत भेद दिसला तरी धंद्यासंबंधानें सर्वांची एकवाक्यता आहे.

पण या दंतकथेचें रामायणांत नांवहि नाहीं. रामायणांत त्यांचेविषयीं जेथें जेथें उल्लेख आहे तेथें तेथें आदरपूर्वक 'तपस्वी' 'मुनिपुंगवः' असेच शब्द योजिले आहेत. रामायणाचा पहिलाच श्लोकः—

**तपःस्वाध्यायनिरतं तपस्वी वाग्विदां वरम् ।**
**नारदं परिपप्रच्छ वाल्मीकिर्मुनिपुंगवम् ॥**

"तपश्चर्या आणि स्वाध्याय यांमध्यें निमग्न असलेले व वाग्वेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असे जे मुनिवर नारद त्यांना वाल्मीकि मुनींनीं प्रश्न केला."

असा असून त्यांत 'तपस्वी' असा त्यांचा उल्लेख आला आहे. आतां हा उल्लेख तपश्चर्येविषयीं असला तरी त्यावरून त्यांचा वर्ण ब्राह्मण ठरणार नाहीं असेंहि कोणी म्हणतील. परंतु दंतकथेवर विश्वासून जर निर्णय करूं लागलें तर तपश्चर्या करणाऱ्या शूद्राचा रामानें वध केला त्याप्रमाणें वाल्मीकि शूद्र असून तपश्चर्या करिते तर त्यांचेहि कोणा राजानें शासन केलें असतें असें कां म्हणूं नये? केवळ कोटिक्रम करून वाचकांचें समाधान करण्याची आमची इच्छा नाहीं. त्यांच्या समाधानार्थ रामायणांतील पुढील दोन श्लोक उध्दृत करितों.

**ततः करुणवेदित्वादधर्मोऽयमिति द्विजः ।**
**निशाम्य रुदतीं क्रौंचीमिदं वचनमब्रवीत् ।**
**मच्छंदादेव ते ब्रह्मन् प्रवृत्तेयं सरस्वती ॥१।२।३१॥**

"रोदन करीत असलेल्या क्रौंच पक्षिणीला अवलोकन करून तिची दया आल्यामुळें 'हा अधर्म आहे' असें म्हणून ते द्विज वाल्मीकि पुढें दिल्याप्रमाणें बोलले." "हे ब्राह्मणा, माझ्या प्रेरणेनेंच तुझ्या ठिकाणीं ही सरस्वती प्रकट झाली आहे."

यांतील पहिल्यांत 'द्विजः' असा वाल्मीकींविषयीं उल्लेख असून दुसऱ्यांत 'ब्रह्मन्' असा त्याहून स्पष्ट उल्लेख आहे. हा दुसरा श्लोक रामायण रचण्याविषयीं महर्षींना ब्रह्मदेवांनीं आज्ञा केली त्या वेळचा आहे. म्हणजे 'ब्रह्मन्' हें संबोधन खुद्द ब्रह्मदेवांनीं वाल्मीकींना उद्देशून योजिलें आहे. शिवाय पहिल्या श्लोकांतील वर्णन निषादानें क्रौंचवध केला त्या वेळचें आहे. वाल्मीकि हे जर

मूळचे कोळी असते तर त्यांना एवढा कळवळा येण्याचें काय कारण होतें? तेव्हां आतां त्यांच्या ब्राह्मण्याविषयीं मुळींच शंका नको.

सीतात्यागानंतर रामानें जो अश्वमेध केला त्यासाठीं निमंत्रित केलेल्या मंडळींत वाल्मीकिहि होते, त्यावरून त्यांचा अधिकार केवळ ब्राह्मणाहून विशेष होता, हें उघड आहे. त्यांचें वेदाध्ययन चांगल्या प्रकारें झालें असून रामाचे पुत्र कुश व लव यांनाहि वेदाध्ययन त्यांनीं सांगितलें होतें. कारण, वेदाध्ययनाला पक्कता येण्यासाठीं त्यांनीं रामायण पढविल्याचें रामायणांत सांगितलें आहे. पुढील श्लोक पहा:—

**स तु मेधाविनौ दृष्ट्वा वेदेषु परिनिष्ठितौ ।**
**वेदोपबृंहणार्थाय तावग्राहयत प्रभुः ॥** १।४।६ ॥

"ते दोघे (राजपुत्र) बुद्धिमान् आणि वेदपारंगत झाले आहेत असें पाहून त्यांचे वेदाध्ययनाला पुष्टि येण्याकरितां प्रभु वाल्मीकींनीं त्यांना हें काव्य पढविलें."

महर्षि जर शूद्र असून मागून ब्राह्मण झाले असते तर त्यांना वेदाध्ययन केव्हां करतां आलें असतें? पण इतकें कशाला? खुद्द महर्षींनीं आपली उत्पत्ति कोणापासून झाली, हें सांगितलें आहे. तो श्लोकच येथें देतों:—

**प्रचेतसोऽहं दशमः पुत्रो राघवनन्दन** ॥ ७।९६।१८ ॥

"हे रघुनंदना रामा, मीं प्रचेतसाचा दहावा पुत्र आहें."

प्रचेतस हा स्वायंभु मनूचा पुत्र उत्तानपाद याच्या वंशांत उत्पन्न झाला होता. आतां यावर कदाचित् एक शंका येण्याचा संभव आहे. रामायणांत वाल्मीकींविषयीं ब्राह्मण म्हणून जे उल्लेख आहेत ते त्यांना ब्राह्मण्य प्राप्त झाल्यानंतरचे असल्यामुळें चिंत्य आहेत. वस्तुतः दंतकथेचा अत्यल्पहि संबंध रामायणांत नसल्यामुळें ही शंका अप्रस्तुत आहे. तथापि या कथेंत सत्यांश किती आहे, हें महर्षींच्याच तोंडच्या एका उक्तीवरून दिसून येणार असून या शंकेचाहि उलगडा होणार आहे.

दंतकथा किंवा तिचा अनुवाद करणारे ग्रंथकार म्हणतात कीं, पूर्वी वाल्या नांवाचा एक मनुष्य होता. तो वाटमाऱ्याचा धंदा करीत असे. यावरून व दंतकथेंतील पुढील कथाभागावरून त्यानें फार दुष्ट कर्मे केल्याचें दिसून येतें.

आतां वाल्मीकींनीं सीता शुद्ध आहे असें भर दरबारांत सांगते वेळीं जी प्रतिज्ञा केली त्यांतील पुढील वाक्य पहाः —

**मनसा कर्मणा वाचा भूतपूर्वं न किल्बिषम् ।**
**तस्याहं फलमश्नामि अपापा मैथिली यदि ॥ ७।९६।२० ॥**

" सीता जर पापरहित असेल तरच आजपर्यंत कायिक, वाचिक व मानसिक पाप माझ्या हातून घडलें नाहीं, त्याचें फल मला प्राप्त होईल. "

खरोखर स्वतांविषयीं इतक्या निर्धास्तपणें सांगण्याचें किती लोकांच्या नशिबीं येत असेल बरें? या वाक्यावरून तर प्रचलित दंतकथेचा महर्षींशीं कांहींहि संबंध नाहीं, हें उघड आहे.

## छंदोबद्ध वाणीचे जनक वाल्मीकि.

रामायणाला वाल्मीकिमहर्षींनीं स्वतः 'आदिकाव्य' म्हटलें आहे. अर्थात् वाल्मीकि हे आदिकवि होत, हें उघड झालें. या संज्ञांवरून म्हणा अगर अन्य कांहीं कारणांनीं म्हणा आमच्याकडे फार प्राचीनकालापासून अशी समजूत आहे कीं, छंदोबद्ध वाणी वाल्मीकींनीं प्रथम निर्माण केली. या समजुतीस रामायणांत मुळींच आधार नाहीं. रामायणाच्यापूर्वीं छंदोबद्ध वाणी नव्हती असें कसें म्हणतां येईल? संहिता, ब्राह्मण, उपनिषदें, स्मृति हीं सर्व रामायणाच्या पूर्वींचीं होत. यांमध्यें छंदोबद्ध वाणी वाटेल तितकी सांपडेल. वेदांतील मंत्रांला छंद सांगितले असून ते पुष्कळ आहेत. वेदांतील व भाषेंतील छंदांच्या संज्ञा परस्परांशीं जमतात. वैदिकमंत्र स्वरसहित म्हणावयाचे असतात व भाषेंतील छंद स्वररहित म्हणावयाचा परिपाठ आहे, एवढाच काय तो या दोन पद्धतींत भेद आहे. सांप्रत प्रचलित असलेल्या पद्धतीचें कर्तृत्व मात्र वाल्मीकिमहर्षींवर लादतां येणें शक्य नाहीं. ही पद्धति महर्षींच्या पूर्वीं फार वर्षांपासून चालत आली आहे. प्रचलित पद्धतीशीं आमचा निकट परिचय असल्यामुळें आम्हांला ती अर्वाचीन व श्रुतिमनोहर वाटते, त्याला उपाय नाहीं. वस्तुतः दोनहि पद्धति फार प्राचीन आहेत. याकरितां पहिलीपासून दुसरीचें जन्म झालें किंवा अर्वाचीन वाटणारी पद्धति वाल्मीकिमहर्षींनीं शोधून काढिली, हें म्हणणें युक्तीस जमत नाहीं. वैदिक छंदांतहि कांहीं भाग स्वरसहित व कांहीं भाग स्वररहित म्हणा-

वयाचा असतो. सिद्धान्तकौमुदींतील स्वरप्रक्रियाप्रकरणांत याविषयीं नियम सांगितला आहे–

" **विभाषा छंदसि । १।२।३६ ॥ छंदसि विभाषा एकश्रुतिः स्यात् । व्यवस्थिताविभाषेयम् । संहितायां त्रैस्वर्यम् । ब्राह्मण एकश्रुतिर्बह्वृचानाम् । अन्येषामपि यथासंप्रदायं व्यवस्था ।** "

या उताऱ्यांत ब्राह्मणग्रंथ एकश्रुतीनें–स्वररहित–म्हणावयाचा संप्रदाय असल्याचें सांगितलें आहे. ब्राह्मणांतील एकादा श्लोक म्हटला तर अर्वाचीन पद्धतीशीं तंतोतंत जुळेल.

**आस्ते भग आसीनस्योर्ध्वस्तिष्ठति तिष्ठतः ।**
**शेते निपद्यमानस्य चराति चरतो भगः ॥**

तसेंच– **तदप्येष श्लोकोऽभिगीतः––**
**मरुतः परिवेष्टारो मरुत्तस्यावसन्गृहे ।**
**आविक्षितस्य कामप्रेर्विश्वेदेवाः सभासदः ॥ इति ॥**

यावरून वैदिक सूत्रें थोडा फेरफार करून म्हटलीं तर तीं अर्वाचीन पद्धतीशीं जमतात व महर्षींनीं हीच सुधारणा करून अर्वाचीन पद्धति निर्माण केली, असें कांहीं विद्वान् मंडळी म्हणते तें चिन्त्य आहे, असें वाटतें. दोनहि पद्धति फार प्राचीनकाळापासून प्रचारांत आहेत. वाल्मीकिमहर्षींनीं वरील पद्धति शोधून काढिलेली नाहीं.

रामायणाची रचना करण्यापूर्वीं ही पद्धति प्रचारांत होती व वैदिक मंत्रांशिवाय भाषेंतहि छंदोबद्ध रचना होती, असें रामायणांतील कांहीं उल्लेखांवरून दिसतें. रामायणांत कांहीं पात्रांच्या तोंडीं अनुष्टुभ् श्लोकात्मक कांहीं वचनें आहेत. हीं वचनें त्या त्या पात्रांनीं त्या कालीं प्रचलित असलेली म्हण म्हणून सांगितलेलीं आहेत. याकरितां त्यांना विशेष महत्त्व आहे. राम अयोध्येकडे

---

१ At such a time वाल्मीकि revived the Vedic metres in a better and more regulated form and gave a fresh impetus to the writing of poetry. —Riddle of the रामायण, page 3.

परत येत असतां तें आनंदवृत्त भरताला कळविण्याकरितां मारुती पुढें गेला होता, तेव्हां भरत त्याला म्हणतो:—

**कल्याणी बत गाथेयं लौकिकी प्रतिभाति माम् ।**
**एति जीवन्तमानन्दो नरं वर्षशतादपि ॥**

" मनुष्य जीवंत असेल तर शंभर वर्षांनीं तरी त्याला आनंद प्राप्त होईल, अशी जी लोकांमध्यें म्हण आहे, ती खरोखर चांगली आहे. "

यांतील दुसरा चरण म्हणजे त्या वेळीं प्रचलित असलेली एक म्हण आहे. तसेंच युद्धकाण्डामध्यें रावणानें बिभीषणाला त्या वेळीं प्रसिद्ध असलेले कांहीं श्लोक सांगितले आहेत. ते सांगतांना रावण प्रारंभीं म्हणतो:—

**श्रूयन्ते हस्तिभिर्गीताः श्लोकाः पद्मवने पुरा ।**
**पाशहस्तान् नरान्दृष्ट्वा शृणुष्व गदतो मम ॥ ६।१६।६॥**

" पूर्वीं पद्मवनामध्यें हातांत पाश घेऊन आलेल्या लोकांना पाहून हत्तींनीं कांहीं श्लोक म्हटले होते, ते मी तुला सांगतों, ऐकून घे. "

अशी प्रस्तावना करून रावणानें तीन श्लोक सांगितले आहेत. यावरून रामायण निर्माण होण्यापूर्वीं छंदोबद्ध वाणी नव्हती, असें म्हणतां येत नाहीं. काव्यसंज्ञेला पात्र अशी पद्यरचना पूर्वीं झालेली नव्हती व ती वाल्मीकींनीं प्रथम केली, अशी आदिकवि या संज्ञेची व्याख्या केली, तरी त्याला कांहीं प्राचीन ग्रंथ आडवे येतील. भाषेमध्यें श्रेष्ठप्रतीचें काव्य वाल्मीकींनीं प्रथम केल्यावरून त्यांना आदिकवि ही श्रेष्ठ पदवी प्राप्त झाली असावी, असें म्हणून आपलें समाधान करून घेणें भाग आहे. वस्तुतः छंदोबद्ध वाणी आपण प्रथम निर्माण केली, असा अभिमान वाल्मीकींनाहि दिसत नाहीं. " मा निषाद " हा श्लोक त्यांच्या तोंडांतून आल्याबरोबर त्यांना जो विस्मय वाटला, तो आपण शापवाक्य बोलत असतां तें सहज छंदोबद्ध निपजल्याबद्दल होय; आणि या गोष्टीवरून पूर्वीं छंदोबद्ध वाणी होती, असें सिद्ध होतें. अन्यथा आपल्या तोंडांतून निघालेली वाणी छंदोबद्ध आहे, हें त्यांना कळणें शक्य नव्हतें.

## रावणाची बंदिशाला.

रावणाची बंदिशाला हें नांव पाहतांच रावणाचे बंदिशालेचें वर्णन आतां

यावयाचें आहे, असा वाचकांचा ग्रह होईल व तो युक्तहि आहे; पण रावणाच्या या बंदिशालेचा शोध करण्याचा आमचा हेतु वेगळा आहे. रावणाचे पराक्रम व त्याचे अत्याचार कळसास पोंचल्याचें सांगतांना त्यानें देवांना आपल्या बंदिशालेंत कोंडून ठेविलें होतें, ती बंदिशाला केवढी होती वगैरे जिज्ञासा वाचकांचे मनांत येणें साहजिक आहे. तेव्हां रामायणांत या बंदिशाळेचें कांहीं वर्णन मिळाल्यास पाहूं. देशभक्तांच्या बंदिवासांतील हालांचीं वर्णनें तीव्र जिज्ञासेनें पण संतापमिश्रित खेदांत कोणीहि वाचक वाचतो, मग देवांच्या बंदिवासाचें वर्णन बाहेर आल्यास तें तो अधिक उत्सुकतेनें नाहीं का वाचणार ?

पण रामायण उघडल्यास त्यांत काय आहे ? नाना देशींच्या सुंदर स्त्रिया रावणानें अंतःपुरांत आणून ठेविल्या होत्या, त्यांचा मात्र बंदिवास रामायणांत दिसतो आहे. सीतेला वश करण्यासाठीं त्यानें तिचा किती छल केला, त्याचें रामायणांत विस्तृत वर्णन आहे व या दृष्टीनें पाहिलें तर त्याचें अंतःपुर हीच सुंदर स्त्रियांची विशाल बंदिशाला होती, असें म्हणण्यास अडचण नाहीं. त्याच्या बंदिशालेचें रामायणांत वर्णन नाहीं, मग त्यांत देवांचा कोंडमारा कसला व्हावयाचा ?

स्वतां रावणानें आपल्या पराक्रमाचें जें वर्णन केलें आहे त्यावरून तर देव बंदिशालेंत नसून मोकळे होते, असें दिसतें. यतिवेषानें गेलेल्या रावणानें आपलें खरें नांव सांगून जेव्हां सीतेशीं आपली पत्नी होण्याविषयीं त्यानें गोष्ट काढिली तेव्हां तिनें केलेली निर्भर्त्सना श्रवण करून तो क्रुद्ध झाला व आपला अधिकार केवढा आहे, हें सांगूं लागला. त्यांत तो म्हणतो " मृत्यूला पाहून ज्याप्रमाणें सर्व प्राणी पळत सुटतात त्याप्रमाणें मला पाहून देव, गंधर्व, पिशाच्च, पक्षी व उरग हे पळत सुटतात.........मी क्रुद्ध झालों असतां हे मैथिली, माझें मुख पाहून इंद्रादि देव त्रस्त होऊन पळून जातात. जेथें मी रहातों तेथें वाराहि भीतभीत वहात असतो. सूर्यहि माझ्या भीतीनें आकाशांत शीतल होतो. फार काय सांगावें ? मी रहातों त्या प्रदेशांतील वृक्षांचीं पानें हालत नाहींत व नद्यांचें उदकहि स्तिमित असतें. " ( ३।४७।३ व ७–९ ) हे उद्गार रावणाचे तोंडचे आहेत. रावणानें आपल्या बंदिशाळेंत देवांना खरोखर कोंडून ठेविलें असतें तर त्यानें तसें अभिमानानें सांगितलें नसतें काय ? देव रावणाला भीत असले तरी त्यांना

पळावयाला वाव होती, असें रावणाचे बोलण्यावरून होत आहे. ते बंदिशाळेंत पडले असते तर त्यांनीं पळून कसें जावयाचें? आणि बंदिशाळेंत कोंडल्यावर रावणानें तरी आणखी पराक्रम कसला गाजवावयाचा?

पण बंदिशाला बंदिशाला म्हणजे तरी काय आहे? विशिष्ट लांबीरुंदीचें व भोंवतीं उंच तटबंदी असलेलें आणि बाहेर पडावयाचीं द्वारें बंद केलेलें घर अशी तिची व्याख्या कोणीं कोठें केली आहे काय? बंदिशाळांचीं मोठमोठीं घरें आपण पहातों व त्यावरून आपण तिचें लक्षण ठरवितों आणि तिचें नांव घेतांच या लक्षणाचें घर आपल्या डोळ्यांला दिसूं लागतें; पण याला प्रमाण काय? आमची समजूत हेंच ना? पण एकाद्या राजानें आपल्या प्रतिपक्ष्याला बंदीत टाकावयाचें म्हणजे तरी काय करावयाचें? तो त्याचें अन्न तोडीत नाहीं व त्यामुळें तो कालवश होण्याची भीति नसते. तो बंदिशाळेंत कोंडला गेला म्हणजे त्याचे पुढील उद्योग बंद पडतात व त्याला बंदिशाळेंत टाकण्यांत राजाचा हेतु हाच असतो. राजाच्या या हेतूकडे पाहिलें म्हणजे त्याला अनुसरून प्रतिपक्ष्याचे पुढील उद्योग राजानें दुसरे उपाय योजून बंद पाडल्यास त्याला बंदिशाळेंत प्रत्यक्ष कोंडून ठेवण्याचें प्रयोजन रहात नाहीं. "दगडी भिंतीभोंवतीं बांधून तुरुंग होत नाहीं किंवा लोखंडी गजांचा सांपळा होत नाहीं." अशा अर्थाची इंग्रजींत एक म्हण* आहे व तींत हेंच तत्त्व सांगितलेलें आहे. रावणानें आपल्या बंदिशाळेंत देवांला कोंडलें होतें असें नव्हे, पण रावणाचे पराक्रमापुढें त्यांचे सर्व उद्योग थांबले होते. इतकेंच नव्हे तर तो नानाविध अत्याचार करीत असतां त्याचा प्रतिकार करण्यास कोणी पुढें आला नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. रावणाची पीडा दुःसह होऊन तो सर्वांना केव्हां मरेल असें झालें होतें; पण त्याचे प्रतिकाराचा यत्न कोणीं केलेला नाहीं. रावणाहून अधिक पराक्रमी म्हणून वालि व कार्तवीर्य यांचीं नांवें उत्तरकांडांत आलीं आहेत, तथापि त्या दुष्टाचें निर्मूलन करून सज्जनांचें रक्षण करावें ही कल्पना त्यांचे ठायीं नव्हती. त्यांनीं आपला पराक्रम दाखवून त्याला चकित केलें व यामुळें त्यानंतर तो त्यांचे वाटेस गेला नाहीं इतकेंच. दशरथा-

* Stone walls cannot make a prison nor iron bars a cage.

कडे विश्वामित्र यज्ञरक्षणाकरितां रामलक्ष्मणांना मागण्याकरितां आले त्या वेळीं रावणाचें नांव घेतांच तो कसा घाबरून गेला, हें रामायणांत सांगितलेंच आहे. त्याचे प्रतिकाराचा संघटित यत्न कोणीं केला नाहीं. समाजाच्या लाभहानीचा विचार करून त्याकरितां यत्न करण्याची कल्पना त्या वेळीं दिसून येत नाहीं. रामानें तरी पत्नीचा अपहार रावणानें केला तेव्हां निरुपाय होऊन हा यत्न केला. विश्वामित्र ज्याप्रमाणें यज्ञाची समाप्ति निर्विघ्न झाल्यावर तपश्चर्येकरितां निघून गेले, त्याप्रमाणें सर्वांची स्थिति होती. स्वार्थाकडे दृष्टि नाहीं व मनांत लोभ नाहीं, पण त्याचा विनियोग मात्र समुद्रावर होणारे पर्जन्यवृष्टीप्रमाणें अस्थानीं होत होता. म्हणजे पराक्रमी पुरुषांना त्याची भीति नव्हती व म्हणून त्याचे नाशाची आवश्यकता वाटत नव्हती; आणि दशरथासारख्या ज्या पुरुषांना त्याची आवश्यकता पटण्यासारखी होती ते उद्योगाकडे लक्ष न देतां दैवावर दृष्टि ठेवून राहिले होते. रावणानें सीतेचा अपहार केला, त्या वेळीं " यांतच रावणाचा अंत होणार " असें सिद्ध बोलूं लागल्याचें ( ३।५४।२७ ) व ब्रह्मदेवानें आपलें कार्य झालें असे उद्गार काढिल्याचें ( ३।५२।११ ) रामायणांत वर्णन आहे आणि यांतच त्या वेळच्या देव आणि मनुष्य या दोनहि समाजांच्या मनोवृत्तींचें सार आहे. रावणासारख्या दुष्टांनीं तपश्चर्या करावी, यज्ञ करावे आणि देवांनीं त्यांना वर द्यावे आणि इकडे विश्वामित्रासारख्यांनीं यज्ञ केले तर त्यांनाहि वर द्यावे अशी देवांची स्थिति होती. विश्वामित्रासारख्यांचे यज्ञांत विघ्न करणारे जे राक्षस त्यांचा निःपात देवांनीं कोणत्याहि प्रकारें केला नाहीं. यज्ञांत विघ्नें येऊं लागल्यामुळें ते बंद होण्याची पाळी आली तरी त्याकडे कोणीं लक्ष दिलें नाहीं. हविर्भाग न मिळाल्यामुळें त्यांना काय खेद वाटत असेल तो वाटो. पंचांगापुरता टिळकपक्ष, टोपीपुरता गांधीपक्ष आणि पोटापुरता नोकरीचा पक्ष असे तीन पक्ष धारण करणारी मंडळी ज्याप्रमाणें आपण सध्यां पाहतों, तोच प्रकार त्या वेळीं देवांतील व मनुष्यांतील मोठ्या पुरुषांमध्येंहि झाला होता. हीच रावणाची बंदिशाला दुसरें काय? दंतकथेंतील रावणाची बंदिशाला वास्तविक नसली तरी रावणाची ही बंदिशाला विशाल होती. तिला भोंवतीं गज नव्हते आणि बाहेर बंद करण्यास द्वार अथवा कुलूप नव्हतें; पण तींत त्या वेळचा सर्व

समाज कोंडला गेला होता. रामानें रावणाचा वध केला तेव्हां या बंदिशाळेंत पडलेल्या बंदिवानांची मुक्तता झाली.

## अहल्योद्धार.

गौतमाची स्त्री अहल्या हिनें इंद्राशीं व्यभिचार केल्यामुळें ती शिला होऊन पडली होती व रामाच्या पादस्पर्शानें ती शापमुक्त झाली अशी कथा सांप्रत प्रसिद्ध आहे. रामायणांत ही कथा वेगळ्या प्रकारानें सांगितली आहे. गौतमानें अहल्येला शिला होण्याबद्दल शाप दिला नव्हता, तर तूं वायुभक्षण करीत अरण्यांत अदृश्य होऊन पडून राहशील असा दिला होता. रामानें तिला आपल्या पायांचा स्पर्श केला नसून त्यानेंच तिला वंदन केलें व त्याचें स्वागत केल्यावर ती शापमुक्त झाली. या कथेंतील महत्त्वाचा भाग मुद्दाम खालीं दिला आहे. गौतमाचा शाप प्रथम खालीं देतों:–

**इह वर्षसहस्राणि बहूनि निवसिष्यसि ॥ १।४८।२९ ॥**
**वातभक्षा निराहारा तप्यन्ती भस्मशायिनी ।**
**अदृश्या सर्वभूतानां आश्रमेऽस्मिन्वसिष्यसि ॥ ३० ॥**
**यदा त्वेतद्वनं घोरं रामो दशरथात्मजः ।**
**आगमिष्यति दुर्धर्षस्तदा पूता भविष्यसि ॥ ३१ ॥**
**तस्यातिथ्येन दुर्वृत्ते लोभमोहविवर्जिता ।**
**मत्सकाशं मुदा युक्ता स्वं वपुर्धारयिष्यसि ॥ ३२ ॥**

" दुसरा कसलाहि आहार न करितां वायुभक्षण करीत व पीडा सहन करीत राखेवर पडून या ठिकाणीं हजारों वर्षे राहशील. तुझें दर्शन कोणत्याहि प्राण्याला होणार नाहीं. दशरथाचा पुत्र पराक्रमी राम ज्या वेळीं या घोर अरण्यांत येईल त्या वेळीं तूं शुद्ध होशील. त्याचा आदरसत्कार केलास म्हणजे हे दुराचारिणि, तुझा लोभ व मोह नाहींसा होऊन आनंदानें माझ्यापाशीं येऊन तुला पूर्वरूप प्राप्त होईल."

तसेंच विश्वामित्र आश्रमाजवळ आल्यावर रामाला म्हणतो:–

**तदागच्छ महातेज आश्रमं पुण्यकर्मणः ॥१।४९।११॥**
**तारयैनां महाभागामहल्यां देवरूपिणीम् ।**
**विश्वामित्रवचः श्रुत्वा राघवः सहलक्ष्मणः ॥ १२ ॥**

**विश्वामित्रं पुरस्कृत्व आश्रमं प्रविवेश ह।**
**ददर्श च महाभागां तपसा द्योतितप्रभाम्॥ १३॥**
**शापस्यान्तमुपागम्य तेषां दर्शनमागता॥ १७॥**
**राघवौ तु तदा तस्याः पादौ जग्राहतुर्मुदा।**
**स्मरन्ती गौतमवचः प्रतिजग्राह सा हि तौ॥ १८॥**

"तर हे महातेजस्वी रामा, त्या पुण्यकर्म्या गौतमऋषीच्या आश्रमांत चल आणि त्या महाभाग देवरूपिणी अहल्येला शापमुक्त कर. विश्वामित्राचें भाषण श्रवण करून त्याला पुढें करून राम आणि लक्ष्मण त्या आश्रमांत गेले. त्या महाभाग अहल्येचें तेज तपश्चर्येच्या योगानें चोहोंकडे फांकलें होतें. या वेळीं तिच्या त्या शापाची मुदत संपल्यामुळें तिचें त्यांना दर्शन झालें. तिला पाहतांच दोघांनीं आनंदानें तिला वंदन केलें व गौतमाचें सांगणें लक्षांत आणून तिनेंहि त्यांचा सत्कार केला."

ही कथा पुनः उत्तरकांडांत आली आहे. दोहोंमध्यें विशेष फरक नाहीं. वरील उताऱ्यांवरून लोकांत प्रचलित असलेल्या कथेंत किती फेरफार होत गेला आहे हें दिसून येईल. अहल्या शिला झाली नसून वातभक्षण करीत ती तपश्चर्या करीत होती, असें "तपसा द्योतितप्रभाम्" या तिला दिलेल्या विशेषणावरून दिसतें. उत्तरकांडांतील कथेंत तर ती शाप मिळाल्यावर तपश्चर्या करूं लागली असें सांगितलें आहे:—

**एवमुक्त्वा स राजर्षिराजगाम स्वमाश्रयम्।**
**तपश्चचार सुमहत्सा पत्नी ब्रह्मवादिनः॥ ७।३०।४९॥**

"याप्रमाणें बोलून तो ब्रह्मवादी गौतम मुनि आपल्या आश्रमाला निघून गेला आणि त्याच्या पत्नीनें मोठी तपश्चर्या चालविली."

या हकीगतीवरून अहल्या ही शिला झाली होती असा अप्रत्यक्षपणेंहि रामायणांत उल्लेख दिसत नाहीं. या कथेची उत्पत्ति मागाहून केव्हां झाली हें सांगतां येणें कठीण आहे. फार प्राचीन कालापासून ही कथा सांप्रतच्या तिच्या अवस्थेंत लोकांना माहीत आहे. या दंतकथेला अनुसरून पुष्कळ टीकाकारांनीं रामायणावरील टीकेंत दोनहि कथांचे मेळ घालण्याचे अत्यंत परिश्रम केले आहेत.

कांहीं टीकाकारांनीं पद्मपुराणादिकांचे उतारे घेऊन वाचकांचें समाधान करण्याचा प्रयत्न केला आहे. रामायणासारख्या प्रामाणिक ग्रंथांतील स्पष्ट शब्दांवर विश्वास न ठेवितां लौकिकी कथांची सत्यता सिद्ध करण्याचा प्रयत्न करणें आम्हांला केवळ हास्यास्पद वाटतें.

## सीताविवाह.

रामायणांतील महत्त्वाच्या कथांपैकीं सीताविवाहाबद्दल नानातऱ्हेच्या कथा प्रचलित आहेत. सीताविवाहाचें लौकिकी नांव म्हटलें म्हणजे सीतास्वयंवर हें होय. या नांवावरून दोहोंतील भेद कळण्यासारखा आहे. जनकराजानें धनुष्याचा पण लावून सीतेचें स्वयंवर आरंभिलें. त्या प्रसंगीं जमलेल्या राजांबरोबर रावणहि आला होता. धनुष्याची प्रत्यंचा चढवीत असतां तें रावणाच्या वक्षःस्थलावर पडलें व तेथून तें राम उचलीत असतां त्याचा मध्येंच भंग झाला, अशी दंतकथा आहे. रामायणांत सीतास्वयंवराचा किंवा त्याकरितां रावण आल्याचा मुळींच उल्लेख नाहीं. अनेक राजांनीं सीतेला मागणी घातली असतां पराक्रमी पुरुषालाच सीता द्यावयाची असा आपला निश्चय जनकानें जाहीर केला. यामुळें निरुपाय होऊन सर्व राजांनीं मिथिलेला वेढा दिला व सुमारें एक वर्षानें तपश्चर्येच्या योगानें त्याला देवांचें साहाय्य मिळून त्यानें त्यांचा पराभव केला. ही गोष्ट घडून आल्यानंतर बरेच दिवसांनीं सीतेचा रामाशीं विवाह झाला. विश्वामित्र यज्ञ पाहण्याकरितां जनकाकडे रामलक्ष्मणांना घेऊन गेले. जनकाचें प्रसिद्ध धनुष्यहि त्यांना दाखविण्याचा महर्षींचा हेतु होता. विश्वामित्रप्रभृति ऋषींनीं रामाला प्रथम कळविलें, तें असें:—

**मैथिलस्य नरश्रेष्ठ जनकस्य भविष्यति ।**
**यज्ञः परमधर्मिष्ठस्तत्र यास्यामहे वयम् ॥ १।३१।६ ॥**
**त्वं चैव नरशार्दूल सहास्माभिर्गमिष्यसि ।**
**अद्‌भुतं च धनूरत्नं तत्र त्वं द्रष्टुमर्हसि ॥ ७ ॥**

"हे नरश्रेष्ठा रामा, मिथिलाधिपति जनकराजाकडे मोठा धर्मयुक्त यज्ञ होणार आहे, तिकडे आम्हीं जात आहों. तर हे पुरुषश्रेष्ठा, तूं आमचेबरोबर चल, म्हणजे तेथें तें अद्‌भुत व श्रेष्ठ धनुष्य तुला पाहण्यास मिळेल."

जनकाकडे गेल्यावर विश्वामित्रांनीं त्याला सांगितलें कीं:--

**पुत्रौ दशरथस्येमौ क्षत्रियौ लोकविश्रुतौ ।**
**द्रष्टुकामौ धनुःश्रेष्ठं यदेतत्त्वयि तिष्ठति ॥ १।६६।५ ॥**
**एतद्दर्शय भद्रं ते कृतकामौ नृपात्मजौ ।**
**दर्शनादस्य धनुषो यथेष्टं प्रतियास्यतः ॥ ६ ॥**

" हे दशरथाचे पुत्र क्षत्रिय असून लोकांत यांची ख्याति आहे. तुझ्याकडे असलेलें धनुष्य पहावें अशी त्यांची इच्छा आहे. तर तें त्यांना दाखव. तें पाहिल्यावर ते जावयाचें असेल तिकडे निघून जातील. तुझें कल्याण असो."

यावरून रामाकडून धनुष्याची प्रत्यंचा चढविण्याची कल्पना विश्वामित्रांच्या मनांत होती, असें वाटत नाहीं. तें जगविख्यात धनुष्य रामाला दाखविण्यापलीकडे विश्वामित्रांच्या मनांत कांहीं नव्हतें. विवाहाचा योग अकल्पित जुळून आला. स्वयंवरासंबंधानें जी दंतकथा आहे त्यांतील जनकानें आपली कन्या वीर्यशुल्का असल्याचें जाहीर केल्याचा भाग खरा आहे. रामानें धनुर्भंग केल्यावेळीं जी सभा भरली होती ती स्वयंवराकरितां जमली होती; धनुर्भंग झाल्यावर जनकाच्या बोलण्यावरून राजा दशरथ मिथिलेला आल्यावरहि या यज्ञाची समाप्ति झाली नव्हती. कारण दशरथ आल्यावर जनकानें त्याला असें कळविलें आहे:-

**श्वः प्रभाते नरेंद्र त्वं संवर्तयितुमर्हसि ।**
**यज्ञस्यान्ते नरश्रेष्ठ विवाहमृषिसत्तमैः ॥ १।६९।१२ ॥**

" हे राजा, उद्या सकाळीं हा यज्ञ समाप्त झाल्यावर या थोर थोर ऋषींच्या साहाय्यानें आपण विवाह उरकून घ्यावा."

## लक्ष्मणाचें वनवासांतील व्रत.

रामाबरोबर लक्ष्मण चौदा वर्षेंपर्यंत वनांत राहण्यास सिद्ध झाला व त्याप्रमाणें तो राहिला, हें रामायणावरून आपणांस कळतें. लक्ष्मण वनामध्यें असतां तेथें त्यानें कोणताहि आहार केला नाहीं व निद्रा घेतली नाहीं अशी लोकांत समजूत आहे. लक्ष्मण हा शेषाचा अवतार; तेव्हां त्याला नागाप्रमाणें केवळ वायु भक्षण करीत राहतां आलें असें कारणहि येथें कोणी सांगतात; पण रामायणांत याला आधार नाहीं. उलट लक्ष्मणाचे आहारनिद्रादि व्यवहार रामाप्रमाणें वनांत चालू

होते अशाविषयीं प्रमाणें रामायणांत आढळतात. अत्रिऋषींचे आश्रमांतून राम पुढें गेल्यावर तेथें एक ऋषींचें आश्रममंडल त्याला आढळलें; ऋषींनीं रामाचा चांगला सत्कार करून स्वतांचे रक्षणाविषयीं त्याला विनंति केली. येथील संवादाचे शेवटीं पुढील श्लोक आहेः——

**एवमुक्त्वा फलैर्मूलैः पुष्पैरन्यैश्च राघवम् ।**
**वन्यैश्च विविधाहारैः सलक्ष्मणमपूजयन् । ३।१।२३ ॥**

" याप्रमाणें भाषण करून त्यांनीं लक्ष्मणासहवर्तमान रामाला फळें, मुळें, पुष्पें व वनांतील इतर नानाविध भक्ष्य पदार्थ समर्पण करून त्याचें पूजन केलें. "

भक्ष्य पदार्थ रामाला समर्पण केल्याचें येथें लिहिलें असलें तरी लक्ष्मणासह रामाचा निर्देश आहे व त्यावरून भक्ष्य पदार्थ दोघांनाहि अर्पण केल्याचें दिसत आहे. लक्ष्मणानें येथें या भक्ष्य पदार्थांचा निषेध केल्याचें लिहिलेलें नाहीं.

या वर्णनानें कोणाचें समाधान न झाल्यास अगस्त्याश्रमांतील पुढील सत्कार पहाः——

**अग्निं हुत्वा प्रदायार्घ्यमतिथीन् प्रतिपूज्य च ।**
**वानप्रस्थेन धर्मेण स तेषां भोजनं ददौ ॥३।१२।१७ ॥**

" अग्नीमध्यें हवन केल्यावर त्या मुनींनीं आपल्या अतिथींची ( राम, लक्ष्मण व सीता यांची ) अर्घ्य वगैरे अर्पण करून पूजा केली व वानप्रस्थ धर्मानुरूप त्यांनीं त्या सर्वांना भोजन घातलें. " येथें तर तिघांनीं भोजन केल्याचें स्पष्ट सांगितलें आहे.

भरद्वाज मुनींचे आश्रमातून राम पुढें गेल्यावर यमुनावनांत त्यांनीं मुक्काम केला. येथें रात्र उजाडली तरी लक्ष्मण उठला नाहीं, याकरितां रामानें त्याला हांका मारून उठविलें, असें स्पष्ट सांगितलें आहे. (२।५६।१–३ ) तेव्हां वनांत तो निजत असे किंवा नाहीं याविषयीं शंका नको. गुहाचे राजधानींत त्यांचा मुक्काम होता त्या वेळीं गुहानें रामाला निद्रा करण्यास सांगून रक्षणार्थ आपण जागत राहतों, असें सांगितलें. या वेळीं राम व सीता झोंपीं गेले असतां लक्ष्मण व गुह यांचा जो संवाद झाला त्यांत लक्ष्मणाचे तोंडीं " दाशरथी राम

सीतेसह भूमीवर निजला असतां मला निद्रा, जीवित आणि सुखोपभोग कसले प्राप्त व्हावयाचे?" ( २।५१।९ ) असे उद्गार आहेत. रामाविषयीं लक्ष्मणाचे मनांत प्रेम व आदर किती वास करीत होता, हें प्रसिद्ध आहे व त्याचे हे उद्गार तदनुरूप आहेत. तथापि हें वर्णन अलंकारिक आहे व याकरितां त्यावरून वस्तुस्थिति अनुमानावयाची नाहीं, हें विसरतां नये. अशा या उद्गारांवरून लक्ष्मणाविषयींची समजूत लोकांत पसरली नसेल ना?

## सेतुबंध.

राम वानरसैन्यासह लंकेवर चालून गेला, तेव्हां समुद्रांतून जाण्याकरितां त्यावर वानरांनीं सेतु बांधिला होता. या सेतूचे दगड नल वानराला असलेल्या वराच्या योगानें पाण्यावर तरले, अशी आख्यायिका आहे. ही फार प्राचीन काळापासून प्रचलित असून तीवर सर्व लोकांची श्रद्धा आहे. कवींनीं या कथेच्या पायावर नानातऱ्हेच्या कोटया लढविल्या असून श्रोत्यांचें मनोरंजन केलें आहे. या कथेला रामायणांत मुळींच आधार नाहीं. सेतु बांधितेवेळीं वानरांनीं काय केलें, त्याचें वर्णन रामायणांतून उतरून घेऊन खालीं देत आहों.

**ततो विसृष्टा रामेण सर्वतो हरिपुंगवाः ।**
**उत्पपेतुर्महारण्यं हृष्टाः शतसहस्रशः ॥ ६।२२।५१ ॥**
**ते नगान्नागसंकाशाः शाखामृगगणर्षभाः ।**
**बभंजुः पादपांस्तत्र प्रचकर्षुश्च सागरम् ॥ ५२ ॥**
**ते सालैश्चाश्वकर्णैश्च धवैर्वंशैश्च वानराः ।**
... ... ... ... ... ... ... ... ...
**चूतैश्चाशोकवृक्षैश्च सागरं समपूरयन् ॥ ५४ ॥**

" रामानें आज्ञा केल्यावर ते शेंकडों व हजारों थोरथोर वानर आनंदानें सर्व दिशांकडील मोठमोठ्या अरण्यांत गेले. पर्वताप्रमाणें धिप्पाड असलेल्या त्या श्रेष्ठ वानरांनीं मोठमोठे अचल वृक्ष मोडून समुद्राजवळ आणिले. साल, अश्वकर्ण, धव, वेळू, ... ... आंबा व अशोक ( वगैरे ) वृक्ष त्यांनीं समुद्रांत टाकिले आणि तो भरून टाकिला."

या उताऱ्यांत दगड तरले असा उल्लेख मुळींच नसून उलट पर्वत, शिला व वृक्ष समुद्रांत टाकून पलीकडे जाण्यास एक जंगी बांधवाट तयार केली, असें स्पष्ट सांगितलें आहे. दगड समुद्रावर तरले ही कथा कशी प्रचारांत आली असेल, तें कळत नाहीं. समुद्रांत तरण्याऐवजीं ते पाण्यांत बुडाले होते, असें रामायणांत लिहिलें आहे:—

**प्रक्षिप्यमाणैरचलैः सहसा जलमुध्दृतम् ।**
**समुत्ससर्प चाकाशमवासर्पत्ततः पुनः ॥ ६।२२।५८॥**
**समुद्रं क्षोभयामासुर्निपतन्तः समंततः ।**

" ते वानर समुद्रांत पर्वत फेंकून देत, त्या वेळीं त्याचें पाणी वर आकाशापर्यंत उसळून जाई व पुनः खालीं येई. याप्रमाणें सर्व बाजूंनीं आंत दगड पडत होते, त्यायोगानें समुद्र क्षुब्ध होऊन गेला. "

या श्लोकांवरून, विशेषतः शेवटच्या चरणांतील " निपन्ततः " या पदावरून दगड समुद्रांत बुडाले होते, असें सिद्ध होतें. शार्दूल नांवाचा रावणाचा हेर रामाच्या सैन्याची टेहळणी करण्यास गेला होता. त्यानें तिकडील हकीगत सांगतांना खालील उद्गार काढिले आहेत:—

**एष शैलशिलाभिस्तु पूरयित्वा महार्णवम् ।**
**द्वारमावृत्य लंकाया रामस्तिष्ठति सायुधः ॥ ६।३०।११ ॥**

" दगड आणि पर्वत यांनीं महासागर भरून काढून हा राम आपल्या शस्त्रांसहवर्तमान लंकेच्या दाराशीं येऊन भिडला आहे. "

या श्लोकांतील " पूरयित्वा " या पदावरून समुद्रावर दगड तरले होते, असें दिसून येत नाहीं; समुद्रांत दगड टाकूनच त्यांना काम करावें लागलें होतें.

## हनुमज्जन्म.

मारुतीच्या जन्मासंबंधीं लोकांत निरनिराळ्या आख्यायिका बऱ्याच आहेत. पुत्रकामेष्टि करीत असतां दशरथाला अग्नीनें प्रसादाचे पिंड दिले व त्यानें ते आपल्या स्त्रियांना वांटून दिले. वांटणी बरोबर न मिळाल्यामुळें कैकेयी रुसली असतां वारीनें तिच्या हातांतील पिंड उचलून अंजनानामक वान[illegible] [illegible]तांत

नेऊन टाकिला. तो भक्षण केल्यावर तिला मारुती हा पुत्र झाला. हा जन्मतांच उदयाचलावर आलेला सूर्य फल असें समजून तें भक्षण करण्यासाठीं त्यानें उड्डाण केलें. त्या वेळीं इंद्रानें त्याजवर वज्र फेंकिलें, त्याच्यायोगानें त्याची हनुवटी भंगून त्याला हनुमान् हें नांव पडलें. याप्रमाणें प्रचलित कथा आहे. मारुतीच्या जन्मासंबंधीं रामायणांत एकंदर तीन कथा आहेत. किष्किंधाकाण्डांत जांबवानानें मारुतीला, युद्धकाण्डांत शुक राक्षसानें रावणाला व उत्तरकाण्डांत अगस्त्यऋषींनीं रामाला ही कथा सांगितली आहे. उत्तरकाण्डांतील कथा मूळ वाल्मीकिरामायणांत नसून प्रक्षिप्त आहे. हा भाग प्रक्षिप्त कां मानिला पाहिजे, याचीं कारणें एका स्वतंत्र भागांत द्यावयाचीं आहेत, याकरितां त्याबद्दल येथें विवेचन करीत नाहीं. तेव्हां ही कथा सोडून दिली म्हणजे दोनच कथा उरतात. यांपैकीं जन्मकथा जांबवानाच्या भाषणांतच असून हनुमान् नांव पडण्याचें कारण दोनहि कथांत सांगितलें आहे. जन्मकथा लोकांत प्रचलित असलेल्या कथेहून फार वेगळी आहे. एकदां अंजना मनुष्यरूपानें पर्वतावर फिरत असतां तिला पाहून वायु मोहित झाला व त्याजपासून तिला मारुती हा पुत्र झाला. हा लहान असतांना ( जन्मल्याबरोबर नव्हे, ) एकदां सूर्य उदयाचलावर आलेला पाहून तें फल आहे, असें समजून तें भक्षण करण्याच्या हेतूनें त्यानें आकाशांत उड्डाण केलें; पण त्या तेजोगोलाजवळ जाणें कोणालाहि अशक्य असल्यामुळें तो मध्येंच पडला व उदयाचलावरील एका शिलातलावर त्याची हनुवटी थोडीशी फुटली. इतक्या उंचीवरून पडून त्याला फार इजा झाली नाहीं, हें पाहून तेव्हांपासून लोक त्याला हनुमान् असें म्हणूं लागले. मुद्याचे श्लोक खालीं देत आहों:--

अनाधृष्यतमं देवमपि देवर्षिराक्षसैः ।
अनासाद्यैव पतितो भास्करोदयने गिरौ ॥ ६।२८।१४ ॥
पतितस्य कपेरस्य हनुरेका शिलातले ।
किंचिद्भिन्ना दृढहनुर्हनुमानेष तेन वै ॥ १५ ॥

" देव, ऋषि किंवा राक्षस या सर्वांना त्या सूर्यासमोर जातां येत नाहीं, यामुळें याला पुढें जातां आलें नाहीं व तो उदयाचलावर पडला व त्या वेळीं

हा बलिष्ठ असल्यामुळें याच्या हनुवटीला थोडीशी दुखापत झाली व तेव्हांपासून त्याला हनुमान् असें नांव पडलें. ”

हा उतारा युद्धकांडांतील शुकराक्षसाचे भाषणांतून घेतला आहे. किष्किंधाकांडांतील कथेंत इंद्रानें वज्र फेंकिल्याचा उल्लेख आहे; तथापि मारुतीची हनुवटी फुटली ती वज्रानें फुटली नसून शिलातलावरच पडून फुटली, असें तीनहि कथांमध्यें सांगितलें आहे.

**तदा शैलाग्रशिखरे वामा हनुरभज्यत ।। ४।६६।२४॥**
**ततो गिरौ पपातैष इंद्रवज्राभिताडितः ।**
**पतमानस्य चैतस्य वामा हनुरभज्यत ॥ ७।२५।४७ ॥**

“ त्या वेळीं पर्वतशिखरावर हा पडला असतां त्याचे डावे बाजूची हनुवटी फुटली. ” “ इंद्राचें वज्र याला लागतांच तो पर्वतावर पडला आणि त्याचे डावे बाजूची हनुवटी फुटली. ”

खुद्द मारुतीला त्याजकडून कार्य करून घ्यावयाचे वेळीं जांबवानानें सांगितलेल्या कथेंत कांहीं तरी अतिशयोक्ति असण्याचा संभव आहे. याकरितां त्यांचा शत्रु जो रावण त्याजकडे त्याच्या हेरानें सांगितलेली कथा तिच्याहून अधिक विश्वसनीय व अतिशयोक्तिरहित वाटल्यामुळें तिचा सारांश वर दिला आहे.

## कुशलवचरित्र.

लव व कुश यांसंबंधीं लोकांत अनेक दंतकथा आहेत. लवकुशचरीत्रावर मराठी कवींचीं अनेक आख्यानें असून संस्कृतांत प्रसिद्ध कवि भवभूति याचें उत्तररामचरीत नांवाचें नाटक आहे. हीं आख्यानें व रामायण यांत विलक्षण भेद आहे. या भेदाचा परिणाम असा झाला आहे कीं, त्याच्यायोगानें रामचरिताचें पर्यवसान भिन्न रसांत झालें आहे. रामानें अश्वमेधाचा अश्व सोडिला असतां फिरत फिरत तो वाल्मीकीच्या आश्रमाजवळ आला. तेव्हां लवकुशांनीं तो धरिला व त्यांचें रामाच्या सैन्याशीं युद्ध झालें. त्या युद्धांत रामसैन्याचा पराभव होऊन त्यांनीं लवकुशांना सीतेसह अयोध्येला नेलें, अशी कथा लोकांत प्रसिद्ध आहे. रामायणांत या गोष्टीचा मुळींच संबंध नाहीं. अश्वमेधाच्या वेळीं लवकुशांना

घेऊन वाल्मीकि अयोध्येस गेले होते. तेथें त्यांनीं रामाच्या दरबारांत रामायण गाऊन दाखविलें व अशा रीतीनें रामाची व त्यांची ओळख झाली. नंतर वाल्मीकींनीं सीतेकडून दिव्य करविलें; परंतु या वेळीं पृथ्वी प्रकट होऊन तिनें सीतेला नेल्यामुळें तिची व रामाची मुळींच भेट झाली नाहीं. याप्रमाणें वाल्मीकिरामायणांत कथा सांगितली आहे. लवकुश हे मोठे योद्धे म्हणून लोकांत प्रसिद्ध आहेत. व रामायणांत त्यांचें गवई म्हणून वर्णन केलें आहे. प्रचलित दंतकथा सोडून दिली तर प्राचीन संस्कृत वाङ्मयांत ते गवई म्हणूनच प्रसिद्ध असावेत असें वाटतें. त्यांच्या गायनकौशल्यावरूनच संस्कृत भाषेंत गवई या अर्थी कुशीलव हा शब्द पडला आहे. या स्वभावभेदामुळें रामचरिताचें पर्यवसान दंतकथेंत आनंदामध्यें व रामायणांत दुःखामध्यें झालें आहे.

## रामायणरचनेचे वेळीं कुशलवांचें वय.

रामायणाची रचना झाली त्या वेळीं लवकुशांचें वय बारा वर्षांहून अधिक नव्हतें, असें उत्तरकांडांतील कथाभागावरून दिसून येतें. सीतेचा त्याग केल्यानंतर थोडक्याच दिवशीं शत्रुघ्न लवणाचा वध करण्याकरितां निघून गेला. तो जातांना वाटेंत वाल्मीकींच्या आश्रमांत उतरला होता. त्याच दिवशीं सीता प्रसूत होऊन तिला लव व कुश हे दोन पुत्र झाले.

**यामेव रात्रिं शत्रुघ्नः पर्णशालां समाविशत् ।**
**तामेव रात्रिं सीताऽपि प्रसूता दारकद्वयम् ॥** ७।६६।१ ॥

" ज्या रात्रीं शत्रुघ्न त्या पर्णकुटिकेमध्यें येऊन उतरला, त्याच रात्रीं सीता प्रसूत होऊन तिला दोन मुलें झालीं. "

लवणवध केल्यावर शत्रुघ्नानें तेथेंच आपली गादी स्थापन केली; व तो तेथें बारा वर्षें राहून रामाला भेटण्याकरितां परत अयोध्येकडे जात असतां वाटेंत वाल्मीकींच्या आश्रमांतच उतरला.

**ततो द्वादशमे वर्षे शत्रुघ्नो रामपालिताम् ।**
**अयोध्यां चक्रमे गन्तुमल्पभृत्यबलानुगः ॥** ७।७१।१॥
**वाल्मीक्याश्रममागत्य वासं चक्रे महायशाः ॥ ३ ॥**

**स भुक्तवान्नरश्रेष्ठो गीतमाधुर्यमुत्तमम् ।**
**शुश्राव रामचरितं तस्मिन्काले यथाकृतम् ॥ १४ ॥**

"नंतर बारा वर्षें गेल्यावर त्या शत्रुघ्नाला थोडेसे सेवक व सैन्य बरोबर घेऊन रामानें रक्षण केलेल्या अयोध्यानगरीला जावें अशी इच्छा झाली. तो महाकीर्तिमान् शत्रुघ्न वाल्मीकिमहर्षींच्या आश्रमांत येऊन उतरला. तेथें जेवण आटोपल्यावर त्या नरश्रेष्ठ शत्रुघ्नानें रामचरित्राचें मधुर गायन श्रवण केलें."

शत्रुघ्न परत आला त्या वेळीं लवकुशांचें वय बारा वर्षांचें होतें, हें निर्विवाद आहे. वाल्मीकींनीं रामायण केल्याबरोबर तें लवकुशांना पढविल्याचें लिहिलें आहे. याकरितां शत्रुघ्न परत यावयाच्यापूर्वी केव्हां तरी लवकुशांचें उपनयन होण्यास लागणारा काल वजा केला म्हणजे तो परत यावयाच्या सुमारास—रामायणाची रचना झाली असली पाहिजे, हें उघड आहे.

वरील विवेचनावरून लवकुश हे बारा वर्षांचे होते, त्यापूर्वी थोडे दिवस वाल्मीकींनीं रामायण रचिलें ही गोष्ट समंजस वाचकांस पटल्यावांचून रहाणार नाहीं. खुद्द वाल्मीकींनीं जी गोष्ट लिहिली नाहीं व जिला दंतकथा, काव्यें अथवा पुराणें यांवांचून दुसरा कोणताहि आधार नाहीं, तीबद्दल शुष्क कोटिक्रम करून तिचें समर्थन करीत राहणें वेडगळपणाचें आहे. अशा तऱ्हेचे प्रयत्न कांहीं टीकाकारांनीं केले आहेत; तथापि ते इतके पोकळ आहेत कीं, ते वाचून सुज्ञ मनुष्यांचें समाधान होणें अशक्य आहे. 'रामायणतिलक' नामक रामायणावर एक टीका आहे. तींत मात्र लोकवार्तेकडे लक्ष न देतां लेखकानें आपला अभिप्राय स्पष्टपणें प्रकट केला आहे. पहिल्या सर्गांतील ९१ व्या श्लोकावरील (हा श्लोक वर आला आहे) टीकेंत खालील मजकूर लिहिलेला आहे:—

**एतदन्तं चरितं वृत्तत्वेनोपदिश्य देवर्षिरतः—**
**परमुत्तरकाण्डविषयं भविष्यत्वेनोपदिशति । अनेन च रावणवधानंतरं रामे राज्यं प्रशासति सति वाल्मीकेर्नारदं प्रति प्रश्न इति ज्ञायते ॥**

'येणेंप्रमाणें कथाभाग पूर्वी घडून आला असें सांगून नंतर व्हावयाचा उत्तरकांडांतील कथाभाग पुढें होणार असें नारद सांगत आहेत. यावरून रावणवध झाल्यावर राम राज्य करीत असतां वाल्मीकि महर्षींनीं नारदाला प्रश्न केला असें दिसून येतें.'

जो सर्ग रामायणाचा पाया आहे त्यावर वरील अभिप्राय प्रकट करून टीकाकारानें दंतकथा झुगारून दिली आहे. आम्हीं पुढें आणिलेल्या प्रश्नाचें विवेचन जरी वरील टीकेंत केलेलें नाहीं तरी वाल्मीकींनीं नारदाला केलेला प्रश्न रावणवध झाल्यावर राम सिंहासनावर असतां केलेला आहे, असा त्यानें निर्णय दिला आहे आणि म्हणून या प्रश्नानंतर त्याच्या उत्तराच्या आधारानें रचिलेलें रामायण त्याच्यामागूनचें होय, हें उघड झालें.

## उपसंहार.

या कथांशिवाय कांहीं कथा अशा आहेत कीं, रामायणांत त्यांचा गंधहि नाहीं. इंद्रजिताचा वध झाल्यावर त्याचें शिर रामाकडे नेलें होतें, तें सुलोचनानामक त्याच्या पत्नीनें रामाच्या अटीप्रमाणें हसवून परत आणिलें, ही कथा रामायणांत नाहीं. ज्या कथेच्या नाटकावर पुष्कळ नाटकमंडळ्यांनीं रगड पैसे मिळविले आहेत ती अहिरावण व महिरावण यांची कथा रामायणांत सांगितलेली नाहीं. आनंदरामायण, अध्यात्मरामायण, पद्मरामायण, महाभारतांतर्गत रामायण ( रामोपाख्यान ), अद्भुत रामायण वगैरे रामायणांतून वाल्मीकिरामायणांत न सांगितलेल्या कथा पुष्कळ आलेल्या आहेत. मराठी भाषेंत जीं रामायणें झालीं आहेत त्यांला वाल्मीकिरामायणाशिवाय इतर रामायणांचा आधार अधिक असल्यामुळें मराठी वाचकांत त्यांतील कथांचा प्रसार अधिक आहे. उत्तरहिंदुस्थानांतील प्रसिद्ध कवि तुलसीदास यानें हिंदी भाषेंत रामायणावर जें उत्कृष्ट काव्य रचिलें आहे तेंहि केवळ वाल्मीकिरामायणाचा आधार धरून रचिलें नसल्यामुळें तिकडेहि या कथांचा प्रसार अधिक आहे. इतर रामायणांपेक्षां हा ग्रंथ मोठा असल्याकारणानें तो वाचण्याकडे लोकांची फारशी प्रवृत्ति नाहीं. ज्यांना त्याची अभिरुचि आहे, ते सर्व मार्मिकदृष्टीनें वाचणारे असतातच असें नाहीं. यामुळें लोकांत ज्या गैरसमजुती रूढ होऊन बसल्या आहेत, त्या घालवून देण्याचा प्रयत्न कोणी करीत नाहीं. अशा रीतीनें गैरसमजुतींचें दडपण मनांवर दीर्घकाल पडून राहिल्यामुळें त्या इतक्या दृढ झाल्या आहेत कीं, त्यांचें निराकरण करण्याचा प्रयत्न करणेंच गैर वाटूं लागलें आहे. मनुष्य हा स्वभावतःच श्रद्धामय आहे. या श्रद्धेला ज्या बाजूचें वळण लावून तिचा परिपोष

करावा, तसतशी ती त्या ठिकाणीं वाढत जाते. आमच्या समाजाची श्रद्धा गैरसमजांत वाढत गेली व तेथेंच दृढ होऊन बसली. याचा परिणाम असा झाला कीं, ज्या ज्या स्थलीं अशा तऱ्हेचे गैरसमज टीकाकारांना आढळून येत, त्या त्या स्थलीं त्यांनीं अतिशय परिश्रम करून त्यांवर पांघरूण घालण्याचा प्रयत्न केला आहे. असे प्रयत्न करितांना ते पुष्कळदां फसले आहेत. लोकांतील समजुतींशीं रामायणाचा विरोध दिसूं लागला तर त्या समजुती खऱ्या आहेत, हें सिद्ध करण्याकरितां त्यांनीं इतर रामायणांतील उतारे घेऊन आपल्या मतें विरोध मिटविला आहे. आमच्या मतें या उताऱ्यांचा फार तर दंतकथांना आधार होईल; पण वाल्मीकिरामायणाशीं असलेला त्यांचा विरोध मिटावा कसा? खुद्द टीकाकारांच्या मनांचें तरी या प्रकारानें समाधान होत असेल काय?

वाल्मीकिरामायणांत स्वभावतः अद्भुत गोष्टी आलेल्या नाहींत. सर्व प्राचीन काव्यांत या काव्याइतकें साधें, सरळ व सोप्या भाषेंत सांगितलेलें काव्य नाहीं. रामचरित्राचें रहस्य अद्भुत गोष्टींनीं कळणें शक्य नाहीं. रामचरित्राला जगांतील कोणत्याहि पुरुषाच्या चरित्रापेक्षां अधिक महत्त्व कां प्राप्त झालें आहे, हें वाल्मीकिरामायण वाचल्यास कळेल; अद्भुत गोष्टींनीं परिप्लुत असलेलीं चरित्रें वाचून कळणार नाहीं. अज्ञ जनांची श्रद्धा अद्भुत कथांवर असणें शक्य आहे व त्याबद्दल त्यांना कोणी दोष देणार नाहीं; परंतु ज्या गोष्टी केवळ चमत्कारांनीं घडून आलेल्या असतात, त्या मनुष्याच्या कर्तबगारीनें घडून आल्यास तें अधिक मानास्पद आहे. चमत्कारांचें श्रवण करून मनोरंजन होईल, कौतुक वाटणार नाहीं. वाल्मीकिरामायण व इतर रामायणें यांत हा महत्त्वाचा भेद आहे. हा स्पष्टपणें दाखवून या रामायणाचें महत्त्व वाचकांचे मनावर बिंबावें, या हेतूनें इतर रामायणांवरून लोकांत जे गैरसमज पसरले आहेत, त्यांचा या रामायणाशीं कसा विरोध आहे, हें दाखविण्याचा या भागांत प्रयत्न केला आहे.

# भाग ६ वा.

## संदिग्ध परामर्श.

### सामान्य आयुर्मान.

" शतायुर्वै पुरुषः " अशी आयुर्मर्यादा वेदांमध्यें सांगितली आहे. योगाभ्यास साध्य झाल्यास या मर्यादेचें उल्लंघन करून पुष्कळ वर्षें जगतां येतें. योगाचा अभ्यास सर्वांना साध्य होणें शक्य नसल्यामुळें वरील मर्यादा उल्लंघून जीवंत राहणारे तपस्वी फार क्वचित् आढळतात. एतावता मनुष्याचे आयुष्याची मर्यादा सामान्यतः शंभर वर्षांची धरण्यास हरकत नाहीं. तथापि पौराणिक ग्रंथांतून बहुतेक व्यक्तींचीं आयुष्यें कल्पनातीत सांगितलेलीं आहेत. रामायणांतहि सर्वत्र हाच मासला आढळून येतो. या नियमाप्रमाणें रामाचें आयुष्यहि फार लांबवून सांगितलें आहे.

**दश वर्षसहस्राणि दश वर्षशतानि च ।**
**रामो राज्यमुपासित्वा ब्रह्मलोकं प्रयास्यति ॥ १।१।९७ ॥**

" राम अकरा हजार वर्षें राज्य करून ब्रह्मलोकाप्रत जाईल. "

रामायणांतील बहुतेक आयुर्मर्यादा अशाच फुगवून सांगितलेल्या आहेत. आयुर्मर्यादा फुगवून सांगावयाच्या या लालसेंत कांहीं स्थलीं तर हास्यास्पद प्रकार केले आहेत. एका ब्राह्मणानें आपला अकालीं मृत झालेला पुत्र रामाकडे आणिल्याचें वर्णन उत्तरकाण्डांत दिलें आहेः—[1]

**अप्राप्तयौवनं बालं पंचवर्षसहस्रकम् ।**
**अकाले कालमापन्नं मम दुःखाय पुत्रक ॥ ७।७३।५ ॥**

" हा माझा मुलगा पांच हजार वर्षांचा असून त्याला अजून तारुण्यहि प्राप्त झालें नाहीं. त्याला अकालीं मृत्यु आल्यामुळें मला फार दुःख होत आहे."

यांत पांच हजार वर्षांच्या एका लहान मुलाचें वर्णन आहे! या मुलाचें हें

---

१ ही कथा प्रक्षिप्त असून पद्मपुराणांतून उतरून घेतल्याबद्दल पुढील भागांत विवेचन देणार आहे. पद्मपुराणांतील कथेंत हा बालक पांच वर्षांचा होता असें लिहिलें आहे.

वर्णन वाचलें म्हणजे राम अगदीं तारुण्याच्या प्रारंभींच स्वर्गवासी झाला, असें होतें; अथवा बाल्याची मर्यादा सोळा वर्षांची आहे, ती जर येथें लागू केली, तर पौराणिक पांच हजार वर्षांबरोबर खरीं सोळा वर्षें, असें कोष्टक मांडावें लागेल. हेंच प्रमाण रामाच्या वरील आयुर्मर्यादेला लागूं केलें तर त्याची खरी खरी किंमत फारतर तीस पसतीस वर्षें होईल. शनीवरील दिवस येथील दिवसाहून पुष्कळ पटीनें मोठा असल्यामुळें त्या दिवसांनीं कालगणना केल्यास जसा घोंटाळा होईल, त्याप्रमाणें वरील आयुर्मर्यादेचें कालमापनाचें कोष्टक वेगळें असल्यास तें समजल्याशिवाय या गोष्टीचा निर्णय कसा करावयाचा ? टीकेंत याचा खुलासा सांपडेल म्हणून पहावें, तर तेथें त्याच्याहून घोंटाळा आहे. या स्थलीं बर्षशब्दाचा अर्थ दिवस असा घ्यावा, असें एका टीकाकारानें सुचविलें आहे. येथेंच असा अर्थ कां घ्यावा ? अन्यत्र कां घेऊं नये ? याचीं कारणें टीकाकारानें मुळींच दाखविलेलीं नाहींत. पांच हजार वर्षांचा मनुष्य बालक कसा असेल, याची शंका टीकाकाराला आली होती व त्याचा निर्णय करण्याचा त्यानें प्रयत्न केला, हें तरी आम्हां वाचकांचें मोठें भाग्य समजलें पाहिजे ! ही अशक्यताहि त्याला ब्राह्मणपुत्राचे ठायीं कां वाटली ? अन्यत्र कां वाटली नाहीं ? याचें स्पष्टीकरण त्यानें मुळींच केलेलें नाहीं. एकंदरींत निरंकुशत्वाचा परवाना अजूनपर्यंत कवींना मिळालेला होता. तो परंपरेनें टीकाकारांनींहि मिळविला आहे, असें म्हणावयास काय हरकत आहे ? पांच हजार वर्षांचा मनुष्य जर बाल्यांत मोडूं शकतो, तर सोळा वर्षांच्या रामाचें वर्णन आहे, तेथें तो कोणत्या अवस्थेंत होता, असें मानावयाचें ? दहा वर्षांचा एक बालक मृत झाल्याचें वर्णन किष्किंधाकांडांत आहे, तेथेंहि हाच प्रश्न उद्भवणार.

**कंडुर्नाम महाभागः सत्यवादी तपोधनः ।**
**महर्षिः परमामर्षी नियमैर्दुष्प्रधर्षणः ॥ ४।४८।१२ ॥**
**तस्य तस्मिन्वने पुत्रो बालको दशवार्षिकः ।**
**प्रनष्टो जीवितान्ताय क्रुद्धस्तेन महामुनिः ॥ १३ ॥**

" कंडु नांवाचे एक महातपस्वी, सत्य भाषण करणारे मोठे ऋषि होते. ते फार रागीट होते. त्यांच्या नियमामुळें त्यांच्या पुढें कोणालाहि जातां येत नसे.

या महर्षींचा एक दहा वर्षांचा मुलगा त्या अरण्यांत मृत्यु पावला. त्याबद्दल ते फार रागावले होते."

वस्तुतः या स्थलीं वर्ष या शब्दाचा अर्थ दिवस असा करण्याची काय आवश्यकता आहे? वरील नियम सर्वत्र लागू केला तरी तसाच घोंटाळा होणार आहे. "शतायुर्वै पुरुषः" या वैदिक मर्यादेचें उल्लंघन झाल्याचें ज्या स्थलीं आढळून येतें त्याच स्थलीं अशक्यतेची शंका डोळ्यापुढें उभी रहाते. वैदिक मर्यादेचें उल्लंघन होत होतें, अशाबद्दल पुरावा नाहीं. पुराणांतून कांहीं व्यक्तींचीं आयुष्यें अमर्याद सांगितलीं आहेत व विशिष्टकालीं वैदिक मर्यादेहून अधिक आयुष्य सर्वांना असे असें सांगितलें आहे, हें आम्हीं मान्य करितों; तथापि त्यास बाधक वाक्यें आढळतात त्यांची वाट काय? द्वापरयुगांत किंवा पांडवकालीं शंभराहूनहि अधिक वर्षें आयुष्य असे, असा समज आहे व त्यास आधारभूत वचनेंहि महाभारतांत सांपडतात. बरें, या समजुतीस बाध आणणारींहि कांहीं वचनें तेथेंच आहेत. उद्योगपर्वांतर्गत प्रजागरपर्वांत धृतराष्ट्रानें विदुराला प्रश्न केला आहे:—

शतायुरुक्तः पुरुषः सर्ववेदेषु वै यदा।
नाप्नोत्यथ च तत्सर्वमायुः केनेह हेतुना॥ ३७१९॥

"सर्व वेदांमध्यें पुरुषाचें आयुष्य शंभर वर्षें सांगितलें आहे. परंतु तितकीं वर्षेंहि ते वांचत नाहींत, याचें कारण काय?"

वेदानें सांगितलेल्या मनुष्याच्या आयुर्मर्यादेचा शंभर वर्षें असा स्पष्ट निर्देश येथें केला असून मनुष्याला तेंहि पूर्णपणें कां लाभत नाहीं, असा धृतराष्ट्राचा प्रश्न आहे. हा प्रश्न वाचून धृतराष्ट्राच्या वेळींहि शंभर वर्षांच्या आंत पुष्कळ मनुष्यें मृत्युमुखीं पडत असत, असें उघड दिसून येतें. किंबहुना हा प्रश्न सध्यां एखाद्याच्या तोंडीं ठेविला तरी वावगा दिसणार नाहीं. रामायणांतहि—

एति जीवन्तमानन्दो नरं वर्षशतादपि।

"मनुष्य जिवंत असेल तर शंभर वर्षांनीं तरी त्याला सुख प्राप्त होईल."

अशी जी त्या वेळची म्हण दिली आहे त्यांतील "वर्षशतादपि" या पदानें ही मर्यादा अप्रत्यक्षपणें दर्शविली आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं.

## वसिष्ठांचें आयुर्मान.

वसिष्ठ महर्षींसंबंधीं लिहितांना रामायणांत त्यांचें आयुष्य अमर्याद सांगितलें आहे. ते इक्ष्वाकुवंशाचे पुरोहित असें वर्णन आहे. ते तपस्वी व योगी होते, याकरितां त्यांची आयुर्मर्यादा वाढणें शक्य आहे. तथापि कांहीं स्थलीं त्यांच्या तोंडचीं म्हणून जीं वाक्यें दिलीं आहेत तीं वाचून शंका उत्पन्न होते. ते इक्ष्वाकुवंशाचे उपाध्याय असल्यामुळें त्यांना त्या वंशाची माहिती असणें शक्य आणि आवश्यक होतें; तसेंच इतका दीर्घकाल ते हजर असल्यामुळें ही माहिती त्यांना प्रत्यक्ष मिळाली असती. असें असून कांहीं ठळक गोष्टींची माहिती ऐकींव म्हणून त्यांनीं दिली आहे.

" **द्वे चास्य (असितस्य) भार्ये गर्भिण्यौ बभूवतुरिति श्रुतिः** ॥२।११०।१८॥

" **असमंजस्तु पुत्रोऽभूत्सगरस्येति नः श्रुतम्** " ॥ २।११०।२६ ॥

" **कल्माषपादपुत्रोऽभूच्छंखणस्त्विति नः श्रुतम्** " ॥ २।११०।३० ॥

" या असित राजाच्या दोन स्त्रिया गरोदर होत्या असें आम्हीं ऐकिलें आहे. " " या सगर राजाला असमंज नांवाचा एक पुत्र होता असें आम्हीं ऐकिलें आहे. " " त्या कल्माषपादाला शंखण नांवाचा एक पुत्र होता असें आम्हीं ऐकिलें आहे. "

इक्ष्वाकुवंशाची माहिती सांगतांना वसिष्ठांनीं "आम्हीं असें ऐकितों" असें स्पष्ट सांगितलें आहे. सगराचा यज्ञ व त्यासंबंधींच्या कथा प्रसिद्ध आहेत व त्याचा मुलगा असमंज याला राजा सगरानें हद्दपार केलें असल्यामुळें याची कारकीर्द विशेष प्रसिद्ध आहे. असें असून सगराला असमंज नांवाचा पुत्र होता एवढी माहिती वसिष्ठांनीं दुसऱ्याच्या आधारावर सांगावी हें आश्चर्य आहे! तसेंच कल्माषपाद राजाचा वसिष्ठांबरोबर कलह झाल्याची कथा प्रसिद्ध आहे. मग त्याला मुलगा कोण होता याची माहितीहि वसिष्ठांना असूं नये काय? यापुढील सर्गांत वसिष्ठांनीं रामाला उद्देशून:—

**स तेऽहं पितुराचार्यस्तव चैव परंतप** ॥ २।१११।४ ॥

" हे रामा, तो मी तुझा व तुझ्या पित्याचा आचार्य आहें. "

असे उद्गार काढिले आहेत. यांत राम व त्याचा पिता दशरथ यांचा आपण

पुरोहित असल्याचें त्यांनीं सांगितलें आहे. आतां पितृशब्द जर रामाचे सर्व पूर्वजांना उद्देशून योजिला आहे असें मानिलें तर "जात्याख्यायामेकस्मिन्बहुवचनमन्यतरस्याम् ॥ १।२।५८ ॥ या सूत्रानें येथें एकवचन होणें शक्य आहे. परंतु समाधानाचा हा मार्ग सरळ नाहीं. यासंबंधानें रा. ब. वैद्य* यांनीं अशी तोड काढिली आहे कीं, वसिष्ठ हें नांवच कुलपरंपरागत असावें. जनक हें नांव कुलपरंपरेनें असल्याचें रामायणांत एक उदाहरण आहे. तथापि वसिष्ठांसंबंधानें स्पष्ट आधार नसल्यामुळें कोणताहि निर्णय देणें कठीण आहे.

---

* १ वरील विवेचन करितांना रा. ब. वैद्य यांनीं आपल्या मताच्या पुष्टीसाठीं रामायणांतील एक पंक्ति दिली आहे:—

" **इक्ष्वाकूणां हि सर्वेषां पुरोधाः परमा गतिः ॥**

" सर्व इक्ष्वाकुवंशांतील राजांचा पुरोहित हीच गति आहे. "

यावर रा. ब. वैद्य यांची अशी कल्पना आहे कीं, ज्यापक्षीं त्रिशंकूनें वसिष्ठांना उद्देशून हें वाक्य उच्चारिलें आहे त्यापक्षीं वसिष्ठ हे इक्ष्वाकुवंशाचे पुरोहित असते तर त्यानें " पुरोधाः " या पदाच्या स्थलीं " वसिष्ठः " असें पद योजिलें असतें. या स्थळीं रा. ब. वैद्य यांची नजरचूक झालेली आहे. वरील पंक्ति त्रिशंकूच्या तोंडची आहे, ही गोष्ट खरी; तथापि ती वसिष्ठांना उद्देशून बोलली नसून वसिष्ठांच्या पुत्रांना उद्देशून बोललेली आहे. वसिष्ठांनीं धिक्कारल्यामुळें त्रिशंकुराजा वसिष्ठांच्या पुत्रांना शरण गेला. त्या वेळीं त्यानें वसिष्ठपुत्रांना उद्देशून जें भाषण केलें त्यांतील वरील पंक्ति एक भाग आहे. येथें त्यानें " वसिष्ठः परमा गतिः " असें म्हणून त्याचें कार्य कसें होणार? त्याला वसिष्ठपुत्रांना संतुष्ट करावयाचें असल्यामुळें त्यानें " पुरोधाः " हें पद योजणें योग्य दिसतें. संदर्भ कळण्याकरितां त्याचे भाषणांतील उतारा खालीं देतों:—

**प्रत्याख्यातो वसिष्ठेन गतिमन्यां तपोधनाः ।**
**गुरुपुत्रानृते सर्वान्नाहं पश्यामि कांचन ॥१।५७।२१॥**
**इक्ष्वाकूणां हि सर्वेषां पुरोधाः परमा गतिः ।**
**तस्मादनंतरं सर्वे भवन्तो दैवतं मम ॥२२॥**

" हे तपस्वी हो, वसिष्ठांनीं मला झिडकारिलें आहे, तेव्हां तुम्हां गुरुपुत्रांशिवाय मला दुसरी गति नाहीं. इक्ष्वाकुवंशांतील राजांची पुरोहित हीच गति आहे. याकरितां आपणच सर्व माझें दैवत आहां. "

## रामाचे यौवराज्याभिषेकाची त्वरा.

कैकेयीला राजानें पूर्वी देऊं केलेले वर तिनें आयत्या वेळीं पुढें केले आणि त्यामुळें रामाला अरण्यवास पत्करावा लागला, असें आपण वाचितों; आणि रामाला यौवराज्याभिषेक करावयाचें राजानें ठरविलें त्यानिमित्तानें हा प्रसंग आला, हें आपणांस कळतें. हा कथाभाग सांगण्याला प्रारंभ होईपर्यंत रामादिकांचें सर्व चरित्र आनंदभरित असून तें आपण आनंदानें वाचतों. राजानें रामाला यौवराज्याभिषेक करावयाचें ठरविलें व सर्व सिद्धता करविली व त्यामुळें हा प्रसंग आला, हें लक्षांत आलें म्हणजे राजानें ही योजना करून हा प्रसंग आपण होऊन आपल्यावर ओढून घेतला, असें वाटूं लागतें. रामादि बंधुचतुष्टय परस्परांवर प्रेम करणारें होतें व हें प्रेम शेवटपर्यंत टिकलेंहि. कैकेयीप्रभृति दशरथाच्या सर्व स्त्रियांमध्यें सवतीमत्सर होता व त्यांत विशेष अपूर्वता नाहीं; तथापि स्वतां कैकेयीचें रामाच्या गुणांनिमित्त त्याजवर प्रेम होतें. पुढील सर्व व्यवहार तिनें मंथरेच्या शिकवणीनें केला आणि ती स्वभावतः दुष्ट असल्यामुळें मंथरेचा उपदेश तिचे मनावर ठसूं शकला, ही गोष्ट खरी; तथापि रामाच्या यौवराज्याभिषेकाविषयीं राजानें केलेली योजना ऐकतांच तिला आनंद झाला, इकडे लक्ष दिलें म्हणजे राजाला तिच्या निमित्तानेंहि ही योजना करावयाचें तादृश्य प्रयोजन दिसत नाहीं. या वेळीं दशरथ वृद्ध झाला होता व या दृष्टीनें आपल्यामागें राज्यव्यवस्था कोणीं पहावी याची योजना करणें अयुक्त नव्हे; तथापि ही व्यवस्था त्यानें केली नसती तरी त्यामुळें कांहीं अव्यवस्था झाली असती अशी शंका घेण्याचें कारण नाहीं. रामलक्ष्मण वनांत गेल्यावर राजा मरण पावला असतां भरताला मातुलगृहाहून आणण्याची व्यवस्था मंत्र्यांनीं केलेली रामायणांत पहावयाला मिळतच आहे व त्यावरून कारण पडतें तर तशी व्यवस्था मंत्र्यांनीं केली असती, असें अनुमान करण्यास अडचण नाहीं. तसेंच यौवराज्याभिषेकाची योजना ठरविली त्या वेळीं भरत व शत्रुघ्न मातुलगृहीं होते, त्यांना आणविण्याची व्यवस्था राजानें मुळींच केलेली नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. त्यानें बाहेरून दूरदूरचे मांडलिक बोलाविले आणि यांना मात्र बोलाविलें नाहीं, याचें कारण काय? या वेळीं अयोध्येंत कांहीं अशुभसूचक उत्पात झाले व ते

पाहून राजाला स्वतांला मृत्यु येणार असें वाटूं लागलें आणि याकरितां ही योजना आपण करीत असल्याचें राजानें रामाला सांगितलें. राजानें सांगितलेलें कारण सरळ होतें. आणि याकरितां त्यानें भरताला आणविणें तितकेंच सरळ होतें. पण त्याला न आणवितां आणि त्याला ही योजना कळूं न देतां अधिकाऱ्यास करावयाचा राजाचा हेतु होता. हा हेतु त्यानें रामाला स्पष्टपणें सांगितला आहे. ( २।४।२५ ) मात्र असें करण्याचें कारण राजानें येथें सांगितलें नाहीं व रामानें विचारिलें नाहीं. " तुझा भाऊ भरत सज्जनांचे वर्तनाचें अनुकरण करीत असून तुज ज्येष्ठ भ्रात्याचे अनुरोधानें वागणारा आहे आणि जरी तो धर्मात्मा दयाळु व जितेंद्रिय आहे, तथापि मनुष्याची बुद्धि अनित्य आहे. (केव्हां फिरेल याचा नियम नाहीं.) " (२।४।२६, २७ ) इतकेच उद्गार राजानें या वेळीं काढिले आहेत. राजाचे या उद्गारांवरून भरताविषयीं त्याचें मन साशंक होतें, हें उघड आहे. कैकेयीला देऊं केलेले वर तिनें आयत्या वेळीं मागून राज्याभिषेकाला विघ्न केलें, हा भाग वेगळा; पण अशा विघ्नाचा संभव राजाला पूर्वींच वाटत होता व तें विघ्न भरताकडून अथवा त्याचे निमित्तानें दुसऱ्या कोणाकडून तरी येणार अशी त्याची समजूत होती. भरताचें या वेळेपर्यंतचें वर्तन राजाला प्रतिकूल नव्हतें; आणि याकरितां त्याविषयीं त्याला साशंक होण्याचें कारण नव्हतें. राजानें या समारंभाकरितां कैकेयीचा पिता केकय व नवे व्याही जनक या दोघांनाहि बुद्ध्या बोलाविलें नाहीं. ( २।१।४८ ) यावरून भरताचें वर्तन सरळ होतें, तरी त्याला त्याचे मामा किंवा आजोबा यांजकडून शिकवण झाल्यास बुद्धि फिरेल, अशी भीति राजाला वाटत होती, असें दिसतें. मनुष्याची बुद्धि केव्हां फिरेल, याचा नियम नाहीं असे जे उद्गार त्यानें रामापाशीं काढिल्याचें वर सांगितलें आहे, त्यांतील इंगित याप्रमाणें आहे. राजाच्या या भीतीचा उलगडा पुढें रामाच्या भाषणांत झाला आहे. रामाला वनांतून परत आणण्याकरितां भरत ज्या वेळीं अरण्यांत गेला व चित्रकूटीं त्याची गांठ पडली त्या वेळीं पित्याला वचनमुक्त करण्याकरितां आपण अरण्यवास पत्करिला वगैरे सांगतांना रामाला राजानें कैकेयीला दिलेल्या वचनापूर्वींच्या एका वचनाची आठवण झाली आहे व ती त्यानें

बोलून दाखविली आहे. या वचनाचा योग कैकेयीच्या [redacted] होता. कैकेयीशीं विवाह करण्यापूर्वीं तिचेपासून होणाऱ्या पुत्राला राज्य देण्याची बोली राजानें तिचे पित्याशीं केली होती. ( २।१०७।३ ) विवाहापूर्वीं झालेल्या या बोलीवरून राजाच्या वृद्धपणीं हा विवाह झाला असावा असें दिसतें. विवाहापूर्वीं राजानें दिलेलें वचन त्याला मनांत खात असलें पाहिजे; कारण हें पूर्वपरंपरागत आचाराला सोडून होतें. राजाचे मागें राज्यावर अधिकार ज्येष्ठ पुत्राचा अशी पद्धति असल्याचें वसिष्ठांनीं चित्रकूटीं रामाची गांठ पडल्यावर त्याला उद्देशून जें भाषण केलें त्यांत सांगितलें आहे. ( २।११०।३६ ) मात्र या वचनाची वार्ता रामावांचून कोणाला माहीत नव्हती. भरताशीं भाषण करितांना रामानें तिचें प्रथमच उद्घाटन केलें. स्वतां कैकेयी आणि तिची हितचिंतक दासी मंथरा यांना या वचनाचा मागमूस नव्हता. आणि याकरितां रुसून बसून पूर्वीं ठेव म्हणून ठेविलेले वर तिला पुढें करावे लागले; नाहींतर राजाला विवाहापूर्वींचे वचनाची आठवण देण्यापलीकडे तिला काम नव्हतें. तिचें काम तिचे पित्यानें वृद्ध दशरथाला कन्या देतांना आधींच करून ठेविलें होतें. राजाला या स्वतांचे वचनाची आठवण होती व रामाचे यौवराज्याभिषेकाचे समारंभाकरितां त्यानें कैकेयीच्या पित्याला अथवा भावाला बोलावणें पाठविलें नाहीं आणि भरत परत आला नाहीं तोंपर्यंत हें काम उरकावयाचें अशी जी त्वरित योजना त्यानें केली आणि रामाजवळ बोलून दाखविली, त्यांतील रहस्य यांत आहे. जनक राजाला न बोलावण्यांत मात्र राजाचें धोरण फार दूरचें होतें. रामाला यौवराज्याभिषेक होण्यांत जनकाला कांहीं अनिष्ट नव्हतें. परंतु राजानें विवाहापूर्वीं दिलेल्या वचनास अनुसरून भरताला यौवराज्य मिळावयाचें असत, त्याला टाकून हें काम उरकण्यांत येत आहे, हें या वेळीं बाहेर पडलें असतें तर भरताच्या स्त्रीचा पिता कुशध्वज जनक यानें आपल्या कन्येकरितां म्हणून समारंभांत विघ्न आणणें संभवनीय होतें आणि अशा रीतीनें एका भाउबंदकींत ही दुसरी भाउबंदकी उपस्थित झाली असती. कुशध्वज जनक तेथें आला असता तर भरताचा शोध त्यानें सहज केला असता व या शोधांत राजाचें कपट बाहेर पडण्यास वेळ लागला नसता. राजानें हें धोरण संभाळलें यांत शंका नाहीं. हें

धोरण विवाहापूर्वी कोठें गुरफटलें होतें, तें कळत नाहीं. पण त्या वेळीं धोरण तरी कसलें? " कामातुराणां न भयं न लज्जा " हेंच त्या वेळचें धोरण! राजाचें हें वर्तन भरताच्या थोर स्वभावामुळें झांकून गेलें यांत शंका नाहीं. रामानें ज्या वेळीं हें पूर्वीचें वचन भरताशीं बोलतांना सांगितलें, त्या वेळीं त्यानें ह्यासंबंधानें कांहींच प्रत्युत्तर दिलेलें नाहीं. भरतानें आपल्या मातेला " तूं जनेंद्र राजाच्या कुलांत उत्पन्न झालेली असतां सज्जनांनीं निंद्य असा बुद्धिभ्रम तुला कसा झाला? " ( २।७३।२४ ) असा प्रश्न केला. यावरून रामानें सांगितलेलें वृत्त त्याला अपूर्व होतें, हें उघड आहे. या वेळीं भरतानें या प्रश्नाची चर्चा न होऊं देण्यांत धोरणच संभाळलें आहे. राजाचे पूर्वीचे वचनास अनुसरून रामाला अरण्यांत जावें लागलें नसतें, तरी राज्याधिकार मिळाला नसता. राम परत येत नाहीं, असें पाहून भरत प्रायोपवेशन करण्याचे उद्देशानें बसला व या वेळीं अरण्यांतून परत आल्यावर आपण राज्याचा स्वीकार करूं, असें रामाकडून त्यानें वचन घेतलें आणि अशा रीतीनें सर्वच पारडें उलट फिरविलें.

## सुमंत्राचें प्रत्यागमन.

रामाचा वनवासांतील प्रथमचा—गुहाचे शृंगवेरपुरापर्यंतचा—प्रवास सुमंत्रासह रथांतून झाला. त्यांचा पहिला मुक्काम तमसातीरीं झाला. तेथें एक रात्र राहिल्यावर ( २।४६।२ ) बरोबर आलेल्या प्रजाजनांना चुकविण्याकरितां सूर्योदयापूर्वीच रामानें रथांतून प्रयाण केलें. दुसरे दिवशीं ते गुहाचे शृंगवेरपुरीं पोंचले. येथें एक रात्र राहिल्यावर ( २।५१।२६ ) तिसरे दिवशीं ते गंगापार झाले. गंगा उतरण्यापूर्वीं त्यांनीं सुमंत्राला परत जाण्यास सांगितलें. राम गंगापार होईपर्यंत गुह आणि सुमंत्र गंगेच्या उत्तरतीरावर बोलत बसले होते आणि राम पलीकडे पोंचल्यावर गुह आपल्या घरीं निघून आला. ( २।५२।१ ) सुमंत्र रथांत बसून अयोध्येकडे जाण्याकरितां निघाला. तो दुसरे दिवशीं सायंकाळीं अयोध्येला पोंचला. ( २।५७।५ ) तो वाड्यांत गेल्यावर राजा व राजपत्न्या यांना त्यानें सर्व वृत्तांत सांगितला. यानंतर कौसल्या व राजा यांचा जो संवाद झाला त्यांत कौसल्येनें राजाला राम वनांत गेल्याला आज पांच रात्री झाल्या असें म्हटलें आहे. ( २।६२।१७) सुमंत्र परत आला ती रात्र वरील गणनेप्रमाणें चौथी येते. तेव्हां कदाचित् सुमंत्र

भेटून गेल्यावर दुसरे दिवशींचे रात्रीं कौसल्येचें वरील भाषण असावें. कारण सुमंत्रानें वाड्यांत येऊन सर्व वृत्त निवेदन केल्याचें सांगितल्यावर तो तेथून निघून गेल्याचें न सांगतां पुढील सर्गांत कौसल्येनें राजाला उद्देशून केलेल्या भाषणाला प्रारंभ झाला आहे. ( २।६१ ) हा संवाद एकांतीं झालेला दिसतो, व यावरून त्या वेळीं तेथें सुमंत्र नसावा, असें दिसतें; आणि पूर्व सर्गांत तो तेथून गेल्याचें सांगितलें नसलें तरी त्याचें तादृश महत्त्व नाहीं. सुमंत्र चौथे रात्रीं अयोध्येला आला व कौसल्येच्या वरील संवादांत पांचवी रात्र असें म्हटलें आहे, यांची संगति लावावयाची म्हणजे मध्यंतरीं एक दिवस गेला असें मानणें भाग आहे. एका दिवसापुरती येथें संगति लावितां आली तरी सुमंत्राचे भाषणांतील एक विधान त्याहून विलक्षण आहे. तो रामवृत्त सांगतांना म्हणतोः—

**गुहेन सार्धं तत्रैव स्थितोऽस्मि दिवसान् बहून् ।**
**आशया यदि मां रामः पुनः शब्दापयेदिति ॥ २।५९।३ ॥**

" राम मला फिरून बोलावणें पाठवील या आशेनें मीं गुहाबरोबर तेथेंच बरेच दिवस राहिलों होतों. "

पूर्वींचे अवतरणांवरून पाहतां सुमंत्रानें मध्यंतरीं मुक्काम मुळींच केल्याचें दिसत नाहीं; आणि येथें तर तो स्वतां गुहाचे राजधानींत कित्येक दिवस राहिल्याचें सांगत आहे. याची संगति कशी लावावयाची ?

## वनवासांतील आहार.

रामादिक वनांत गेल्यावर तेथें आहार कोणता करीत असत, या प्रश्नाचें तादृश महत्त्व नाहीं; वनांत मिळणारीं फलें व कंद यांवर आणि निषिद्ध नसलेल्या पशूंचे मांसावर त्यांनीं निर्वाह करणें साहजिक आहे. पण रामायणांतील वर्णनें परस्परविरुद्ध असल्यामुळें या प्रश्नाची चर्चा करणें प्राप्त झालें आहे. कैकेयीनें रामाजवळ जो वर मागितला, त्यांत रामानें वल्कलें व अजिन परिधान करून चौदा वर्षेंपर्यंत दंडकारण्यांत तपस्वी होऊन रहावें, असें तिनें सांगितलें आहे. ( २।११।२६, २७ ) तिचे भाषणांत रामाचे आहाराविषयीं कोणतीहि अट नाहीं, आणि जर असेल तर ती त्यानें तपस्वी रहावें, यांतच अंतर्भूत आहे. दशरथाचे मृत्यूची वार्ता कळल्यावर रामानें त्याचें उत्तर-

कार्य केलें. त्या वेळीं बदरीफलांनीं मिश्रित केलेला इंगुदीफलांचा पिंड दर्भास्तरणावर ठेवून राम अत्यंत दुःखाकुल झाला व रडत म्हणालाः--

**इदं भुंक्ष्व महाराज प्रीतो यदशना वयम्।**
**यदन्नः पुरुषो भवति तदन्नास्तस्य देवताः ॥ २।१०३।३० ॥**

" हे महाराज, जें अन्न आम्ही भक्षण करितों तें ( तुला समर्पण करितों, त्याचा ) तूं स्वीकार कर. ( कारण ) जें अन्न पुरुष भक्षण करीत असेल, तें त्यानें देवतांना द्यावें ( असा नियम आहे. )

भरत रामाला परत आणण्याकरितां गेला त्या वेळीं बरोबर कौसल्याप्रभृति स्त्रिया गेल्या होत्या. भरत सर्वांचे पुढें गेला व त्यानें रामाला पित्याचे मृत्यूची वार्ता सांगितली आणि ती ऐकून वरील पिंडप्रदान केल्यावर राम पर्णकुटिकेकडे परत आला. याच मार्गानें मागाहून कौसल्यादि स्त्रिया आल्या. दर्भास्तरणावर दिलेले इंगुदीफलाचे पिंड त्यांनीं अवलोकन केले आणि त्यांनींहि रामानें उच्चारिलेल्या वरील नियमाचें स्मरण होऊन रामानेंच स्वतांचे आहाराला अनुसरून हें पित्याला उद्देशून पिंडदान केलें असावें, असें अनुमान केलें आहे.

पिंडप्रदानाचें हें वर्णन वाचलें म्हणजे कंदमूलफलांवर त्यांचा निर्वाह होत असावा व त्यांनीं मांसाहार सोडिला असावा, असें वाटतें. वनांत जावयाचें ठरल्यावर राम सीतेला भेटावयास गेला. त्या वेळीं ती बरोबर येत्यें, असें म्हणाली असतां प्रथम रामानें वनवासांतील कष्टमय राहणीचें वर्णन केलें, त्यांत " वनामध्यें राहावयाचें म्हणजे वृक्षावरून गळून पडलेल्या फलांवर संतुष्ट असलें पाहिजे, ( २।२८।१२ ) असें सांगितलें आहे. लक्ष्मणानें रामाला आपण बरोबर येत असल्याचें कळविलें, तेव्हां ' आपण वनांतील फलें, मुळें व तपस्व्यांचे होमकर्माला योग्य असे इतर पदार्थ नित्य आणून देत जाईन.' (२।३१।२९) असें आश्वासन दिलें आहे. राम भरद्वाजाश्रमीं गेल्यावेळीं रामानें स्वतांचे व्रताविषयीं सांगतांना वनांतील फलमूलांवर आपली उपजीविका चालविणार, असें म्हटलें आहे. ( २।५४।१६ ) भरद्वाजांनीं त्याचा सत्कार केला, त्यांतहि वनांतील फलमूलांपासून सिद्ध केलेले अन्नरस त्यांनीं रामाला अर्पण केले आहेत. राम वनांत गेल्यावर कौसल्येनें जो शोक केला, त्यांत सीतेविषयीं तिनें " ती

नित्य चटण्याकोशिंबिरी यांनीं युक्त असें अन्न भक्षण करीत असून आतां अरण्यामध्यें देवभाताचें अन्न कसें बरें भक्षण करील ?" ( २।६१।५ ) असे उद्गार काढिले आहेत. अरण्यवासव्रताचें वृत्त कौसल्येला कळविण्याकरितां राम तिजकडे प्रथम गेला, त्या वेळीं त्यानें तिला "मी आतां मुनींप्रमाणें आमिष वर्ज्य करून कंदमूलफलांवर उपजीविका करीत चौदा वर्षेपर्यंत निर्जन वनामध्यें राहणार." ( २।२०।२९ ) असें सांगितलें आहे.

रामायणांतील या सर्व निर्देशांवरून रामाचा आहार वनामध्यें असतां फलमूलांवर होत असे, यांत शंका रहात नाहीं.

पण पंचवटींत असतां राम मायामृगाचे मागें गेल्यावर सीतेचा रावणाशीं जो संवाद झाला त्यांत तिनें आपला पति मृगयेला गेला असून लवकरच पुष्कळ मांस घेऊन परत येईल, असें सांगितलें आहे. ( ३।४७।२३ ) या वेळीं राम परत आला तेव्हां त्यानें येतांना पृषतसंज्ञक मृग मारून आणिला आहे. ( ३।४४।२७ ). येथें अशी शंका येते कीं, फलमूलांवर निर्वाह करणाऱ्या रामाला मांस आणण्याचें किंवा मृगया करण्याचें कारण काय ? वालिवधाचें समर्थन करितांना रामानें मांसभक्षक पुरुष मृगांचा उघड अथवा लपून वध करितात व त्यांत कोणताहि दोष नाहीं, ( ४।१८।४० ) असें सांगून स्वतां मांसाशी असल्याचें सूचित केलें आहे. मांसभक्षक असल्यामुळें रामाला मृगयेकरितां जातां आलें व यानिमित्त पुढील प्रसंग ओढवला आहे. चित्रकूटीं पर्णकुटिका बांधिल्यावर तिची वास्तुशांति केली. तींत कृष्णमृगाचें मांस आणून त्याचें हवन रामानें केलें आहे. ( २।३६।२८ ) जटायू मरण पावल्यावर त्याचें और्ध्वदेहिक रामानें केलें व त्या वेळीं मृगमांसाचे पिंड करून ते त्याचे उद्देशानें अर्पण केले आहेत. ( ३।६८।३३ ) कबंधानें रामाला पंपेकडे जावयाचा मार्ग सांगितला व पुढें पंपेविषयीं सांगतांना तेथील उत्तम पक्षी व मत्स्य भक्षण करावयास मिळतील असें त्यानें वर्णन केलें आहे. ( ३।७३।१३–१९ ) या सर्व निर्देशांवरून रामाचा निर्वाह वनांतील केवळ फलमूलांवर होत असे असें म्हणतां येत नाहीं. दशरथाला इंगुदीफलाचें पिंडप्रदान करणाऱ्या रामानें जटायूला मात्र मांसाचें पिंडप्रदान केलें, याचा मेळ कसा घालावयाचा ? जटायू मांसभक्षक म्हणून

त्याला मांस दिलें म्हणावें, तर दशरथाचे बाबींत तोच न्याय लागू कां नाहीं? आपण स्वतां भक्षण करावयाचें तेंच देवतांना द्यावयाचें असें जें धर्मशास्त्र रामानें दशरथाला पिंडदान करितेवेळीं डोळ्यांत पाणी आणून उच्चारिलें त्याचें जटायूला पिंडदान करीतेवेळीं त्याला स्मरण होऊं नये, हें आश्चर्य नव्हे काय? पर्णकुटिकेचे वास्तुशांतीचे वेळीं हाच प्रकार झाला आहे. सीतेची गांठ पडल्यावर मारुतीनें राम विरहस्थितींत कसा असतो हें तिला सांगितलें. त्यांत "राम मांसभक्षण करीत नाहीं आणि मद्यहि सेवन करांत नाहीं; शास्त्रविहित असें वनांतील ओदनच तो नित्य एक वेळ संध्याकाळीं भक्षण करीत असतो," (५।३६।४१) असें वर्णन केलें आहे. विरहावस्थेंतील रामाविषयींच्या या वर्णनावरून सीतेचा विरह होण्यापूर्वीं रामानें मांस वर्ज्य केल्याचें दिसून येत नाहीं. रामानें चौदा वर्षें अरण्यांत वास करावा एवढीच कैकेयीची अट व या अटीचे दृष्टीनें रामाचे व्रताला बाध येतो, असें नाहीं. रामाचे पूर्वीचे उद्गार व पुढील आचार यांत संगति नाहीं व ही विसंगतता कशी आहे, हें दाखविण्यासाठीं येथील विवेचन केलें आहे.

## वनांत निघतें वेळीं सीता व राम यांचें वय.

वनवासास जाते वेळीं रामाचें व सीतेचें वय किती होतें हा प्रश्न घोटाळ्याचा आहे. अरण्यकांडांत सीता रावणाला आपली हकीकत सांगतांना म्हणते:—

**उषित्वा द्वादशसमा इक्ष्वाकूणां निवेशने ।**
**भुंजाना मानुषान्भोगान्सर्वकामसमृद्धिनी ॥ ३।४७।४ ॥**
**मम भर्ता महातेजा वयसा पंचविंशकः ।**
**अष्टादश हि वर्षाणि मम जन्मनि गण्यते ॥ १० ॥**

"इक्ष्वाकुवंशजांच्या वाड्यामध्यें माझीं बारा वर्षें गेलीं. मनुष्याला योग्य असे सर्व भोग मीं भोगिले व माझ्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या. माझा तेजस्वी पति त्या वेळीं पंचवीस वर्षांचा असून मला अठरा वर्षें झालीं होतीं."

या उताऱ्यावरून सीता विवाह झाल्यावेळीं सहा वर्षांची व अरण्यांत जातेवेळीं अठरा वर्षांची होती. आणि विवाहाचे वेळीं रामाचें वय तेरा वर्षांचें असून तो पंचविसावे वर्षीं वनवासास निघून गेला, असें दिसून येतें. अयोध्याकांडांत

राम वनवासास जाते वेळीं कौसल्येनें जे शोकाचे उद्गार काढिले आहेत, त्यांमध्यें रामाच्या वयाचा निर्देश केलेलें एक वचन आढळतें:—

**सप्तदश च वर्षाणि जातस्य तव राघव ।**
**अतीतानि प्रकांक्षंत्या यथा दुःखपरिक्षयम्** ॥ २।२०।४५ ॥

"हे रामा, तुला आज सतरा वर्षें झालीं आहेत. आज ना उद्यां माझ्या दुःखांचा क्षय होईल अशी वाट पाहात मीं इतके दिवस काढिले आहेत."

या श्लोकावरून वनवासाला निघते वेळीं रामाचें वय सतरा वर्षांचें होतें, असें दिसतें. या श्लोकावर टीका करितांना कांहीं टीकाकारांनीं "जातस्य" याचा अर्थ उपनयन होऊन दुसरें जन्म झाल्यावर सतरावे वर्षीं असा केला आहे. यामुळें उपनयनापर्यंतचीं दहा वर्षें व पुढील सतरा वर्षें एकत्र केलीं असतां सत्ताविसावे वर्षीं राम वनवासास निघून गेला, असें निष्पन्न होतें. या कल्पनेला त्यांनीं कोणताहि आधार दिलेला नाहीं. अरण्यकांडांतील सीतेच्या वर दिलेल्या भाषणाशीं मेळ बसविण्याकरितां त्यांनीं हा उपद्व्याप केला आहे. वस्तुतः या परिश्रमापासून फलनिष्पत्ति कांहीं व्हावयाची नाहीं. कारण रामाचें वय वनवासाला निघतेवेळीं पंचवीस वर्षांचें होतें असें सीतेनें सांगितलें आहे; व येथें तर तें सत्तावीस वर्षांचें ठरत आहे. उपनयनापूर्वीचा काल तर दहा वर्षांहून कमी धरितां येणें शक्य नाहीं. दहावें वर्ष हा क्षत्रियांच्या उपनयनाचा काल शास्त्रानें ठरविलेला आहे. ही अडचण लक्षांत घेऊन एका टीकाकारानें अति तरुण असताहि त्यानें राज्याचा त्याग केला असा अखेरीस शेरा मारिला आहे. कांहींहि असो; दोन वाक्यांचा मेळ बसत नाहीं, हें निर्विवाद आहे.

कौसल्येच्या भाषणांत रामाचें जें वय आलेलें आहे, तें पूर्वीच्या आधारावरून अधिक विश्वसनीय दिसतें. विवाह होण्यापूर्वीं रामाचें वय सुमारें सोळा वर्षांचें असावें. विश्वामित्र यज्ञरक्षणार्थ रामलक्ष्मणांना मागण्याकरितां आले, त्या वेळीं दशरथानें—

**ऊनषोडशवर्षो मे रामो राजीवलोचनः** ॥ १।२०।२ ॥

"कमलाप्रमाणें ज्याचे सुंदर डोळे आहेत, अशा या रामाला पुरतीं सोळाहि वर्षें झालीं नाहींत."

असे उद्गार काढिले आहेत. या वेळीं रामाच्या वयाला पंधरा वर्षें पूर्ण झालीं असून सोळावें वर्ष लागलें असलें पाहिजे. यानंतर सुमारें महिन्याचे आंत त्याचा विवाह झाला. विवाह होऊन परत आल्यावर युधाजित् भरताला घेऊन गेला व तो परत येण्याच्या पूर्वीं राम वनवासाला गेला. विवाह व भरताचें मातुल-गृहीं गमन यांमधील काल किती होता, तें स्पष्टपणें सांगितलेलें नाहीं.

**कस्यचित्त्वथ कालस्य राजा दशरथः सुतम् ॥ १।७७।१५ ॥**

"यानंतर कांहीं काल गेल्यावर राजा दशरथ आपल्या मुलाला (म्हणाला)" असा अस्पष्ट निर्देश रामायणांत केला असल्यामुळें संशयाला अवकाश सांपडतो. भरत परत येण्यापूर्वीं राम वनवासाला गेला असल्यामुळें मधील काल फार असणें संभवनीय नाहीं. म्हणजे विवाहानंतर थोडया दिवसांनीं भरत मातुलगृहीं गेला व त्यानंतर थोडया दिवसांनीं राम वनवासाला गेला. एवंच विवाह व रामाचा वनवास यांमधील काल फार नाहीं. सीतेनें आपण बारा वर्षें श्वशुरगृहीं असल्याबद्दल जें सांगितलें आहे, तें तर सुतराम् शक्य नाहीं. भरत गेल्यानंतर राम वनवासाला जावयाच्या पूर्वींच्या कालाचा उल्लेख रामायणांत " व्याजहार बहूनृतून् " असा अस्पष्ट केला आहे. कांहीं टीकांमध्यें याचाच अर्थ बारा वर्षें असा केला आहे. कौसल्येच्या तोंडचें म्हणून जें वाक्य वर दिलें आहे, त्यावरूनहि हा काल दीर्घ होता, असें दिसत नाहीं.

सीतेच्या तोंडीं जे शब्द आहेत त्यांवरून विवाहकालीं तिचें व रामाचें वय अनुक्रमें सहा व तेरा वर्षांचें असून यानंतर बारा वर्षें लोटल्यावर तीं वनांत गेलीं, असें दिसतें. हें लक्षांत ठेवून पुढील श्लोक वाचला तर काय बरें वाटेल?

**अभिवाद्याभिवाद्यांश्च सर्वा राजसुतास्तदा ।**
**रेमिरे मुदिताः सर्वा भर्तृभिः सहिता रहः ॥ १।७७।१३ ॥**

" नंतर सर्व वडील मंडळींना नमस्कार करून त्या राजकन्या आनंदानें आपल्या पतींसहवर्तमान एकांतीं रममाण होऊं लागल्या. "

तेरा वर्षांचा पुरुष व सहा वर्षांची स्त्री यांचा संबंध वाचून वाचकांना खरोखर कींव येईल. सकृद्दर्शनीं ही गोष्ट खरी आहे काय, अशी शंका वाच-

कांचे डोळ्यांसमोर उभी राहील. हा संबंध उघडपणें अशक्य व अनिष्ट दिसतो. क्षत्रियांचें उपनयन दहावे वर्षी होतें; अर्थात् रामानें अवघीं तीन वर्षें ब्रह्मचर्य पाळिलें, असें सिद्ध होतें. आपलें विवाहवृत्त अनसूयेला सांगतांना सीतेच्या तोंडीं खालील वाक्य आहे:—–

**पतिसंयोगसुलभं वयो दृष्ट्वा तु मे पिता ।**
**चिंतामभ्यगमद्दीनो वित्तनाशादिवाधनः ॥ २।११८।३४ ॥**

"नंतर पतिसंयोगाला माझें वय योग्य झालें आहे असें पाहून दरिद्री मनुष्याला द्रव्यनाश झाला असतां जशी काळजी वाटते, तशी माझ्या पित्याला काळजी वाटूं लागली."

यांत आपलें वय पतिसंयोगसुलभ झाल्याचें पाहून आपल्या बापाला चिंता वाटूं लागली असे तिचेच शब्द आहेत. पतिसंयोगसुलभ याचा अर्थ विवाहास योग्य असा धरून जरी वाक्य वाचिलें तरी पुढील वर्णनावरून तसा अर्थ करितां येत नाहीं. सहावें वर्ष क्षत्रिय कन्येच्या विवाहाला योग्य कसें होणार? कारण त्या वेळीं झालेल्या विवाहांचीं वर्णनें वाचलीं तर कन्या प्रौढ होत्या असें उघड दिसतें. ज्या कन्यांचा स्वयंवर झाला होता त्या प्रौढ असणेंच अधिक शक्य आहे. सहावें वर्ष हा जर विवाहाला योग्य काल असता तर स्वयंवराचे वेळीं वधूंनीं वराविषयीं पसंतीनापसंती दर्शविल्याचें जें वर्णन आहे तें अशक्य मानावें लागलें असतें. सीतेचा विवाह स्वयंवराचा समारंभ होऊन जरी झाला नसला तरी जनकानें तिचें वय पतिसंयोगसुलभ झाल्याचें पाहून ती वीर्यशुल्का आहे, असें जाहीर केलें होतें. जनकाचा पण सिद्ध करितां न आल्यामुळें अनेक राजांनीं मिथिलेला वेढा देऊन सीतेचें हरण करण्याचा एक वर्ष प्रयत्न चालविला होता. परंतु हा प्रयत्न जनकाच्या तपोबलानें फुकट गेला. यानंतर पुष्कळ काळ लोटल्यावर तें धनुष्य व यज्ञ पाहाण्यासाठीं विश्वामित्र रामाला घेऊन जनकाकडे गेला. या सर्व कथेकडे लक्ष दिलें तर विवाहकालीं सीतेचें जें सहा वर्षांचें वय सांगितलें त्यांत उपरिनिर्दिष्ट काल वजा करावा लागेल. असें केलें म्हणजे ज्या वर्षी सीता पतिसंयोगसुलभ झाली असें रामायणांत वर्णन आहे, तो काल स्पष्टपणें दिसून येईल. मिथिलेला राजांनीं घातलेला वेढा उठविल्यानंतर किती

दिवसांनीं राम जनकाकडे यज्ञ पाहाण्याकरितां गेला त्या कालाचा निर्देश रामायणांत " सुदीर्घस्य तु कालस्य " असा अस्पष्ट असल्यामुळें सहा वर्षांत किती काल वजा करावा हें नक्की सांगतां येत नाहीं. तथापि त्या वेळीं तिला चार वर्षें पूर्ण होऊन पांचवें वर्ष लागलें होतें, असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. हें वय विवाहास योग्य आहे असें कधीं तरी म्हणतां येईल काय? आणि एवढ्या या पंचवार्षिक अर्भकासाठीं इतक्या राजांनीं तुटून पडावें हें किती हास्यास्पद आहे? रा. रा. अभ्यंकर यांनीं आपल्या रामायणावरील निबंधांत गॉरिशिओनें प्रसिद्ध केलेल्या प्रतींतून जी माहिती मिळवून प्रसिद्ध केली आहे, तीवरून हा घोंटाळा पूर्णपणें उलगडतो. अरण्यकांडांतील सीतेच्या तोंडीं असलेले श्लोक या प्रतींत मुळींच नाहींत. यावरून ते प्रक्षिप्त आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. तसेंच या श्लोकांमुळें उद्भवलेल्या मधील बारा वर्षांच्या घोंटाळ्याविरुद्ध या प्रतींत स्पष्ट उल्लेख आहे. आमच्याकडील प्रतींत जेथें बारा वर्षांचा उल्लेख आहे, तेथें या प्रतींत एक वर्षाचा आहे:—

**संवत्सरं चाध्युषिता राघवस्य निवेशने।**
**भुंजाना मानुषान् भोगान्सर्वकामसमृद्धिनी॥ ३।६३।३॥**
**ततः संवत्सरादूर्ध्वं सममन्यत मे पतिम्।**
**अभिषेचयितुं राजा सोपाध्यायः प्रचक्रमे॥ ४॥**

" रामाच्या वाड्यामध्यें मीं एक वर्ष होत्यें. तेथें मनुष्याला योग्य असे सर्व भोग मीं भोगिले व माझ्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या. याप्रमाणें एक वर्ष लोटल्यावर राजा व उपाध्याय यांनीं माझा पति जो राम त्याला अभिषेक करण्याचा उपक्रम केला. "

याप्रमाणें गॉरिशिओच्या प्रतींत लिहिलें आहे. पुढें सुंदरकांडांतहि सीतेनें मारुतीला आपली हकीगत सांगतांना हाच काल सांगितला आहे. याकरितां हे श्लोक विश्वसनीय मानण्यास हरकत नाहीं. आतां आमचेकडील प्रतींतील अयोध्याकांडांत कौसल्येच्या तोंडीं असलेला जो श्लोक वर दिला आहे त्यांत वनवासाला जाते वेळीं रामाचें वय सतरा वर्षांचें होतें, असें सांगितलें आहे. याच स्थलीं गॉरिशिओच्या प्रतींत अठरा वर्षांचें वय सांगितलें आहे:—

**अद्य जातस्य वर्षाणि दश चाष्टौ च तेऽनघ ।**
**क्षपितानीह कांक्षत्या त्वत्तो दुःखपरिक्षयम् ॥ २।१७।१५ ॥**

" आज तुला अठरा वर्षें झालीं. इतकीं वर्षें हे निष्पाप रामा, तुझ्याकडून माझ्या दुःखांचा क्षय होईल या आशेनें मीं काढिलीं आहेत. "

या श्लोकामुळें एका वर्षाचा पुनः फेर पडतो आहे; तथापि विशेष नाहीं. आणि राज्याभिषेक चैत्र शुा ५ रोजीं व्हावयाचा होता व कौसल्येचें हें भाषणहि त्या वेळचें आहे. लवकरच चार दिवसांनीं त्याच्या वयाला सतरा वर्षें पूर्ण होऊन अठराव्याला प्रारंभ व्हावयाचा होता. याकरितां तो उल्लेख तिच्या तोंडून सहज आला होता, असें म्हटल्यास फारसा दोष येणार नाहीं. एकंदरींत विवाहकालीं रामाचें वय सोळा वर्षांचें असलें पाहिजे. सीतेचें वय त्या वेळीं किती होतें हें स्पष्ट सांगतां येत नाहीं; तथापि "रेमिरे मुदिता रहः" या वर्णनावरून ती बरीच प्रौढ होती, यांत शंका नाहीं.

## रामादींचे पुत्रांचीं राज्यें.

सीतेचें दिव्य झाल्यानंतर बारा सर्गांनीं उत्तरकाण्डाची समाप्ति झाली आहे. या बारा सर्गांत रामादिकांच्या पुत्रांनीं अनेक राज्यें स्थापन केलीं, त्याचें वर्णन असून त्यापुढें रामानें निर्याण केल्याचें लिहिलें आहे. हीं वर्णनें परस्परांशीं पृथक् असल्यामुळें त्यांतील मूळचें कोणतें व प्रक्षिप्त कोणतें, हें निवडून काढणें फार कठीण आहे. प्रक्षेपक कवींच्या वेळीं जीं निरनिराळीं राज्यें होतीं, त्यांचा रामाच्या वंशाशीं संबंध जोडण्याकरितां हे सर्ग मागून लिहिले असावे, असा रा. ब. वैद्य यांचा तर्क आहे. जर या वर्णनांत लांबलचक वंशावळी

१ It refers to the founding of kingdoms by the sons of राम, लक्ष्मण, भरत and शत्रुघ्न, kingdoms which were well-known in the time of the last editor. It appears probable that the various ruling races of India of that day must have invented these stories in order to connect themselves with the celebrated sun-race of अयोध्या, a family exalted above others by the birth of राम, the incarnation of विष्णु. —Riddle of the रामायण, Page 49.

सांगण्यांत आली असती, तर असा तर्क करण्यास बराच आधार होता. तसा प्रकार येथें नसल्यामुळें निःशंकपणें हा तर्क स्वीकारितां येत नाहीं. या वर्णनाचे सर्ग अवघे तीन आहेत. त्यांतील पहिल्या १०० व्या सर्गांत युधाजिताकडून आलेल्या गार्ग्य ऋषींनीं गंधर्वांचा देश जिंकण्याकरितां भरताचे पुत्र तक्ष व पुष्कल यांना सैन्यासह नेल्याचें वर्णन असून त्यापुढील सर्गांत त्यांनीं तेथें आपापलीं राज्यें स्थापन केल्याचें वर्णन आहे. यांच्या राजधानींचीं नांवें अनुक्रमें तक्षशिला व पुष्कलावती अशीं सांगितलीं आहेत. यापुढील सर्गांत लक्ष्मणाचे पुत्र अंगद व चंद्रकेतु यांचेकरितां अंगदीया व चंद्रकेतु या नांवांचीं दोन नगरें वसविल्याचें वर्णन आहे. पुढें सर्ग १०८ वा यांत लवाकरितां श्रावस्ती व कुशाकरितां कुशावती येथें राज्यें स्थापिल्याचें सांगितलें आहे.

रामायणांत तर हे सर्ग प्रक्षिप्त आहेत किंवा मूळचे आहेत, हें निश्चित ठरविण्याजोगें साधन मुळींच नाहीं. प्रक्षेपक कवीला आपल्या वेळचीं राज्यें फार फार प्राचीन काळचीं—रामापासून अविच्छिन्न चालत आलेलीं—आहेत, असें दाखवावयाचें होतें म्हणावें तर केवळ राजधानींच्या नांवांच्या प्राचीनत्वावर त्याचा हा हेतु कसा सिद्धीस जाणार ? मात्र राजधानीच्या नांवांचा प्राचीनपणा रामायणांतील उल्लेखांवांचून अन्य रीतीनें कसा सिद्ध होत आहे, हें आम्हीं अन्यत्र दाखविलें आहे. रामायणांतील प्रक्षेपकाचा काल रा. ब. वैद्य यांनीं इसवी सनाचें पहिलें शतक मानिला आहे; आणि रामायणांतील या वादविषयक सर्गांत सांगितलेल्या नगरींतील तक्षशिला नगरी तर इसवी सनाच्या अगदीं प्रारंभास प्रसिद्ध होती. यामुळें ऐतिहासिक बाजूनें या वादाचा अंशतः निर्णय करितां येतो. प्रक्षेपकाच्या पूर्वीं या नगरीचें नांव एक शतक तरी असल्यामुळें रा. ब. वैद्य यांचा तर्क युक्तीस जमत नाहीं.

## भाषेंत स्वर होते काय ?

आमचेकडील कांहीं विद्वान् गृहस्थ किंवा पाश्चात्य शोधक यांनीं वाल्मीकिरामायणावर जे निबंध लिहिले आहेत, त्यांमध्यें वाल्मीकींनीं छंदोबद्ध काव्य

प्रचारांत आणिलें अशी जी लोकांत समजूत आहे, ती निर्मूल ठरविली आहे. हा सिद्धान्त स्थापित करितांना त्यांनीं हें एक प्रमाण विशेषतः पुढें आणिलें आहे कीं, वैदिक मंत्र स्वररहित म्हटले तर भाषेंतील श्लोक तयार होतो. या कल्पनेला अनुसरून वाल्मीकींनीं भाषेंतील छंद तयार केले असावे, असा सदर टीकाकारांचा तर्क आहे. वाल्मीकींना या कल्पनेचा आश्रय करावा लागला नसून वेदांतील कांहीं भाग एकश्रुतीनें म्हणावयाचा असतो, म्हणून त्यांतील श्लोक त्यांच्यापुढें आयतेच तयार होते, असें या पुस्तकांत अन्यत्र दाखविलें आहे. या वादाविषयीं विचार करितांना एक वेगळाच प्रश्न उपस्थित झाला आहे. रामायणांतील श्लोक सध्यां जरी आम्ही स्वररहित म्हणत असतों, तरी रामायणकालीं ते स्वररहित म्हणावयाचा प्रघात होता किंवा कसें ? किंबहुना त्या वेळीं भाषेंत स्वर होते किंवा नाहीं, अशी शंका व्याकरणांतील कांहीं नियमांवरून उपस्थित झाली आहे. ही शंका वाचून सकृद्दर्शनीं कांहीं वाचकांना ती वेडगळ वाटण्याचा संभव आहे. कारण वेदांशिवाय आतां स्वर कोठेंहि उरले नाहींत. अशा रीतीनें आमची दृष्टि संकुचित झाली असल्यामुळें भाषा बोलते वेळीं स्वरांविषयीं मनांत आधीं विचार करावा लागेल, असें मनांत येऊन ही गोष्ट अशक्य वाटूं लागते; परंतु ज्या वेळीं संस्कृत भाषा प्रचारांत होती त्या कालाविषयीं सांप्रत विचार करावयाचा असल्यामुळें त्या वेळीं स्वरांकरितां वेगळी मेहनत करावी लागणें शक्य वाटत नाहीं. इंग्लिश भाषा बोलतांना त्यांतील स्वरांविषयीं—आघातां ( Accent ) विषयीं—वेगळा विचार करावा लागतो काय ? ज्याप्रमाणें आमच्या तोंडून ते विनायास बाहेर पडतात, त्याप्रमाणें संस्कृत भाषा प्रचारांत होती, त्या वेळीं स्वरांविषयीं बोलण्यापूर्वी विचार करावा लागत नसून ते सहज बोलतां येत असत, असें मानिल्यास प्रत्यवाय कोणता ? स्वररहित भाषेशीं आमचा दृढ परिचय झाला असल्यामुळें या प्रश्नाच्या योगानें कांहीं मंडळी चकित होतील, असें आम्हीं प्रारंभींच ध्वनित केलें आहे. केवळ अनुमानानें विचार करणारा मनुष्य आमच्या विरुद्ध निर्णय करील, इतका विरुद्ध पक्षाचा पगडा लोकांच्या अंतःकरणावर बसला आहे. स्वतांची भाषा असली तरी परकीपेक्षां परकी झाली असल्यामुळें प्रत्येकाच्या

अंतःकरणापुढें स्वरांविषयींचें काठिण्य एकदम दत्त म्हणून उभें राहतें. " अग्निमीळे पुरोहितम् " शिकवितांना उपाध्यायानें शिष्याची शेंडी धरून स्वर व्यक्त करावयास लाविल्याचे प्रसंग सर्वत्र दृग्गोचर होत असल्यामुळें स्वरांसहित बोलण्याची कल्पना लोकांना त्या विद्यार्थ्याप्रमाणें कठीण वाटेल. याच मुद्याच्या जोरावर केसरीकारांनीं " मराठी भाषेची लेखनशुद्धि " या विषयावर लिहितांना यापूर्वीच या प्रश्नाचा निकाल आमच्याविरुद्ध देऊन टाकिला आहे. तथापि या मुद्याचें जर शास्त्रीयदृष्ट्या विवेचन केलें तर तो व्यर्थ होणार आहे. स्वर व्यक्त करितांना मानेला हिसडा दिला पाहिजे, असें कोठेंहि सांगितलेलें नाहीं. उलट अशा रीतीनें म्हणणाराचा शास्त्रकारांनीं निषेध केला आहे. " गीती शाघ्री शिरःकंपी तथा लिखितपाठकः " असें जें अधम पाठकांचें परिगणन केलें आहे, त्यांतील शिरःकंपी या शब्दानें असल्या पाठकांचाच बोध होतो. स्वर व्यक्त करण्याची शुद्ध पद्धति कळली तरी तिचा अभ्यास नसल्यामुळें वरील अधम पद्धतीचा प्रचार झाला आहे. फार प्राचीन काळाविषयीं आपणांस विचार करावयाचा असल्यामुळें सध्यांची स्वर व्यक्त करण्याची पद्धति त्या काळाला लागू करितां येणार नाहीं. " उच्चैरुदात्तः " या सूत्रावर उदात्तस्वराची व्याख्या देतांना सिद्धान्तकौमुदीमध्यें खालीं लिहिल्याप्रमाणें विवरण आहे:—

**ताल्वादिषु सभागेषु स्थानेषूर्ध्वभागे निष्पन्नोऽजुदात्तसंज्ञः स्यात् ।**

मुखामध्यें वर्णोच्चाराचीं तालु आदिकरून जीं स्थानें आहेत त्यांचे उच्चनीच असे भाग आहेत; त्यांतील उच्चभागीं वायु आदळून जो अच् स्वर उच्चारिला जातो त्याला उदात्त स्वर म्हणावें, असा वरील वाक्याचा अर्थ आहे. याच्या उलट अनुदात्त स्वराची व्याख्या आहे. या विवरणामध्यें स्वर व्यक्त करितांना मानेच्या कोणत्या बाजूला किती अंश हिसडा दिला पाहिजे वगैरे कांहीं सांगितलेलें नाहीं. या गोष्टीचा यापूर्वीं पुष्कळांनीं बाऊ करून ठेविला आहे व पुढेंहि कदाचित् कोणीतरी तो करील. याकरितां हा केवळ भ्रम आहे, हें येथें स्पष्टपणें नमूद करून ठेविणें अवश्य आहे.

आतां प्राचीनकालीं भाषा स्वरांसहित बोलण्याचा प्रघात होता असा संशय आम्हांला येऊन तो कसा दृढ झाला हें येथें सविस्तर सांगितल्याशिवाय हा

विषय पुरा होणार नाहीं. व्याकरणांत स्वरांविषयीं नियम सांगतांना ते केवळ वेदांला लागू आहेत असें सांगितलेलें नसून त्यांचा विचार भाषा व वेद या दोहोंसंबंधीं एकत्र केला आहे. शाकटायनाच्या किंवा सारस्वत व्याकरणांत स्वरांविषयीं मुळींच विचार केलेला नाहीं. पाणिनीय व्याकरणहि प्राचीन आहे, यांत शंका नाहीं. तेव्हां इतर व्याकरणांत स्वरांविषयीं नियम नाहींत, एवढया-वरून भाषेंत स्वर नव्हते असें म्हणतां येणार नाहीं. हें अनुमान ग्राह्य धरिलें तर वेदांत स्वर नव्हते, असें म्हणावें लागेल, व तें तर साफ चुकीचें आहे, हें सिद्ध करण्याची जरूर नाहीं. पाणिनीय व्याकरणांत भाषेंतील व वेदांतील शब्दांचा एकत्र विचार केलेला आहे. प्रथम भाषेंतील शब्दांविषयीं सामान्य नियम सांगून नंतर छांदसरूप भिन्न असेल तर तेवढ्यापुरता वेगळा नियम सांगितला आहे. उदात्त, अनुदात्त व स्वरित असे जे स्वरांचे तीन भेद आहेत ते वैदिक शब्दांकरितां म्हणून वेगळे सांगितलेले नाहींत. स्वरांविषयीं विशेष नियम सांगतांना जर तो नियम वेदांमध्यें विकल्पानें दिसत असेल तर तेथें " विभाषा छंदसि " असें सूत्र केलें आहे. आणि त्याचा भाषेमध्यें विकल्प असल्यास तेथें " विभाषा भाषायाम् " असें सूत्र केलें आहे. ज्यांना ज्यांना या सूत्रांचा स्पष्ट खुलासा पाहिजे असेल त्यांनीं तो मूळांत पहावा. सूत्रांच्या बाह्यस्वरूपावरून आमच्या म्हणण्याची सत्यता वाचकांस पटणार आहे. जर स्वरविधि वेदांपुरता असता तर या दोनहि प्रकारच्या सूत्रांचा अवतार झाला नसता. भाषेंत स्वर होते या-बद्दल स्पष्ट उल्लेख सांपडणें कठीण दिसतें; निदान आम्हांला तरी तो आढळला नाहीं. तथापि व्याकरणग्रंथांतील आणखी कांहीं प्रमाणें खालीं देतों. पातंजल महाभाष्यांत व्याकरणाचें अध्ययन कां करावें याचीं कारणें प्रारंभीं दिलीं आहेत. त्यांतील एक येथें उतरून घेतों:—

**दुष्टः शब्दः स्वरतो वर्णतो वा । मिथ्या प्रयुक्तो न तमर्थमाह ।**
**स वाग्वज्रो यजमानं हिनस्ति । यथेन्द्रशत्रुः स्वरतोऽपराधात् ॥**

" स्वर चुकल्यास अथवा उच्चार चुकल्यास दुष्ट शब्द होतो व अशा रीतीनें अशुद्ध प्रयोग केला असतां त्यापासून योग्य अर्थ निष्पन्न होत नाहीं. असा अशुद्ध

प्रयोग वज्राप्रमाणें असून तो यजमानाचा घात करितो. इंद्राचा शत्रु जो वृत्रासुर त्याचा स्वर चुकल्यामुळें त्याचा असाच घात झाला."

स्वर चुकला तर शब्द दुष्ट होतो असें येथें सांगितलें आहे; व वृत्राविषयींचें प्रसिद्ध उदाहरण दिलें आहे. वृत्राचा अपराध जरी लौकिक भाषेंतील नव्हता तथापि पूर्वीचा नियम सामान्य म्हणून सांगितला आहे हा नियम सामान्य नसता तर वैदिक शब्दांचा उच्चार शुद्ध होण्याकरितां व्याकरणाचें अध्ययन करण्याचें कारण नाहीं. वेदाध्ययन करणारे सांप्रतचे ब्राह्मण तरी याकरितां व्याकरण कोठें शिकत आहेत? वरील नियम सामान्य असून वैदिक व लौकिक शब्दांना तो लागू आहे, असें प्रसिद्ध वैयाकरण नागोजीभट्ट यांनीं आपल्या उद्योत नामक टीकेंत प्रतिपादन केलें आहे.

**मंत्र इति। न चोहितस्य कथं मंत्रत्वमिति वाच्यम्। मंत्रशब्दस्य बोधपरत्वात्। अत एव "मंत्रो हीमः स्वरतः" इति शिक्षापाठं विहाय भाष्ये "दुष्टः शब्दः" इति पठितम्। तत्रत्य मंत्रशब्दस्य शब्दमात्रपरतेति सूचयितुम्॥**

"वृत्रानें जें वाक्य म्हटलें तो मंत्र नव्हता. त्यांत इंद्रशब्दाचा नियमाप्रमाणें ऊह केला होता; तेव्हां तो मंत्र कसा होईल व त्याला दोष कसा लागेल? तर, मंत्र म्हणजे ज्यापासून अर्थ होतो असा शब्द. यासाठीं 'मंत्रो हीनः स्वरतो वर्णतो वा' हा शिक्षेंतील पाठ सोडून 'दुष्टः शब्दः स्वरतो वर्णतो वा' असा पाठ भाष्यांत घेतला आहे. यावरून शिक्षेंत जरी मंत्र असें लिहिलें आहे, तरी त्याचा अर्थ शब्द असा आहे."

या टीकेवरून आम्हीं वर केलेलें अनुमान सत्य असल्याबद्दल वाचकांची खातरी झाल्यावांचून राहणार नाहीं. "ऋलृक्" या प्रत्याहारसूत्राविषयीं विचार करितांना याच ग्रंथांत एके स्थलीं लिहिलें आहे:—

**"(न कर्तव्यः। इदमवश्यं कर्तव्यम।) प्रकृतिवदनुकरणं भवतीति। किं प्रयोजनम्। 'द्विः' पचन्त्वित्याह "तिङ्ङतिङ" इति निघातो यथा स्यात्।**

या भाष्याचा थोडासा खुलासा केल्याशिवाय त्यांतील रहस्य कळणार नाहीं. शब्दाचें अनुकरण मूळ प्रकृतीप्रमाणें होतें म्हणजे प्रकृतीला जें कांहीं विशेष असतें तें सर्व अनुकरणांत यावयाचें असा सिद्धान्त प्रथम सांगितला आहे. हा

सिद्धान्त जर स्वीकारिला नाहीं तर काय अनर्थ होईल, हें पुढील पंक्तींत उदाहरण घेऊन दाखविलें आहे. एक मनुष्य "पचन्तु पचन्तु" असें म्हणाला. याचें अनुकरण करितांना दुसऱ्यानें 'द्विःपचन्त्वित्याह' असें सांगितलें. या ठिकाणीं पूर्वीच्या शब्दांला असलेला अनुदात्त स्वर अनुकरणांतहि आला पाहिजे आहे. वरील सिद्धान्त मान्य न केल्यास तो येणार नाहीं. हा भाष्यकारांचा आशय आहे. येथें दिलेलें उदाहरण साधें व्यवहारांतील आहे. जर हें उदाहरण वेदांतील असतें तर स्वर बदलण्यासंबंधीं विवेचन करण्याची जरूर नव्हती. अशीं उदाहरणें भाष्यांत बरींच सांपडतील. वरील उदाहरणावरून भाषेंत स्वर होते, ही गोष्ट वाचकांना पटल्यावांचून राहणार नाहीं. स्वरांसहित भाषा बोलण्याचा त्या वेळीं प्रघात होता किंवा नाहीं हें आणखी प्रमाणें सांपडल्याशिवाय सिद्ध करितां येणार नाहीं. असें असलें तरी भाष्य हा ग्रंथ ज्या वेळीं संस्कृत भाषा प्रचारांत होती त्या वेळीं लिहिलेला आहे; आणि व्याकरणावरील सर्व ग्रंथांत हा मुख्य व प्रमाण म्हणून मानितात. भाष्यामध्यें उदाहरणें व प्रत्युदाहरणें यांची जी गर्दी करून सोडिलेली आहे त्यावरून त्या वेळीं संस्कृत भाषा प्रचारांत होती, हें उघड दिसून येतें. वर दिलेलें उदाहरण अशा ग्रंथांतील आहे; तेव्हां त्यावरून निघणारा सिद्धान्त विरुद्ध प्रमाण सांपडेपर्यंत मान्य करण्यास हरकत नाहीं.

भाष्यकारांना होऊन सुमारें दोन हजार वर्षें होऊन गेलीं आहेत. त्यांच्या वेळीं जर भाषेंतील शब्दांला स्वर होते तर वाल्मीकिमहर्षींच्या वेळीं ते होते हें सिद्ध करण्याची आवश्यकता नाहीं. याप्रमाणें रामायण वाचण्याची पद्धतिहि त्या वेळीं स्वरांसहित असूं शकेल. रामाच्या दरबारांत ज्या वेळीं कुशलवांनीं रामायणगायन करून दाखविलें त्या वेळीं तें श्रवण करण्याकरितां ज्या मंडळींना मुद्दाम बोलाविण्यांत आलें होतें त्यांत स्वरज्ञानांत कुशल असलेली कांहीं मंडळीहि बोलाविलेली होतीः—

**स्वराणां लक्षणज्ञांश्च उत्सुकद्विजसत्तमान् ॥ ७।९४।५ ॥**
**एतान्सर्वान्समानीय गातारौ समवेशयत् ॥ ९ ॥**

"स्वरांचीं लक्षणें जाणणारे व गायन ऐकण्यास उत्सुक असलेले मोठ-

मोठे ब्राह्मण वगैरे सर्व मंडळी बोलावून त्यांमध्यें त्या दोन गवयांना बसविण्यांत आलें."

रामायण स्वरांसहित वाचण्याची जर पद्धति असली तर वेद म्हणण्याच्या पद्धतींत व या पद्धतींत भेद कोणता राहिला ? मग स्वर सोडून वैदिक मंत्र वाचिले तर भाषेतील छंदाप्रमाणें ते वाचतां येतात व वाल्मीकींनीं हा शोध लावून भाषेमध्यें छंद निर्माण केले, अशी कल्पना करण्याची जरूर राहणार नाहीं. वाल्मीकींनीं छंदोबद्ध वाणी प्रथम निर्माण केली, ही लोकांत असलेली समजूत निर्मूल आहे, हें आम्हांला मान्य आहे व त्याबद्दल या पुस्तकांत यापूर्वी विवेचन केलेलें आहे. ही समजूत निर्मूल ठरवितांना आम्हांला आलेला संशय येथें दाखवून आम्हीं हा दुसरा मार्ग वाचकांपुढें मांडिला आहे.

# भाग ७ वा.

## रामायणांतील प्रक्षिप्त भाग.

वाल्मीकिमहर्षींच्या या काव्याची महती पहिल्या भागांत वर्णिली आहे. आतां रामायणाच्या सध्यां उपलब्ध असलेल्या प्रतींत जो कांहीं प्रक्षिप्त भाग आहे, त्याविषयीं या भागांत विचार करावयाचा आहे. हा प्रक्षिप्त भाग रामायणाला जोडणाराचा हेतु कदाचित् वाईट नसेल, उलट पुष्टि द्यावयाचेंहि त्याच्या मनांत असेल; परंतु आम्हांला तरी ही पुष्टि न वाटतां सूज वाटते. वाल्मीकिमहर्षीसारख्या कवीच्या काव्यांत न शोभणारे द्विरुक्ति किंवा परस्परविरोध वगैरे दोष या प्रक्षिप्त भागांच्या योगानें रामायणांत उत्पन्न झाले आहेत; किंबहुना या दोषांच्या साहाय्यानेंच प्रक्षिप्त भाग निवडून काढितां येतात. वाल्मीकिमहर्षींच्या गोड, शुद्ध, ओजस्वी, प्रतिभाशाली व गंगाप्रवाहाप्रमाणें सरळ वाहणाऱ्या भाषापद्धतीशीं तुलना केली, तर प्रक्षिप्त भागांतील भाषापद्धति नीरस अतएव त्याज्य वाटते. नुसत्या भाषापद्धतीच्या नीरसत्वावरून कोणताहि सर्ग वा श्लोक प्रक्षिप्त ठरविणें धाडसाचें होईल, हें खरें आहे; व प्रस्तुतचा भाग लिहितांना या प्रमाणाचा आम्हीं कितपत उपयोग केला आहे, हें सुज्ञ वाचकांस दिसून येईलच. या प्रेक्षपक कवींच्या अंगीं तादृश पांडित्य नसल्यामुळें त्यांनीं मूळ काव्यांत कोणता भाग येऊन गेला आहे, इकडे मुळींच लक्ष दिलेलें नाहीं. कदाचित् रामायणांतील जो भाग आम्हीं प्रक्षिप्त ठरविला आहे, त्याशिवाय आणखीहि कांहीं भाग मूळ काव्याशीं पूर्णपणें संलग्न झाल्यामुळें प्रक्षिप्त असूनहि उमगला नसेल; परंतु तेवढ्यावरून प्रक्षेपक कवींचें दूरदर्शित्व निःशंकपणें अनुमानितां येणार नाहीं. कसेंहि असो; त्यांच्या या अदूरदर्शित्वामुळें त्यांच्या हातून जे प्रमाद झाले आहेत, त्यांचा या भागांत आम्हांला उपयोग करून घेतां येईल, यांत संशय नाहीं.

ज्या दोषांवरून आपणांस प्रक्षिप्त सर्ग ठरवितां येतात, ते दोष रामायणाच्या प्राचीन टीकाकारांस उमगले नव्हते, असें नाहीं. कांहीं प्रसंगीं द्विरुक्ति किंवा पर-

स्परविरोध असल्याचें त्यांनीं कबूल केलें आहे; परंतु त्यावरून तो भाग प्रक्षिप्त आहे, असें स्पष्ट मत देण्याचें धाडस मात्र त्यांनीं केलें नाहीं. यामुळें कांहीं तरी कारणें देऊन हे दोष नाहींत, असें सिद्ध करण्याचा त्यांना यत्न करावा लागला आहे व तो व्यर्थ गेला आहे. कांहीं स्थलीं तर अशी मजा झाली आहे कीं, दोष निवारण करण्याच्या भरांत त्यांनीं जी कोटि लढवून आपल्या म्हणण्याचें समर्थन केलें आहे, तीच कोटि पुढील एकाद्या प्रसंगीं त्यांच्या गळ्यांत आली आहे. रामायणावरील टीकेंतच नव्हे तर प्राचीन ग्रंथांवरील कोणत्याहि ग्रंथाचे टीकेंत अशा तऱ्हेचे प्रसंग चाणाक्ष वाचकांना पदोपदीं आढळून येतील. ग्रंथांतील दोष, दोष म्हणून पुढें न आणितां, त्यावर शक्य त्या रीतीनें पांघरूण घालणें हें आपलें कर्तव्य आहे, अशी प्राचीन टीकाकारांची भावना दिसते. लोकांत शब्दाचा जो प्रयोग असेल, त्याविरुद्ध प्रतिपादन करणें अशक्य व निरुपयोगी असल्यामुळें " प्रयोगशरणा वैयाकरणाः " ही परिभाषा वैयाकरणांना योग्य आहे; इतरांनींहि त्याचा कित्ता आपल्यापुढें ठेवणें योग्य होणार नाहीं. दोषांचें समर्थन करावयाचें कार्य खऱ्या पंडितांशिवाय होणें शक्य नाहीं, हें आम्हांला कबूल आहे; तथापि अशा कामीं बुद्धिसर्वस्वव्यय करणें श्रेयस्कर दिसत नाहीं.

कांहीं पौराणिक ग्रंथांत प्रक्षिप्त भाग इतक्या बेमालूमपणें घुसडले असतात कीं, कितीहि धूर्त टीकाकार असला तरी त्याला ते उमगून काढणें मुष्किलीचें होऊन जातें. आमचें महाभारत घ्या किंवा अठरा 'पुराणें उघडून पहा; त्यांतील प्रक्षिप्त भाग त्यांचेबद्दल संशय आला तरी ते प्रक्षिप्त आहेत असें सिद्ध करणें अशक्य असतें. या ग्रंथांची रचनाच अशी आहे कीं, चाणाक्ष कवीला आपली कृति कोणाला न उमगेल अशा रीतीनें त्यांमध्यें सहज घुसडून देतां येईल. संवादात्मक पद्धतीनें निरनिराळीं कथानकें त्यांमध्यें सांगितलीं असल्यामुळें त्यांत आणखी कथांचा समावेश केल्यास त्यांचा मूळ ग्रंथाशीं सहज मिलाफ होऊन जाईल. रामायणाची रचना पुराणादिकांच्या धर्तीवर नसल्यामुळें मूळ ग्रंथाशीं प्रक्षिप्त भागाचा मिलाफ होत नाहीं व यामुळें तो सहज उमगून काढितां येतो. या महाकाव्यांत रामचरित्राचा कथाप्रवाह सरळपणें वाहत गेला आहे.

उत्तरकांडाशिवाय सर्व रामायणांत संवादात्मक कथाभाग फार थोडा आहे. उत्तर-कांडांत मात्र बराच संवादात्मक कथाभाग आहे. या कांडांत अशा पद्धतीनें आणखी कथाभाग घुसडणें असल्यास अजूनहि अशक्य नाहीं.

रामायणाची श्लोकसंख्या त्याच ग्रंथांत सांगितलेली आहे. तीवरून या काव्यांत कांहींतरी फेरफार झाला असला पाहिजे, असें सकृद्दर्शनीं दिसून येतें. रामायणाची श्लोकसंख्या खालील श्लोकांत सांगितली आहे.

चतुर्विंशत्सहस्राणि श्लोकानामुक्तवानृषिः।
तथा सर्गशतान्पंच षट्कांडानि तथोत्तरम् ॥ १।४।२ ॥

"वाल्मीकिऋषींनीं या ग्रंथांत चोवीस हजार श्लोक लिहिले असून त्यांत पांचशें सर्ग, सहा कांडें, तसेंच उत्तरकांड अशीं रचिलीं आहेत."

सांप्रत रामायणाची जी प्रत उपलब्ध आहे तींत श्लोकसंख्या व सर्गसंख्या खालीं दिल्याप्रमाणें आढळून येते:—

| कांडाचें नांव. | सर्गसंख्या. | श्लोकसंख्या |
|---|---|---|
| बाल | ७७ | २२९२ |
| अयोध्या | ११९ | ४३५५ |
| अरण्य | ७५ | २४७६ |
| किष्किन्धा | ६७ | २४८१ |
| सुन्दर | ६८ | २८९३ |
| युद्ध | १२८ | ५७९५ |
| उत्तर | १११ | ४०४३ |
| एकूण | ६४५ | २४३३५ |

प्राचीन टीकाकारांची टीका नसल्यामुळें साहजिक प्रक्षिप्त ठरलेले सर्ग पंधरा असून लोकसंख्या ६९४ आहे. सर्गांच्या व श्लोकांच्या वरील बेरजेंतून जर या संख्या वजा केल्या तर सर्ग ६३० व श्लोक २३६४१ उरतात. म्हणजे जो कथाभाग प्रक्षिप्त आहे किंवा काय याचा आपणांस विचार करावयाचा आहे, तो सर्व या मर्यादेंत आहे. यांतून प्रक्षिप्त भाग कमी व्हावयाचा म्हणजे आधींच चोवीस हजारांच्या आंत असलेली संख्या आणखी कमी होणार! सर्ग तर

सर्ग्यांच १४५ अधिक आहेत. कितीहि सूक्ष्मदृष्ट्या परीक्षण केलें तरी या काव्यांत इतके सर्ग प्रक्षिप्त निघणें शक्य नाहीं. आतां एवढें खरें कीं, सर्गांचे आद्यन्त सर्व प्रतींतून सारखे आढळत नाहींत. याकरितां सर्गांच्या न्यूनाधिक्यावर कोणतेंहि प्रमाण ठरविणें बरोबर होणार नाहीं. श्लोकांच्या संख्येविषयीं मात्र विचार करणें अवश्य आहे. चोवीस हजार श्लोकांची भरती होण्यास प्रक्षिप्त श्लोकांचा समावेश करावा लागूनहि संख्या पुरी होत नाहीं. वरील श्लोकांत सांगितलेली सर्गांची संख्या पांचशें ही सहा कांडांतील सर्गांची असून श्लोकसंख्या सर्व रामायणाची, अशी तोड 'रामायणतिलक' नामक एका टीकेंत सुचविलेली आहे:—

**तत्र पंचशतरूपसर्गसंख्या षट्कांडानामेव ।**
**श्लोकसंख्या तु सोत्तराणामित्याहुः ।**

परंतु या तोडीनें श्लोकसंख्येचा घोटाळा मुळींच मिटत नाहीं. शिवाय हा भेद करण्यास आधार कोणता? कतकानें हा वादविषयक श्लोकच प्रक्षिप्त ठरविला आहे. ही तोड आम्हांला अधिक ग्राह्य वाटते. कारण श्लोकसंख्या अधिक झाली असती तर त्यांतील प्रक्षिप्त भाग किती आहे हें नक्की ठरवितां आलें असतें; या स्थलीं श्लोकसंख्येचीच भर होत नसल्यामुळें हा श्लोक प्रक्षिप्त मानिल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

रामायणाची श्लोकसंख्या चोवीस हजार होण्यास भरीस घालावयास लागणारे श्लोक लुप्त झाले असावे किंवा प्रक्षेपकानें आपल्या विरुद्ध वाटणारे श्लोक जाणुनबुजून काढून टाकिले असावे असा तर्क करण्यास जागा नाहीं. प्रक्षेपक इतका चतुर व धाडसी असावा असें वाटत नाहीं. तसेंच कथाप्रवाहाला प्रक्षिप्त भाग असतील त्याशिवाय अन्यत्र खळ पडलेली नाहीं. अशी स्थिति झाली असल्यामुळें रामायणांतील कांहीं भाग लुप्त झाला आहे असें म्हणवत नाहीं. तेव्हां हा श्लोक प्रक्षिप्त मानणें भाग आहे.

वाल्मीकिमहर्षींनीं हें काव्य केवळ अनुष्टुभ छंदांत रचिलें. मोठमोठ्या वृत्तांचे जे श्लोक आहेत ते सर्व प्रक्षिप्त आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. सर्व रामायण या छंदांतच करण्याबद्दल महर्षींनीं प्रारंभींच प्रतिज्ञा करून ठेविली आहे. क्रौंचवध केल्याचें पाहून त्यांनीं निषादाला शाप दिला, तो असा होता:—

**मा निषाद प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वतीः समाः ।**
**यत्क्रौंचमिथुनोदकमवधीः काममोहितम् ॥**

" हे निषादा, ज्या पक्षीं काममोहित झालेल्या क्रौंच पक्ष्यांच्या जोडप्यांतील एकाचा तूं वध केला आहेस, त्यापक्षीं पुष्कळ वर्षेपर्यंत तुला चांगली स्थिति प्राप्त होणार नाहीं. "

ब्रह्मदेवांनीं या छंदांत रामायण रचण्याची वाल्मीकींना आज्ञा दिली. या आज्ञेप्रमाणें त्यांनीं हें काव्य अनुष्टुभ छंदांतच केलें असलें पाहिजे, हें उघड आहे. वाल्मीकींची इच्छाहि ब्रह्मदेवांच्या आज्ञेप्रमाणें होती:--

**तस्य बुद्धिरियं जाता महर्षेर्भावितात्मनः ।**
**कृत्स्नं रामायणं काव्यमीदृशैः करवाण्यहम् ॥१।१।४१ ॥**

" त्या शुद्ध अंतःकरणाच्या महर्षींला अशा प्रकारच्या श्लोकांत सर्व रामायण लिहावें अशी इच्छा उत्पन्न झाली. "

यांतील " ईदृशैः " या पदाचा अर्थ जर कोणी विपरीत करूं लागला तर त्याचा खुलासा पूर्वीच्या श्लोकांत येऊन गेला आहे.

**समाक्षरैश्चतुर्भिश्च पादैर्गीतो महर्षिणा ।**
**सोऽनुव्याहरणाद् भूयः शोकः श्लोकत्वमागतः ॥ १।२।४०॥**

" सारख्या अक्षराचे चार पाद त्या श्लोकांत होते. शोकामध्यें पुनः पुनः उच्चारिलेलें तें वाक्य श्लोकत्व पावलें. "

या श्लोकावरून " मा निषाद " हा श्लोक ज्या छंदांत आहे तद्व्यतिरिक्त छंदांत रामायणांतील श्लोक केलेला नाहीं, असें उघड होतें. बहुतेक सर्व रामायण याच छंदांत आहे. प्रक्षिप्त वाटणाऱ्या भागांतील बराच भाग अनुष्टुभाशिवाय इतर छंदांत आढळून येतो, याचें कारण हेंच होय. अनुष्टुभ छंदांतहि कांहीं प्रक्षिप्त भाग आहे.

कालिदासादि महाकवींच्या प्रसिद्ध काव्यांच्या पद्धतीप्रमाणें या आर्ष महाकाव्याला स्वरूप देण्याचा प्रक्षेपकानें प्रयत्न केल्यामुळें त्याला विशेषतः दीर्घच्छंदांचा आश्रय करावा लागला आहे. रघुवंशादि काव्यांमध्यें बहुधा सर्गांतील सर्व श्लोक एका छंदांत ठेवून शेवटचा श्लोक वेगळ्या छंदांत ठेवण्याची वहि-

वाट आहे. रामायणाचें मूळचें स्वरूप या पद्धतीप्रमाणें नसणार, हें उघड आहे. प्रक्षेपकानें हें स्वरूप बदलून बहुधा प्रत्येक सर्गाचा शेवटचा श्लोक दीर्घच्छंदांत घातला आहे. कांहीं सर्गांतील शेवटचे श्लोक अनुष्टुभ छंदांतच असल्यामुळें आम्हीं 'बहुधा' हा शब्द योजिला आहे. वस्तुतः सर्व काव्यभर हाच क्रम आढळून येतो असें म्हणण्यास हरकत नाहीं. ही पद्धति चांगली किंवा वाईट त्याबद्दल आम्हांला तूर्त विवेचन करावयाचें नाहीं, तर ही पद्धति महर्षींनीं स्वतः योजिली होती किंवा नाहीं हें पहावयाचें आहे. रामायणकाव्य अनुष्टुभ छंदांतच करण्याबद्दल महर्षींच्या मनांत इच्छा होती, असें एका श्लोकाचा उतारा देऊन पूर्वीं सिद्ध केलें आहे. यावरून अनुष्टुभाशिवाय इतर छंदांचा प्रवेश रामायणांत होणें अशक्य नसलें तरी अनिष्ट आहे. प्रक्षेपक तादृश दूरदर्शी नसल्यामुळें त्यानें किती कथाभाग येऊन गेला आहे व पुढें काय सांगितलें आहे इकडे लक्ष न देतां या काव्याची योग्यता वाढविण्याच्या हेतूनें प्रत्येक सर्गाचे शेवटीं दीर्घच्छंदांत नवीन श्लोक घालून रघुवंशादि काव्यांच्या धर्तीवर या काव्याचें स्वरूप बदलून टाकिलें आहे. मासल्याकरितां प्रत्येक कांडांतील श्लोक पुढें देतों:—

## बालकाण्ड.

दुसऱ्या सर्गाचे शेवटचे दोन श्लोक खालीं दिल्याप्रमाणें आहेत.

**उदारवृत्तार्थपदैर्मनोरमैः। तदास्य रामस्य चकार कीर्तिमान्।**
**समाक्षरैः श्लोकशतैर्यशस्विनो। यशस्करं काव्यमुदारदर्शनः॥४२॥**
**तदुपगतसमाससंधियोगम्। सममधुरोपनातार्थवाक्यबद्धम्।**
**रघुवरचरितं मुनिप्रणीतम्। दशशिरसश्च वधं निशामयध्वम्॥४३॥**

"त्या उदार व कीर्तिमान् वाल्मीकि मुनींनीं त्या यशस्वी रामाचें चरित्र काव्यामध्यें प्रथित केलें. या काव्यांत शेकडों श्लोक असून त्यांतील अक्षरें सारखीं आहेत. त्यांतील पदांचा अर्थ सुंदर व गंभीर असून पदरचनाहि मनोरम आहे. त्यांतील समास व संधी यथाशास्त्र योजिले असून त्यांतील वाक्यांच्या अर्थांत न्यूनता किंवा अधिकपणा नाहीं व तो गोड आहे. यामध्यें रावणाचा वध व रामचरित्र सांगितलें आहे, तें तुम्हीं श्रवण करा."

यांत वाल्मीकिमहर्षींनीं रामायणकाव्य केलें व तें तुम्हीं ऐका असें सांगितलें आहे. याचे पूर्वीचा श्लोक वर अवतरिलेला असून त्यांत तर महर्षींना रामायण काव्य लिहिण्याची इच्छा झाली, असें सांगितलें आहे; आणि त्याचे पुढील वरील दिलेल्या श्लोकांत रामायणकाव्य लिहून झाल्याचें स्पष्ट म्हटलें आहे. याचा मेळ कसा घालावयाचा ?

## अयोध्याकाण्ड.

अठराव्या सर्गाच्या शेवटीं खालील श्लोक आहे:—

**इतीव तस्यां परुषं वदन्त्याम् । न चैव रामः प्रविवेश शोकम् ।**
**प्रविव्यथे चापि महानुभावो । राजा च पुत्रव्यसनाभितप्तः ॥ ४१ ॥**

" अशा रीतीनें ती कठोर भाषण करीत होती, तरी रामाला त्याबद्दल मुळींच वाईट वाटलें नाहीं. परंतु पुत्राचा वियोग होणार असें मनांत येऊन तो महापराक्रमी दशरथ संतप्त होऊन त्याला फार शोक झाला. "

यांत कैकेयीचें निष्ठुर भाषण ऐकून रामाला मुळींच खेद झाला नाहीं वगैरे वर्णन आहे. पुढील सर्गाच्या प्रारंभीं या अर्थाचा एक श्लोक आहे:—

**तदप्रियममित्रघ्नो वचनं मरणोपमम् ।**
**श्रुत्वा न विव्यथे रामः कैकेयीं चेदमब्रवीत् ॥ २ ॥**

" कैकेयीच्या त्या भाषणाला मरणाचीच उपमा योग्य; इतकें तें दुःसह होतें. ( तथापि ) तें श्रवण करूनहि शत्रुनाशक रामाच्या मनाला कोणताहि विकार न होतां त्यानें तिला ( शांतपणें ) उत्तर दिलें. "

या श्लोकाच्या योगानें पूर्वसर्गांतील श्लोक व्यर्थ होत आहे हें सिद्ध करणें नलगे.

## अरण्यकाण्ड.

अठ्ठेचाळिसाव्या सर्गाच्या शेवटीं दीर्घच्छंदांत एक श्लोक आहे:—

**जीवेच्चिरं वज्रधरस्य पश्चात् । शचीं प्रधृष्याप्रतिरूपरूपाम् ।**
**न मादृशीं राक्षस धर्षयित्वा । पीतामृतस्यापि तवास्ति मोक्षः ॥ २४ ॥**

" इंद्राची अप्रतिम सुंदर स्त्री शची हिचें त्याच्या पाठीमागें जरी तूं हरण केलेंस तरी तुला जगतां येईल; परंतु हे राक्षसा, माझ्यासारख्या स्त्रीचें जर तूं हरण केलेंस तर तूं जरी अमृत प्याला असलास तरी तुला मृत्यु चुकवितां येणार नाहीं. "

या श्लोकाच्या पूर्वीच्या श्लोकांत हीच उपमा येऊन गेली आहे:—

**अपहृत्य शचीं भार्यां शक्यमिन्द्रस्य जीवितुम् ।**
**न हि रामस्य भार्यां मामानीय स्वस्तिमान्भवेत्** ॥ २३ ॥

"इंद्राची भार्या शची हिचें जरी तूं हरण केलेंस तरी तुला जगतां येईल; परंतु मीं रामाची स्त्री आहें, माझें तूं हरण केलेंस तर तुझें कल्याण होणार नाहीं."

दोनहि श्लोकांतील उपमांमध्यें भेद मुळींच नाहीं. याकरितां दुसरा श्लोक निरुपयोगी ठरत असल्यामुळें तो प्रक्षिप्त मानणें भाग आहे.

## किष्किन्धाकाण्ड.

पन्नासाव्या सर्गाच्या समाप्तीच्या प्रसंगीं वरच्यासारखाच हास्यास्पद प्रकार आहे.

**विस्मिता हरयस्तत्र व्यवतिष्ठन्त सर्वशः ।**
**पप्रच्छ हनुमांस्तत्र काऽसि त्वं कस्य वा बिलम्** ॥ ४० ॥

"(तेव्हां) ते वानर सर्वस्वी आश्चर्यचकित होऊन उभे राहिले व हनुमानानें तिला तूं कोण, आणि हें विवर कोणाचें, असे प्रश्न केले."

या श्लोकांत जी हकीगत आली आहे, तीच किंचित् विस्तारानें पुढील शेवटच्या श्लोकांत आली आहे.

**ततो हनूमान्गिरिसंनिकाशः । कृतांजलिस्तामभिवाद्य वृद्धाम् ।**
**पप्रच्छ का त्वं भवनं बिलं च । रत्नानि चेमानि वदस्व कस्य ॥४१॥**

"पर्वताप्रमाणें धिप्पाड असलेल्या हनुमानानें नंतर त्या वृद्ध स्त्रीला नमस्कार करून 'तूं कोण? हें घर, हें विवर व हीं रत्नें कोणाचीं?' असे प्रश्न केले."

पूर्वश्लोकांतील शेवटचा चरण व यांतील शेवटचे दोन चरण यांत कांहीं-तरी भेद दिसत आहे काय? वृत्त मात्र बदललें आहे.

## सुन्दरकाण्ड.

एकसष्ठाव्या सर्गाचे शेवटीं तर दहा-बारा श्लोक प्रक्षिप्त दिसतात. यांतील बहुतेक दीर्घच्छंदांत आहेत. सीताशुद्धि करून मारुती आदिकरून वानर परत आले असतां वाटेंत त्यांनीं मधुवनांत शिरून मधुपान केलें, त्याचें यांत वर्णन आहे. पुढील सर्गाच्या प्रारंभीं पाहिलें तर ते मधुवनांत गेलेहि नव्हते, असें दिसतें.

**अंगदस्य मुखाच्छ्रुत्वा वचनं वानरर्षभाः ॥ ४ ॥**
**साधु साध्विति संहृष्टा वानराः प्रत्यपूजयन् ।**
**जग्मुर्मधुवनं यत्र नदीवेग इव द्रुमम् ।**
**ते प्रविष्टा मधुवनं पालानाक्रम्य शक्तितः ॥ ६ ॥**

" अंगदाच्या तोंडचें हें वाक्य ऐकून त्या श्रेष्ठ वानरांना हर्ष झाला व त्यांनीं त्याची ' शाबास, शाबास, ' असें म्हणून प्रशंसा केली. नदीचा प्रवाह ज्याप्रमाणें झाडाकडे वेगानें जावा, त्याप्रमाणें ते वानर मधुवनाकडे वेगानें गेले आणि त्या वनावरील रक्षकांचा आपल्या बलानें पराभव करून त्यांनीं आंत प्रवेश केला. "

वस्तुस्थिति अशी असून यापूर्वीच्या सर्गांत वानरांनीं मधुवनांत प्रवेश करून कशी क्रीडा केली व वनरक्षक दधिमुख वानराला त्यांनीं कसा मारिला, याचें वर्णन दिलें आहे. पुढील सर्गांत त्यांनीं मधुवनांत प्रवेश करून केलेल्या क्रीडेचें जें वर्णन अनुष्टुभ् छंदांत केलें आहे, त्याचाच हा अनुवाद पूर्वीं केलेला आहे.

## युद्धकाण्ड.

चवेचाळिसाव्या सर्गाचे शेवटीं असलेले समानार्थक दोन श्लोक खालीं देतोः—

**अदृश्यः सर्वभूतानां कूटयोधी निशाचरः ।**
**बबन्ध शरबन्धेन भ्रातरौ रामलक्ष्मणौ ॥ ४७ ॥**
**प्रकाशरूपस्तु यदा न शक्तः । तौ बाधितुं राक्षसराजपुत्रः ।**
**मायां प्रयोक्तुं समुपाजगाम । बबन्ध तौ राजसुतौ दुरात्मा ॥ ३९ ॥**

" तो इंद्रजित् मायेनें युद्ध करीत होता व त्याचें दर्शन कोणालाहि होत नव्हतें. त्या राक्षसानें राम व लक्ष्मण यांना शरबंधानें बांधून टाकिलें. "

" राक्षसाधिपति रावणाचा पुत्र इंद्रजित् याला जेव्हां उघडपणें त्या राम व लक्ष्मण यांचा पराभव करितां येईना, तेव्हां त्या दुष्टानें माया प्रकट केली व त्या राजपुत्रांना बांधिलें. "

पहिल्या श्लोकांत रामलक्ष्मणांना बद्ध केल्याचें वर्णन आहे. पुढील श्लोकांत त्याच अर्थाचें वर्णन केलेलें असून मध्यें असलेल्या श्लोकाकडे लक्ष न देतां तो लिहिलेला आहे.

तौ तेन पुरुषव्याघ्रौ क्रुद्धेनाशीविषैः शरैः ।
सहसाऽभिहतौ वीरौ तदा प्रेक्षन्त वानराः ॥ ३८ ॥

" त्या राक्षसाला कोप येऊन त्यानें त्या दोघां पुरुषश्रेष्ठांचा सर्परूपी बाणांनीं एकदम वध केला, असें त्या वानरांना त्या वेळीं वाटलें. "

या श्लोकानें कथाप्रवाह किंचित् पुढें गेला असल्यामुळें पुढील श्लोक प्रक्षिप्त आहे, याबद्दल शंका रहात नाहीं.

## उत्तरकाण्ड.

पंचाणवाव्या सर्गाच्या शेवटीं एकाच अर्थाचे, एवढेंच नव्हे, तर बहुतेक-सारख्याच शब्दांत दोन श्लोक आहेत.

एवं विनिश्चयं कृत्वा श्वोभूत इति राघवः ।
विसर्जयामास तदा सर्वांस्ताञ्शत्रुसूदनः ॥ १६ ॥
इति संप्रविचार्य राजसिंहः । श्वोभूते शपथस्य निश्चयम् ।
विससर्ज मुनीन्नृपांश्च सर्वान् । स महात्मा महतो महानुभावः॥१७॥

" याप्रमाणें उद्यां करावयाचें असा निश्चय केल्यावर त्या शत्रुनाशक रामानें त्या वेळीं सर्वांना निरोप दिला. "

" त्या महापराक्रमी, महात्म्या व सर्व राजांमध्यें श्रेष्ठ असलेल्या रामानें उद्यां शपथेचा निर्णय करावयाचा, असा विचार करून तेथें आलेले ऋषि व राजे यांना निरोप दिला. "

दुसऱ्या श्लोकांत नवीन कांहीं सांगितलेलें नसून पूर्व श्लोकांतील कथा वेगळ्या वृत्तांत सांगितली आहे; तेव्हां ही पद्धति वाल्मीकींची म्हणतां येईल काय ?

सर्गाच्या शेवटीं असणाऱ्या दीर्घच्छंदांतील श्लोकांचा मासला कळण्याकरितां प्रत्येक काण्डांतील एक एक उदाहरण वर दिलें आहे. दीर्घच्छंदांतील श्लोक सर्व सर्गांच्या शेवटीं नसले तरी पुष्कळ सर्गांच्या शेवटीं आढळणाऱ्या दीर्घच्छंदांतील श्लोकांचें वास्तविक स्वरूप काय आहे, हें समजण्यास वरील उताऱ्यांवरून सोपें जाईल. वरील उताऱ्यांत ज्या प्रकारचा परस्परविरोध किंवा द्विरुक्ति दाखविलेली आहे तो प्रकार सर्वत्र आढळेलच, असें म्हणतां येत नाहीं; तथापि त्यावरून काढिलेलें अनुमान सर्वत्र लागू करण्यास कांहीं हर-

कत नाहीं. सामान्यतः अशा श्लोकांची भाषाशैली गचाळ असते व त्यांचें प्रत्याख्यान केलें असतां अर्थहानिहि होत नाहीं, हें सूक्ष्मदृष्टि वाचकांना सहज कळून येईल व त्यावरून अशा तऱ्हेचे श्लोक निवडून काढण्यास त्यांना विशेष श्रम पडणार नाहींत, असें वाटतें. अशा सर्व श्लोकांचें परिगणन करूं लागल्यास आमच्यापाशीं स्थलावकाश नाहीं व या येवढ्याशा कामाला बराच काल लागणार आहे. याकरितां असे श्लोक निवडून काढण्याचा मार्ग वर स्पष्ट दाखवून दिला आहे.

दीर्घच्छंदांतील हे श्लोक कांहीं सर्गांच्या मध्येंहि आढळतात व कोठें कोठें सबंध सर्ग दीर्घच्छंदांत आहेत. वाल्मीकिमहर्षींनीं प्रथम केलेल्या संकल्पावरून हे श्लोक त्यांचे नाहींत, हें उघड आहे. परस्परविरोध किंवा द्विरुक्ति हे दोष येथेंहि आढळून येतात. प्रक्षेपकानें कांहीं स्थलीं अनुष्टुभ् श्लोकहि घुसडले आहेत. तेव्हां वरील दोष ज्या स्थलीं आढळतील, ते श्लोक—दीर्घच्छंदांत असोत वा अनुष्टुभांत असोत—प्रक्षिप्त मानिले पाहिजेत. अरण्यकाण्डाच्या चवथ्या सर्गांतील कांहीं भाग खालीं देत आहों, तो वाचकांनीं लक्ष्यपूर्वक पहावा. कबंध राक्षसाच्या वधाची कथा या सर्गांत आहे.

| मूळ श्लोक. | पुनरुक्ति. |
|---|---|
| तं मुक्तकण्ठमुत्क्षिप्य<br>शंकुकर्णं महास्वनम् ।<br>विराधं प्राक्षिपच्छ्वभ्रे<br>नदन्तं भैरवस्वनम् ॥ २८ ॥<br>तं प्रेक्ष्य रामः सुभृशम्<br>अवध्यमचलोपमम् ।<br>भयेष्वभयदः श्रीमान्<br>इदं वचनमब्रवीत् ॥ ९ ॥<br>तपसा पुरुषव्याघ्र<br>राक्षसोऽयं न शक्यते ।<br>शस्त्रेण युधि निर्जेतुं<br>राक्षसं निखनावहे ॥ १० ॥ | तमाहवे दारुणमाशुविक्रमौ ।<br>स्थिरावुभौ संयति रामलक्ष्मणौ।<br>मुदान्वितौ चिक्षिपतुर्भयावहौ ।<br>नदन्तमुत्क्षिप्य बलेन रक्षितम् २९<br>अवध्यतां प्रेक्ष्य<br>महासुरस्य तौ ।<br>शितेन शस्त्रेण<br>यदा नरर्षभौ ।<br>समर्थ्य चात्यर्थ-<br>विशारदावुभौ ।<br>बिले विराधस्य<br>वधं प्रचक्रतुः ॥ ३० ॥ |

"त्या विराध राक्षसाचे कान शंकूप्रमाणें कठीण व स्वर फार मोठा होता. त्याच्या मानेवरील पाय रामानें काढिला व तो भयंकर गर्जना करीत असतां लक्ष्मणानें त्याला खड्डयांत लोटिलें." "पर्वताप्रमाणें धिप्पाड असलेला तो राक्षस अत्यंत अवध्य आहे, असें पाहून भयाच्या प्रसंगीं अभय देणारा श्रीमान् राम म्हणाला, हे पुरुषश्रेष्ठा लक्ष्मणा, तपश्चर्येच्या योगानें हा राक्षस युद्धांत अजिंक्य झाला आहे, याकरितां त्याला आपण पुरून टाकूं."

"ते राम व लक्ष्मण मोठे पराक्रमी व धैर्य धरून युद्धामध्यें जाग्यावर राहणारे असे होते. त्यांनीं त्या युद्धामध्यें त्या घोर राक्षसाला तो भयंकर गर्जना करीत असतां बलाच्या योगानें उचलून खड्डयांत लोटिलें." "त्या महादैत्याचा वध तीक्ष्ण शस्त्रानें युद्धांत करितां येणें शक्य नाहीं, असें जेव्हां त्या पुरुषश्रेष्ठांना दिसून आलें, तेव्हां त्या युद्धविशारद रामलक्ष्मणांनीं त्या विराधाला खड्डयांत लोटून त्याचा वध करावा, असा उपक्रम केला."

मासल्याकरितां दोन श्लोक वर दिले आहेत. आणखी असले श्लोक तीन असून त्यांत पूर्वीच्या कथेचाच अनुवाद केलेला आहे. जिज्ञासूंनीं हा भाग मूळांत वाचून पहावा.

किष्किंधाकांडाच्या ३१ व्या सर्गांत असाच प्रकार केलेला आहे. लक्ष्मण रामाचा निरोप कळविण्याकरितां सुग्रीवाकडे आला, त्या वेळचा हा प्रसंग आहे.

**लक्ष्मणस्य वचः श्रुत्वा शोकाविष्टोऽगदोऽब्रवीत् ।**
**पितुः समीपमागम्य सौमित्रिरयमागतः ॥ ३६ ॥**

"लक्ष्मणाचें भाषण ऐकून अंगदाला फार वाईट वाटलें व तो सुग्रीवाकडे जाऊन त्याला 'हा सुमित्रापुत्र लक्ष्मण आला आहे' असें म्हणाला."

या श्लोकांतील कथाभाग यापुढें किंचित् विस्तारानें दीर्घच्छंदांत सांगितला आहे.

**अथांगदस्तस्य सुतीव्रवाचा । संभ्रान्तभावः परदीनवक्त्रः ।**
**निर्गत्य पूर्वं नृपतेस्तरस्वी । ततो रुमायाश्चरणौ ववन्दे ॥ ३७ ॥**
**संगृह्य पादौ पितुरग्र्यतेजा । जग्राह मातुः पुनरेव पादौ ।**
**पादौ रुमायाश्च निपीडयित्वा । निवेदयामास ततस्तदर्थम् ॥ ३८॥**

" नंतर लक्ष्मणाच्या त्या तीव्र भाषणानें तो अंगद गोंधळला, त्याचें तोंड म्लान झालें आणि त्यानें सुग्रीवाकडे जाऊन प्रथम त्याला व नंतर रुमेला वंदन केलें. पुनः त्या तेजस्वी अंगदानें सुग्रीवाचे व रुमेचे पाय धरिले आणि नंतर लक्ष्मण आल्याचें त्याला सांगितलें."

आतां दाखविलेल्या दोन उदाहरणांवरून दीर्घच्छंदांतील श्लोक ऋषिप्रणीत नसून कोणातरी कवींनीं मागाहून घुसडून दिले आहेत, अशी वाचकांची खातरी झाल्यावांचून राहणार नाहीं. दीर्घच्छंदांतील श्लोक ज्या तत्त्वास अनुसरून प्रक्षिप्त ठरविण्याचा वर प्रयत्न केला आहे, त्याच तत्त्वावर सर्व रामायणाचें सूक्ष्मदृष्टया पर्यालोचन केलें असतां प्रक्षिप्तभाग ठरविण्यास कठीण पडणार नाहीं. अशा रीतीनें परीक्षण करून आम्हांला आढळलेला प्रक्षिप्त भाग यथाक्रम खालीं देत आहों.

## बालकांड.

सर्ग ३ व ४ हे प्रक्षिप्त दिसतात. द्वितीय सर्गाचे अंतीं वाल्मीकींना ब्रह्मदेवांनीं येऊन निषादाला उद्देशून दिलेली शापोक्ति श्लोकरूप असून त्याच वृत्तांत समग्र रामचरित सांगण्याची आज्ञा केली व ते निघून गेले; व महर्षींना तें पटून त्यांनीं त्याप्रमाणें काम करण्याचा निश्चय केला, इतकी कथा आली आहे. पुढील सर्गांत महर्षि आसनावर बसले व त्यांना रामचरित्राचें ज्ञान होऊं लागलें असें वर्णन आहे. चवथ्या सर्गांत काव्य संपूर्ण झाल्यावर तें त्यांनीं कुशलवांना पढविलें व तें ते गाऊं लागले असतां गायनानें आश्रमांतील महर्षि संतुष्ट झाले, आणि राजमार्गामध्यें रामानें त्यांना पाहून आपल्या सभास्थानीं नेलें व त्यांनीं तेथें रामायणाचें गायन केलें, असा कथाभाग आहे. यापुढें पांचव्या सर्गापासून रामायणाला प्रारंभ झाला आहे. यांतील तिसऱ्या सर्गांत रामचरित्राचें त्यांना ज्ञान होऊं लागलें हें वर्णन अस्थानीं व विसंगत आहे. वाल्मीकींनीं नारदाला प्रश्न केला त्या वेळीं सीता त्यांच्या आश्रमांत होती व तिला आश्रमांत आणितांना त्यांनीं ती शुद्ध असल्याचें जाणून आणिली असें म्हटलें आहे. (७।४९-१२) यावरून रामाचें चरित्र त्यांना मुळींच माहीत नव्हतें असें म्हणवत नाहीं. नारदांना त्यांनीं केलेला प्रश्न स्वतांच्या समजुतीला त्यांची संमति मिळ-

ण्यापुरता होता, असें दिसतें. वाल्मीकि प्रश्न करितात तो, " सांप्रत लोकांमध्यें गुणसंपन्न कोण आहे ? " अशा प्रकारें त्या वेळीं विद्यमान असलेल्या पुरुषाविषयीं करितात आणि नारदहि त्या पुरुषाचें प्रथम नांव सांगून त्याची गुणसंपन्नता व्यक्त करण्याकरितां चरित्राचा उपक्रम करितांना तो लोकप्रसिद्ध ( जनैः श्रुतः ) असल्याचें सांगतात; मग अशा लोकप्रसिद्ध पुरुषाचे चरित्राविषयीं ते अगदीं अनभिज्ञ होते असें कसें म्हणावें ? बरें, हें ज्ञान झालें असा मोघम निर्देश असता तर पूर्वीं नारदांनीं सांगितलेल्या चरित्रावरून तें त्यांना स्थूलतः समजलें व ब्रह्मदेवांकडून वर मिळाल्यावर तें पूर्णपणें समजलें असें अनुमान करून समाधान मानितां आलें असतें. परंतु येथें हें ज्ञान काय झालें हें सांगण्याच्या निमित्तानें तेंच चरित्र पुनः संक्षेपानें आलें आहे. प्रथम सर्गांतील चरित्रापेक्षां तृतीय सर्गांतील चरित्र तुलना करूं लागल्यास श्लोकसंख्येनें लहान आहे. व कथेच्या दृष्टीनें जवळजवळ सारखें आहे. प्रथम सर्गांतील चरित्राची समाप्ति " रामाला सीता प्राप्त होऊन तो सिंहासनावर बसला. " ( १।१।८९ ) याप्रमाणें झाली आहे. व तृतीय सर्गांत " सर्व सैन्याला रामानें निरोप दिला, आपल्या राष्ट्राचें रंजन केलें व सीतेचा त्याग केला. " ( १।३।३९ ) इतका कथाभाग अधिक आलेला आहे. पण या वेळीं सीता त्यांच्या आश्रमांत होती. तेव्हां ब्रह्मदेववरानिमित्त चरित्रांतील हा कथाभाग त्यांना नव्यानें समजला असें म्हणणें हास्यास्पद होईल. चवथ्या सर्गांत " वाल्मीकींनीं रामायणरचना केल्यावर तें त्यांनीं रामपुत्र कुशलवांना पढविलें व तें ते गाऊं लागले असतां सर्व ऋषि संतुष्ट झाले. एकदां राजमार्गामध्यें त्यांना रामानें पाहिलें व वाड्यांत नेलें आणि तेथें त्यांनीं रामाज्ञेनें रामायण गायिलें. " अशी कथा आली आहे. ही कथा तर अगदीं विसंगत आहे. प्रथम त्यांची रामानें पूजा केल्याचें सांगितलें हें विचित्र आहे; दुसरें असें कीं, काव्यविषयीं त्यानें त्यांजवळ कांहीं विचारपूस केल्याचें दिसत नाहीं. रामापुढें रामायणगानाचा हा जो समारंभ झाला त्याचें पर्यवसान सीतेच्या दिव्यांत झालें व या कथेचा संबंध उत्तरकांडांत आहे. उत्तरकांडांतील कथेंत अश्वमेधाचे निमित्तानें वाल्मीकि शिष्यांसह अयोध्येला आले व त्यांच्या आज्ञेप्रमाणें कुशलवांनीं यज्ञमंडपांत रामायणाचें

गायन केल्याचें सांगितलें आहे. येथें मात्र प्रथम दिवशीं गायन समाप्त झाल्यावर रामानें काव्याचा कर्ता कोण? काव्य किती आहे? वगैरे विचारपूस केली आहे व ती सरळ दिसते. यांत रामानें पूजा केल्याचें सांगितलें नसून त्यांना पारितोषिक म्हणून द्रव्य देण्याची आज्ञा केली आहे. वाल्मीकींनीं कुशलवांना रामायणाचें गायन करण्याची आज्ञा केली, तेव्हां प्रत्यहीं वीस सर्गांचें गायन करा, असें सांगितलें आहे. त्यांच्या या आज्ञेप्रमाणें त्यांनीं रामायण गायिलें म्हणजे त्यांत चवथा सर्ग साहजिकपणें येतों आणि यांतच रामानें कुशलवांना राजमार्गांत पाहून बोलावून आणिलें व त्यांजकडून सभागृहांत रामायणाचें गायन करविलें असें वर्णन आहे. यज्ञसमारंभाचे निमित्तानें गायन करिते वेळीं त्यांनीं ही कथा गावयाची म्हणजे किती विलक्षण दिसते? पूर्वीच्या गायनसमारंभाचें स्मरण कोणालाहि झाल्याचें दिसत नाहीं. राम तर या बाबतींत इतका अनभिज्ञ दिसतो कीं, त्यानें अश्वमेधाचे वेळीं ते गात असतांना त्यांना हें काव्य कोणीं केलें? केवढें आहे? असले प्रश्न केले आहेत. विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, रामायणाची ग्रंथसंख्या व सर्गसंख्या यांचा उल्लेख चवथ्या सर्गांत आहे व प्रथम दिवशीं पहिले वीस सर्ग म्हटलें, त्यांत तो म्हटला गेला असतां रामानें हे प्रश्न केले आहेत. रामायणाचा खरा प्रारंभ पांचव्या सर्गापासून होतो; त्या सर्गाला प्रारंभ करून रामायण कुशलवांनीं गायिलें असा तर्क करावा, तर पहिल्या सर्गाचा उल्लेख त्या वेळेचें वर्णन देतांना उत्तरकांडात स्पष्टपणें केलेला आहे.

**एवं प्रभाषमाणेषु पौरजानपदेषु च ।**
**प्रवृत्तमादितः पूर्वसर्गे नारददर्शितम् ॥ ७।९४।४५ ॥**

"याप्रमाणें नागरिक मंडळी परस्पर बोलत असतां प्रथम नारदांनीं सांगितलेलें (चरित्र) ज्यांत आहे तो पूर्व सर्ग गाण्यास प्रारंभ झाला. (ते गाऊं लागले.) नारददर्शित सर्ग म्हणजे अगदीं पहिला सर्ग; व त्यापासून गायनाला प्रारंभ झाला, असें म्हटलें असल्यानें पांचव्या सर्गापासून त्यांनीं रामायण गाऊन दाखविलें, असें म्हणवत नाहीं. हा सर्व घोंटाळा प्रक्षेपकानें केलेला आहे. बालकांडाच्या प्रारंभींचे चार सर्ग आज जरी रामायणांत मोडत असले तरी रामायणाची रचना झाल्यानंतर ते प्रस्तावनेवजा मागाहून जोडिले आहेत, हें निर्विवाद

आहे. कुशलवांना रामायण वाल्मीकींनीं पढविलें त्या वेळीं तें किती रचिलें होतें याचें विवेचन पुढील प्रकरणांत आलें असून त्यांत तें युद्धकांडापर्यंत होतें असें दाखविलें आहे. अर्थात् प्रस्तावनेवजा असलेले सर्ग षट्कांडात्मक रामायणाची रचना झाल्यानंतर जोडिले असले पाहिजेत. प्रास्ताविक सर्ग मूळचे वाल्मीकींचे नसून प्रक्षिप्त मानिले तर त्यांचा उल्लेख करणारें सबंध उत्तरकांड प्रक्षिप्त मानावें लागेल. प्रक्षिप्त भाग निवडून काढून टाकिल्यावर उत्तरकांडांतील मूळचा म्हणून मानण्यासारखा भाग अगदीं थोडा उरत आहे, हें याच प्रकरणांतील उत्तरकांड-विषयक चर्चेवरून दिसून येईल. या उरलेल्या भागांतच अश्वमेधाची कथा आहे. भाषेच्या दृष्टीनें पाहिलें तर उत्तरकांडांतील या भागाची भाषा पूर्वीच्या षट्कांडांतील वाल्मीकींच्या भाषेशीं विसदृश नाहीं. उत्तरकांडासंबंधानें बरीच विद्वान् मंडळी साशंक आहेत. उत्तरकांडांतील बराच भाग प्रक्षिप्त ठरत असला तरी सबंध कांड प्रक्षिप्त मानणें विक्षिप्तपणाचें होईल. कारण सीतात्यागाचा महत्त्वाचा भाग त्यांत असून तो लोकांपुढें मुळींच येणार नाहीं. आणि त्या वेळीं ज्या लोकसंग्रहार्थ रामानें सीतेचा त्याग केला तें कार्य सीतात्याग करूनहि तो लोकांपुढें न आल्यानें त्या वेळीं झालें तरी पुढील पिढीच्या उपयोगीं पडणार नाहीं. तिसरा व चवथा हे दोन सर्ग गाळिले म्हणजे हा घोंटाळा मिटतो. तिसऱ्या सर्गांत ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें रामायणरचना करण्यास सिद्ध झालेल्यां महर्षींना रामचरित्र माहीत असतांहि त्याचें ज्ञान होऊं लागल्याचें जें विसंगत वर्णन आहे, तें वाचावें लागणार नाहीं; आणि रामायण एकदां ऐकूनहि पुनः ऐकण्याचा प्रसंग आला असतां रामाला व दरबारांतील इतर श्रोत्यांना त्याचें मुळींच स्मरण नसल्याचें जें दिसून येतें तें, व रामानें ग्रंथसंख्या तेथें एकदां ऐकून पुनः ग्रंथसंख्या किती म्हणून विचारिलें तें, ऐकावें लागणार नाहीं. द्वितीय सर्गाचे अंतीं रामायण रचण्याचा निश्चय महर्षींनीं केल्याचें जें लिहिलें आहे तेथेंच ही प्रस्तावना वास्तविक समाप्त झाली. अर्थात् यापुढें मूळ ग्रंथाला प्रारंभ व्हावयाचा व मधील दोन सर्ग गाळिले म्हणजे तो त्याप्रमाणें होतो.

आठव्या सर्गांत दशरथानें वसिष्ठप्रभृति ऋषींच्या संमतीनें पुत्रप्राप्तीकरितां अश्वमेध करण्याचें ठरविलें व यज्ञभूमि तयार करून अश्व सोडण्याविषयीं

मंत्र्यांना आज्ञा दिली, असें वर्णन आहे. नंतर राजा अंतःपुरांत गेला व पत्नींना यज्ञदीक्षा घेण्यास सांगितली, असें लिहिलें आहे.

> संभाराः संभ्रियन्तां मे गुरूणां वचनादिह ।
> समर्थाधिष्ठितश्चाश्वः सोपाध्यायो विमुच्यताम् ॥ १५ ॥
> सरय्वाश्चोत्तरे तीरे यज्ञभूमिर्विधीयताम् ॥ १६ ॥
> इत्युक्त्वा नृपशार्दूलः सचिवान्समुपस्थितान् ।
> विसर्जयित्वा स्वं वेश्म प्रविवेश महामतिः ॥ २३ ॥
> ततः स गत्वा ताः पत्नीर्नरेन्द्रो हृदयंगमाः ।
> उवाच दीक्षां विशत यक्ष्येऽहं यज्ञकारणात् ॥ २४ ॥

" 'गुरूंनीं सांगितल्याप्रमाणें यज्ञाच्या साहित्याची तयारी करा. उपाध्याय व बलिष्ठ लोक बरोबर देऊन अश्व सोडून द्या. सरयूनदीच्या उत्तरतीरावर यज्ञाची भूमि तयार करा.' याप्रमाणें त्या महाबुद्धिमान् नृपश्रेष्ठ दशरथानें आज्ञा केली व तेथें आलेल्या मंत्र्यांना निरोप देऊन अंतःपुरांत निघून गेला. तेथें गेल्यावर त्यानें आपल्या प्रियपत्नींना 'मी पुत्रप्राप्तीकरितां यज्ञ करणार आहें, तेव्हां तुम्ही यज्ञाची दीक्षा घ्या,' असें सांगितलें. "

यापुढील म्हणजे नवव्या सर्गांत सनत्कुमारांनीं पूर्वी वर्तवून ठेविलेलें भविष्य सुमंत्रानें राजाला सांगून ऋष्यशृंगाला आणविण्याविषयीं सुचविलें आहे. यापुढें १० व्या सर्गांत ऋष्यशृंगाला पूर्वी रोमपाद राजानें कसा आणविला, हें सांगून ११ व्या सर्गांत दशरथानें त्याला आणविल्याचें वर्णन आहे. १२ व्या सर्गांत दशरथानें ऋष्यशृंगप्रभृति ऋषींना पुत्रप्राप्तीकरितां काय उपाय करावा, असा पुनरपि प्रश्न केला आहे. त्यांनींहि पूर्वीचाच उपाय सांगितला असून मंत्र्यांना राजानें पूर्वींचीच आज्ञा केली आहे. हे चारहि सर्ग आमच्या मतें प्रक्षिप्त आहेत. प्रारंभींच्या नवव्या सर्गाचा प्रारंभच असा आहे कीं, तो दुसऱ्या एखाद्या पुराणांतून जशाचा तसा—पूर्वकथेच्या अनुसंधानाला अनुसरून आवश्यक असलेला फेरफार न करितां—घेतला आहे. आठव्या सर्गाच्या शेवटीं कथा कोठपर्यंत आली होती, तें वरील उताऱ्यांत आलेंच आहे. पुढील सर्गाचा प्रारंभ कसा विचित्र आहे, पहाः—

एतच्छ्रुत्वा रहः सूतो राजानमिदमब्रवीत् ।
श्रूयतां तत्पुरावृत्तं पुराणे च मया श्रुतम् ॥ १॥

" हें ऐकून एकांतामध्यें सूतानें राजाला सांगितलें कीं, पुराणामध्यें मीं एक कथा ऐकिली आहे, ती मीं सांगतों, श्रवण करा. "

उताऱ्यांतील शेवटच्या श्लोकाशीं याचा संबंध कसा जुळणार ? यांतील " एतच्छ्रुत्वा " याचा संबंध कोणीकडे लावावयाचा ? आपल्या सर्व सचिवांना राजानें निरोप दिला, असें पूर्वीं लिहिलें आहे, त्याची वाट काय ? राजा अंतःपुरांत गेला असल्याचें पूर्वसर्गांत वर्णन आहे. शिवाय पुत्रप्राप्तीचा जो प्रश्न पुढें आलेला होता, त्याचा निकाल पूर्वसर्गांत होऊन अश्वमेध करण्याचें ठरलेंहि होतें. ऋष्यशृंग आल्यावर १२ व्या सर्गांत जें वर्णन आहे तें ८ व्या सर्गांतील वर्णनाशीं पूर्णपणें जुळतें: किंबहुना १२ वा सर्ग म्हणजे ८ वा सर्गच पुनरपि लिहिलेला आहे. दशरथाचा प्रश्न व ऋषींचें उत्तर हे भाग अगदीं एक आहेत. यावरून असें दिसतें कीं, ऋष्यशृंगाची कथा उतरून घेतल्यावर त्याला आणिल्याचें कारण काय, अशी शंका उद्भवून पूर्वींचा सर्ग पुनः लिहिलेला असावा.

ततः प्रीतमना राजा प्राप्य यज्ञमनुत्तमम् ।
पापापहं स्वर्नयनं दुस्तरं पार्थिवर्षभैः ॥ ५८ ॥

" मोठमोठ्या राजांनाहि करण्यास अशक्य असलेला, पापाचा नाश करणारा व स्वर्गाची प्राप्ति करून देणारा असा तो श्रेष्ठ यज्ञ समाप्त झाल्यावर राजाला आनंद झाला. "

अशा रीतीनें राजाचें मन प्रसन्न झालें, असें वर्णन आहे. यानंतर राजानें ऋष्यशृंगाला पुत्रप्राप्तीकरितां कांहींतरी उपाय करण्याची पुनः प्रार्थना केली आहे. यापुढील म्हणजे १५ व्या सर्गांत ऋष्यशृंगानें केलेल्या पुत्रीय इष्टीचें वर्णन अवघ्या एका श्लोकांत आहे. यापुढें सर्व सर्गभर हविर्भागाकरितां तेथें आलेल्या देवांनीं रावणाबद्दल ब्रह्मदेवाकडे व नंतर विष्णूकडे गाऱ्हाणें नेल्याचें वर्णन आहे. नंतर सोळाव्या सर्गांत विष्णूनें अवतार घेण्याचें कबूल केलें आहे. इकडे दशरथाच्या यज्ञकुंडांतून एक पुरुष निघून त्यानें राजाला पायस दिलें व तें

त्यानें आपल्या पत्न्यांना वांटून दिलें, अशी कथा आहे. हे दोन सर्ग वाचूं लागलें म्हणजे सकृद्दर्शनीं नाना शंका उद्भवतात. पुत्रप्राप्तीकरितां अश्वमेध करण्याचें ठरलें होतें, त्याप्रमाणें तो याग समाप्त झाल्यावर पुनरपि राजानें सर्व ऋषींना तोच प्रश्न विचारणें वेडगळपणाचें दिसतें. या पुत्रीया इष्टीचें वर्णन तर सारें एका श्लोकांत आटोपलें आहे; तेंच अश्वमेधाचें वर्णन पूर्वसर्गांत किती उत्कृष्ट लिहिलेलें आहे! याहूनहि चमत्कारिक गोष्ट ही कीं, पुत्रीया इष्टीचे वेळीं हविर्भाग घेण्याकरितां आलेल्या देवांनीं रावणासंबंधींचें आपलें गाऱ्हाणें ब्रह्मदेवाकडे व विष्णूकडे त्या ठिकाणीं नेलें आहे. या ठिकाणीं अशी शंका येते कीं, नुकत्याच झालेल्या अश्वमेधाचे वेळीं या देवांना कांहींच पीडा होत नव्हती कीं काय? हें सर्व विसंगत दिसतें. विष्णूच्या अवतारापूर्वीं होणारे सर्व शिष्टाचार रामायणांत नसल्यामुळें हे दोन सर्ग मागाहून कोणींतरी घुसडून दिले आहेत. शिवाय पुढील १८ व्या सर्गाचा जो प्रारंभ आहे, त्यावरून तर ही गोष्ट चांगली सिद्ध होते.

**निवृत्ते तु क्रतौ तस्मिन्हयमेधे महात्मनः।**
**प्रतिगृह्यामरा भागान् प्रतिजग्मुर्यथागतम्॥ १॥**

"त्या महात्म्या राजाचा अश्वमेध समाप्त झाल्यावर आपापले हविर्भाग घेऊन देव आपापल्या स्थानीं गेले."

या श्लोकांतील "हयमेधे" हा शब्द विशेष महत्त्वाचा आहे. वस्तुतः यापूर्वींच्या सर्गांकडे पाहिलें तर पुत्रीया इष्टि समाप्त झाल्याचें दिसून येतें. असें असून ज्यापक्षीं वरील श्लोकांत "हयमेध" समाप्त झाल्याचें स्पष्ट लिहिलें आहे, त्यापक्षीं पुत्रीया इष्टीचें व तदनुषंगानें असलेलें इतर वर्णन प्रक्षिप्त ठरतें. एका टीकाकारानें "हयमेधे इत्यस्य पुत्रेष्टियुते इति शेषः" असें या शंकेचें समाधान करण्याचा प्रयत्न केला आहे; परंतु हें समाधान अगदीं टाकाऊ आहे. ही इष्टि अश्वमेधाची अंगभूत मानावी, अशी कल्पना कोणीं पुढें केली आहे. दोन कल्पनांतील मुद्दा एक आहे; तथापि पुत्रीया इष्टि अश्वमेधाची अंगभूत मानिल्यानें तिची आवश्यकता आपोआप सिद्ध होते, हा या कल्पनेंत विशेष आहे; पण या कल्पनेला रामायणांत आधार मिळत नाहीं. पुत्रप्राप्त्यर्थ अश्व-

मेध करावयाचें राजाच्या मनांत आलें, असा या कथेचा उपक्रम आहे. ( १। ८।२ ) आणि यज्ञाची समाप्ति झाल्याचें पुढें ( १।१४।५८ ) स्पष्ट लिहिलें आहे. अर्थात् पुत्रेष्टि अंगभूत असेल, तर ती येथें समाप्त झाली, असें मानणें भाग आहे; पण या इष्टीचा उपक्रम तर पुढील सर्गांत आहे, म्हणजे ती अश्वमेधाची अंगभूत मानितां येणार नाहीं, व वेगळी मानिली तर पुढील अश्वमेधसमाप्तीचे निर्देशामुळें ती आपोआप गतार्थ होत आहे.

सर्ग ३८ ते ४५ पर्यंत सात सर्ग प्रक्षिप्त दिसतात. यज्ञरक्षणार्थ विश्वामित्रांबरोबर राम निघाल्यावर त्यानें ताटकेचा वध केला व मारीचसुबाहूंला समुद्राकडे फेंकून दिलें व दुसरे दिवशीं जनकाकडे यज्ञाकरितां ऋषिमंडळी गेली त्यांबरोबर त्याजकडील अद्‌भुत् धनुष्य पाहण्याकरितां रामलक्ष्मण गेले. मार्गांत शोणातीरीं उतरून तेथें प्रातःकाळीं आन्हिक आटोपून पुढें ते गंगातीरीं राहिले व तेथें त्यांचा जो संवाद झाला त्यांत हे सर्ग मोडतात. सर्ग ३५ यामध्यें रामानें विश्वामित्रांला गंगा नदीसंबंधी माहिती विचारिली व ती सांगण्याला विश्वामित्रांनीं प्रारंभ केला. गंगेच्या कथेबरोबर कार्तिकेयाच्या उत्पत्तीची कथा आली आहे. या कथेची समाप्ति विश्वामित्रांनीं ३७ व्या सर्गाच्या समाप्तीबरोबर पुढीलप्रमाणें केली आहे.

**एष ते राम गंगाया विस्तरोऽभिहितो मया ।**
**कुमारसंभवश्चैव धन्यः पुण्यस्तथैव च ॥ ३१ ॥**

" हे रामा, याप्रमाणें धन्य व पुण्यकारक अशा प्रकारचा गंगेचा सविस्तर वृत्तांत व कुमारजन्म तुला कथन केलें. "

गंगेचें आख्यान येथें समाप्त झाल्याचें यावरून उघड दिसतें. यापुढील सात सर्गांत सगराच्या यज्ञाचा उपक्रम करून भगीरथानें गंगा कशी आणिली, हें सांगितलें आहे. या सर्गाचा प्रारंभः—

**तां कथां कौशिको रामं निवेद्य मधुराक्षराम् ।**
**पुनरेवापरं वाक्यं काकुत्स्थमिदमब्रवीत् ॥१।३८।१॥**

" याप्रमाणें कुशिककुलोत्पन्न विश्वामित्रांनीं रामाला मधुर शब्दांनीं कथन केल्यावर ते पुनरपि त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला म्हणाले :—"

असा केलेला आहे. रामविश्वामित्रांतील संवादामध्यें किंबहुना सर्व रामायणांत आलेलीं उपाख्यानें त्या त्या वेळीं कोणीं तरी प्रसंगोचित प्रश्न केल्याच्या निमित्तानें सांगण्यांत आलीं आहेत व येथील कथेचा उपक्रम विश्वामित्रांनीं आपण होऊन केलेला आहे. पुढील कथा गंगेसंबंधीं असली तरी तो सांगण्याचा हेतु विश्वामित्रांचा असता तर पूर्वसर्गांतीं केलेली कथेची समाप्ति त्यांनीं केली नसती. कालासंबंधीं घोंटाळा तर याहूनहि विलक्षण झाला आहे. विश्वामित्रादि मंडळी शोणातीर सोडून निघाली ती अर्धा दिवस उलटल्यावर ( गतेऽर्धदिवसे १।३५।-६ ) गंगातीरीं आली. तेथें त्यांनीं स्नान, देवपितृतर्पण, अग्निहोत्रहवन केल्यावर भोजन केलें आणि आनंदानें सर्व मंडळी एकत्र बसली असतां रामानें गंगेसंबंधीं प्रश्न केला व त्यानिमित्त गंगेची कथा विश्वामित्रांनीं सांगितली. येथील कालासंबंधींच्या निर्देशावरून हा संवाद सायंकाळीं सूर्यास्तापूर्वी झाला असें दिसतें; पण गंगाख्यान श्रवण केल्यावर ४५ व्या सर्गाचे प्रारंभीं रामलक्ष्मण काय म्हणतात पहा:—

**क्षणभूतेव नौ रात्रिः संवृत्तेयं परंतप ।**
**इमां चिंतयतः सर्वां निखिलेन कथां तव ॥ ३ ॥**

" आपण सविस्तर सांगितलेल्या सर्व कथेच्या चिंतनामध्यें, हे शत्रुतापन मुने, आम्हांला ही सर्व रात्र क्षणासारखी झाली. "

या भाषणावरून हा संवाद रात्रीं झाला असावा, असें दिसतें. आणि यापुढें प्रातःकाल होऊन त्यांनीं आन्हिककर्म आटोपल्याचें वर्णन आहे. परंतु ४४ व्या सर्गाच्या अंतीं गंगेसंबंधींचें दुसरें आख्यान समाप्त करितांना विश्वामित्रांनीं " संध्याकाळचें अतिक्रमण होत आहे " ( २० ) असें रामाला स्मरण दिलें आहे. यापुढें त्यांनीं संध्यावंदन वगैरे मुळींच केल्याचें सांगितलें नसून विश्वामित्रांनीं सांगितलेली कथा ऐकून रामलक्ष्मण काय म्हणाले, तें सांगितलें असून तें वर दिलें आहे व त्यांत तर ते रात्र गेली असें सांगत आहेत. यापुढील श्लोक तर अगदीं विचित्र आहे:—

**तस्य सा शर्वरी सर्वा मम सौमित्रिणा सह ।**
**जगाम चिंतयानस्य विश्वामित्र कथां शुभाम् ॥ ४ ॥**

कथेचें चिंतन करितां करितां रात्र गेली असें सांगण्याचा येथें आशय दिसतो; व हें रामाचें भाषण आहे असें वाटतें. शब्दशः अर्थ करूं म्हटलें तर हा श्लोक लागत नाहीं. ‘ तस्य ’ या शब्दाचा संबंध कोणत्या शब्दाशीं जोडावा, हें कळत नाहीं; आणि मागील श्लोकाहून यांत नवीन कांहीं नाहीं. ‘रामायणतिलक’ टीकेनें येथें ‘अधिक आदर व्यक्त करण्याकरितां पूर्वींचा आशय पुनः सांगितला.’ (उक्तस्यैवार्थस्य आदरातिशयबोधनाय पुनरुपादानं) अशी संगति लाविली आहे. या श्लोकांत विश्वामित्राला उद्देशून रामाच्या तोंडीं “ हे विश्वामित्र ” असा शब्द आहे. तो रामाच्या नित्य विनयशील वृत्तीला शोभत नाहीं. यज्ञरक्षणासंबंधींच्या सर्व कथेंत रामानें त्यांना ‘ भगवन् ’ ‘ महामुने ’ अशा प्रकारें संबोधिलें असल्याचें तें आख्यान चाळल्यास दिसून येईल. आमच्या मतें या श्लोकाचा पाठ चुकला आहे व याला पोषक असा पाठभेद दुसऱ्या प्रतींत मिळत आहे. वेंकटेश्वर छापखान्याच्या टीकात्रयोपेत रामायणाच्या प्रतींत हा श्लोक पुढीलप्रमाणें आहे:—

**तस्य सा शर्वरी सर्वा सहसौमित्रिणा तदा ।**
**जगाम चिंतयानस्य विश्वामित्रकथां शुभाम् ॥**

“विश्वामित्रांनीं सांगितलेल्या शुभकथेचें चिंतन करीत करीत त्या वेळीं लक्ष्मणासहवर्तमान रामाची ती सर्व रात्र निघून गेली. ”

कालाची ही विसंगतता उघड उघड आहे. टीकाविषयक ग्रंथाची कसेंहि करून संगति लावण्याच्या टीकाकारांच्या पद्धतीप्रमाणें येथें संगति लावण्याचा एक प्रयत्न संभवनीय आहे. हा संवाद सायंकाळीं झाला नसून रात्रींच झाला व देवपितृतर्पण केल्यावर अग्निहोत्रसंबंधीं होम देऊन ते एकत्र जमल्याचें जें वर्णन आहे, तो सायंकालचा होम होय. कथा सांगून ते निजले; विश्वामित्रांनीं संध्याकालाचें अतिक्रमण होत असल्याची जी सूचना रामाला दिली, ती प्रातःसंध्येविषयींची होय. अशा रीतीनें कल्पना केली म्हणजे कालामध्यें विसंगतता राहणार नाहीं. वरवर पाहिलें तर ही कल्पना ठीक आहे; पण संध्याकालाविषयींची विश्वामित्रांची सूचना कथानिरूपणाचे अंतीं नसती तर हें जमलें असतें. कथानिरूपणाचे समाप्तीचे वेळीं विश्वामित्र संध्याकालाची सूचना देतात

व त्यांचें भाषण पूर्ण होतांच रामलक्ष्मण आपली रात्र कथेचें चिंतन करितां करितां क्षणासारखी गेली, असें म्हणतात, याची संगति कशी लावावयाची? वास्तविक कथा ऐकिल्याबरोबर ( ४५।१ ) असें त्यांनीं म्हणणें हें मूळांत विसंगत आहे. कथेचें निरूपण रात्रौ झाल्याची जर कल्पना घेतली तर निरूपणांतीं संध्याकाल झाल्याची जी सूचना केली ती संध्योपासना केव्हांची? निरूपण सर्व रात्र चाललें होतें असें म्हणावें तर तें संभवनीय नाहीं व त्याला इतका काल लागण्यासारखा नाहीं; आणि तसेंहि मानिलें तर कथेचें चिंतन करण्यांत रात्र गेली असें म्हणतां येणार नाहीं, तें केवळ श्रवण होईल. श्रवण व चिंतन यांत अंतर आहे. प्रारंभींच्या वर्णनावरून हें निरूपण सायंकालीं झालें असें दिसतें व या धोरणानें पुढील कथेंतील प्रक्षिप्त भाग गाळून संगति लावणें आवश्यक आहे.

आमच्या मतें या सर्गाचा खरा प्रारंभ वरील श्लोकानेंच झाला असून तो मधील प्रक्षिप्त सर्ग वगळून ३७ व्या सर्गापुढें वाचावा म्हणजे संगति लागते. पूर्वींचें निरूपण सायंकालीं झालें व तें संपलें तेथें हा सर्ग समाप्त झाला आणि पुढील सर्गाचे प्रारंभीं कथेचें चिंतन करण्यांत रात्र निघून गेली असें वर्णन आलें म्हणजे विसंगतता रहात नाहीं.

सर्ग ५१ ते ६६ पर्यंत पंधरा सर्ग विश्वामित्रांना ब्रह्मर्षित्व कसें प्राप्त झालें, ही कथा आहे. विश्वामित्रांबरोबर रामलक्ष्मण जनकाकडे यज्ञमंडपांत गेले असतां राजानें त्यांचें स्वागत केलें व जनकानें प्रश्न केल्यावरून विश्वामित्रांनीं रामलक्ष्मणांची माहिती व यज्ञरक्षणार्थ आपण त्यांना आणिल्यापासून पुढें तेथें येईपर्यंतचा सर्व वृत्तान्त निवेदन केला, इतकी कथा ५० व्या सर्गांत आली आहे. पुढील सर्गांत जनकाचा पुरोहित शतानंद यानें विश्वामित्रांबरोबर आल्याबद्दल रामाला धन्यवाद देऊन रामानें किंवा अन्य कोणीं न विचारितां विश्वामित्रांना ब्रह्मर्षिपद कसें प्राप्त झालें, हें सांगण्यास आपण होऊन प्रारंभ केला आहे. हें निरूपण सबंध पंधरा सर्ग आहे. ही कथा स्वभावतः अस्थानीं दिसते. शतानंद हा जनकाचा पुरोहित ( १।५०।६ ) व जनकाकडे यज्ञ चालला असतां तेथें विश्वामित्रादि मंडळी आली, तेव्हां त्यांचें त्यानें उत्तम प्रकारें स्वागत केलें, येथ-

पर्यंत सर्व ठीक झालें; पण तें आटोपल्यावर पुरोहित कोणी न विचारितां कथा सांगूं लागतात, आणि यजमान व अतिथि श्रवण करितात, हें किती विचित्र आहे ? विश्वामित्रांनीं यापूर्वी रामाला कथा सांगितल्याचें जें वर्णन आहे, तें वाटेंत चालतांना व त्याहि रामानें प्रश्न केल्यावरून आणि वाटेंत लागलेल्या प्रदेशासंबंधीं. येथें शतानंद रामाला " विश्वामित्राची कथा सांगतों, ती श्रवण कर." ( ५१।१९ ) असें म्हणून सांगण्यास प्रारंभ करीत आहे. सर्व कथा रामाला सांगण्यांत आली आहे, असें शतानंदाच्या भाषणांत मधून मधून आलेल्या संबुद्धिप्रयोगांवरून दिसतें; पण मग जनकाला कथा समाप्त होईपर्यंत तेथें बसवून ठेविला आहे, तो कशाकरितां ? नाटकांत ज्या पात्रांमध्यें संवाद चालू असतो, त्यांहून इतर पात्रें केवळ त्यांचा संवाद श्रवण करीत रंगभूमीवर तिष्ठत ठेवूं नयेत, असा नाट्यशास्त्राचा नियम आहे, तो येथें आम्ही लावितों असें नाहीं; तथापि जनकानें श्रवणेच्छा व्यक्त केलीहि नाहीं व शतानंद त्याला उद्देशून बोलत नाहीं; मग त्याला तेथें बसवून कशाला ठेविला ? अशी शंका आहे. आमच्याप्रमाणें कवीलाहि ही शंका आली असावी, असें वाटतें आणि यासाठीं . हें निरूपण संपल्यावर त्यानें जनकाकडून अशा कथा ऐकून तृप्ति वाटत नाहीं—आणखी आणखी ऐकावें असें वाटतें—असें वदविलें आहे. बरें; ज्या रामाला उद्देशून ही कथा शतानंदानें सांगितली, त्याला ती माहीत नव्हती, असें म्हणवत नाहीं. रामलक्ष्मणांना मागण्याकरितां विश्वामित्र दशरथाकडे आल्यावेळीं राजानें त्यांचें स्वागत केलें, तेव्हां त्यानें—

**पूर्वं राजर्षिशब्देन तपसा द्योतितप्रभः ।**
**ब्रह्मर्षित्वमनुप्राप्तः पूज्योऽसि बहुधा मया ॥१।१८।५८॥**

" ( हे महामुने, ) पूर्वी तपश्चर्येच्या योगानें आपणांला राजर्षिपद प्राप्त होऊन आपलें तेज फांकलें होतें व मग आपणांला ब्रह्मर्षिपद प्राप्त झालें; आपण मला पुष्कळ प्रकारांनीं पूज्य आहां. "

असे उद्गार काढिले आहेत. वसिष्ठांनीं उपदेश केल्यावर राजानें ज्या वेळीं दोघांना विश्वामित्रांबरोबर पाठविण्याचा विचार केला, त्या वेळीं ते सभेंतच होते व तेथेंच राजानें त्यांना हांक मारून ( आजुहाव १।२२।१ ) ऋषींबरोबर

जाण्यास सांगितलें. ते सभेंत नसते तर नित्याप्रमाणें सुमंत्राला पाठवून त्यांना आणविल्याचें लिहिलें असतें; येथें तर त्यांना केवळ हांक मारिली आहे. तेव्हां हा संवाद चालू असतां येथें ते होते व ऐकत होते, हें निर्विवाद आहे. विश्वामित्रांचें चरित्र त्यांना खरोखर माहीत नसतें तर राजाचें भाषण ऐकून त्यांना तद्विषयक जिज्ञासा झाली असती व ती त्यांनीं व्यक्त केली असती. वसिष्ठ व शतानंद यांनीं विश्वामित्रांचा केलेला गौरव तर अगदीं एक आहे. वसिष्ठांच्या भाषणांतील पुढील श्लोक—

**एष विग्रहवान् धर्म एष वीर्यवतां वरः।**
**एष विद्याधिको लोके तपसश्च परायणम्** ॥१।२१।१०॥

शतानंदानें केलेल्या उपसंहारांतील पुढील श्लोकाशीं ताडून पहाः—

**एष राम मुनिश्रेष्ठ एष विग्रहवाँस्तपः।**
**एष धर्मः परो नित्यं वीर्यस्यैष परायणम्** ॥१।६५।२९॥

वसिष्ठांनीं केलेला गौरव तेव्हांच त्यांना पटला व यासाठीं त्यांनीं त्यांचे चरित्राविषयीं प्रश्न त्या वेळीं केला नाहीं, असें अनुमान यावरून करणेंच उचित होय. अर्थात् विश्वामित्रांचें हें उज्वल चरित्र रामायणांत गोवण्याच्या उद्देशानें कोणा तरी प्रक्षेपकानें शतानंदाला पुढें केला असें म्हणणें भाग आहे. मात्र शतानंदाला पुढें करितांना प्रक्षेपक अगदीं घसरला आहे. पूर्वसर्गांत विश्वामित्रादिकांचें स्वागत केल्यावर जनकानें विचारल्यावरून विश्वामित्रांनीं त्याला "रामलक्ष्मण यज्ञरक्षणार्थ सिद्धाश्रमीं आले; त्यांनीं राक्षसाचा वध केला; विशाला नगरी मार्गांत लागली; अहिल्येचें दर्शन होऊन गौतमाची भेट झाली व महाधनुष्य पाहाण्याकरितां ते मिथिलेला सांप्रत आले आहेत." इतका वृत्तांत ( १।५०।२३।२४ ) सांगितला. स्वागत करितेवेळीं बरोबर शतानंद असून तो हा वृत्तांत ऐकत होता. आणि पुढील सर्गांत तो पुढें होऊन विश्वामित्राला काय विचारतो पहाः—

**अपि ते मुनिशार्दूल मम माता यशस्विनी।**
**दर्शिता राजपुत्राय तपो दीर्घमुपागता** ॥१।५१।४॥

" हे मुनिश्रेष्ठा, दीर्घ तपश्चर्या करीत असलेली माझी यशस्विनी माता आपण राजपुत्राला दाखविली ना ? "

ही प्रश्नपरंपरा पुढें आहेच; हा केवळ मासला दाखविला आहे. तर हे प्रश्न येथें त्यानें पुनः करणें सयुक्तिक दिसतें काय? रामायणतिलक टीकाकाराला ही शंका आली व ती त्यानें व्यक्त केली आहे. शतानंदानें हा प्रश्न उत्कंठातिशयानें पुनः केला अशी येथें त्यानें तोड सुचविली आहे; पण त्यायोगानें टीकाकाराचें तरी स्वतांचें समाधान झालें, असें वाटत नाहीं. टीकेचा निर्देश केवळ आमची शंका अस्थानीं नाहीं इतकें दाखविण्याकरतां केला आहे, आणि यावरून हा घोंटाळा विश्वामित्रचरित्र शतानंदाकडून तेथें वदविण्याच्या प्रक्षेपकाच्या लालसेनें झाला, हें उघड आहे. तसेंच ५० व्या सर्गांत यज्ञमंडपामध्यें गेल्यावर विश्वामित्रादि मंडळी "उदकयुक्त व निवांत स्थान पाहून तेथें उतरली" (१।५०।५) असें वर्णन आहे. नानादेशांहून यज्ञाकरितां तेथें हजारों ऋषि (१।५०।३) आले असून तेथें त्यांजकरितां पुष्कळ वसतिस्थानें केलेलीं होतीं आणि यासाठीं वर लिहिल्याप्रमाणें त्यांनीं स्वतांकरितां निवांतस्थान पाहिलें. ही मंडळी आल्याचें ऐकून जनक त्यांचें स्वागत करण्याकरितां ते उतरले होते तेथें आला. (१।५०।६) अर्थात् तेव्हां झालेला संवाद ते उतरले होते त्या स्थानीं झाला; पण शतानंदाचें पुराण संपल्यावर त्या सर्गाची समाप्ति कशी केली आहे, पहाः—

**विश्वामित्रोऽपि धर्मात्मा सहरामः सलक्ष्मणः।**
**स्ववासमभिचक्राम पूज्यमानो महात्मभिः॥ १।६५।४० ॥**

"मोठमोठे लोक प्रशंसा करीत असतां धर्मात्मे विश्वामित्र मुनि रामलक्ष्मणांसह आपल्या वसतिस्थानाकडे निघून गेले."

अशा रीतीनें हें सर्व आख्यान अस्थानीं आणि कारणावांचून मागाहून कोणीं घुसडलें आहे. १।५० यापुढें १।६६ हा सर्ग सुसंगत दिसतो.

सर्ग ७७ वा हा बालकांडाचा अंत्य सर्ग असून त्यांत युधाजिताबरोबर भरत व शत्रुघ्न त्याचे नगरीला गेल्याचें वर्णन आहे व याच अर्थाचा श्लोक अयोध्याकांडाचे प्रारंभीं आहे. विवाहाचे वेळीं युधाजित भरताला नेण्याकरितां आला व दशरथादि सर्व मंडळी मिथिलेला गेल्याचें ऐकून तो तिकडे गेला. (१।७३।१–५) विवाहानंतर सर्व मंडळींबरोबर तो अयोध्येला आला व तेथें

कांहीं काल ( किती तें रामायणांत स्पष्ट लिहिलें नाहीं. ) राहिल्यावर भरताला घेऊन स्वगृहीं गेला. पुढें कांहीं कालानंतर ( याचाहि रामायणांत स्पष्ट निर्देश नाहीं. ) रामाला यौवराज्याभिषेक करावा असें दशरथानें मनांत आणिलें. कथेचा हा क्रम लक्षांत घेऊन या सर्गाचे उपसंहारात्मक श्लोक वाचणें आवश्यक आहे. आणि यासाठीं तो संक्षेपानें येथें सांगितला. हे श्लोक दोन कांडांच्या सांध्यावर आहेत. व कथाक्रम लक्षांत घेतां त्यांत यौवराज्याभिषेकाविषयींच्या विचारापूर्वींची कथा येथें संभवते; पण पुढील श्लोक पहाः—

**रामश्च सीतया सार्धं विजहार बहून् ऋतून् ॥२५॥**

" रामानें सीतेसहवर्तमान पुष्कळ दिवस ( ऋतु ) विहार केला. "

येथें कित्येक टीकाकारांनीं पुढील अरण्यकांडांतील सीतावचनाच्या अनुरोधानें हा काल बारा वर्षांचा सांगितला आहे. कालाचा हा निर्देश मूळांतच विसंगत कसा आहे व गॉरिशिओचे प्रतींतील एक वर्षाचा पाठ घेऊन कशी संगति लागते, हें मागील प्रकरणांत दाखविलें आहे. अर्थात् हा काल एक वर्षाहून अधिक असणें शक्य नाहीं. दुसरें असें कीं, हा काल विवाहानंतर युधाजिताबरोबर भरत गेल्यावरचा आणि वनवासापूर्वींचा आहे. हा काल बारा वर्षांचा मानिल्यास तोंपर्यंत युधाजिताकडे भरत मातुलगृहीं होता व त्या दोघां बंधूंच्या स्त्रिया अयोध्येंत होत्या, असें मानावें लागेल; हें कितपत संभवनीय आहे, तें वाचकांनींच ठरवावें. हा असंभाव्य काल बाजूला ठेविला आणि पाठभेदाप्रमाणें येणारा एक वर्षाचा काल घेतला, तरी रामानें सीतेसह पुष्कळ काल विहार केल्याचा वरील मोघम निर्देशहि असंभाव्य दिसतो. कारण विवाहानंतर अयोध्येंत आल्यावर युधाजित् तेथें कांहीं काल राहिला, तो काल एक वर्षांत कमी व्हावयाचा आहे. वास्तविक हे सर्व श्लोक अस्थानीं आहेत. भरत मातुलगृहीं गेल्यावर रामानें सर्व पौरकार्यें सांभाळिलीं व लोकप्रीति संपादिली, असें सांगितलें आहे. यांतील अंत्य श्लोक पहाः—

**एवं दशरथः प्रीतो ब्राह्मणा नैगमास्तथा ।**
**रामस्य शीलवृत्तेन सर्वे विषयवासिनः ॥ २३ ॥**

" अशा प्रकारें रामाच्या सुशील वर्तनानें दशरथ संतुष्ट झाला. तसेंच ब्राह्मण, वैश्य व त्याच्या राज्यांतील इतरहि सर्व लोक त्याजवर संतुष्ट झाले. "

यापुढें पुढील श्लोक दिला आहे:—

**तेषामतियशा लोके रामः सत्यपराक्रमः ।**
**स्वयंभुरिव भूतानां बभूव गुणवत्तरः ॥ २४ ॥**

" त्यांमध्यें सत्यपराक्रमी रामानें लोकांत मोठी कीर्ति संपादन केली व प्राण्यांमध्यें ब्रह्मदेवाप्रमाणें तो अधिक गुणसंपन्न झाला. "

या श्लोकांत " त्यांमध्यें " ( तेषाम् ) या शब्दानें वाच्य कोण समजावयाचे ? मागील श्लोकानंतर हा श्लोक क्रमप्राप्त म्हणून वाचावयाचा व त्यांतील संदर्भानुसार अर्थ घ्यावयाचा म्हणजे त्या शब्दानें " लोक " वाच्य मानावे लागतील; पण मग यांचा संबंध कसा जोडावयाचा ? येथें कित्येक टीकाकारांनीं " तेषाम्" या शब्दाचा अर्थ " त्या चारी भावांमध्यें " असा केला आहे. श्लोकांच्या धोरणावरून हा अर्थच इष्ट आहे, असें आम्हीहि म्हणतों; पण मागील श्लोकापुढें हा श्लोक वाचला असतां तो युक्त दिसत नाहीं, याला उपाय काय ? वास्तविक हा श्लोक अयोध्याकांडाचे प्रारंभींच्या श्लोकांतून प्रक्षेपकानें येथें आणून ठेविला आहे. दोन स्थलीं एक श्लोक असला तरी पूर्वापर संबंध पाहतां तो अयोध्याकांडांत सुसंगत दिसतो; व यासाठीं तो मूळचा तेथील असून येथें मागाहून कोणीं घुसडला असावा असें दिसतें. अयोध्याकांडांतील हा भागहि प्रक्षिप्तच आहे व तें पुढें दाखवावयाचें आहे. प्रस्तुत मुद्यापुरते दोन श्लोक घेऊं:—

**सर्व एव तु तस्येष्टाश्चत्वारः पुरुषर्षभाः ।**
**स्वशरीराद्विनिर्वृत्ताश्चत्वार इव बाहवः ॥२।१।५॥**
**तेषामपि महातेजा रामो रतिकरः पितुः ।**
**स्वयंभुरिव भूतानां बभूव गुणवत्तरः ॥६॥**

" आपल्याच देहांतून निघालेल्या चार बाहूंप्रमाणें त्या दशरथाला ते पुरुषश्रेष्ठ असे चारहि ( पुत्र ) ( अत्यंत ) प्रिय होते. त्या चौघांमध्यें महातेजस्वी रामावर पित्याचें प्रेम फार होतें; ( कारण ) सर्व प्राण्यांमध्यें ब्रह्मदेवाप्रमाणें तो अधिक गुणसंपन्न झाला होता. "

यांतील दुसऱ्या श्लोकांतील दुसरा अर्ध तर पूर्वश्लोकार्धाशीं अगदीं सारखा आहे आणि पूर्वार्ध थोडा भिन्न आहे; तथापि त्याचा उपक्रम दोहोंकडे सारखा आहे व हाच संशयास कारण झाला आहे. कारण येथील आरंभींचा शब्द मागील श्लोकाशीं सुसंगत आहे, तसा बालकांडांतील नाहीं, आणि यावरून येथील श्लोकच, मागील काण्डाचे उपसंहारात्मक श्लोक मागाहून घुसडतांना कोणींतरी थोड्या फेरानें उतरला असावा, असें अनुमान आहे. अर्थात् येथपासून पुढील श्लोक प्रक्षिप्त आहेत.

अलीकडे लाहोर येथें दयानंद महाविद्यालय संस्कृत ग्रंथमालेंतून जी रामायणाची प्रत प्रसिद्ध झाली आहे, त्यांतील अयोध्याकाण्ड (व तेंहि अपूर्ण) प्रस्तुत आमचे हातीं आलें आहे, तींतील पाठ पाहतां आमच्या अनुमानास पुष्टि मिळत आहे. या प्रतींत अयोध्याकाण्डाचा प्रारंभ, युधाजिताबरोबर भरताला जाण्याविषयीं दशरथानें सांगितलें, येथून झाला आहे. अर्थात् आमचेकडील प्रतींत या कथाभागाला प्रारंभ १।७७।१५ पासून होतो. लाहोरप्रतींत भरताला जातेवेळीं दशरथाचा उपदेश वगैरे कथाभाग अधिक आहे; तथापि आम्हांला आमच्या अनुमानापुरता त्यांत आधार आहे. वर अवतरिलेला ७७।२३ हा श्लोक लाहोरप्रतींत पुढीलप्रमाणें आहे.—

**रामस्य शीलवृत्ताभ्यां सर्वे च विषये जनाः ॥२।३।४॥**
**तुष्टुवुः सहिताः सर्वे देवकल्पस्य धीमतः ॥**

दोनहि स्थलीं अर्थ एक आहे; पाठमात्र थोडा भिन्न आहे; पण यापुढील श्लोक—

**अथ राजा दशरथः सस्मार प्रोषितौ सुतौ ॥२।३।५॥**
**उभौ भरतशत्रुघ्नौ किंचिच्छोको बभूव ह ॥**

हा असून हा श्लोक आमचे प्रतींत २।१।४ था आहे. अर्थात् आमचेकडील बालकाण्डाचे प्रतींत अंतिम सर्गाचे अंतीं असलेले श्लोक त्या प्रतींत पाठभेदानेंहि नव्हते, हें उघड आहे.

## अयोध्याकांड.

सर्ग १ ला याचे आरंभींचे उपक्रमात्मक श्लोक ३५ प्रक्षिप्त दिसतात. यांत प्रारंभीं रामाचें गुणवर्णन करून पुढें दशरथानें रामाला यौवराज्याभिषेक करावा,

असें मनांत आणून सभा बोलाविली, इतकी कथा आहे. यांतील प्रारंभींचा गुणवर्णनात्मक भाग अस्थानीं आहे व त्या योगानें द्विरुक्तिदोष उत्पन्न होत आहे. हा भाग व पुढें दशरथानें यौवराज्याभिषेकाविषयीं केलेला विचार यांचा सांधा बरोबर जमला नाहीं. दोन विभागांचे पुढील उभयान्वयी श्लोक पहा:—

**एतैस्तु बहुभिर्युक्तं गुणैरनुपमैः सुतम् ।**
**दृष्ट्वा दशरथो राजा चक्रे चिंतां परंतपः ॥ ३५ ॥**

" असे अनेक अनुपम गुण आपल्या पुत्राच्या अंगीं असल्याचें अवलोकन करून शत्रुतापन अशा दशरथाच्या मनांत वाटूं लागलें. "

हा श्लोक वाचला म्हणजे राजानें काय मनांत आणलें, अशी जिज्ञासा उत्पन्न होते. यापूर्वीं रामाचे गुणवर्णनाचा भाग असून त्याचे शेवटीं तो राजा असावा, असें लोकांना वाटूं लागलें, असें वर्णन आहे. वरील श्लोकांत लोकां-प्रमाणें राजालाहि वाटूं लागल्याचा निर्देश नाहीं; अर्थात् तें वेगळें सांगण्याचा कवीचा उद्देश दिसतो व त्याप्रमाणें तें पुढें सांगितलेंहि आहे; पण पुढील श्लोकाचा उपक्रम स्वतंत्र दिसतो.

**अथ राज्ञो बभूवैव वृद्धस्य चिरजीविनः ।**
**प्रीतिरेषा कथं रामो राजा स्यान्मयि जीवति ॥३६॥**

" नंतर त्या वृद्ध व दीर्घकाल वांचलेल्या दशरथाला माझ्या डोळ्यांदेखत राम राजा कसा होतो असें वाटूं लागलें. " दशरथाला काय वाटूं लागलें याचा केवळ निर्देश या श्लोकांत असणें सरळ आहे; परंतु यांत मागील श्लोकांतील वर्णन पुनः देऊन काय वाटूं लागलें तेंहि सांगितलें आहे. श्लोकारंभींचा 'अथ' शब्द स्वतंत्र उपक्रमाचा द्योतक आहे. मागील ( ३५ ) श्लोकांत रामाचे गुणांचा निर्देश मागील वर्णनाकडे बोट दाखवून केला आहे, आणि यापुढील तीन ( ३८-३९-४० ) श्लोकांत रामाचे गुण सांगून ते राजानें पाहिले असें वर्णन आहे. अर्थात् पूर्वोक्त गुणवर्णनाचा निर्देश करून 'राजाला वाटूं लागलें' असें मोघम सांगणारा श्लोक व त्याबरोबर तन्निर्दिष्ट सर्व भाग पुढील ग्रंथाशीं संगत नाहीं असें होत नाहीं काय ? रामाचे गुण प्रथम सांगतांना त्याला दश-रथाची उपमा ( २।१।९ ) दिली असून गुणवर्णनाचे अंतीं त्याचे गुण पाहून

लोकांना तो राजा असावा असें वाटूं लागल्याचें लिहिलें आहे याची संगति कशी लावावयाची? राम दशरथतुल्य होता म्हणून श्रेष्ठ, तर दशरथ स्वतः प्रजापालन करीत असतां राम राजा असावा असें लोकांना वाटण्याचें कारण काय? यौवराज्याभिषेकाविषयींचा आपला विचार परिषदेपुढें राजानें ठेविला व तिनें संमति देतांच राजानें हीच शंका विचारिली आहे. या वेळीं राजाला प्रजाजनांनीं जें उत्तर दिलें त्यांत रामाचें गुणवर्णन आलें असून तें त्या स्थलीं सुसंगत दिसतें. या गुणवर्णनाचे उपसंहारामध्यें पुढील श्लोक आहे—

**तमेवं गुणसंपन्नं रामं सत्यपराक्रमम्।**
**लोकनाथोपमं नाथमकामयत मेदिनी** ॥२।२।४८॥

"अशा प्रकारच्या गुणांनीं राम संपन्न व सत्यपराक्रमी असून लोकपालाप्रमाणें आहे, व म्हणून तो राजा असावा अशी पृथ्वी (वरील सर्व लोकां) ला इच्छा झाली आहे."

दशरथाचे प्रश्नाला प्रजाजनांनीं दिलेल्या उत्तरांत हा श्लोक शोभतो, तसा प्रारंभींच्या गुणवर्णनाचे अंतीं कसा शोभेल? पण तोच तेथें थोड्या भेदानें जशाचा तसा दिला आहे. (२।१।३४) कांहीं भाग तर दोहोंकडे प्रायः एक आहे. उदाहणार्थ २।२। ३१, ४२, ४३, ३५, ३६, ४७, ४८, हे श्लोक २।१। ९, १७, २१, ३३, ३४ या श्लोकाशीं तोलून पहा. तेव्हां हा भाग प्रक्षेपकानें घातलेला आहे, हें उघड आहे. आमचे मतें अयोध्याकांडाचा खरा आरंभ २।१।३६ येथें होतो व पुढील गुणवर्णन सुसंगत दिसतें.

चौदाव्या सर्गांत दशरथ व कैकेयी यांच्या आज्ञेनें रामाला बोलाविण्याकरितां सुमंत्र निघून गेला आहे. यानंतर पंधराव्या सर्गांत राजवाड्याबाहेर जमलेल्या ब्राह्मणांनीं राजा उठून अद्यापि बाहेर आला नाहीं, असें पाहून त्याला उठविण्याकरितां सुमंत्राला आंत पाठविलें व त्याला पुनः आलेला पाहून राजानें रागावून तीच आज्ञा केली, अशी कथा आहे. हा कथाभाग अगदीं विसंगत आहे. चौदाव्या सर्गांत वसिष्ठांनीं रामाच्या अभिषेकाच्या तयारीचें वर्णन करून नागरिक लोक उत्सुकतेनें अभिषेकाची वाट पहात बाहेर उभे आहेत, असा निरोप सुमंत्राबरोबर पाठविला आहे आणि पुढील सर्गांत अभिषेकाच्या तया-

रीचें वर्णन प्रारंभीं कवीनें केलें असून रामाला बोलावण्यासाठीं बाहेर आलेल्या सुमंत्राला त्याचें कार्य काय होतें हें समजूनहि, बाहेर जमलेल्या ब्राह्मणांनीं राजाला उठविण्याकरितां पुनरपि आंत पाठविला आहे. सुमंत्राला व त्या ब्राह्मणांना हें कृत्य शोभण्यासारखें आहे काय? या कृत्यामुळें राजालाहि राग येऊन त्यानें सुमंत्राला:—

**किमिदं कारणं येन ममाज्ञा प्रतिबाह्यते।**
**न चैव संप्रसुप्तोऽहं आनयेहाशु राघवम् ॥२।१५।२६॥**

"मी केलेल्या आज्ञेचें उल्लंघन तूं कां करीत आहेस? मला झोंप लागलेली नाहीं. तूं लवकर रामाला घेऊन इकडे ये."

असें स्पष्ट सांगितलें आहे. दशरथावर सुमंत्रासारख्याला असें सांगण्याची पाळी आली, हें वाचकांनाहि असंभाव्य वाटेल. या सर्गांत असलेल्या पुनरुक्ति, शेवटीं दीर्घच्छंदांत असलेले कांहीं श्लोक व सुमंत्राचें त्याला न शोभणारें वर्तन यांवरून हा सर्ग प्रक्षिप्त ठरत आहे. या सर्गाचा प्रारंभहि चमत्कारिक आहे. चौदाव्या सर्गाच्या अंतीं रामाला बोलाविण्याकरितां सुमंत्र निघून गेल्याचें वर्णन खालीं दिल्याप्रमाणें आहे:—

**निर्जगाम महातेजा राघवस्य दिदृक्षया।**
**सागरह्रदसंकाशात्सुमित्रोऽतःपुराच्छुभात् ॥६६॥**

"रामाचें दर्शन घेण्याच्या इच्छेनें तो महातेजस्वी सुमंत्र समुद्रांतील डोहाप्रमाणें असलेल्या त्या शुभ अंतःपुरांतून बाहेर पडला."

यापुढें सर्गसमाप्तीचा श्लोक असून तो ठरल्याप्रमाणें दीर्घच्छंदांत आहे. या श्लोकांत सुमंत्रानें राजवाड्याच्या बाहेर पुष्कळ लोक जमले आहेत, असें पाहिल्याचें लिहिलें आहे. बहुधा ही पुढील सर्गाची प्रस्तावना असावी; पण पंधराव्या सर्गाच्या प्रारंभींचा—

**ते तु तां रजनीमुष्य ब्राह्मणा वेदपारगाः।**
**उपतस्थुरुपस्थानं सहराजपुरोहिताः ॥१॥**

"ती रात्र गेल्यावर ते वेदपारंगत ब्राह्मण राजपुरोहितासहवर्तमान तेथें आले."

हा श्लोक पूर्वीच्या कोणत्याच श्लोकाशीं जुळत नाहीं. यांतील "ते ब्रा-

ह्मणा: " व " तां रजनीम् " या शब्दांचा पाठीं कोठें संबंध आहे, तें कळत नाहीं. तेव्हां हा सर्ग प्रक्षिप्त मानिल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

सर्ग ४१ वा याचे आरंभींचे कांहीं श्लोक व सर्ग २० वा याचे आरंभींचे कांहीं श्लोक एक आहेत. पूर्ण सादृश्य होऊं नये, म्हणून क्वचित् स्थलीं थोडा शाब्दिक फेरफार केलेला आहे. या सर्गांत असलेलें वर्णन पूर्वींच्या व पुढील सर्गाच्या मध्यें आल्यामुळें रसभंग झाला आहे. राम वनवासाला निघाला असतां त्याला पोंचवावयाला आलेल्या दशरथ वगैरे मंडळींची स्थिति कशी झाली होती, याचें वर्णन पूर्वींच्या सर्गांत आलेलें आहे. शेवटीं दशरथ परत फिरत नाहीं, असें पाहून त्याला अमात्यांनीं—

यमिच्छेत्पुनरायातं नैनं दूरमनुव्रजेत् ॥

" जो परत यावा असें वाटत असेल, त्याला पोंचविण्यास लांबपर्यंत जाऊं नये. "

असें शास्त्र सांगून परत फिरविलें, असें लिहिलें आहे. पुढील सर्गांत नगरींतील लोकांची स्थिति वर्णन करण्याचा जो एकदम उपक्रम करण्यांत आला आहे, तो वरील वर्णनाशीं सुसंगत दिसतो काय ? यापेक्षां सर्ग ४२ व्याच्या प्रारंभींचें—

यावत्तु निर्यतस्तस्य रजोरूपमदृश्यत ।
नैवेक्ष्वाकुवरस्तावत्संजहारात्मचक्षुषी ॥१॥

" राम जाऊं लागला तेव्हां जोंपर्यंत त्याच्या रथाच्या योगानें उडालेली धूळ दिसत होती, तोंपर्यंत इक्ष्वाकुवंशांतील त्या श्रेष्ठ राजानें आपली दृष्टि परत फिरविली नाहीं. "

हें वर्णन जर ४० व्या सर्गापुढें जोडिलें, तर किती शोभेल बरें !

सर्ग ९१ वा यांत रामाला वनांतून परत आणण्याकरितां भरत आला असतां विशाल सेनेसह त्याचें भरद्वाजमुनींनीं स्वागत करून त्यांची भोजनादिकांची व्यवस्था कशी ठेविली, त्याचें वर्णन आहे. हें वर्णन अतिशयोक्तीनें भरलेलें असून अस्थानीं आहे. भरद्वाजांकडून एवढें थाटाचें स्वागत करून घेण्याइतक्या स्वस्थ मन:स्थितींत त्या वेळीं भरत किंवा दुसरा कोणी तेथें

नव्हता. यांत भरद्वाजांनीं मद्यमांसादिकांची चंगळ करून परिचर्येकरितां अप्सरादि आणिल्याचें वर्णन आहे. सर्ग ९२ मध्यें आश्रमापासून चित्रकूट साडेतीन योजनांवर असल्याचें लिहिलें आहे. (१०) आणि सैन्याकरितां विश्वकर्म्याकडून भूमि सारखी करविली आहे, ती पांच योजनें ( २१।२९ ) असल्याचें वर्णन आहे. अर्थात् चित्रकूटपर्वतापर्यंत या सेनानिवासाची सीमा पोंचते. मग दुसरे दिवशीं चित्रकूट पर्वताकडे जाणारा मार्ग भरतानें भरद्वाजांना विचारला, त्याचें प्रयोजन काय ? अर्थात् हा सर्व सर्ग प्रक्षिप्त आहे.

पुढें १०० व्या सर्गांत रामानें भरताला लांबलचक उपदेश केलेला आहे. भरत रामाला परत आणण्याकरितां गेला त्या वेळचा हा प्रसंग आहे. या वेळीं दशरथ मरण पावून अगदीं थोडे दिवस झाले होते. त्याचें उत्तरकार्य करून राज्यावर न बसतां भरत अरण्यांत रामाकडे आला होता. अशा प्रसंगीं दोघां भावांची भेट झाली असतां मनुष्यस्वभावानुरूप कोणतीं प्रश्नोत्तरें प्रारंभीं होणें शक्य होतें बरें ? दशरथाच्या शोचनीय मृत्यूबद्दल शोक करण्याचा प्रसंग सकृद्दर्शनीं सर्व मंडळींवर येणें योग्य दिसत नाहीं काय ? परंतु खुद्द रामायणांत काय आहे ? सुमारें पाउणशें श्लोक भरताला रामानें उपदेश केलेला आहे. या सर्व सर्गांत मंत्री कसा असावा ? मसलती कशा कराव्या ? वगैरे नाना तऱ्हेच्या बाबींबद्दल विचार सांगितले आहेत. हा सर्ग वाचूं लागतांच तो अस्थानीं असल्याचा भास होऊं लागतो. हा उपदेश संपूर्ण झाल्यावर पुढील सर्गांत रामाला दशरथ मृत्यु पावल्याचें वृत्त कळलें आहे. प्रस्तुत सर्गांत दशरथ कुशल आहे काय ? असा प्रश्न रामानें प्रारंभीं करून त्याजकडून उत्तराची अपेक्षा न करितांच उपदेशाचा उपक्रम केला आहे. उपदेश तरी अशा रीतीनें केला आहे कीं, जणूं काय दशरथ मृत झाल्यावर भरत गादीवर आरूढ होऊन फार दिवसांनीं रामाच्या भेटीला आल्याची त्याच्या मनांत कल्पना होती. हें संभवनीय दिसतें काय ? बरें, भरताला उपदेश करण्याइतकी रामाचीहि स्थिति नव्हती. कारण दोघेहि सारख्याच वयाचे, सारख्याच अनुभवाचे व बहुतेक सारख्याच योग्यतेचे पुरुष होते. दशरथ मृत होऊन किंवा राम वनांत येऊन एक महिनाहि पूर्ण झाला नसेल. अशा वेळीं व अशा परिस्थितींत हा उपदेश केलेला

आहे. याकरितां हा सर्ग प्रक्षिप्त नाहीं असें मानणें म्हणजे रामाकडे कमीपणा आणण्यासारखें आहे यापुढील सर्गाच्या प्रारंभीं रामानें जे प्रश्न केले आहेत त्यांवरून हा सर्ग प्रक्षिप्त असल्याचें उघड दिसून येतें. या सर्गभर भरताला प्रश्नजालांत गुरफटून टाकिलें असून पुढील सर्गाचा प्रारंभ पहाः—

**तं तु रामः समाज्ञाय भ्रातरं गुरुवत्सलम् ।**
**लक्ष्मणेन सह भ्रात्रा प्रष्टुं समुपचक्रमे ॥१॥**

"आपला भाऊ भरत हा आपल्या वडील मंडळींवर प्रेम करणारा आहे असें पाहून रामानें आणि लक्ष्मणानें त्याला प्रश्न विचारण्याचा उपक्रम केला."

या श्लोकावरून प्रश्न विचारण्यास अद्यापि प्रारंभ व्हावयाचा आहे, असें दिसतें. यापुढें रामानें केलेले प्रश्न त्याच्या सौजन्यास शोभण्यासारखे आहेत. ९९ व्या सर्गाच्या अंतीं भरत व शत्रुघ्न आल्यावर—

**तावुभौ च समालिंग्य रामोऽप्यश्रूण्यवर्तयत् ॥२।९९।४०॥**

"भरत आणि शत्रुघ्न यांना रामानें आलिंगन दिलें, तेव्हां त्याच्याहि डोळ्यांतून अश्रु आले."

इतका कथाभाग आलेला आहे. यापुढें दोन श्लोक असले तरी त्यांत विशेष कथाभाग नाहीं. अर्थात् या वेळीं रामानें आपल्या भावांना आलिंगन दिलें असून तो अश्रु ढाळीत आहे अशी स्थिति आहे. पुढील म्हणजे १०० व्या सर्गाच्या प्रारंभीं वेगळेंच वर्णन आहे:—

**जटिलं चीरवसनं प्रांजलिं पतितं भुवि ।**
**ददर्श रामो दुर्दर्शं युगान्ते भास्करं यथा ॥१॥**

"त्या भरतानें वल्कलें परिधान केलीं होतीं; त्याच्या जटा वाढल्या होत्या; व अशा रीतीनें तो जमिनीवर पडला असतां प्रलयकालींच्या सूर्याप्रमाणें त्याच्याकडे पाहणें कठीण झालें होतें, असें रामानें पाहिलें."

यांत भरतानें लोटांगण घातलें असल्याचें वर्णन आहे. हें पतन नमस्काराचें म्हणावें तर तो पूर्वीच उरकलेला आहे. ( श्लोक २७ वा पहा. ) तेव्हां १०० व्या सर्गाच्या प्रारंभीं दिलेलें वर्णन पूर्वसर्गांतील वर्णनाशीं विसंगत आहे, हें उघड आहे.

याशिवाय या सर्गांत रामानें भरताला जे प्रश्न विचारिले आहेत, ते सर्व महाभारतांतील सभापर्वांतर्गत नारदनीतीशीं तंतोतंत जुळतात. प्रारंभींचे थोडेसे प्रश्न राम व भरत यांच्यासंबंधाचें असल्यामुळें ते मात्र नवे बनवून घातले आहेत. बाकीचा सर्व भाग भारतांतून क्वचित्स्थलीं थोडासा फेरफार करून उतरून घेतलेला आहे. प्रक्षेपकानें जर यांत कांहीं विशेष कौशल्य खर्च केलें असेल तर तें एवढेंच कीं, त्यानें भारतांतील प्रश्नांची सांखळी तोडून तिची आपल्या मनाप्रमाणें रचना करून ती रामायणांत ठेवून दिली आहे. यामुळें रामायण वाचीत असतां जर याबद्दल आपणांला थोडासा संशय उत्पन्न झाला आणि आपण दोनहि ग्रंथ ताडून पाहूं लागलों तर थोडासा प्रयास पडल्याशिवाय रहात नाहीं. याकरितां रा. रा. अभ्यंकर यांनीं आपल्या "रामायणानंतरचें महाभारत" या निबंधांत अयोध्याकांडांतील हा सर्ग व भारतांतील नारदनीति या दोहोंत आढळणारे सारखे श्लोक ( पान १५० पहा. ) दिले आहेत. ते पाहिजे तर जिज्ञासूंनीं पहावे. मात्र हे श्लोक रामायणांतून भारतांत आले असें जें त्यांचें मत तेथें भासतें, तें आम्हांस मान्य नाहीं, हें येथें वेगळें लिहिण्याची जरूर नाहीं. अशीं सर्व स्थलें येथें देतां येणार नाहींत, हें मनांत आणून रा. रा. अभ्यंकरांच्या पुस्तकाकडे आम्हीं हवाला दिलाच आहे; तथापि वाचकांची खातरी होण्याकरितां कांहीं निवडक स्थलें येथें उतरून घेणें भाग आहे.

| महाभारत—सभापर्व अध्याय ५ वा. | रामायण-अयोध्याकांड सर्ग १००. |
|---|---|
| कच्चिदात्मसमा वृद्धाः<br>शुद्धाः संबोधनक्षमाः ॥२९॥ | कच्चिदात्मसमाः शूराः<br>श्रुतवन्तो जितेन्द्रियाः । |
| कुलीनाश्चानुरक्ताश्च<br>कृतास्ते वीरमंत्रिणः । | कुलीनाश्चेंगितज्ञाश्च<br>कृतास्ते तात मंत्रिणः १५ |
| विजयो मंत्रमूलो हि<br>राज्ञो भवति भारत ॥३०॥ | मंत्रो विजयमूलं हि<br>राज्ञां भवति राघव । |
| कच्चित्संवृत्तमंत्रैस्ते<br>अमात्यैः शास्त्रकोविदैः ॥ | सुसंवृतो मंत्रिधुरै-<br>रमात्यैः शास्त्रकोविदैः १६ |
| कालातिक्रमणादेते | कालातिक्रमणे ह्येव |

| | |
|---|---|
| भक्तवेतनयोर्भृताः । | भक्तवेतनयोर्भृताः । |
| भर्तुः कुप्यन्ति दौर्गत्यात् | भर्तुरप्यतिकुप्यन्ति |
| सोऽनर्थः सुमहान्स्मृतः ॥५३॥ | सोऽनर्थः सुमहान् कृतः ३३ |
| कच्चित् स्त्रियः सांत्वयसि | कच्चित् स्त्रियः सांत्वयसे |
| कच्चित्ताश्च सुरक्षिताः । | कच्चित्तास्ते सुरक्षिताः । |
| कच्चिन्न श्रद्दधास्यासां | कच्चिन्न श्रद्दधास्यासां |
| कच्चिद् गुह्यं न भाषसे ॥८७॥ | कच्चिद् गुह्यं न भाषसे |
| कच्चिद्दर्शयसे नित्यं | कच्चिद्दर्शयसे नित्यं |
| मनुष्यान्समलंकृतः । | मानुषाणां विभूषितम् । |
| उत्थाय काले कालज्ञैः | उत्थायोत्थाय पूर्वाह्णे |
| सह पांडव मंत्रिभिः ॥९०॥ | राजपुत्र महापथे ॥५१॥ |
| कच्चिज्ज्ञातीन् गुरून् वृद्धान् | कच्चिद् गुरूंश्च वृद्धांश्च |
| दैवतांस्तापसानपि । | तापसान्देवतातिथीन् । |
| चैत्यांश्च वृक्षान् कल्याणान् | चैत्यांश्च सर्वान्सिद्धार्थान् |
| ब्राह्मणांश्च नमस्यसि ॥१०४॥ | ब्राह्मणांश्च नमस्यसि ॥६१॥ |
| कच्चित्ते सफला वेदाः | कच्चित्ते सफला वेदाः |
| कच्चित्ते सफलं धनम् । | कच्चित्ते सफलाः क्रियाः । |
| कच्चित्ते सफला दाराः | कच्चित्ते सफला दाराः । |
| कच्चित्ते सफलं श्रुतम् ॥११४॥ | कच्चित्ते सफलं श्रुतम् ७२ |

" तूं आपले मंत्री आपल्यासारखे, वृद्ध ( शूर ), शुद्ध ( बहुश्रुत), बोलण्यांत पटाईत ( जितेंद्रिय ), कुलीन, तुझ्यावर प्रेम करणारे ( इंगित जाणणारे ) आणि शूर ( हे भरता ) केले आहेस ना ? हे धर्मराजा, ( हे भरता ) मसलत ही राजाच्या ( राजांच्या ) विजयाचें मूळ आहे. ज्यांची मसलत गुप्त असते अशा ( मंत्र्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या ) शास्त्रज्ञ अमात्यांसहवर्तमान ( तूं गुप्तपणें मसलत करितोस ना ? ) भत्ता व पगार यांवर या सेवकांचा चरितार्थ चालतो, यामुळें त्यांच्या पगाराची वेळ चुकली म्हणजे द्रव्य जवळ नाहीं म्हणून ते धन्यावर ( फार ) रागावतात व हा अनर्थ मोठा मानिला आहे. तूं स्त्रियांचें सांत्वन

करितोस ना ? तूं त्यांचें रक्षण करितोस ना ? त्यांच्यावर तूं विश्वास ठेवीत नाहींस ना ? त्यांना तूं आपली गुप्त गोष्ट सांगत नाहींस ना ? हे धर्मराजा ( हे राजपुत्रा भरता ) तूं नेहमीं योग्य वेळीं ( पूर्वाह्णीं ) उठून आपल्या योग्य कालाचें ज्ञान असलेल्या मंत्र्यांसहवर्तमान ( रस्त्यांतील ) लोकांना अंगावर अलंकार घालून दाखवितोस ना ? वडील मंडळी, वृद्ध, देवता, ऋषि व आपली ज्ञाति (अतिथि), यज्ञभूमि, [ वृक्ष ] व कल्याण करणारे ( जन्माचें सार्थक केलेले ) ब्राह्मण यांना नमस्कार करितोस ना ? तुझें वेदाध्ययन, तुझी संपत्ति ( तुझ्या क्रिया ) तुझ्या स्त्रिया व तुझी विद्या हीं सफल झालीं आहेत ना* ? "

एवढा महत्त्वाचा पुरावा मिळाल्यावर हा सर्ग वाल्मीकिप्रणीतच आहे असें म्हणण्याचें धाडस यापुढें सुज्ञजन करणार नाहींत अशी आशा आहे.

सर्ग ११२ वा याचे प्रारंभींचे श्लोक ८ प्रक्षिप्त आहेत. भरतानें रामाला परत येण्याची विनंति केल्यावर रामानें जें उत्तर दिलें त्यानें सर्ग १११ वा याची समाप्ति झाली आहे. पूर्वी वचन दिल्याप्रमाणें चौदा वर्षे अरण्यांत राहून मग आपण राज्याचा स्वीकार करूं व अशा रीतीनें वागल्यानें पिता वचनमुक्त होईल, असें रामानें सांगितलें आहे. यापुढील कथा रामाचें भाषण ऐकून भरतानें काय केलें त्याविषयीं असावयाची, हें साहजिक आहे. परंतु सर्ग ११२ वा याचे प्रारंभीं तेथें कित्येक महर्षि आले व त्यांनीं भरताला रामाचें म्हणणें ग्राह्य असल्याचें सांगितलें व तें पाहून रामानें आनंदित होऊन त्यांची पूजा केली, असें वर्णन आहे. हें वर्णन पूर्वापर कथेशीं विसंगत आहे. त्यानंतरहि भरतानें रामाला परत फिरण्याविषयीं जी विनंति केली ती करण्याचें कारण काय ? बरें; ऋषींच्या या भाषणाला भरतानें स्वतां कांहींच उत्तर कां दिलें नाहीं ? पूर्वसर्गांतील रामाच्या निश्चित भाषणानंतर ११२ व्या सर्गांतील पुढील श्लोक शोभतो:—

**त्रस्तगात्रस्तु भरतः स वाचा सज्जमानया ।**
**कृतांजलिरिदं वाक्यं राघवं पुनरब्रवीत् ॥९॥**

---

टीपः—दोनहि ग्रंथांतील उतारे जवळ जवळ एकाच अर्थाचे आहेत. यासाठीं दोहोंचा अर्थ एकत्र दिला आहे. भारतांतील एकाद्या शब्दाच्या स्थानीं दुसरा शब्द रामायणांत असल्यास ते शब्द अनुक्रमें कंसापूर्वी व कंसांत दिले आहेत. भारतांतील जो शब्द अधिक राहिला आहे, तो [ ] या कंसांत दिला आहे.

" रामाचें तें निश्चयात्मक भाषण ऐकून भरताला अगदीं मोडखळल्यासारखें होऊन गेलें व हात जोडून पुनः तो रामाला म्हणाला. "

## अरण्यकांड.

यांतील ३१ वा सर्ग प्रक्षिप्त आहे, असें वाटतें. खरादि राक्षसांचा वध रामानें केल्यावर हें वृत्त रावणाला कळविण्याकरितां अकंपन राक्षस लंकेला गेला. नंतर रावणानें तो वृत्तांत ऐकून अकंपनानें सुचविल्याप्रमाणें सीताहरण करण्याचें ठरविलें; परंतु तो मारीचाकडे साहाय्यार्थ गेला असतां त्यानें त्याचें मन वळविलें व तो लंकेला परत आला. इतकी कथा या सर्गांत आली आहे. या सर्गांत अवघे पन्नास श्लोक आहेत. एवढी महत्त्वाची कथा इतकी घाई करून रामायणांत कोठेंहि सांगितलेली नाहीं. मारीचरावणांच्या संवादाचे सारे दहा श्लोक आहेत. या सर्गाचा प्रारंभ तर अगदीं विचित्र आहे. पूर्वीं कांहीं सूचना न करितां अकंपनाचें पात्र कवीनें वाचकांपुढें एकदम उभें केलें आहे. खरादि राक्षसांशीं रामाचें युद्ध झालें त्या वेळीं तो कोणत्या कामासाठीं तेथें आला होता तें मुळींच सांगितलेलें नाहीं. अकंपन व रावण यांचा हा संवाद व मारीचानें रावणाचें मन वळविल्याची हकीगत ही खरीच घडली होती असें पुढील वर्णनावरून वाटत नाहीं. रामानें खरादींचा वध केल्याचें रावणाला या वेळीं खरोखरच कळलें असतें तर त्यानें शूर्पणखा हें वृत्त कळवावयास मागाहून आली त्या वेळीं तिला—

कश्च रामः कथंवीर्यः किंरूपः किंपराक्रमः ॥३४।२॥

" तो राम कोण? त्याचें वीर्य कसें आहे? त्याचें स्वरूप कसें आहे? त्याचा पराक्रम कसा आहे? "

असा प्रश्न केला असता काय? तसेंच मारीचाचा व रावणाचा जो संवाद पुनः झाला आहे त्यांत पूर्वींच्या संवादाचा मुळींच उल्लेख नाहीं. याकरितां हा सर्ग प्रक्षिप्त मानणें भाग आहे. हा सर्ग प्रक्षिप्त न मानितां याचा संबंध पुढें नाहीं म्हणून पुढील सर्ग प्रक्षिप्त मानिल्यास त्यांतील कथांचे उल्लेख सर्व रामायणांत आले आहेत, त्याचा निकाल कसा लावावयाचा? शिवाय ही कथा गॉरिशिओच्या प्रतींत नाहीं.

सर्ग ६३ वा प्रक्षिप्त दिसतो. राम आश्रमांत परत आल्यावर सीता तेथें दिसत नाहीं असें पाहून त्यानिमित्त त्यानें केलेला विलाप यांत वर्णिला आहे. ग्रंथसंख्या २० असून सर्व दीर्घ छंदांत आहेत. ६२ व्या सर्गाचे अंतीं रामानें सीतेचा विरह झाल्यामुळें आपण आतां कांहीं जगत नाहीं, यासाठीं लक्ष्मणाला अरण्यांतून परत जाण्यास सांगून त्याबरोबर भरतादिकांला सांगितलेले निरोप दिले आहेत. यापुढें ६३ व्या सर्गाला प्रारंभ झाला आहे. यांत तिला राक्षसानें नेली असावी अशी रामानें प्रथम शंका घेतली आहे व त्या दृष्टीनें रामाचें भाषण आहे. रामाचे तोंडीं शंका म्हणून जरी हें भाषण असलें तरी तें पुढील कथेचे अनुसंधानानें केलेलें आहे, असें उघड दिसतें. यापुढें ती गोदावरीवर कमलाकरितां गेली असेल अशी शंका घेऊन लागलीच ती तशी एकटी जाणार नाहीं असें म्हणून तिचें निरसन केलें आहे ( १३, १४ ) आणि यापुढील सर्गांत गोदावरीवर ती कमलाकरितां गेली असेल असें म्हणून लक्ष्मणाला रामानें तिकडे शोधण्याकरितां पाठविलें आहे, ( ६४।१,२ ) हें तर पूर्वकथेशीं विरुद्ध आहे.

## किष्किंधाकांड.

सर्ग १३ वा प्रक्षिप्त दिसतो. वालिसुग्रीव यांचें युद्ध झालें व त्यामध्यें रूपसादृश्यामुळें रामाला वालीचा वध करितां आला नाहीं. यासाठीं सुग्रीवाच्या कंठामध्यें खुणेकरितां मारुतीनें माला घातली व तो पुनः वालीकडे गेला. तिकडे तो जात असतां मार्गांत सप्तजनाश्रम लागला व त्यानिमित्त सुग्रीवानें रामाला त्याची माहिती सांगितली, हें वर्णन या सर्गांत आहे. हें वर्णन अस्थानीं आहे. बाराव्या सर्गाच्या अंतीं "रामाच्या सांगण्यावरून सुग्रीवाला स्वस्थपणा आला व शरीरानें झळकत झळकत तो पुनः रामासह किष्किंधेकडे गेला." (४२) असें लिहिलें आहे. अर्थात् किष्किंधेला प्राप्त झाल्यावर मार्गांत झालेला संवाद पुढें देणें असंबद्ध आहे. बरें; सुग्रीवाचे निवासस्थानापासून किष्किंधा दूर होती, असें नाहीं. प्रथम सुग्रीव वालीकडे गेला, तेव्हां मध्यें हा आश्रम लागला नाहीं व तो तेथें लवकर गेला, असेंच वर्णन आहे. ( ४।१२।१४ ) आणि या सर्गांत किष्किंधा दूर असल्याचें लिहिलें आहे. ( १३।२९) हा विसंगतपणा पाहिला म्हणजे हा सर्ग प्रक्षिप्त आहे, असें आपोआप वाटतें.

सर्ग ३० वा यांतील श्लोक १५ ते २०, २८ ते ४४ व ४६ ते ५७ हे प्रक्षिप्त आहेत. वालिवध झाल्यावर वर्षाकाल संपेपर्यंत राम स्वस्थ राहिला व शरत्काल आला असतां सुग्रीव वचनाप्रमाणें कांहीं करीत नाहीं, असें पाहून रामाचा संताप व शरत्कालाचें वर्णन हीं यांत आहेत. प्रक्षिप्त भाग दीर्घच्छंदांत असून विसंगत आहे. वर्षाकाल संपून आकाश निरभ्र झाल्यावर शरदृतूंतील एका रात्रीं चंद्रिकेकडे पाहून रामाला सीतेचें स्मरण झालें व तो विलाप करूं लागला, असा उपक्रम आहे. ( ३०।१२ ) याप्रमाणें विलाप करीत असतां फळें आणण्याकरितां गेलेला लक्ष्मण परत आला. (१५) रामाला खिन्न बसलेला पाहून लक्ष्मणानें उत्तेजक भाषण केलें, तें व रामाचें उत्तर हीं १४ ते २० यांत आहेत. यापुढील श्लोकांत " सीतेचें स्मरण होऊन रामाचें मुख निस्तेज झालें व तो लक्ष्मणाला म्हणाला, " ( २१ ) असें वर्णन आहे. पुढें सर्व वर्णन शरदृतूचें आहे. लक्ष्मणाच्या उत्तेजनाविषयीं यांत उल्लेख नाहीं व उलट उपसंहारांत त्याचे खेदाचे उद्गार आहेत. ( ६४–६८ ) तेव्हां मधील संवादात्मक श्लोक प्रक्षिप्त होत. शरदृतूचे पुढील वर्णनांत २८ ते ४४ व ४६ ते ५७ हे श्लोक त्यांत कालविपर्यास झाल्यामुळें प्रक्षिप्त आहेत. चंद्रकिरणांनीं पर्वत चोपडल्यासारखे दिसत असल्याचें वर्णन २७ व्या श्लोकांत असून या चंद्रकिरणांवर मार्मिक पण असभ्य दृष्टान्त ४५ व्या श्लोकांत आहे. मधील वर्णन सामान्यतः पर्वत, अरण्यें व त्यांवरील पशुपक्षी यांविषयीं आहे. उपक्रम शरदृतूंतील चांदण्या रात्रीचा असतां २९ व्या श्लोकांत सूर्याचे प्रथम किरण सरोवरांचे ठिकाणीं पडल्याचें लिहिलें आहे. ह्याच प्रकार ३७ व्यांत आहे. तेव्हां हा भाग असंबद्ध होय, हें उघड आहे. ५७ व्या श्लोकांतील वर्णन पूर्वीं २२ व्यांत आलें त्याच नमुन्याचें आहे. तेव्हां हा भाग तोंपर्यंत मानणें भाग आहे. ५९ व्या श्लोकापासून प्रथम उदकें निर्मल झाल्याचें सांगून सुग्रीवाच्या वर्तनाविषयीं चर्चेला प्रारंभ झाला आहे, तो पुढील कथेशीं सुसंगत आहे.

सर्ग २४ वा प्रक्षिप्त दिसतो. वालि मृत झाल्यावर सुग्रीव व तारा यांनीं केलेला शोक व शेवटीं त्यांचें रामानें केलेलें सांत्वन यांत वर्णिलें आहे. पूर्वीच्या

सर्गांत तारेनें केलेला विलाप आला आहे व यानंतर या सर्गांत सुग्रीव वाली-जवळ येऊन विलाप करूं लागला आहे. सुग्रीवाला या वेळीं पूर्वींचें वैर असलें तरी दुःख वाटणें साहजिक आहे. तथापि त्याचा अतिरेक होऊन स्वतां अग्नि-प्रवेश करण्यास तो सिद्ध झाल्याचें जें लिहिलें आहे तें किती विचित्र आहे? (२२) इतकेंच नव्हे तर सुग्रीवानें रामाला आपण गेलों तरी सीताशुद्ध्यादि कार्यें आपली वानरसेना करील असें आश्वासन दिलें आहे. वालीनें प्राणोत्क्रमणापूर्वीं सुग्रीवाला आपली दिव्य माला दिली व आपला पुत्र आणि पत्नी त्याच्या स्वाधीन करून त्यांचा सांभाळ करण्यास सांगितलें; आणि या वेळीं सुग्रीवानें ती माला व त्याचें भाषण ग्रहण केल्याचें लिहिलें आहे. (२२।१८) सुग्रीवाच्या या आचरणाशीं पुढील त्याचे विचार विसंगत दिसतात. तसेंच वालीनें सांत्वन केलें त्या वेळीं रामलक्ष्मण तेथें जवळ होते हें सरळ आहे व तारा तेथें आली तेव्हां त्यांना तिनें तेथें पाहिल्याचें लिहिलें आहे. (१९।२५) सुग्रीवाचा विलाप या सर्गांत वर्णिला आहे. त्याचे प्रारंभीं तो प्रथम रामासमीप गेला व विलाप करूं लागला, असें लिहिलें आहे (२४-१२). आणि तारा वाली-जवळ बसून यापूर्वींच विलाप करीत असतां तिला या वेळीं रामानें पाहिल्याचें लिहून रामालाहि तिनें तेव्हां प्रथम पाहिल्याचें (२८) लिहिलें आहे. हें सर्व वर्णन पूर्वकथेशीं अगदीं विसंगत आहे.

सर्ग ३१ वा याचे प्रारंभींच्या ८ श्लोकांनीं असाच घोंटाळा केला आहे. रामानें लक्ष्मणाला सुग्रीवाकडे जाण्यास सांगून त्याजबरोबर संदेश पाठविल्याचें वर्णन ३० व्याचे अंतीं असून ३१ व्याचे प्रारंभीं लक्ष्मण क्रुद्ध होऊन सुग्रीवाचे वधार्थ सज्ज झाल्याचें लिहून त्याचें सांत्वन रामानें केल्याचें वर्णन आहे. लक्ष्मण क्रुद्ध झाला हें स्वभावानुरूप होय, यांत शंका नाहीं. पण रामाचा संदेशहि सुग्रीव वचनाप्रमाणें न वागल्यास आपल्या हातून वध पावेल, अशा प्रकारचा असल्यावर त्याच्या क्रोधाचें वेगळें वर्णन व भाषण कशाला? आणि लक्ष्मणाबरोबर तीव्र संदेश पाठविणारा राम लक्ष्मणाला कठोर न बोलतां सौम्य भाषेनें बोलण्यास सांगतो, हें तर त्याहून विलक्षण होय. ३०।८३ मध्यें

रामाचा संदेश पुरा झाला व यापुढें रामाज्ञेप्रमाणें लक्ष्मण किष्किंधेला गेला. ( ३१।९ ) असें वर्णन असणें युक्त होय.

सर्ग ३३ वा यांतील श्लोक ३१ ते अखेरपर्यंत सर्व प्रक्षिप्त आहेत. लक्ष्मण किष्किंधेमध्यें गेल्यावर त्यानें आपण आल्याचें अंगदाला पुढें पाठवून सुग्रीवाला कळविलें. तेव्हां तो घाबरून मंत्र्यांशीं बोलत असतां (३१) मारुतीनें त्याला प्रथम लक्ष्मणाला शरण जाऊन त्याचा कोप शांत करण्यास सांगितलें. ( ३२ ) इतकी कथा पूर्वीं आली आहे. ३३ व्यांत प्रथम निरनिराळ्या वानरांच्या गृहांचें वर्णन देऊन पुढें लक्ष्मणाला समजावण्याकरितां सुग्रीवानें तारेला पुढें पाठविलें व त्यांचा तेथें जो संवाद झाला, तो दिला आहे. सर्व वर्णन पूर्व कथेशीं विसंगत आहे. प्रारंभीं वानरांच्या गृहांचें वर्णन देऊन लक्ष्मणाच्या धनुष्याचे टणत्कारानें सुग्रीव भिऊन गेला, असें सांगितलें. ( ३० ) येथपर्यंत कथा सुसंगत दिसते. तारेचा लक्ष्मणाशीं संवाद विलक्षण आहे. लक्ष्मण व सुग्रीव यांची गांठ पडून रामाचा निरोप श्रवण केल्यावर तारेनें भाषण करून जी क्षमा मागितली, ती पुढें ३५ व्यांत आहे, व ती तेथें युक्त आहे. पुढील सर्गांतील तारेच्या या भाषणांत पूर्वींच्या भाषणाचा मुळींच उल्लेख नाहीं. सीताशोधनार्थ वानर पाठविल्याचें तिनें दोनहि भाषणांत सांगितलें आहे. दुसऱ्यानें हें सांगते वेळीं पूर्वींच्या भाषणाचा उल्लेख येणें आवश्यक आहे; पण हें दुसरें भाषण पाहिलें तर त्यांचा संवाद प्रथमच होत आहे, असें दिसतें. सुग्रीवानें तारेला पुढें पाठवितांना जें सांगितलें, त्यांत लक्ष्मणाला क्रोध आला, त्याचें कारण त्याला जणूंकाय माहीत नाहीं, असें दिसतें. तो म्हणतो:--

**यद्यस्य कृतमस्माभिर्बुध्यसे किंचिदप्रियम् ।**
**तद्बुध्द्वा संप्रधार्याशु क्षिप्रमेवाभिधीयताम् ॥ ३४ ॥**

" आमच्या हातून जर याचा कांहीं अपराध झाला असेल तर तो कोणता, हें तुझ्या लक्षांत येत असल्यास लवकर निश्चय करून मला आधीं सांग."

सुग्रीवाचें हें भाषण अगदीं विसंगत आहे. लक्ष्मणाला शरण जाण्याचा उपदेश ३२ व्यांत मारुतीनें केला असून त्याच्या क्रोधाचें कारणहि तेथें सांगितलें आहे. तेव्हां ही अनभिज्ञता सुग्रीवाची नसून प्रक्षेपकाची होय.

सर्ग ४० वा यापासून पुढें चार सर्गांत सुग्रीवानें सीताशुद्धयर्थ जे वानर पाठविले, त्यांना त्यानें जें भूगोलाचें वर्णन सांगितलें, तें दिलें आहे. किष्किंधेहून त्यानें चार दिशांना वानर पाठविले व चारहि दिशांकडील देश, नद्या, नगरें, पर्वत यांची माहिती त्यानें जाते वेळीं सांगितली. किष्किंधा कोठें आहे, याविषयींचा प्रश्न येथें उत्पन्न होतो; पण त्याचा विचार वेगळ्या प्रकरणांत करायाचा आहे, तेव्हां तो प्रश्न तूर्त सोडून देऊं; तथापि तो अनिर्णित असें मानूनच या भूगोलवर्णनाचा विचार करूं. सुग्रीवानें चारी दिशांकडील माहिती सांगणें अस्थानीं आहे, असें नाहीं; परंतु पूर्वापरसंबंध पाहूं गेलें म्हणजे हें वर्णन अस्थानीं व असंभाव्य वाटूं लागतें. रावणानें सीता नेल्याचें व तो दक्षिणेकडे निघून गेल्याचें रामाला जटायू, संपाति यांजकडून कळलें होतें व सीतेनें आपल्या उत्तरीयांत बांधून कांहीं अलंकार ऋष्यमूक पर्वतावर टाकिलेले सुग्रीवादि वानरांना मिळाले आणि ते रामानें ओळखिल्यावर त्याच पर्वताचे दक्षिणेकडे रावण निघून गेला असल्याचें त्यांनीं प्रत्यक्ष पाहिलें असल्यामुळें त्यांना सीतेला शोधण्याकरितां कोणत्या दिशेला वानर पाठवावे, याविषयीं संशय पडण्याचें कारण दिसत नाहीं. रामालाहि रावणाचें वृत्त मुळींच माहीत नव्हतें, असें नाहीं. यज्ञरक्षणार्थ विश्वामित्र दशरथाकडे राजपुत्रांना मागण्याकरितां आले त्या वेळीं रावणाचें नांव ऐकतांच दशरथ घाबरून गेल्याचें लिहिलें आहे (१।२०।२२, २३) व यावरून रामाला रावणाचा वृत्तांत कळलेला असणें संभवनीय आहे. रावणाचें निवासस्थान मात्र दूर व तो क्रूर यामुळें त्याची माहिती मात्र यांना नसली तर त्यांत आश्चर्य नाहीं. सुग्रीवानें या वस्तुस्थितीस अनुसरून रामाची गांठ प्रथम पडली तेव्हां त्या पापी व दुष्कुलोत्पन्न राक्षसाचें वसतिस्थान, सामर्थ्य व पराक्रम किंवा कुल मला मुळींच माहीत नाहीं, (४।७।२) असें सांगितलें; तथापि रामानें सुग्रीवाकरितां त्याचा बंधु वालि याचा वध करण्याची प्रतिज्ञा यापूर्वीच केली असल्यामुळें प्रत्युपकारार्थ म्हणून त्यानें रावणाचें निवासस्थान आपल्याला माहीत नसलें तरी "सीता तुला प्राप्त होईल असा यत्न मी करीन, हें मी प्रतिज्ञेनें सांगतों; तूं वाईट वाटूं देऊं नकोस." (४।७।३) असें आश्वासन दिलें. रावणाचें निवासस्थान

त्याला माहीत नाहीं तर त्यानें प्रयत्न कसा करावयाचा, अशी येथें शंका येण्याचा संभव आहे. परंतु माहिती नसली तरी प्रयत्न करण्यास अडचण कोणती? व्यवहारांतहि आपणांस पुष्कळ पुरुष अथवा स्थलें ऐकून माहीत असतात व त्यांच्या नांवांवरून कारण पडलें तर अधिक माहिती मिळवितां येते. सुग्रीवाची प्रतिज्ञा याच दृष्टीनें केलेली आहे. विसंगतता आहे ती अन्यत्र आहे. प्रथम अशी शंका येते कीं, त्यानें सीताशुद्ध्यर्थ चारी दिशांना पाठविण्यासाठीं वानर दूरदूरचे बोलावून आणिले; अर्थात् इतके दूर गेलेल्या वानरांना तिकडील दिशांची माहिती कोणीं सांगितली? त्यांना पूर्वीची माहिती होती तर त्यांनाच सीता-शुद्ध्यर्थ कां पाठविलें नाहीं? वानर सुग्रीवापाशीं थोडे होते आणि शुद्ध्यर्थ अधिक वानरांची आवश्यकता होती म्हणून त्यांना बोलाविलें म्हणावें, तर त्यांना बोलावूं गेलेल्या वानरांबरोबरच कार्याची आज्ञा कां कळविली नाहीं? आज्ञा होतांच किष्किंधेकडे येणारे वानर सीताशुद्ध्यर्थ आज्ञा झालेली कळती तर परभारें गेले नसते काय? मग हा द्राविडी प्राणायाम कां केला? आणि मधील काल वृथा कां घालविला? बरें, हिमालयापासून—नव्हे त्याच्याहि पलीकडील प्रदेशा-पासून—दक्षिणेकडे समुद्राहिपलीकडील द्वीपांची माहिती सांगणाऱ्या सुग्रीवाला लंकेची माहिती कां नसावी? सर्वांत विलक्षण हें कीं, रावणाचें निवासस्थान माहीत नाहीं म्हणणारा सुग्रीव दक्षिणेकडे वानरांना पाठवितांना समुद्रापलीकडे शतयोजनांवर असलेलें द्वीप रावणाचें निवासस्थान आहे म्हणून सांगत आहे. पूर्वीच्या त्याच्या भाषणाशीं हें तर उघड विरुद्ध आहे. आणि पूर्वी माहिती नसून मागाहून मिळाली म्हटलें तरी, त्याच प्रदेशाकडे वानर पाठविण्याचें न करितां सर्वत्र पाठविले, म्हणून त्याचें कृत्य त्यानें त्याच वेळीं केलेल्या भाषणाचेंहि विरुद्ध आहे. निवासस्थान स्वतां सांगतो व प्रत्येक दिशेला जाणाऱ्या वानरांना रावणाचें निवासस्थान कोठें आहे त्याचा शोध करा अशी आज्ञा करितो याचा मेळ कसा घालावयाचा? चारी दिशांकडील प्रदेशांच्या वर्णनामध्यें तरी संगति कोठें आहे? पूर्वेकडील प्रदेशांत भागीरथी, शरयू या नद्या सांगितल्या आहेत; त्याबरोबर सिंधु, शोण, सरस्वती या नद्या सांगितल्या आहेत (२०।२१). म्हणजे किष्किंधेसंबंधीं वाद बाजूला राहून तिला निर्विवादपणें समुद्रांतील एकादें द्वीप

मानावें लागेल, याची वाट काय ? शरयूतीरीं तिला शोधावयाची म्हणजे प्रत्यक्ष अयोध्या आली व विदेह शोधावयाचा म्हणजे तिचें माहेर आलें. तेथें वानरांनीं तिला शोधावयाची कल्पना ऐकून रामलक्ष्मणांना हसूं कोसळलें नाहीं कसें ? ( ४०।२२ ) दक्षिणेकडे जाणाऱ्या वानरांस दंडकारण्य शोधावयास सांगितलें आहे. ( ४१।११ ) तर दंडकारण्यांत रामलक्ष्मणांनीं प्रवेश करून पुढें—अर्थात् दक्षिणेकडे—गेल्याचें पूर्वीं सांगितलें आहे ( ३।१।१; ३।२।१ ) त्याची वाट काय ? पश्चिमेकडील देशांत नरकासुराची प्राग्ज्योतिष नगरी सांगितली आहे ( ४२।३१ ) आणि गौड प्रतींत तर द्वारावती व प्रभास हीं सांगितलीं असल्याचें रा. रा. अभ्यंकर यांनीं लिहिलें आहे. याची संगति कशी लावावयाची ? कृष्णचरित्राविषयींची ही योजना समजावयाची ना ? उत्तरेकडील वर्णनांत कुरु देशाबरोबर मद्र ( ४३।११ ) देश सांगितला आहे, तो कोणता ? आणि या असल्या माहितीबद्दल रामानें कौतुक करून त्याला ही माहिती कशी मिळाली, असें विचारिलें आहे ( ४६।१ ). सुग्रीवानें रावणाचें निवासस्थान माहीत नसल्याचें सांगितलें व सीताशुद्ध्यर्थ वानर पाठविले, हें खरें आहे; परंतु ते चारी दिशांना न पाठवितां दक्षिणेकडेच पाठविले, हें अधिक संभवनीय आहे. चारी दिशांला वानर पाठविल्याचें सांगतांना तीन दिशांकडील वानरांत केवळ त्यांच्या अधिपतींच्या नांवांचा निर्देश केलेला आहे; आणि दक्षिणेकडे जाणाऱ्या वानरांत बारातेरा वानरांच्या नांवाचा संग्रह केला आहे. सीताशुद्ध्यर्थ ते कोणकोणत्या देशीं गेले हें पुढें विस्तारानें न सांगतां केवळ हात हालवीत परत आले असें सांगितलें आहे व दक्षिणेकडे गेलेल्या वानरांविषयीं कथा सविस्तर असली तरी तींत तिकडील देशादिकांचा निर्देश नाहीं. तेव्हां आमच्या मतें भूगोलवर्णनाचा हा सर्व भाग प्रक्षिप्त आहे. मात्र प्रक्षेपकानें हा भाग घुसडिते वेळीं तदनुरोधानें पुढें व पाठीं करावयाचे निर्देश व्यवस्थितपणें केले असल्यामुळें पूर्वापर विसंगतता दाखवून त्याचा प्रक्षिप्तपणा येथें दाखवितां आला नाहीं. या भागाची अंतर्गत विसंगतता या कामीं कमी आहे, असें नाहीं. तथापि यामुळें या प्रक्षिप्त भागाच्या अनुरोधानें अन्यत्र केलेले निर्देश ओळखून ते प्रक्षिप्त मानावयाचें कार्य वाचकांना स्वतां करावें लागणार आहे, हा यांत विशेष आहे.

यांतील ५८ व्या सर्गांत प्रायोपवेशनाचा निश्चय करून बसलेल्या वानरांना संपातीनें सीता कोठें आहे तें सांगितलें व हा वृत्तांत कळल्यामुळें त्यांना अत्यंत आनंद झाला; नंतर त्यांनीं संपातीला जटायूचें तर्पण करण्याकरितां समुद्रावर नेलें व परत जाग्यावर आणिलें, इतकी कथा आहे. यापुढें ५९ व्या सर्गांत संपातीचें तें भाषण श्रवण करून वानरांनीं जांबवनाला पुढें केला व त्याजकडून त्याला 'सीतेला कोणीं व कोठें पाहिलें' असा प्रश्न विचारिला. याच सर्गांत त्यानें ही हकीकत सांगून पुढील चार सर्गांत निशाकरमुनींनीं पूर्वी सांगितलेलें भविष्य वानरांना सांगितलें आहे व नंतर तो निघून गेला आहे. या सर्व सर्गांत बरेच घोटाळे आहेत. सीता कोणीं व कोठें पाहिली, तसेंच सध्यां ती कोठें आहे याविषयींची सर्व हकीकत संपातीनें ५८ व्या सर्गांतच वानरांना सांगितली होती. मग जांबवानानें पुनरपि त्याला—

**क्व सीता केन वा दृष्टा को वा हरति मैथिलीम्** ॥५९।३॥

"सीता कोठें आहे? तिला कोणीं पाहिलें? तिला कोण नेत होता?"

असा प्रश्न विचारण्यास उद्युक्त होणें वेडगळपणाचें दिसतें. तसेंच या प्रश्नास उत्तर म्हणून संपातीनें पुनः जी हकीकत सांगितली आहे ती पूर्वीच्या हकीकतीशीं मुळींच जमत नाहीं. ५८ व्या सर्गांत संपाति म्हणतोः—

**तरुणी रूपसंपन्ना सर्वाभरणभूषिता ।**
**ह्रियमाणा मया दृष्टा रावणेन दुरात्मना** ॥१५॥
**तां तु सीतामहं मन्ये रामस्य परिकीर्तनात्** ॥१८॥

"एक तरुण, सुंदर व अंगावर सर्व अलंकार घातलेली स्त्री दुष्ट रावण नेत असतां मीं पाहिलें. तिच्या तोंडांतून 'राम राम' अशीं अक्षरें मीं ऐकिलीं. यावरून ती सीता असावी असें मी म्हणतों."

याच्या अगदीं विरुद्ध हकीकत त्यानें पुढील सर्गांत सांगितली आहे. आपला पुत्र सुपार्श्व भक्ष्यशोधनार्थ महेन्द्रपर्वतावर फिरत असतां रावण सीतेला घेऊन जात आहे, असें त्यानें पाहिलें व आपल्याला येऊन सांगितलें, असा संपातीच्या भाषणाचा आशय आहे. ५९ व्या सर्गाचा प्रारंभहि पूर्वसर्गाच्या समाप्तीशीं जमत नाहीं. पूर्वसर्गाच्या शेवटीं खालील श्लोक आहेः—

**तं पुनः प्रापयित्वा च तं देशं पतगेश्वरम् ।**
**बभूवुर्वानरा हृष्टाः प्रवृत्तिमुपलभ्य ते ॥३५॥**

" त्या पक्षिराजाला त्या वानरांनीं त्याच्या मूळच्या जाग्यावर आणून ठेविलें व सीता कोठें आहे हें समजल्यामुळें त्यांना फार आनंद झाला. "

बरें, यापुढील ५९ व्या सर्गाचा प्रारंभ पहाः—

**ततस्तदमृतास्वादं गृध्रराजेन भाषितम् ।**
**निशम्य वदतो हृष्टास्ते वचः प्लवगर्षभाः ॥१॥**

" नंतर अमृताप्रमाणें गोड असलेलें त्या गृध्रराज संपातीचें भाषण ऐकून त्या श्रेष्ठ वानरांना आनंद झाला आणि ते म्हणाले. "

पूर्वसर्गांत संपाति व वानर यांचा संवाद झाला होता ही गोष्ट खरी असली तरी मध्यंतरीं थोडासा कथाभाग येऊन गेला असल्यामुळें त्यापुढें हा श्लोक शोभत नाहीं. यापेक्षां ५८ व्या सर्गांतील वरील श्लोकापुढें ६४ व्याच्या प्रारंभींचा

**आख्याता गृध्रराजेन समुत्प्लुत्य प्लवंगमाः ।**
**संगताः प्रतिसंयुक्ता विनेदुः सिंहविक्रमाः ॥१॥**

" त्या गृध्रराज संपातीनें सांगितलेला वृत्तांत ऐकून सिंहाप्रमाणें पराक्रमी असलेले वानर उड्या मारून एकत्र जमले व गर्जना करूं लागले. "

हा श्लोक जर ठेविला तर पुढील कथेशीं संगति चांगली लागेल.

## सुन्दरकाण्ड.

या काण्डाच्या प्रारंभीं रावणाच्या वाड्यांचें वगैरे जें वर्णन दिलें आहे, त्यांत फार घोंटाळा आहे. पुनःपुनः तीं वर्णनें देऊन हा भाग कंटाळवाणा करून टाकिला आहे. ४ थ्या सर्गाच्या शेवटीं:—

**राक्षसाधिपतेर्गुप्तमाविवेश गृहं कपिः ॥२९॥**

" त्या हनुमानानें त्या राक्षसाधिपति रावणाच्या वाड्यांत गुप्तपणें प्रवेश केला, " असें सांगितलें आहे. यापुढें ५ व्या सर्गाच्या प्रारंभीं चंद्रोदयाचें वर्णन असून त्यापुढें राक्षसांचीं व स्त्रियांचीं वर्णनें आलीं आहेत. हा भाग पूर्वसर्गांत अनुष्टुभ छंदांत आलाच आहे. तसेंच या सर्गांत मारुतीनें सर्व शोधिलें, तथापि कोठेंहि सीता सांपडली नाहीं, असें सांगतांना पतिवियोगजन्य स्थितीचें जें वर्णन

दिलें आहे, तें तर अगदीं अस्थानीं दिसतें. ज्या मारुतीनें पूर्वीं तिला पाहिलेंहि नव्हतें, त्याचें म्हणून हें वर्णन मानिलें, तर तें पूर्णपणें असंभवनीय आहे. कवीचें हें वर्णन म्हणावें, तर त्याची येथें अपेक्षा दिसत नाहीं. हा सर्ग काढिला आणि ४ थ्याच्या शेवटचा जो श्लोक वर दिला आहे, त्याचा संबंध पुढें कोठें आहे हें शोधूं लागलें, तर तो ६ व्यांतील प्रारंभींच्याः--

**रक्षितं राक्षसैर्भीमैः सिंहैरिव महद्वनम् ।**
**समीक्षमाणो भवनं चकाशे कपिकुंजरः ॥३॥**

" सिंहांनीं एकाद्या अरण्याचें रक्षण करावें, त्याप्रमाणें मोठमोठे राक्षस त्या वाड्याचें रक्षण करीत होते. त्या वाड्याकडे पहात असतां तो हनुमान शोभत होता. "

या श्लोकाशीं जमतो, म्हणून आशापूर्ण दृष्टीनें पुढें पहावें तों या सर्गांतील सर्व श्लोक दीर्घच्छंदांत आहेत. ६ व्या सर्गाच्या शेवटीं खालील श्लोक आहेः--

**प्रासादसंघातयुतं स्त्रीरत्नशतसंकुलम् ।**
**सुव्यूढकक्ष्यं हनुमान् प्रविवेश महागृहम् ॥४५॥**

" त्या मोठ्या वाड्यांत ( लहान ) घरें पुष्कळ होतीं; पुष्कळ सुंदर स्त्रिया होत्या व त्यांत पुष्कळ चौक होते. त्या वाड्यांत हनुमानानें प्रवेश केला. " यापुढें पुनः गृहांचें, राक्षसांचें व स्त्रियांचें वर्णन दिलें आहे, तें शोभेल काय? पूर्वसर्गांत " प्रविवेश " असें पद स्पष्ट आहे, तेव्हां पुढील सर्गांत फार तर एकदोन श्लोक असलें वर्णन शोभलें असतें. या गृहांत मारुतीनें प्रवेश केल्यावर त्यानें तेथें काय पाहिलें, हें समजण्याची वाचकांनीं किती वेळ वाट पहावयाची? पुनः ८ व्या सर्गांत आठच श्लोक असून ते दीर्घच्छंदांत आहेत. येथेंहि वाचकांची वरील जिज्ञासा तृप्त होत नाहीं. शेवटीं ९ व्या सर्गाला जेव्हां प्रारंभ करावा, तेव्हांः—

**तस्यालयवरिष्ठस्य मध्ये विमलमायतम् ।**
**ददर्श भवनश्रेष्ठं हनुमान्मारुतात्मजः ॥१॥**

" त्या मोठ्या वाड्याच्या मध्यभागीं एक स्वच्छ, विस्तीर्ण व उत्कृष्ट असें घर होतें, तें त्या वायुपुत्र हनुमानानें पाहिलें. "

हा श्लोक दृष्टीस पडून आशेची झुळूक वाटूं लागते. या सर्गाची भाषा अगदीं नीरस असून कांहीं स्थलीं परस्परविरोधहि उत्पन्न झाला आहे. ८ व्या सर्गांत पुष्पक विमानाचें वर्णन हाच विषय असून त्यांत रावणाला तें तपःसामर्थ्यानें प्राप्त झालें होतें, ( तपःसमाधानपराक्रमार्जितम् ) असें सांगितलें आहे आणि त्यापुढील सर्गांतः—

**कुबेरमोजसा जित्वा लेभे तद्राक्षसेश्वरः ॥१०॥**

" त्या राक्षसाधिपति रावणानें पराक्रमानें कुबेराचा पराभव करून तें ( विमान ) मिळविलें. "

असें सांगितलें आहे. या दोन वाक्यांत अवघें पंधरा श्लोकांचें अंतर आहे. एकाच कवीच्या—त्यांतहि वाल्मीकींच्या—कृतींत हा विरोध शोभत नाहीं. एकंदरींत हे सर्ग खुद्द वाल्मीकींचे नसून मागाहून कोणींतरी घुसडिले आहेत.

सर्ग १२ वा प्रक्षिप्त वाटतो. रावणाचे अंतःपुरांत सीतेला सर्वत्र शोधिल्यावर ती न दिसल्यामुळें पानभूमि सोडून देऊन मारुती अन्यत्र तिला शोधण्याकरितां बाहेर पडल्याचें सर्ग ११ व्याच्या अंतीं लिहिलें आहे. १२ व्या सर्गांत सीतेला सर्वत्र शोधिली तरी ती आढळली नाहीं; यामुळें मारुतीची निराशा झाली; तथापि पुनः उत्साहानें तो शोधूं लागला व ती न आढळल्यामुळें निराश झाला, असें वर्णन आहे. ११।१७ व १२।१८ हे दोन श्लोक अगदीं एका अर्थाचे असून त्यांत रावणाचे अंतःपुरांत सीतेला मारुतीनें सर्वत्र शोधिल्याचें सांगितलें आहे; आणि यावरून सर्ग १२ व्यांतील हा श्लोक व संसर्गतः सर्व सर्ग गतार्थ अतएव प्रक्षिप्त ठरत आहे.

याशिवाय या काण्डांत २८ वा व २९ वा असे दोन सर्ग प्रक्षिप्त आहेत. २७ व्या सर्गांत त्रिजटा राक्षसीनें आपण पाहिलेला स्वप्नांतील वृत्तांत सीतेला सांगून त्यावरून रामाचा विजय सूचित होतो, असें तिला आश्वासन दिलें व हें ऐकून तिला अत्यंत हर्ष झाला, अशी कथा आहे.

**ततः सा ह्रीमती बाला भर्तुर्विजयहर्षिता ।**
**अवोचद्यदि तत्सत्यं भवेयं शरणं हि वः ॥४८॥**

" नंतर लज्जेनें युक्त असलेल्या त्या सीतेला आपल्या पतीचा जय होणार

असें मनांत येऊन आनंद झाला व जर हें खरें असेल तर मी तुमचें रक्षण करीन, असें ती ( त्या राक्षसींना ) म्हणाली. "

यापुढील सर्गाचा जो प्रारंभ आहे, तो याशीं मुळींच जमत नाहीं.

**सा राक्षसेन्द्रस्य वचो निशम्य। तद्रावणस्याप्रियमप्रियार्ता।**
**सीता वितत्रास यथा वनान्ते। सिंहाभिपन्ना गजराजकन्या ॥१॥**

" राक्षसाधिपति रावणाचें तें दुःसह भाषण ऐकून त्या सीतेला फार दुःख वाटलें. वनामध्यें एकाद्या लहान हत्तिणीला सिंहानें त्रास द्यावा, त्याप्रमाणें तिची स्थिति झाली. "

या श्लोकांत रावणाचें भाषण ऐकून सीतेची अवस्था काय झाली, त्याचें वर्णन आहे. वास्तविक रावणाचें व तिचें भाषण होऊन तो निघून गेल्याबद्दल २२ व्या सर्गांतच लिहिलें आहे. मधील पांच सर्गांत राक्षसींनीं सीतेला भिवविल्याचें वर्णन असून शेवटीं त्रिजटेनें स्वप्नवृत्तान्त सांगून तिला धीर दिल्याचें लिहिलें आहे. रावणाच्या भाषणाचा संबंध इतका दूर येणें शक्य नाहीं. या दोन सर्गांत सीता उद्वेगानें आत्महत्त्या करण्यास तयार झाली होती; परंतु तिला तितक्यांत शुभ शकून होऊं लागल्यामुळें ती थांबली, असें वर्णन आहे. या वर्णनाचा ३० व्या सर्गांतील प्रारंभींच्या वर्णनाशीं मुळींच संबंध नाहीं. २९ वा सर्ग सबंध दीर्घच्छंदांत असून त्याचा शेवटचा श्लोक खालीं दिल्याप्रमाणें आहे:—

**सा वीतशोका व्यपनीततंद्रा। शान्तज्वरा हर्षविबुद्धसत्वा।**
**अशोभतार्या वदनेन शुक्ले। शीतांशुना रात्रिरिवोदितेन॥**

" तिचा शोक नाहींसा झाला, झोंप गेली, संताप कमी झाला व तिला आनंद झाला. तेव्हां शुक्लपक्षांत चंद्रोदय झाला असतां जशी रात्र शोभते, त्याप्रमाणें ती श्रेष्ठ स्त्री आपल्या मुखाच्या योगानें शोभूं लागली. "

या श्लोकाचा संबंध ३० व्या सर्गांतील—

**हनुमानपि विक्रान्तः सर्वं शुश्राव तत्त्वतः।**
**सीतायास्त्रिजटायाश्च राक्षसानां च गर्जितम् ॥१॥**

" त्या महापराक्रमी हनुमानानें सीता, त्रिजटा व राक्षसी यांचीं भाषणें इत्थंभूत ऐकिलीं. "

या श्लोकाशीं कांहीं तरी जमेल काय ? यापेक्षां हे दोन सर्ग काढिले, तर २७ व्या सर्गाच्या शेवटचा जो श्लोक वर दिला आहे, त्याचा या श्लोकाशीं संबंध चांगला जमेल. मारुती परत गेल्यानंतर इतर वानरांना त्यानें जी हकीगत सांगितली आहे, त्यांत त्रिजटेनें सीतेला स्वप्नवृत्तान्त सांगितल्याची कथा सांगून पुढें तिच्याशीं भाषण करावयास सांपडावें, म्हणून आपण इक्ष्वाकुवंशस्तवन करूं लागलों, असें वर्णन आहे. ती आत्महत्त्या करूं लागली होती, ही कथा त्यांत मुळींच आलेली नाहीं. मारुतीनें परत गेल्यावर जो वृत्तान्त सांगितला आहे, तो कांहींहि न वगळतां सांगितला आहे. मग एवढी महत्वाची गोष्ट तो काय म्हणून वगळील ? तेव्हां हे दोन सर्ग प्रक्षिप्त आहेत, हें उघड होतें.

सर्ग ३२ वा प्रक्षिप्त आहे. अशोक वनिकेमध्यें वृक्षावर बसून मारुतीनें सीतेला ऐकूं यावें म्हणून संक्षेपतः रामचरित्राचें कथन केलें व तें ऐकून सीतेनें वर मान करून वृक्षाकडे पाहिलें अशी कथा ३१ व्यांत आहे. ३२ व्यांत सीता त्याला पाहून विस्मित झाली; मूर्च्छित पडली व सावध होऊन मंगल चिंतू लागली, असें वर्णन आहे. ३३ व्यांत तर मारुतीला पाहून तिला हर्ष झाल्याचें असून, तें पूर्ववर्णनाशीं संगत नाहीं. ३१।१५ यांत सीतेला विस्मय वाटल्याचें वर्णन असून ३३।१४ यांत तिला हर्ष झाल्याचें सांगितलें आहे. हीं परस्पराशीं सुसंगत दिसतात. मधील मूर्च्छा प्रक्षेपकाची आहे.

सर्ग ४३ वा हाहि प्रक्षिप्त आहे. अशोकवनिकाभंग केल्यास्तव राक्षसांनीं मारुतीवर हल्ला केला. तेव्हां त्यांना मार देऊन तो तोरणावर जाऊन बसला, इतकी कथा ४२ व्यांत आहे. ४३ व्यांत मारुतीनें प्रासादभंग केल्याचें वर्णन आहे. पुढील सर्गांत त्याजबरोबर रावणानें पाठविलेला जंबुमाळी राक्षस युद्धाकरितां आल्याचें सांगितलें आहे. मारुतीनें केलेला विध्वंस दूतांनीं रावणाला सांगितल्यावर त्याजकडून मारुतीचे पारिपत्याकरितां कोणी राक्षस येणें सरळ आहे; शिवाय ४२ व्याचे अंतीं मारुती तोरणावर बसल्याचें लिहिलें असून जंबुमाळी त्याजवर आला त्या वेळीं त्यानें त्याला तोरणावर पाहिल्याचें वर्णन ४४ व्यांत आहे; तें ४२ व्यापुढें सुसंगत दिसतें. रावणाचे सेवकांनीं मारुतीनें

केलेल्या विध्वंसाचा वृत्तांत यजमानाला सांगतांना अशोकवनिकाभंगानंतर झालेला प्रासादभंग सांगितलेला नाहीं. ४२।३३-३६ व ४३।८-११ हे श्लोक मारुतीच्या तोंडीं दोहोंकडे अगदीं एक आहेत. तेव्हां ४२।४ च्या पुढें ४४ व्या सर्गाचा प्रारंभ युक्त दिसतो.

सर्ग ५४ वा यांतील ३१ ते ४६ व ४८ हे श्लोक प्रक्षिप्त आहेत. या सर्गांत लंकादहनाची कथा असून प्रक्षिप्त भाग पुनरुक्तिदोषानें भरलेला आहे. प्रारंभींच्या तीस श्लोकांत लंकादहन सांगितलें असून तेंच दीर्घछंदांत पुढें आलें आहे. ५३।४१ व ५४।४८ या श्लोकांतील उत्तरार्धें अगदीं एक आहेत. ३० व्यांत लंका दग्ध झाल्याचें सांगितलें असून त्यापुढें ४७ वा श्लोक शोभतो.

सर्ग ५६ वा यांत प्रारंभींचे श्लोक २२ प्रक्षिप्त आहेत. लंकादहनानंतर मारुतीनें सीतेचें दर्शन घेऊन तिला आश्वासन दिलें, त्या वेळीं विशाल सागर मध्यें असल्यामुळें राम लंकेंत कसा येईल अशी शंका सीतेनें घेतली, व तिचें निराकरण मारुतीनें कसें केलें तो कथाभाग यांत आला आहे. प्रथम मारुतीची भेट झाली त्या वेळींच वास्तविक हा विधि होऊन गेला असून पूर्वीं ५।३९ मध्यें त्याचें वर्णन आलें आहे व तें आणि हें वर्णन अगदीं शब्दशः एक आहे. तेव्हां निघते वेळीं सीतेनें तीच शंका पुनः घेणें असंभवनीय आहे. सर्गाचा खरा आरंभ २३ व्या श्लोकापासून होतो. येथें मारुतीनें लंकेंत आल्यावर कोणतीं कार्यें केलीं तीं प्रारंभीं संक्षेपतः पण क्रमानें सांगितलीं आहेत. या कार्यक्रमांत सीतेला प्रथम दिलेल्या आश्वासनाचा उल्लेख आहे, दुसऱ्याचा मुळींच नाहीं. ( २३–२५ ) सीतेला अभिवंदन करून तो निघाला, असें लिहिलें आहे. शिवाय प्रथम सीतेला आश्वासन दिलेल्या भाषणांत ३९।३५-४१ हे श्लोक महत्त्वाचे आहेत, त्यांची पुढील पुनरुक्तींत छायाहि नाहीं. तेव्हां हा भाग प्रक्षिप्त म्हणून गाळणें भाग आहे. मारुती रामाकडे गेल्यावर त्यानें लंकेंतील सर्व वृत्तांत त्याला निवेदन केला; ती कथा ६८ व्या सर्गांत आहे व तुलना केल्यास सर्ग ३९ वा व ६८ वा यांतील हा भाग सर्वथा एक आहे. ३९ व्यांतील ३५ ते ४१ हे महत्त्वाचे श्लोक ६८ व्यांत आहेत. हा भाग ५६ व्यांत नाहीं. हा भेद लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

सर्ग ६१ वा यांतील १२ ते अखेर ( २४ ) इतके श्लोक प्रक्षिप्त आहेत. वानरांनीं मधुवनांत आल्यावर अंगदाची आज्ञा घेऊन मधुपान केल्याचें वर्णन यांत आहे. मधुपानाचें विस्तृत वर्णन ६२ व्यांत आलें असून त्यांत प्रथम मारुतीनें मधुपान करण्यास इतर वानरांस प्रोत्साहन दिलें व अंगदानें त्याला संमति दिली, असें लिहिलें आहे. अर्थात् पूर्वीं त्यांनीं मधुपान केल्याचें वर्णन विसंगत असल्यामुळें प्रक्षिप्त होय. शिवाय यांत बराच भाग दीर्घ-छंदांत आहे.

## युद्धकाण्ड.

सर्ग ११ ते १५ हे पांच प्रक्षिप्त आहेत. बिभीषणानें रावणाला सीतेची मुक्तता करण्याचा उपदेश केला, इतकी कथा १० व्यांत आली आहे. पुढें ११ व्यांत रावणानें विचार करण्याकरितां सभा भरविली व या सभेंत काय भाषणें झालीं, तें पुढील सर्गांत आहे. ही सभा घाईघाईनें भरविली ( ११।१८।१९ ) असून, रावण कामार्त होऊन ती त्यानें बोलाविली आहे. यापूर्वीं अशा प्रकारें सभा भरविल्याचें स्पष्ट लिहिलें नसलें तरी या सभेंत ज्यांनीं भाषणें केलीं, त्यांनीं आपापलीं मतें पूर्वीं रावणाला सांगितलीं आहेत. लंकेंतील मारुतीचे पराक्रम पाहून रावणानें सर्व राक्षसांना पुढें काय करावें याचा विचार ठरविण्याकरितां आपापलीं मतें सांगण्याची विनंति केल्याचें ६ व्यांत लिहिलें आहे. या वेळीं रावणाला ज्या ज्या राक्षसांनीं आपलें मत सांगितलें, तेच राक्षस पुढील सभेंत बोलले असून त्यांच्या भाषणांतहि नावीन्य नाहीं. पुढील सर्गांत सभा भरविल्याचा स्पष्ट उल्लेख आहे, व पूर्वीं तो नाहीं, हाच दोहोंत भेद आहे. पूर्वीं आपण कांहीं सांगितलें, याची आठवण रावणाला एकानेंहि दिली नाहीं. सभेचे वेळीं नगररक्षणार्थ व्यवस्था ठेवावयाची रावणानें प्रहस्ताला केलेली आज्ञा व त्याप्रमाणें त्यानें केलेली व्यवस्था त्या वेळची परिस्थिति पाहतां आवश्यक दिसत नाहीं. सभेमध्यें भाषण करणारांत बिभीषण असून त्याचें भाषण केवळ दीर्घछंदांत आहे. सभेंत रावणानें प्रथम जें भाषण केलें, त्यांत एक गोष्ट तर अगदीं मिथ्या आहे, तो म्हणतो;--

**सा तु संवत्सरं कालं मामयाचत भामिनी ।**
**प्रतीक्षमाणा भर्तारं राममायतलोचना ॥१८॥**

" ती विशालनयना सुंदरी आपल्या भर्त्याची वाट पहात असून तिनें मजजवळ एक वर्षाची मुदत मागून घेतली आहे. "

या सभेंत बिभीषणानें रावणाला उपदेश केला, तो ऐकून रावणानें त्याला जें उत्तर दिलें आहे तें १६ व्यांत असून तें ऐकतांच बिभीषण आपल्या मंत्रिचतुष्टयासह रामाकडे गेल्याचें १७ व्यांत लिहिलें आहे. हा प्रकार भर सभेंत झाला, असें येथील कथासंदर्भावरून दिसतें; पण मग या वेळीं रावणाला संमति देणारा कोणीहि सभासद पुढें आला नाहीं, हें आश्चर्य नव्हे काय ? आमच्या मतें बिभीषणाचा उपदेश सभेंत झालेला नाहीं; तर रावण एकांतीं आपल्या मंत्र्यांसह बसला असतां ( विजने मंत्रिसंन्निधौ १०।१२ ) झाला व तो ऐकून रावणानें त्याला दुरुत्तरें केलीं आणि तीं सहन न होऊन तो शत्रुपक्षास मिळाला. अर्थात् एकांतीं केलेल्या उपदेशापुढें ( १० ) रावणाच्या उत्तराचा ( १६ ) सर्ग वाचणें युक्त होय.

सर्ग ५० वा यांतील कांहीं भाग घोंटाळ्याचा आहे. रामलक्ष्मणांना शरबंधांत इंद्रजितानें बद्ध केल्यावर कांहीं वेळानें राम सावध झाला व लक्ष्मणाला मूर्च्छित झालेला पाहून निराशेनें त्यानें विलाप केला; इतक्यांत तेथें बिभीषण आला; इतकी कथा होऊन ४९ वा सर्ग समाप्त झाला आहे. बिभीषणाला पाहून वानरांना इंद्रजिताचा भास झाला व भिऊन ते पळूं लागले असतां सुग्रीवाचे आज्ञेवरून जांबवानानें वानरांना तो बिभीषण असल्याचें सांगून धीर दिला. बिभीषण त्यांना पाहून निराश झाला असतां, सुग्रीवानें त्याला धीर दिला. सुषेण औषधी आणण्याची आज्ञा वानरांना करूं लागला; इतक्यांत तेथें गरुड आला व त्याला पाहून शररूपी नाग पळून गेले. अशा रीतीनें त्यांना शरबंधांतून मुक्त केल्यावर गरुड निघून गेला. या सर्गांतील कथा याप्रमाणें आहे. या कथेंत विसंगतता कोठें आहे, तें आतां पाहूं. रामलक्ष्मण शरबंधांत बद्ध झाले व रणांगणावर पडले हें सर्व सांगतांना शरबंधाचें माहात्म्य फार वाढविलें आहे. शररूप धारण केलेल्या नागांनीं त्यांना बद्ध केलें असें विधान कांहीं स्थलीं आहे, ( ६।४५।-

८ ) तर नागांप्रमाणें तीक्ष्ण बाणांनीं बद्ध केलें असें कोठें लिहिलें आहे. ( ६।-५१।१५ ) आणि भिन्न जातींच्या बाणांनींहि इंद्रजितानें रामाला पडतां पडतां वेध केल्याचें एके स्थलीं लिहिलें आहे. ( ६।४५।२३ ) सर्वांचा मेळ करावयाचा म्हणजे तीक्ष्ण बाण सर्व शरीरांत रुतल्यामुळें व्यथित होऊन ते भूमीवर पडले व नागांचा संबंध घ्यावयाचा म्हणजे ते विषारी होते असें समजावयाचें आहे. नागांप्रमाणें तीक्ष्ण बाण ( शैरराशीविषोपमैः ) रामलक्ष्मणांनींहि युद्धामध्यें सोडल्याचें वर्णन अन्यत्र आहे व या दृष्टीनें इंद्रजिताच्या कृतींत अपूर्वता नाहीं. बिभीषण शत्रुपक्षाकडील मर्मज्ञ व त्यानें "त्यांना मूर्च्छा आली आहे; त्यांच्या शरीरावर मृत्यूचें चिन्ह नाहीं. तेव्हां कांहीं वेळानें ते सावध होतील," ( ६।-४६।३३, ४०, ४१ ) असें त्यांना प्रथम पाहातांच सांगितलें आहे. या वेळीं सुग्रीव भिऊन गेला असतां बिभीषणानें याप्रमाणें सांगून त्याला धीर दिला आहे, तर प्रस्तुत सर्गांत बिभीषण भिऊन गेला असून सुग्रीवानें धीर धरिला आहे. बिभीषणानें प्रथम भाषण केलें त्या वेळीं दोघेहि निश्चेष्ट होऊन पडले होते व दुसऱ्या भाषणाचे वेळीं राम सावध झाला होता; मग या वेळीं बिभीषण इतका भ्याला, याचें कारण काय? राम लक्ष्मणाकरितां विलाप करीत असतां तेथें बिभीषण आला व सुग्रीवाशीं त्याचें जें भाषण झालें तें ऐकत असतांहि राम त्याशीं कांहीं बोलत नाहीं; आणि या वेळीं राम भूमीवर पडला असला तरी सावध असतां "दोघेहि मूर्छेतून लवकर सावध होतील" असें सुग्रीव म्हणत आहे* (२२) यांचा मेळ कसा घालावयाचा? सुग्रीवानें

---

* येथील श्लोक पुढीलप्रमाणें आहेः—

**गरुडाधिष्ठितावेतावुभौ राघवलक्ष्मणौ ।**
**त्यक्त्वा मोहं वधिष्येते सगणं रावणं रणे ॥६।५०।१२॥**

"हे उभयतां रामलक्ष्मण शुद्धीवर येतील व गरुडावर आरोहण करून गणांसह रावणाचा रणांगणावर वध करितील."

गरुड तेथें येण्यापूर्वी सुग्रीवाचें हें भाषण आहे. गरुड पुढें आला तरी येणार असल्याची वार्ता नसतां सुग्रीवानें हें भविष्य कसें केलें? येथें व्यंकटेश्वर प्रतींत "न रुजा पीडितौ" असा पाठ आहे. "त्यांना विकार कसलाहि झालेला नाहीं," असें त्यानें म्हणणें सरळ आहे व यासाठीं हा पाठ युक्त दिसतो.

या वेळीं सुषेणाला हाक मारून रामलक्ष्मणांना किष्किंधेला घेऊन जाण्यास सांगितलें आहे. आणि सुषेण पुढें येऊन औषधी कोणत्या आणावयाच्या तें वानरांना सांगूं लागला आहे. या दोन भाषणांचा संबंध कसा जोडावयाचा? औषधें आणण्यास क्षीरसागरावर जाण्यास त्यानें सांगितलें आहे आणि पुढें इंद्रजिताच्या वधानंतर याच सुषेणानें लक्ष्मणाला वनस्पति हुंगावयास देऊन त्याच्या शरीरांतील व्रण नष्ट करून वेदना नाहींशी केली, असें वर्णन आहे. (६।९१।२४, २५.) तर तेव्हां त्यानें या औषधी कोठून आणिल्या? तेथें त्या औषधींचें नांव दिलेलें नाहीं; पण इष्ट कार्य उभयत्र एक आहे. बरें, या वेळीं गरुडाला अकल्पित येण्याचें कारण काय? तुझा मित्र म्हणून आपण आलों असें तो रामाला सांगत आहे. (६।५०।४६) तर तो पुढील प्रसंगीं (६।९१) कां आला नाहीं? बाणांनीं जखडून गेला असतांहि राम ज्याप्रमाणें आपोआप सावध झाल्याचें प्रथम (६।४९।३) सांगितलें आहे, त्याप्रमाणें लक्ष्मणहि कांहीं वेळानें सावध झाला असावा असें दिसतें. मात्र हा घोंटाळा कसा झाला तें वर्णन वेगळें काढून दाखवितां येण्यासारखें नाहीं, इतकें तें इंद्रजिताच्या शरबंधाप्रमाणें आंत-बाहेर भरून गेलेलें आहे.

यांतील ५९ सर्ग प्रक्षिप्त दिसतो. यांतील बहुतेक श्लोक दीर्घच्छंदांत आहेत. भाषापद्धति वाल्मीकींच्या भाषेशीं जुळत नाहीं. शिवाय याची पूर्वींच्या व पुढील कथेशीं संगति लागत नाहीं. अमात्य प्रहस्त याचा वध झाल्यावर खुद्द रावणाची स्वारी रामावर ससैन्य निघाल्याचें यांत वर्णन आहे. या वेळीं झालेल्या युद्धाचें वर्णन इतर युद्धांच्या मानानें फार असून श्लोकांची संख्या १४७ झाली आहे. सर्व वर्णन अद्भुत गोष्टींनीं अगदीं भरून गेलें आहे. रावणाची स्वारी बाहेर पडली त्या वेळीं त्यांतील योद्ध्यांचीं वर्णनें रामाला सांगतांना बिभीषण म्हणतोः—

**योऽसौ गजस्कंधगतो महात्मा । नवोदितार्कोपमताम्रवक्त्रः ।**
**संकंपयन्नागशिरोऽभ्युपैति । ह्यकंपनं त्वेनमवेहि राजन् ॥१४॥**

"हे राजा, तो पहा अकंपन नांवाचा राक्षस. तो हत्तीच्या खांद्यावर बसला

असून त्याचें तोंड बालसूर्याप्रमाणें आरक्तवर्ण दिसत आहे व हत्तीचें शिर कंपीत करीत तो येत आहे."

यांत अकंपन राक्षस येत असल्याचें वर्णन आहे. वास्तविक अकंपन मृत झाल्यावर रावणानें प्रहस्ताला युद्धार्थ पाठविलें होतें. अकंपनवधाचें वर्णन यापूर्वीच ५६ व्या सर्गांत येऊन गेलें आहे.

**अकंपनवधं श्रुत्वा क्रुद्धो वै राक्षसेश्वरः ॥१॥**
**उवाचात्महितं काले प्रहस्तं युद्धकोविदम् ॥४॥**

"अकंपनाचा वध झाल्याचें श्रवण करून तो राक्षसाधिपति रावण आपल्या हितासाठीं युद्धविशारद प्रहस्ताला म्हणाला."

५७ व्या सर्गाच्या आरंभीं असें वर्णन आहे. अशा रीतीनें या ५९ व्या सर्गांत पूर्वी काय लिहिलें व पुढें काय लिहिलें आहे याचा विचार न करितां युद्धाचें वर्णन लिहिलें आहे. या वेळपर्यंतच्या रावणाच्या पद्धतीप्रमाणें रावणानें स्वतः या वेळीं बाहेर येणें अशक्य दिसतें. अजूनपर्यंत त्यानें आपल्या पदरचे मोठमोठे वीर रामावर पाठवून दिले होते, व या सर्गानंतरहि स्वतां उरेपर्यंत त्यानें हा क्रम सोडिलेला दिसत नाहीं. मग आज स्वतां बाहेर पडण्याइतकें त्याच्यावर कोणतें संकट कोसळलें होतें ? पुढील कांहीं सर्गांतील भाषणांवरून ही गोष्ट सिद्ध होते. इंद्रजिताचा वध झाल्यावर राम लक्ष्मणाला म्हणतो:—

**निरमित्रः कृतोऽस्म्यद्य निर्यास्यति हि रावणः ॥६।९१।१६॥**

"आतां माझा शत्रु उरलेला नाहीं; आज रावण मात्र बाहेर पडेल ( असें वाटतें. )"

रामाच्या या भाषणावरून अजूनपर्यंत रावण बाहेर पडला नसून आज तो बाहेर पडण्याचा संभव आहे, असा त्याचा तर्क होता असें दिसतें. शिवाय रामाच्या या वाक्यांतील "निरमित्रः" या पदावरून रावणाची वर अनुमानिलेली पद्धति सिद्ध ठरते. शेवटीं रावण बाहेर पडल्यावर रामानें जे उद्गार काढिले आहेत, त्यांवरून त्यापूर्वी तो युद्धास आला होता असें वाटत नाहीं.

**सोऽयमद्य रणे पापश्चक्षुर्विषयमागतः ।**
**चक्षुर्विषयमागम्य नायं जीवितुमर्हति ॥६।१००।५३॥**

" तो हा पापी रावण आज माझ्या दृष्टीला पडत आहे. आतां तो जिवंत सुटणें शक्य नाहीं. "

रावण एकदांच बाहेर पडला व त्याच वेळीं त्याचा वध झाला. तेव्हां या सर्गांत रामरावणयुद्धाचें जें वर्णन आलें आहे, तें रावण त्या वेळीं बाहेर पडला नसल्यामुळें मागाहून कोणीं तरी घुसडिलें असलें पाहिजे.

यांतील ७३ व ७४ असे दोन सर्ग प्रक्षिप्त आहेत. ७३ व्या सर्गाचा प्रारंभ पूर्वसर्गाच्या समाप्तीशीं जमत नाहीं. ७२ व्या सर्गांत अतिकायाचा वध झाल्याचें श्रवण करून रावण संतापला व सर्व सैन्याला सावध राहण्यास सांगून तो आपल्या मंदिरांत निघून गेला, असें वर्णन आहे. ७२ व्या सर्गाचा उपांत्य श्लोक पहा.

तान्सर्वान्हि समादिश्य रावणो राक्षसाधिपः ।
मन्युशल्यं वहन्दीनः प्रविवेश स्वमालयम् ॥१७॥

" राक्षसाधिपति रावणानें सर्वांना ( याप्रमाणें ) आज्ञा केली. त्याच्या अंतःकरणांत शल्याप्रमाणें क्रोध टोंचीत होता व त्यामुळें तो दीन झाला होता आणि अशा स्थितींत तो आपल्या घरांत निघून गेला. "

यापुढील ७३ व्या सर्गाचा प्रारंभ पूर्वसर्गाशीं किती विरुद्ध आहे पहाः--

ततो हतान् राक्षसपुंगवांस्तदा । देवान्तकादित्रिशिरोऽतिकायान् ।
रक्षोगणास्तत्र हतावशिष्टाः । ते रावणाय त्वरिताः शशंसुः ॥१॥

" नंतर त्या ठिकाणीं अवशिष्ट राहिलेल्या राक्षसांनीं देवांतक, त्रिशिरा, अतिकाय वगैरे मोठमोठे राक्षस मरण पावल्याचें रावणाला त्वरित येऊन कळविलें. "

या श्लोकांत जी कथा ७२ व्या सर्गांत येऊन गेली आहे व ज्यापुढें थोडासा कथाभाग येऊन गेला आहे त्याचाच अनुवाद केलेला आहे. सर्व सैन्याला सावध राहाण्यास सांगून रावण अंतःपुरांत गेला, इतकी कथा मागील सर्गांत आली आहे. ती तितकीच सोडून देऊन या सर्गांत रावणाचा इंद्रजिताशीं संवाद होऊन त्यानें इंद्रजिताला युद्धार्थ पाठविलें, असें वर्णन केलें आहे. याच युद्धांत इंद्रजितानें रामलक्ष्मण व सर्व वानर यांना मूर्च्छित केलें व जांबवानाच्या सांग-

ण्यावरून मारुतीनें हिमालयपर्वतावर जाऊन औषधि आणिली व सर्वांना सावध केलें. हें युद्ध संपल्यावर रात्र पडली व औषधीहि मारुतीनें रात्रीं आणिली होती.

तावुभौ युगपद्वीरौ हनूमद्राक्षसोत्तमौ ।
उल्काहस्तौ तदा रात्रौ रणशीर्षे विचेरतुः ॥७४।७॥

" नंतर राक्षसश्रेष्ठ बिभीषण व हनुमान् या दोघांनीं हातांत दिवट्या घेतल्या व त्या रात्रीं ते रणभूमीवर फिरूं लागले. "

हें वर्णन युद्ध संपल्यानंतर व मारुतीनें औषधि आणिल्यावर सर्वांना सावध करण्यापूर्वींच्या स्थितीचें आहे. सर्व सावध झाल्यावर रात्र संपत आली असली पाहिजे, हें उघड आहे. असें असूनहि यापुढील ७५ व्या सर्गांत यानंतरचा जो कथा भाग सांगितलेला आहे त्याच्या प्रारंभींच रात्र पडूं लागल्याचें वर्णन आहे:

ततोऽस्तंगत आदित्ये रौद्रे तस्मिन्निशामुखे ।
लंकामभिमुखाः सोल्का जग्मुस्ते प्लवगर्षभाः ॥४॥

" नंतर सूर्याचा अस्त झाल्यावर तो प्रदोषकाल भयंकर दिसूं लागला. तेव्हां त्या वानरश्रेष्ठांनीं हातांत दिवट्या घेतल्या व ते लंकेकडे जाऊं लागले. "

ही रात्र पूर्वींच्या रात्रीनंतरची दुसरी रात्र म्हणणें असंभाव्य आहे. याकरितां मागील सर्ग प्रक्षिप्त मानणें भाग आहे. याशिवाय ७३ व्या व ७४ व्या सर्गांत रामाकडील योद्ध्यांची जी दुर्दशा वर्णिली आहे त्यावरून त्यांचीं पुढील बोलणीं कोणत्या पद्धतीचीं असलीं पाहिजेत याचें कोणालाहि अनुमान करितां येईल. अभिमानानें भरलेलीं भाषणें त्यांनीं यानंतर करणें शक्य नव्हतें. परंतु पुढील सर्गाचा प्रारंभ पहा:—

ततोऽब्रवीन्महातेजाः सुग्रीवो वानरेश्वरः ।
अर्थं विज्ञापयंश्चापि हनूमन्तमिदं वचः ॥१॥
यतो हतः कुंभकर्णः कुमाराश्च निषूदिताः ।
नेदानीमुपनिर्हारं रावणो दातुमर्हति ॥२॥

" नंतर वानरांचा अधिपति महातेजस्वी सुग्रीव यानें हनुमानाला उद्देशून गंभीर अर्थाचें भाषण केलें, ( तो म्हणाला, ) ' ज्यापक्षीं कुंभकर्णाचा व राव-

णाच्या पुत्रांचा वध झाला आहे त्यापक्षीं आतां कांहीं रावण बाहेर पडून आमच्याशीं युद्ध करीत नाहीं.' "

ही दर्पोक्ति या वेळीं सुग्रीवाच्या तोंडीं शोभते काय? सुग्रीवाच्या सर्व सैन्याचा पराभव झाला होता; रामलक्ष्मण मूर्च्छेतून नुकतेच उठले होते; अशा वेळीं जणुंकाय आपला पराभव झाला नसून शत्रूंचा अतिशय नाश झाला आहे असें समजून बोलल्याप्रमाणें सुग्रीवाचें भाषण आहे. या सर्गद्वयानें अशा रीतीनें घोंटाळा केला असल्यमुळें ते वाल्मीकिप्रणीत म्हणतां येत नाहींत.

शिवाय इंद्रजित् समरांगणीं आल्यावर तेथें त्यानें अग्नीमध्यें हवन केल्याचें विलक्षण वर्णन या सर्गांत आहे. ( ७३।१७,१८ ) वास्तविक ६।८० मध्यें इंद्रजितानें हवन केल्याचें वर्णन आहे; पण तें हवन युद्धभूमीवर नसून यज्ञभूमीवर आहे. ( ६।८०।५ ) इंद्रजिताचें अद्भुत सामर्थ्य दाखविण्यासाठीं प्रक्षेपकानें हें वर्णन दिलें, हें खरें; पण इंद्रजित या वेळीं समरांगणावर आल्याचें त्याच्या लक्षांत आलें नाहीं. ( ६।८०।७–१० ) हे श्लोक तर त्यानें जशाचे तसे पूर्वीं उतरून घेतले आहेत. ( ६।७३।२०–२३ ).

तसेंच ६।८० मध्यें इंद्रजितानें हवन केल्याचें जें वर्णन आहे, त्यानंतर तो रणांगणावर आला असतां त्यानें लक्ष्मणाला उद्देशून जें भाषण केलें त्यांत त्यानें आपण पूर्वीं त्याच्याशीं युद्ध केलें, त्या वेळीं केलेल्या पराक्रमाचें वर्णन केलें आहे. या वर्णनांत त्यानें पूर्वीं रात्रियुद्धामध्यें रामलक्ष्मणांला आपण शरबंधानें बद्ध केल्याचें स्मरण दिलें आहे. ( ६।८८।११ ) हा प्रसंग ६।४५ मध्यें आला आहे. ६।७४ मध्यें वर्णिलेलें युद्ध दिवसां झालें आहे; अर्थात् तो प्रसंग इंद्रजितानें उल्लेखिलेला दिसत नाहीं. या रात्रियुद्धाविषयींचा निर्देश त्यानें 'प्रथमचें युद्ध' ( युद्धे प्रथमे ६।८८।४५) असा केला आहे. अर्थात् त्यानें हें भाषण केलें, तो त्याशीं युद्ध करण्याचा दुसरा प्रसंग होय. ६।७४ मध्यें वर्णिल्याप्रमाणें रामलक्ष्मणांना त्यानें खरोखर मूर्च्छित केलें असतें, तर या पराक्रमाचा निर्देश त्यानें ओघाबरोबर केला नसता काय ?

सर्ग १०५ वा प्रक्षिप्त आहे. युद्धाचे योगानें रामाला थकवा वाटून तो चिंताग्रस्त झाला असतां तेथें अगस्त्यमुनि आले व त्यांनीं त्याला आदित्यहृदय-

स्तोत्राचा उपदेश करून त्याचा जप करावयास सांगितलें; रामानें याप्रमाणें जप केल्यावर त्याला उत्साह वाटला, असें वर्णन या सर्गांत आहे. मागील सर्गाकडे पाहिलें तर रामापेक्षां रावण चिंताग्रस्त असल्याचें दिसतें. रावण मूर्च्छित झाला असतां सारथ्यानें रथ बाजूला नेला; रावण सावध झाल्यावर रथ बाजूला नेला म्हणून तो सारथ्यावर रागावला. नंतर सारथ्यानें सर्व वृत्तान्त सांगितल्यावर रावणाची शंका दूर झाली व त्यानें रथ रणांगणावर नेण्यासाठीं सारथ्याला आज्ञा केली; इतकी कथा १०४ सर्गांपर्यंत झाली आहे. अर्थात् या वेळीं राम चिंताग्रस्त असणें शक्य आहे काय ? सारथ्यानें रथ पाठीं फिरविला, इतकेंच १०४ च्या अंतीं लिहिलें आहे. ( २६ ) पुढें एक श्लोक दीर्घच्छंदांत असून त्यांत रथ रणभूमीवर आल्याचें वर्णन आहे; परंतु १०६ चे प्रारंभीं सारथ्यानें रथ हांकारल्याचें सांगून रणभूमीवर तो रामानें पाहिल्याचें लिहिलें आहे. ( ४, ५ ) रणभूमीवर रथ रामानें परत आलेला पाहिल्याचें वर्णन येथें आहे व रथ पुढें पाहून राम चिंताग्रस्त झाल्याचें मागील सर्गांत लिहिलें आहे. याचा मेळ कसा घालावयाचा ? शिवाय भर रणांगणावर स्तोत्राचा जप करण्याची सवड कशी मिळणार ? तेव्हां रथ परत फिरविल्यावर ( १०४ ) तो रणांगणावर आला, ( १०६ ) अशा क्रमानेंच कथा असणें युक्त होय.

सर्ग १०९ वा प्रक्षिप्त दिसतो. रावणवध झाल्यावर बिभीषण शोकाकुल झाला असतां रामानें त्याचें सांत्वन केलें व प्रेताला संस्कार करावयास सांगितलें, अशी कथा या सर्गांत आहे. रामाच्या सांत्वनपर भाषणाचा उपसंहार पुढीलप्रमाणें आहे.—

**मरणान्तानि वैराणि निवृत्तं नः प्रयोजनम् ।**
**क्रियतामस्य संस्कारो ममाप्येष यथा तव ॥२॥**

" वैराची समाप्ति मृत्यूबरोबर होते; आमचें कार्यहि उरकलें आहे. तेव्हां याला तूं आतां संस्कार कर. रावण जसा तुझा आहे, तसा माझाहि आहे. "

यापुढील सर्गांत रावणाच्या स्त्रिया येऊन त्यांनीं विलाप केल्याचें लिहिलें असून त्यापुढील १११ व्या सर्गांत मंदोदरीचा विलाप आहे. या (१११ व्या) सर्गाचे अंतीं रामबिभीषणांचा संवाद असून त्यांतील रामाचे भाषणाचा उप-

संहार अगदीं वरीलप्रमाणें त्या शब्दांत आहे. (१११।१०१) रामानें नंतर केलेल्या भाषणांत पूर्वी आपण हेंच सांगितलें असल्याचें तो म्हणत नाहीं व बिभीषणाला तर त्याचें स्मरण दिसत नाहीं. पूर्वी १०९ व्या सर्गांत रावणाचे मृत्यूबद्दल तो शोक करीत आहे व पुढील १११ व्या सर्गांत रामानें प्रथम प्रेताला संस्कार करावयास सांगितलें असतां तो "या रावणानें धर्माचा व व्रताचा त्याग केला असून हा क्रूर, दुष्ट व खोटा होता, यानें परस्त्रीवर हात टाकिला, त्यापक्षीं याला और्ध्वदेहिक संस्कार करणें मला योग्य नाहीं, सर्वांना पीडा करणारा हा माझा शत्रु असून भ्राता म्हणून जन्मास आलेला होता" ( १११।९३, ९४ ) असें सांगत आहे. बिभीषणाच्या तोंडीं हीं दोन भाषणें अगदीं परस्परविरुद्ध आहेत. रावणाची निंदा करणारा हा बिभीषण पूर्वी शोक करितांना त्याविषयीं काय म्हणतो पहाः—

**गतः सेतुः सुनीतानां गतो धर्मस्य विग्रहः ॥१०९।६॥**
**गतः सत्त्वस्य संक्षेपः सुहस्तानां गतिर्गता ।**
**आदित्यः पातितो भूमौ मग्नस्तमसि चंद्रमाः ॥७॥**
**चित्रभानुः प्रशान्तार्चिर्व्यवसायो निरुद्यमः ।**

" (रावण मृत झाल्यामुळें) धर्मनिष्ठांची मर्यादा नाहींशी झाली आहे. धर्माचें स्वरूप नष्ट झालें आहे; बलाचें निधान लयाला गेलें आहे; वीरांचा आश्रय गेला आहे; सूर्य भूमीवर गळून पडला आहे; चंद्र अंधारांत बुडून गेला आहे. अग्नि ज्वालारहित झाला आहे; आणि प्रवृत्तिरूप धर्मालाहि प्रतिबंध झाला आहे."

बिभीषणाचें हें भाषण त्याच्या तोंडीं शोभतें काय ? रावणाला त्यानें धर्माचें स्वरूप असें म्हणणें किती विचित्र आहे ! विलाप केल्यावर रामानें जयाविषयीं शाश्वती नसते अशी नीति सांगितली व यावर बिभीषणानें "परलोकीं गेलेल्या याचें और्ध्वदेहिक आपल्या प्रसादानें करावें अशी इच्छा आहे." ( १०९।२४ ) असें सांगितलें. बिभीषणाच्या या प्रार्थनेला रामानें जें उत्तर दिलें तें एकाच श्लोकांत असून तो वर उद्धृत केला आहे. बिभीषण हा वेळपर्यंत रावणासाठीं विलाप करीत आहे व और्ध्वदेहिक करण्यास रामाची संमति मागत आहे व त्याला राम "तो मरून गेला असतां वैर संपलें. त्याचें और्ध्व-

देहिक करावयाचें आतां पहा." असें सांगत आहे. हा देखावा किती विलक्षण आहे? बिभीषणानें रावणाशीं असलेलें वैर व्यक्त केलें नसतां रामानें त्याचें निराकरण कसलें करावयाचें? हा घोटाळा प्रक्षेपकानें केलेला आहे. त्याला त्रिभीषणानें विलाप केलेला पहावयाचा होता तो त्यानें रावणवधानंतर घुसडून दिला व पुढील संवादांतील रामाचा संस्कार करण्याविषयींचा उपदेश अंतीं देऊन समाप्ति केली; पण हा श्लोक पूर्वीचे भाषणाशीं जमत नाहीं, हें त्यांच्या लक्षांत आलें नाहीं. और्ध्वदेहिक करण्याला रामाची संमति त्रिभीषणानें मागितली. तो श्लोक दीर्घच्छंदांत आहे हें विशेष आहे, रावणाचा वध करून रामानें अंगद, सुग्रीव व बिभीषण यांचे मनोरथ पूर्ण केले असें पूर्वसर्गांत (१०८।३१) लिहिलें आहे व त्यावरून रावणवध झाल्यानें बिभीषणाला आनंद झाल्याचें ध्वनित होत आहे, मग तो शोक कशाला आणि कां करील? अर्थात् हा विलापसर्ग प्रक्षिप्त आहे.

सर्ग ११७ वा प्रक्षिप्त आहे. ११६ व्याच्या अंतीं सीतेनें अग्निप्रवेश केला व त्या वेळीं सर्वत्र हाहाःकार झाला, असें वर्णन आहे. ११७ व्या सर्गांत तेथें ब्रह्मादिक देव आल्याचें लिहिलें असून ब्रह्मदेवानें म्हटलेलें एक स्तोत्र दिलें आहे. व पुढें ११८ व्या सर्गांत अग्नीनें स्वतः प्रकट होऊन सीता शुद्ध असल्याचें सांगितलें आणि रामानें तें मान्य केलें असें वर्णन आहे. ११७ व्या सर्गांत तेथें आलेल्या देवांनीं सीतेची उपेक्षा करणें योग्य नव्हे, असें एकदां सांगितलें असून (१०) बाकी सर्व रामाची स्तुति आहे. या स्तुतीच्या अंतीं ब्रह्मदेवांनीं तिची फलश्रुति सांगितली असून तींत, "हें तुझें दिव्य, पुरातन व इतिहासरूप आर्षस्तोत्र जे पुरुष पठण करतील त्यांचा कधीं पराभव होणार नाहीं. (३३)" असें म्हटलें आहे. स्वतां ब्रह्मदेवानें ही स्तुति केली आहे व तीच पुरातन असल्याचें तो सांगत आहे, यांतच त्याच्या स्तुतीचा फोलपणा व्यक्त होत आहे. वास्तविक सीतेनें अग्निप्रवेश केल्याच्या वर्णनापुढें:—

**विधूपाऽथ चितांतांतु वैदेहीं हव्यवाहनः ।**
**उत्तस्थौ मूर्तिमानाशु गृहीत्वा जनकात्मजाम् ॥११८।२॥**

"नंतर ती चिता उडवून देऊन व जनककन्या सीतेला घेऊन मूर्तिमान्

अग्नि [ तींतून ] सत्वर बाहेर पडला. " हें वर्णन येणें सुसंगत दिसतें. अशा प्रसंगीं सीतेचा रामाकडून स्वीकार करविण्यापूर्वी देवांनीं येऊन स्तुति करणें अगदीं अस्थानीं आहे. अर्थात् हा सर्व भाग प्रक्षिप्त आहे.

सर्ग ११९ व १२० हे प्रक्षिप्त दिसतात. यांत प्रथम शंकर व दशरथ यांचें स्तुतिपर आशीर्वाद असून पुढील सर्गांत इंद्रानें वर देऊन रणांगणावर मृत झालेले वानर उठविल्याचें वर्णन आहे. सर्ग ११७ वा प्रक्षिप्त असल्याचें पूर्वी सांगितलें असून यांतच देवांचें आगमन तेथें झाल्याचें वर्णन आहे. त्याचा संसर्ग हें एक हे सर्ग प्रक्षिप्त वाटण्याला कारण आहे, हें सांगावयास नको. आतां दुसरीं कारणें कोणतीं तें पाहूं. सर्ग ११९ वा यांत प्रथम शंकराचें जें भाषण आहे, तें पूर्वसर्गांतील रामाचें भाषण श्रवण करून बोलल्याचें लिहिलें आहे. (११९।१). अग्नीनें सीता शुद्ध आहे असें सांगितल्यावर रामानें तिचा स्वीकार केला व सीता शुद्ध असल्याचें आपण जाणत असून, हें सर्व लोकापवाद येऊं नये यासाठीं करावें लागलें असें रामानें सांगितलें व तें ऐकून वरील शंकराचें भाषण दिलें आहे. कथेचा प्रवाह पाहतां या भाषणांत सीतेच्या पावित्र्याबद्दल विशेष वर्णन येणें अवश्य दिसतें. पण शंकराच्या तोंडीं याविषयीं एकहि शब्द नाहीं. रावणवधाबद्दल प्रशंसा करून सुखानें राज्य करण्यास त्यानें सांगितलें आहे. दशरथाच्या भाषणांतहि स्तुति व आशीर्वाद आहे. म्हणजे हीं दोनहि भाषणें सीतेवरील प्रकृत प्रसंगानंतर न देतां रावणवध झाल्या वेळीं दिलीं तरी चालण्यासारखीं आहेत. नाहीं म्हणावयास दशरथानें मात्र सीतेला उपदेश करितांना रामानें केलेल्या त्यागाबद्दल त्यावर रागावूं नको, असें सांगितलें आहे; व हाच एक त्या दोनहि भाषणांत अपवाद आहे. तसेंच सीता शुद्ध असल्याचें अग्नीनें देवांसमक्ष सांगितल्याचे पुढें ६।१२४।१५ व ६।१२६।५१-५२ व ७।४५।७–८ या स्थळीं उल्लेख आहेत. तेव्हां या कथाभागाविषयीं निश्चित विधान करितां येत नाहीं. हे सर्ग प्रक्षिप्त वाटण्यास त्यांत दिसणारी विसंगतता कारण आहे व ती येथें दाखविली आहे.

सर्ग १२८ यांतील ९० व्या पुढील श्लोक प्रक्षिप्त आहेत. यांत राज्याभिषेक झाल्यानंतर रामानें दहा हजार वर्षे राज्य केलें, भरताला यौवराज्याभिषेक केला

इत्यादि सांगून रामायणाची फलश्रुति सांगितली आहे. उत्तरकांडांतील ४१ व्या सर्गांत राज्याभिषेकानंतर एक महिना झाल्याचें ( साग्रो मासो गतः ४१।२०) सांगितलें आहे. अर्थात् यापूर्वी पुढील कथा सांगणें अस्थानीं आहे. राज्याभिषेक होतांच युवराजाची योजना करण्याइतकी घाई करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. यांतच "रामानें पुत्र, भ्राते व बांधव यांसह नानाविध यज्ञ केले" (१२८।९७ असें वर्णन आहे, हें तर विचित्र आहे. कारण या वेळेपर्यंत रामाला पुत्र झालेला नव्हता; तेव्हां हा भाग प्रक्षिप्त मानणें भाग आहे. फलश्रुति सांगतांना, पूर्वी वाल्मीकि महर्षींनीं केलेलें आदिकाव्य" (१२८।११०) असा रामायणाचा उल्लेख केला आहे व तो उघडच कोणींतरी मागाहून केलेला दिसतो. फलश्रुतीच्या श्लोकांवर कतकाची टीका नाहीं. अर्थात् त्याला ते मान्य नाहींत.

## उत्तरकाण्ड.

या कांडाइतका घोंटाळा कोणत्याच कांडांत नाहीं. प्राचीन टीकाकारांची टीका नसल्यामुळें तेरा सर्ग स्वभावतः प्रक्षिप्त ठरलेले आहेत. उरलेल्या सर्गांत प्रक्षिप्त भाग किती आहे व अस्सल भाग किती आहे हें ठरविणें कठीण आहे. या कांडांतील प्रारंभींच्या छत्तीस सर्गांत ऋषींनीं रामाला सांगितलेल्या कथांशिवाय कांहीं एक नाहीं. यापुढें सहा सर्गांत सर्व मंडळींना निरोप देण्याचा विधि उरकून घेण्यांत आला आहे. यानंतर सीतात्याग, लवणवध, अश्वमेध, सीतेचें दिव्य वगैरे कथा सांगितलेल्या आहेत. या कांडाच्या प्रारंभीं ज्या कथा आल्या आहेत त्यांमध्यें पुष्कळ स्थलीं पूर्वींच्या कथाभागाशीं विरोध उत्पन्न झाला आहे. खुद्द या कांडांतहि परस्परविरोध आहे. या कांडाचा प्रारंभ खालील श्लोकानें केलेला आहे:—

**प्राप्तराज्यस्य रामस्य राक्षसानां वधे कृते ।**
**आजग्मुर्मुनयः सर्वे राघवं प्रतिनंदितुम् ॥१॥**

"राक्षसांचा वध झाल्यावर व रामाला राज्य प्राप्त झाल्यावर त्याचें अभिनंदन करण्याकरितां सर्व ऋषि त्याजकडे आले."

या श्लोकावरून ज्या वेळीं ऋषिमंडळ रामाचें अभिनंदन करण्याकरितां त्याजकडे गेलें त्या वेळीं त्याला राज्याभिषेक होऊन कांहीं तरी दिवस गेले असले

पाहिजेत हें उघड आहे. यानंतर या ऋषींपैकीं अगस्त्य ऋषींनीं रामाला पुष्कळ कथा सांगितल्या आहेत. पण पुढील ३७ व्या सर्गाचा प्रारंभ कसा विचित्र आहे पहा:—

**अभिषिक्ते तु काकुत्स्थे धर्मेण विदितात्मनि ।**
**व्यतीता या निशा पूर्वा पौराणां हर्षवर्धिनी ॥१॥**

" ककुत्स्थ कुलांत उत्पन्न झालेल्या आत्मवेत्त्या रामाला ज्या दिवशीं राज्याभिषेक झाला त्या रात्रीं सर्व पौरजनांना हर्ष झाला. "

यांत अभिषेक ज्या दिवशीं झाला त्या रात्रीचें वर्णन आहे. अभिषेकानंतर कांहीं दिवसांनीं झालेल्या गोष्टींचें वर्णन पूर्वी देऊन नंतर पूर्वीच्या गोष्टींचीं वर्णनें देणें या काव्यांत तरी शोभत नाहीं. अभिषेक व ऋषींचें आगमन यांच्या दरम्यान कांहीं तरी दिवस गेले असले पाहिजेत असें आम्हीं वर विधान केलें आहे. या विधानाला पुष्टि देण्यासारखा स्पष्ट पुरावा जरी येथें देतां आला नाहीं तथापि एवढी गोष्ट निर्विवाद आहे कीं, ज्या दिवशीं रामाला राज्याभिषेक झाला त्याच दिवशीं ऋषींनीं त्याला कथा सांगण्यास प्रारंभ केला नव्हता. मग मध्यें जे बरेच सर्ग लिहिले आहेत त्यांची वाट काय ?

रावणपुत्र इंद्रजित् याचा वध लक्ष्मणानें केला ही गोष्ट सर्वश्रुत आहे. याकरितां ती सिद्ध करण्यासाठीं येथें मागील उतारा देण्याची जरूर नाहीं. परंतु अगस्त्यऋषींनीं प्रारंभीं रामाची जी प्रशंसा केली आहे तींत खालील वाक्य आहे:

**द्वन्द्वयुद्धमनुप्राप्तो दिष्ट्या ते रावणिर्हतः ॥१।२६॥**

" रावणपुत्र इंद्रजिताशीं द्वन्द्वयुद्ध करून तूं त्याचा वध केलास याबद्दल आम्हांला फार आनंद वाटतो. "

या श्लोकांत खुद्द रामानें इंद्रजिताचा वध केला असें विधान ऋषींनीं केलें असून त्याबद्दल त्याची प्रशंसा केली आहे. हें विधान पूर्वी येऊन गेलेल्या कथेच्या अगदीं विरुद्ध आहे.

रामाची वर लिहिल्याप्रमाणें प्रशंसा करितांना सर्व राक्षसांच्या वधापेक्षां इंद्रजिताचा वध केला ही गोष्ट विशेष आश्चर्यकारक व अभिनंदनास्पद आहे असें ऋषींनीं उद्गार काढिले आहेत, हें ऐकून रामाला फार विस्मय वाटला व त्यानें

त्यांना असें विधान करण्याचें कारण काय असें विचारिलें आहे. परंतु इंद्रजिताचा वध झाला त्या वेळीं खुद्द रामानें असें विधान केलें होतें:—

अद्य मन्ये हते पुत्रे रावणं निहतं युधि ॥६।९१।१३॥
अद्याहं विजयी शत्रौ हते तस्मिन्दुरात्मनि ।

" रावणाचा पुत्र इंद्रजित् आज मरण पावला आहे. परंतु मीं युद्धामध्यें रावणाचाच वध झाला असें समजतों. तो दुष्ट राक्षस मरण पावला तेव्हां आजच मीं शत्रूवर जय मिळविला."

मग ऋषींच्या अशाच विधानाबद्दल एवढें आश्चर्य प्रकट करण्याचें काय कारण होतें ? तसेंच यानंतर ऋषींनीं आपल्या विधानाबद्दल खुलासा केल्यावर रामानें-

अगस्त्यं त्वब्रवीद्रामः सत्यमेतच्छ्रुतं च मे ॥७।३०।५३॥

"तेव्हां राम अगस्त्याला म्हणाला—होय मींहि पूर्वीं या कथा ऐकिल्या आहेत." असे उद्गार काढिल्याचें लिहिलें आहे. इतक्या कथा सांगितल्यानंतर हे उद्गार ऐकून त्यांना काय बरें वाटलें असेल ?

इंद्रजित् मृत्यु पावला त्या वेळीं त्याविषयीं रामानें काढिलेले उद्गार औपचारिक होते असें नव्हे. इंद्रजिताला मिळालेल्या वराविषयींचा वृत्तांत बिभीषणानें युद्ध चालू असतां रामाला निवेदन केला होता. (६।८५।१०–१५) अगस्त्यमुनींच्या भाषणांत हाच वृत्तांत (७।३०।११–१५) पुनः आलेला आहे. मग या प्रश्नोत्तरांचें प्रयोजन काय ?

बिभीषण, सुग्रीव वगैरे मंडळींना निरोप दिल्याचें वर्णन ४० व्या सर्गांत आहे. निरोप देण्यापूर्वीं यांना अलंकार वगैरे बक्षिसें देण्याचें काम पूर्वसर्गांत आटोपिलें आहे. परंतु हा सर्व कथाभाग पूर्वीं युद्धकांडांत येऊन गेला आहे त्याची वाट काय ?

सर्वे वानरवृद्धाश्च ये चान्ये वानरोत्तमाः ।
वासोभिर्भूषणैश्चैव यथार्हं प्रतिपूजिताः ॥६।१२८।८४॥
यथार्हं पूजिताः सर्वे कामै रत्नैश्च पुष्कलैः ।
प्रहृष्टमनसः सर्वे जग्मुरेव यथागतम् ॥८६॥

" नंतर वृद्ध व श्रेष्ठ वानरांना त्यांच्या योग्यतेप्रमाणें वस्त्रें व अलंकार

देऊन रामानें त्यांची प्रशंसा केली. त्या सर्वांना त्यांच्या योग्यतेप्रमाणें इष्ट वस्तु व पुष्कळ रत्नें देऊन त्यांची वाहवा केल्यावर त्यांना आनंद होऊन ते आत्म-मार्गानें परत गेले."

युद्धकांडांतील या वर्णनाप्रमाणेंच उत्तरकांडांत वर्णन आहे. जी कथा पूर्वीं सविस्तर सांगण्यांत आली आहे, ती पुनः सांगण्याचें वाल्मीकींस काय प्रयोजन होतें? युद्धकांडाच्या शेवटीं रामायणाचें पूर्वार्ध संपल्यामुळें उपसंहारात्मक कांहीं भाग लिहिला आहे. त्यांत रामराज्यांतील लोकस्थितीचें वगैरे वर्णन आहे. हें सर्व घडून आल्यानंतर सीतात्याग वगैरे गोष्टी झाल्या, अशी जरी वस्तुस्थिति नसली तरी या कथा पुढें सांगितल्यानें मूळकथेचें अनुसंधान सुटत नाहीं. युद्धकांडांत आलेल्या वरील कथेचा पुनरुच्चार केल्यानें मात्र विसंगतता प्राप्त होते. तसेंच ३८ व्या सर्गांत रामानें राजांना निरोप दिला त्या वेळीं सीता रावणानें हरण केल्याचें ऐकून भरतानें त्यांस बोलाविल्याचें राम त्यांना सांगत असल्याची अश्रुतपूर्व कथा आली आहे. (३८।२५) आणि हे राजे तर "रावणाचा वध झाल्यावर भरतानें आपणांस उगाच आणविलें; पूर्वीं आणविलें असतें तर आम्हीं राक्षसांचा वध तेव्हांच केला असता." (३९।४-५) असें आपापसांत बोलत आहेत. तर रावणानें यापूर्वीं जे अत्याचार चालविले होते त्या वेळीं हे राजे काय निजले होते? सर्वच विलक्षण आहे.

राज्याभिषेकानंतर दोन महिने सुखानें गेल्याचें ३९।२९ मध्यें लिहून तेथें शिशिरारंभ झाल्याचा उल्लेख आहे. वनवासाची मुदत भरल्याबरोबर राम परत आला. अर्थात् त्या वेळीं चैत्र मास होता व राज्याभिषेक लागलींच झाला; म्हणजे त्यानंतर दोन मासांनीं शिशिरारंभ होणें शक्य नाहीं. पुढील ४१ व्या सर्गांत तर राज्याभिषेकानंतर एक महिना लोटल्याचें (१९) लिहिलें आहे. या दोहोंचा मेळ कसा घालावयाचा? याकरितां उत्तरकांडांतील प्रारंभींचे हे ४० सर्ग प्रक्षिप्त आहेत, हें उघड आहे. उत्तरकांडाचा खरा आरंभ ४१ व्या सर्गापासून होतो व यांतच राज्याभिषेकानंतर एक मास झाल्याचा उल्लेख आहे व तो मागील सर्ग गाळल्यावर विसंगत दिसत नाहीं.

सीतेला वाल्मीकींच्या आश्रमांत सोडून लक्ष्मण परत आला व त्यानें रामाला

भेटून त्याचें सौम्य शब्दांनीं सांत्वन केलें. तेव्हां रामाचें दुःख कमी होऊन त्यानें त्याबद्दल लक्ष्मणाची प्रशंसा केली. इतकी कथा ५२ व्या सर्गाच्या अखेर-पर्यंत आली आहे. यापुढें रामानें लक्ष्मणाला पौरकार्याकडे लक्ष न दिल्यामुळें राजावर कसे अनर्थ ओढवतात हें स्पष्ट करून दाखविण्याकरितां कथा सांगितल्या आहेत. हे सर्ग सात आहेत. यानंतर प्राचीन टीकाकारांच्या टीका नसल्यामुळें विनायास प्रक्षिप्त ठरलेले तीन सर्ग आहेत. मग ६० व्या सर्गाला प्रारंभ झाला आहे. यांपैकीं मधील सात सर्गांसंबंधीं येथें विचार करावयाचा आहे. ५२ व्या सर्गाच्या शेवटीं खालील श्लोक आहे:—

**निवृत्तिश्चागता सौम्य संतापश्च निराकृतः ।**
**भवद्वाक्यैः सुरुचिरैरनुनीतोऽस्मि लक्ष्मण ॥१९॥**

"हे सौम्य लक्ष्मणा, तुझ्या मनोहर भाषणाच्या योगानें माझें दुःख कमी झालें असून संताप नाहींसा झाला आहे."

या श्लोकांतील शेवटच्या संबुद्धीवरून हें वाक्य रामानें लक्ष्मणाला उद्देशून उच्चारलेलें होतें, हें उघड आहे. येथें हा संवाद पुरा झाल्यासारखा आहे. पण पुढील सर्गाचा प्रारंभ किती चमत्कारिक रीतीनें केला आहे पहा:—

**लक्ष्मणस्य तु तद्वाक्यं निशम्य परमाद्भुतम् ।**
**सुप्रीतश्चाभवद्रामो वाक्यमेतदुवाच ह ॥१॥**

"लक्ष्मणाचें तें आश्चर्यकारक भाषण ऐकून रामाला फार आनंद झाला व तो म्हणाला."

वास्तविक या श्लोकापूर्वींचें पूर्वसर्गांतील वाक्य लक्ष्मणाच्या तोंडांतून निघालेलें नव्हतें. या श्लोकांत "तत्" हें पद नसतें तर पळण्यास थोडा वाव मिळाला असता. या पदानें समीप असलेल्या मागील वाक्याचा निर्देश स्पष्टपणें केला असल्यामुळें अन्य मार्गानें मनाचें समाधान करून घेतां येत नाहीं. यापुढें रामानें उपरिनिर्दिष्ट विषयाचा जो उपक्रम केला आहे तोहि ओढूनताणून केल्यासारखा भासतो. या विषयावर व्याख्यान देण्यासारखा तो प्रसंग नव्हता. सीतावियोगामुळें या वेळीं राम दुःखित होता व त्याचें समाधान करण्याचा प्रयत्न लक्ष्मणानें नुकताच केला होता. राज्यकारभाराकडे राजानें दुर्लक्ष्य केल्यास

त्याचे काय परिणाम होतात याचें सोदाहरण विवेचन करण्याइतकें रामाचें मन स्वस्थ होतें, असें वाटत नाहीं. हा संवाद रात्रौ होऊन तो समाप्त होण्याच्या सुमारास सूर्योदय झाल्याचें वर्णन ५९ व्या सर्गाच्या शेवटीं दिलें आहे.

**इति कथयति रामे चंद्रतुल्याननेन । प्रविरलतरतारं व्योम जज्ञे तदानीम्**
**अरुणकिरणरक्ता दिग्बभौ चैव पूर्वा । कुसुमरसविमुक्तं वस्त्रमागुंठितेव**

" चंद्राप्रमाणें ज्याचें मुख सुंदर होतें असा तो राम भाषण करीत असतां आकाशांत नक्षत्रें कमी होत चाललीं. अरुणाच्या किरणांनीं पूर्वदिशा तांबडी दिसूं लागली व गुलाली वस्त्र नेसलेल्या स्त्रीप्रमाणें शोभूं लागली. "

यापुढें तीन प्रक्षिप्त सर्गांनंतर ६० व्या सर्गाचा प्रारंभ होतो:—

**तयोः संवदतोरेवं रामलक्ष्मणयोस्तदा ।**
**वासन्तिकी निशा प्राप्ता न शीता न च घर्मदा ॥१॥**

" राम व लक्ष्मण याप्रमाणें बोलत असतां वसंतऋतूंतील रात्र प्राप्त झाली. या रात्रीं थंडीहि विशेष पडली नसून उष्माहि फार होत नव्हता. "

या श्लोकांत रात्र पडूं लागल्याचें वर्णन आहे. तेव्हां या दोन श्लोकांचा मेळ कसा घालावयाचा? ५२ व्या सर्गांतील शेवटचा जो श्लोक वर दिला आहे त्याचा व ६० व्या सर्गांतील या श्लोकाचा संबंध अधिक जवळचा दिसतो. यावरून मधील सात सर्ग कोणींतरी मागाहून घुसडून दिले आहेत, असें अनुमान काढिल्यास तें कोणीहि सुज्ञ पुरुष अयुक्त म्हणणार नाहीं.

यापुढें ७३ व्या सर्गांत एका ब्राह्मणानें अकालीं मृत झालेला आपला मुलगा रामाच्या दरबारांत आणिल्याची कथा आहे. याबद्दल तपास करण्याकरितां रामानें पुष्पक विमानांतून प्रवास केला, तेव्हां त्याला एक शूद्र तपश्चर्या करितांना आढळला. हा अधर्म पाहून रामानें त्याचा शिरच्छेद केला. यानंतर देवांच्या विनंतीवरून राम अगस्त्याश्रमीं गेला व तेथें त्यांनीं सांगितलेल्या अनेक कथा श्रवण करून परत आला. इतकी कथा ८२ व्या सर्गाच्या अखेरपर्यंत आली आहे. रामाचा अवतार त्रेतायुगांत झाला होता, ही गोष्ट प्रसिद्ध आहे. या प्रसिद्धीला अनुसरूनच बालकांडांत विश्वामित्रांनीं रामाला ज्या कथा सांगितल्या आहेत, त्यांच्या प्रारंभीं " पुरा कृतयुगे " असे शब्द आढळतात. वर

ज्या सर्गांचा उल्लेख आलेला आहे त्यांत यासंबंधीं फार घोटाळा केला आहे. ब्राह्मणपुत्र मृत झाल्याबद्दल विचार चालू असतां वसिष्ठादि मंत्र्यांनीं रामाला सांगितलें:—

तस्मिन्द्वापरसंख्ये तु वर्तमाने युगक्षये ।
अधर्मश्चानृतं चैव ववृधे पुरुषर्षभ ॥७४।२४॥
अस्मिन् द्वापरसंख्याने तपो वैश्यान् समाविशत् ॥२५॥
अधर्मः परमो राजन् द्वापरे शूद्रजन्मनः ।
स वै विषयपर्यन्ते तव राजन्महातपाः ॥२८॥

" प्रकृत द्वापरयुग संपत आलें असल्यामुळें हे पुरुषश्रेष्ठा, अधर्म व असत्य भाषण यांची वृद्धि होत चालली आहे. या द्वापरयुगामध्यें वैश्य तप करूं लागले. तेव्हां हे राजा, या द्वापरयुगामध्यें शूद्रांनीं तप करणें हा मोठा अधर्म आहे व तुझ्या राज्यामध्यें एक शूद्र योगी तपश्चर्या करीत आहे. "
याप्रमाणेंच पुढें अगस्त्यमुनींनीं रामाला कथा सांगण्याचा उपक्रम केला तेव्हांहि:—

पुरा त्रेतायुगे राम बभूव बहुविस्तरम् ॥७७।१॥

" पूर्वी त्रेतायुगामध्यें हे रामा, एक विस्तीर्ण (अरण्य) होतें. "

अशा रीतीनें त्रेतायुगाचा प्राचीन म्हणून उल्लेख केलेला आहे. अर्थात् द्वापरयुगांत राम होता, असें सिद्ध होत आहे. यावरून हे सर्ग कोणत्या तरी पुराणांतून उतरून घेतले असले पाहिजेत, असें वाटतें, आणि ही कथा उतरून घेतांना आवश्यक फेरफार केले नाहींत व तीहि अस्थानीं घातली आहे.

ब्राह्मणाच्या मृत पुत्राला सजीव केल्याच्या वगैरे कथा पद्मपुराणांत आल्या आहेत. पुराणांतील अशा प्रकारच्या कथा मूळच्या कां प्रक्षिप्त आहेत, हें ठरविण्याला मार्ग नसतो. कारण या कथा प्रायः कोणत्या तरी विषयावर चर्चा करून त्यानिमित्त दिलेल्या असतात व अशा विषयांचा पूर्वापर संबंध असत नाहीं. रामायणांत रामचरित्र क्रमानें सांगितलें आहे. यामुळें प्रक्षेपकास पूर्वापर संगति राखून वागणें कठीण जातें व हेंच प्रक्षिप्त भाग ओळखण्याचें साधन होय. रामायणांतील ही कथा तींतील विसंगतपणा दाखवून प्रक्षिप्त असल्याचें वर सांगितलें आहे. प्रक्षेपकानें ही कथा कोठून आणिली, हें येथें पद्मपुराण

चाळीत असतां सहज उमगल्यावरून त्याविषयीं येथें दोन शब्द लिहावयाचे आहेत. प्रक्षेपकाला हें काम करून कांहीं स्वार्थ साधावयाचा होता, असें नाहीं. रामविषयक कथांचा एकत्र संग्रह करावयाच्या सामान्य हेतूनेंच प्रायः हा भाग वाढला आहे. केव्हां केव्हां अशा कथा दंतकथानुरोधानें रचिल्या आहेत, तर कित्येक दुसऱ्या पुराणांतून घेतलेल्या आहेत. प्रस्तुत कथा पद्मपुराणांतून थोड्या फेरफारानें घेतलेली आहे, हें दोन ग्रंथांतील महत्त्वाच्या भागांची तुलना पुढें देत आहों, त्यावरून कळून येईल. पद्मपुराणांतील कथा पुलस्त्य व भीष्म यांच्या संवादरूपानें आली आहे. सृष्टिखंडांतील ३५ व्या अध्यायांतील ३५ व्या श्लोकापासून या कथेला प्रारंभ होऊन ती ३७ व्या अध्यायाबरोबर समाप्त झाली आहे. एकंदर ग्रंथसंख्या ३६८ आहे.

पुढील स्थलें पहा:—

| रामायण. | पद्मपुराण. |
|---|---|
| ततः कतिपयाहःसु वृद्धो जानपदो द्विजः । | एतस्मिन्नेव दिवसे वृद्धो जानपदो द्विजः। |
| मृतं बालमुपादाय राजद्वारमुपागमत् ॥७३।२॥ | मृतं पुत्रमुपादाय रामद्वारमुपागमत् ॥३५।५॥ |

यापुढें ब्राह्मणानें केलेला विलाप पद्मपुराणांत नसून तो आणि याविषयीं विचार करण्याकरितां वसिष्ठादि आठ ऋषि बोलाविले, इतकी कथा रामायणांत अधिक आहे. शूद्र तपश्चर्या करीत असल्यामुळें बालक अकालीं मरण पावला, असें पद्मपुराणांत वसिष्ठांनीं सांगितल्याचें लिहिलें आहे व रामायणांत तेंच भाषण ऋषिमंडळीपैकीं नारदांचे तोंडीं आहे.

| रामायण. | पद्मपुराण. |
|---|---|
| तथा तु करुणं तस्य द्विजस्य परिदेवनम् । | |
| सुश्राव राघवः सर्वं दुःखशोकसमन्वितम् ॥७४।१॥ | शुश्राव राघवः सर्वं दुःख-शोकसमन्वितम् । |
| शृणु राजन्यथा काले प्राप्तो | शृणु राम यथाकालं प्राप्तो वै |

| | |
|---|---|
| बालस्य संक्षयः ॥७४।८॥ | बालसंक्षयः ॥३५।४४॥ |
| तस्य तद्वचनं श्रुत्वा रामस्याक्लिष्टकर्मणः ॥७६।१॥ | तस्य तद्भाषितं श्रुत्वा रामस्याऽक्लिष्टकर्मणः ॥३५।७८॥ |
| ततो देवाः प्रयातास्ते विमानैर्बहुविस्तरैः । रामोऽप्यनुजगामाशु कुंभयोनेस्तपोवनम् ॥७६।२०॥ | ततो देवाः प्रयातास्ते विमानैर्बहुभिस्तदा । रामोप्यनुजगामाशु कुंभयोनेस्तपोवनम् ॥३६।३॥ |
| ताः प्रजा देवदेवेशं राजार्थे समुपाद्रवन् । सुराणां स्थापितो राजा त्वया देव शतक्रतुः ॥७६।३८॥ | ताः प्रजा देवदेवेशं राजार्थे समुपागमत् । सुराणां विद्यते राजा देवदेव शतक्रतुः ॥३६।४१॥ |
| तेनेदं शक्रतुल्येन दिव्यमाभरणं मम। तस्मिन्निमित्ते काकुत्स्थ दत्तमद्भुतदर्शनम् ॥७८।२९॥ | तेन मे शक्रतुल्येन दत्तमाभरणं शुभम् । तस्मिन्निमित्ते काकुत्स्थ दत्तमद्भुतकर्मणा ॥३६।१३१॥ |
| अरजाऽपि रुदन्ती सा आश्रमस्याविदूरतः । प्रतीक्षते सुसंत्रस्ता पितरं देवसंनिभम् ॥८०।१८॥ | भार्गवी रुदती दीना आश्रमस्याविदूरतः । प्रत्यपालयदुद्विग्ना पितरं देवसंमितम् ॥३७।४२॥ |
| ऋषेर्वचनामाज्ञाय रामः संध्यामुपासितुम् । अपाक्रामत्सरः पुण्यमप्सरोगणसेवितम् ॥८२।१॥ | ऋषेर्वचनमादाय रामः संध्यामुपासितुम् । उपचक्राम तत्पुण्यं स सरो रघुनंदनः ॥३७।६४॥ |

रामायणांतील ८२ व्या सर्गांत रामानें त्या सरोवरावर जाऊन सायंसंध्या केली व परत अगस्त्याश्रमीं येऊन त्यांचा निरोप घेऊन परत पुष्पक विमानांतून अयोध्येला आल्याचें लिहिलें आहे. पद्मपुराणांत यापुढें गृध्रोलूकांची कथा आहे. ही कथा उत्तरकाण्डांत ५९ सर्गापुढें जे तीन प्रक्षिप्त सर्ग आहेत, त्यांतील तिसऱ्या सर्गांत आली आहे. हे तीन सर्ग त्यांवर प्राचीन टीकाकार कतक याची टीका नसल्यामुळें प्रक्षिप्त गणलेले आहेत. यांतील पहिल्या दोन सर्गांत श्वानाची प्रसिद्ध कथा असून त्यापुढें प्रस्तुतची कथा आहे. ग्रंथसंख्या दोनहि ग्रंथांत सारखी ( ६५ ) आहे. मात्र पद्मपुराणांत या कथेची समाप्ति करितांना पूर्वापर संबंध राखिलेला आहे व रामायणांत सांध्यावरील हा भाग

गाळलेला आहे. पद्मपुराणांत गृध्राचा उद्धार केल्यावर रामाचें उलूकाला उद्देशून भाषण आहे:—

**उलूकं प्राह धर्मज्ञः स्वगृहं विश कौशिक ॥३१॥**
**अहं संध्यामुपासित्वा गमिष्ये यत्र वै मुनिः ॥**

" धर्मज्ञ राम उलूकाला म्हणाला, हे कौशिका, आपल्या गृहांत प्रवेश कर. मी संध्योपासना केल्यावर मुनि ( अगस्त्य यांज ) कडे जाणार आहे.

यापुढील श्लोक दोनहि ग्रंथांत एकच आहे.

**अथोदकमुपस्पृश्य संध्यामन्वास्य पश्चिमाम् ।**
**आश्रमं प्राविशद्रामः कुंभयोनेर्महात्मनः ॥**

—पद्म ३७।१३३॥ रामायण ॥८२।२॥

रामायणांतील श्लोकाचा प्रारंभ " तत्र " या शब्दानें केला आहे, एवढा काय तो दोहोंमध्यें भेद आहे. यापुढील कथा दोनहि ग्रंथांत वरीलप्रमाणेंच थोड्या शाब्दिक भेदानें सांगितलेली आहे. रामानें भरतलक्ष्मणांना बोलावून राजसूय करण्याची आपली इच्छा प्रदर्शित केली व भरतानें त्यांत पुष्कळ प्राण्यांची हिंसा होईल म्हणून त्याविषयीं आपलें मत विरुद्ध असल्याचें सांगितलें. त्याचें मत ऐकून रामानें राजसूयाविषयींचा बेत रहित केला; इतकी कथा यापुढें आलेली आहे.

कथासादृश्यावरून हा सर्व कथाभाग पद्मपुराणांतून रामायणांत कोणीं तरी आणिला असावा असें वाटतें. मात्र आमच्या या अनुमानाला एक विरुद्ध प्रमाण आहे व त्याविषयींहि निर्देश करणें आवश्यक आहे. ब्राह्मणानें मृत पुत्र आणल्यावर त्याविषयीं विचार करण्याकरितां जे ऋषि बोलावण्यास आले, त्यांतील वसिष्ठांनीं आपलें मत सांगितल्याचें पद्मपुराणांत लिहिलें असून रामायणांत त्यांच्या स्थानीं नारदांचें नांव आहे. नारदांच्या या भाषणानंतर रामायणांत पुढील श्लोक आहे.

**नारदस्य तु तद्वाक्यं श्रुत्वाऽमृतमयं तथा ।**
**प्रहर्षमतुलं लेभे लक्ष्मणं चेदमब्रवीत् ॥७६।१॥**

" नारदाचें तें अमृततुल्य भाषण ऐकून रामाला अत्यंत हर्ष झाला, व तो लक्ष्मणाला म्हणाला. "

याच अर्थाचा श्लोक पद्मपुराणांत असून पूर्वसंदर्भानुसार येथें वसिष्ठांच्या नांवाचा निर्देश आवश्यक असतां तेथें नारदाचें नांव लिहिलें आहे. व आमचें अनुमान त्यामुळें हेलकावे खाऊं लागलें आहे. रामाच्या दरबारांत जे ऋत्विज् असल्याचें लिहिलें आहे त्यांत नारद ( व मौद्गल ) यांचें नांव नाहीं आणि रामायणांत त्यानें मत दिल्याचें लिहिलें आहे. तें विचित्र आहे हें खरें; तथापि पद्मपुराणांत नारदाचें पूर्वी नांव आलें नसून पुढें एकदम निर्देश केला हें त्याहून विचित्र आहे. यामुळें ही कथा रामायणांतून पद्मपुराणांत आली का पद्मपुराणांतून रामायणांत आली, असा संशय येतो; व केव्हां तर दोनहि ग्रंथांतील कथांचें उत्पत्तिस्थान तिसराच ग्रंथ असावा, असें वाटतें. कांहीं असलें तरी रामायणांतील कथा अस्थानीं आहे, यांत संशय नाहीं. रामायणांतील कथांचे हे प्रक्षेपकहि भिन्न दिसतात. अकालीं मृत झालेल्या ब्राह्मणपुत्राची कथा रामायणांत आधीं प्रक्षिप्त केलेली असून या भागावर कतकाची टीका आहे व गृध्रोलूकाची कथा मागाहून प्रक्षेपिली असून तीवर कतकाची टीका नाहीं आणि पद्मपुराणांतील कथेंत तर ती मध्येंच आली आहे. तेव्हां पद्मपुराणांत असलेली ही कथा रामायणांत आली आहे असें पाहून त्यांत गृध्रोलूकांच्या कथेची असलेली ही न्यूनता मागाहून कोणीं तरी दूर केली, असें वाटतें. पद्मपुराणांतील कथेचे अध्याय विशाल असून प्रक्षेपकानें त्याचे रामायणाला शोभतील असे विभाग करून त्यांची सर्गांत मांडणी केली आहे. प्रक्षिप्त कथानकाचा उपक्रम प्रायः ज्या पद्धतीनें असतो त्याच पद्धतीनें ८० व्या सर्गाचा प्रारंभ केला आहे. सर्गाचे अंतीं दीर्घच्छंदांत प्रायः एकेक श्लोक एका प्राचीन प्रक्षेपकानें दिला आहे. ही पद्धति या कथेंत दिसत नाहीं. नाहीं म्हणावयास ७५ व्या सर्गाचे अंतीं एक श्लोक ( १९ ) दीर्घछंदांत आहे; परंतु तो पद्मपुराणांत नाहीं. यावरून रामायणांतील हा कथाभाग पद्मपुराणांतून घेतला असावा, असें जें अनुमान होतें त्यास पुष्टि मिळते, कारण रामायणांतून पद्मपुराणांत ही कथा प्रक्षेपिणाराला या श्लोकाची

तादृश अडचण नव्हती व तो श्लोक तर पद्मपुराणांत नाहीं. तेव्हां दीर्घच्छंदांत श्लोक करून घालण्याचा व्याप रामायणांतील प्रक्षेपकानेंच केला आहे.

अगस्त्यांनीं सांगितलेल्या कथा श्रवण करून राम परत आल्यावर ८३ व्या सर्गांत रामानें लक्ष्मण व भरत यांजवळ राजसूय यज्ञ करण्याबद्दल गोष्ट काढिली. राजसूय यज्ञांत पुष्कळ लोकांचा वध होत असल्यामुळें तो न करितां अश्वमेध करावा, अशी भरतानें सूचना केली व ती रामानें मान्य केली.

बालानां तु शुभं वाक्यं ग्राह्यं लक्ष्मणपूर्वज ।
तस्माच्छृणोमि ते वाक्यं साधु युक्तं महाबल ॥८३।२०॥

" हे भरता, लहानाचेंहि युक्त भाषण ऐकून घ्यावें, यासाठीं हे पराक्रमी भरता, तुझें भाषण युक्त व चांगलें आहे, म्हणून मी ऐकून घेतों. "

भरताची सूचना मान्य करितांना रामानें वरील भाषण केलें आहे. हा संवाद येथें पूर्ण होऊन त्यांनीं पुढील तयारीला लागणें उचित दिसतें; परंतु पुढील सर्गांत लक्ष्मणानें रामाला अश्वमेधाचें माहात्म्य सांगण्यास प्रारंभ केला आहे. या अश्वमेधप्रशंसेंत लक्ष्मणानें रामाला वृत्रवधाची कथा सांगितली आहे. विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, ही कथा सविस्तर सांगण्याविषयीं रामानें लक्ष्मणाजवळ आपली इच्छा प्रकट केली आहे. हे सर्व बंधु वेदान्तनिष्णात होते, असें बालकांडांत लिहिलें आहे. वेदांत वृत्रवधाची कथा आलेली आहे. मग ती लक्ष्मणाला माहीत असावी व रामाला नसावी, हें संभवनीय दिसतें काय? ही कथा संपल्यावर रामानें लक्ष्मणाला इल राजाची कथा सांगितली आहे. अन्य ग्रंथांत आढळणार ही कथा वाचून मग रामायणांतील कथा वाचिली, तर हिचा अश्वमेधाशीं संबंध नसतांना ती येथें सांगितली आहे, असें आढळून येईल. वास्तविक रामानें भरताची सूचना मान्य केल्यावर त्याच बाबीबद्दल पुनरपि चर्चा करीत राहाणें अनवश्यक व म्हणून अशक्य दिसतें. ९० व्या सर्गापर्यंत या कथा असून पुढें रामाच्या भाषणास प्रारंभ होतो. तोंपर्यंतचा हा भाग रामायणांत कथाबाहुल्य आणण्याच्या ईर्ष्येनें वाढविलेला आहे, असें वाटतें.

सर्ग १०८ वा यांतील श्लोक १७ ते अखेर ( ३६ ) पर्यंत प्रक्षिप्त वाटतात. रामानें सरयूप्रवेश करण्याचें ठरल्यावर शत्रुघ्नाला बोलावून आणिलें व

तोहि आपल्या पुत्राचे हातीं राज्यकारभार देऊन अयोध्येला आला आणि रामाची भेट होऊन त्यानें त्याला आपण बरोबर येणार असल्याचें कळविलें; इतकी कथा सर्गाचे प्रारंभापासून श्लोक १७ पर्यंत आली आहे. पुढें राहिलेल्या सर्गांत सुग्रीवादि वानर आणि बिभीषण तेथें आल्याची व त्यांची रामाशीं भेट व भाषणें झाल्याची कथा आहे. बिभीषण व मारुती यांना रामकथा प्रचलित असेपर्यंत पृथ्वीवर राहण्याची रामानें आज्ञा केल्याचें यांत सांगितलें आहे. हे श्लोक अवघे १९ आहेत; पण यांतील सर्वच भाग विसंगत आहे. सरयूप्रवेश करण्याचा विचार ठरल्यावर रामानें बाहेर असलेल्या शत्रुघ्नाला बोलावून आणिल्याचें सर्गारंभीं सांगितलें आहे. तीन दिवसांच्या वाटेवर ( ७।१०८।१२ ) असलेल्या मधुरानगरीकडे रामाला दूत पाठवावे लागले व तेव्हां शत्रुघ्न तेथें आला आहे आणि फार दूर असलेले सुग्रीवबिभीषणादि स्वर्गलोकीं जाऊं लागलेल्या रामाचें दर्शन घेण्याकरितां न बोलावितां आल्याचें तेथें सांगितलें आहे. लक्ष्मणाचा रामानें त्याग केला असतां त्यानें सरयूतीरीं जाऊन प्रायोपवेशन करून देहविसर्जन केलें व त्याच दिवशीं (७।१०७।३) सरयूप्रवेश करण्याचा विचार रामानें केला व तो पुढील व्यवस्थेला लागला. भरतानें आपल्यामागें राज्य चालविण्याचें नाकारल्यामुळें रामानें कुशलवांना राज्याभिषेक करून दोन प्रांत त्यांचे स्वाधीन केले आणि शत्रुघ्नाला आणण्यास दूत पाठविले. म्हणजे हा सर्व व्यवहार घाईनें उरकण्यांत आला. अर्थात् मधील कालाचा निर्देश नसला तरी रामाची मनःस्थिति व त्वरा लक्षांत घेतां आठवड्याहून अधिक काल या कामीं लागण्याचें कारण दिसत नाहीं. तर रामाचा हा विचार सुग्रीवादिकांला कळण्यास अवसर कसा मिळणार? रामानें त्यांजकडे दूत पाठविलेले नाहींत, इतकेंच नव्हे तर त्यांचें स्मरणहि केलेलें नाहीं. मग त्यांना इतक्या अल्पावधींत ही वार्ता कशी कळली? त्यांचे ठायीं अतींद्रिय ज्ञानाची कल्पना करावी तर तें शत्रुघ्नाचे ठायीं कां नसावें? शत्रुघ्नाकडे रामानें दूत पाठविले यावरून तें त्यास नव्हतें हें स्पष्ट आहे. शत्रुघ्नानें रामाचे समागमें आपण येणार असें सांगून त्याचें अनुमोदन मिळाल्याचें सांगितल्यावर पुढील कथेचा उपक्रम कसा आहे पहाः—

**तस्य वाक्यस्य वाक्यान्ते वानराः कामरूपिणः ।**
**ऋक्षराक्षससंघाश्च समापेतुरनेकशः ॥७।१०८।१७॥**

" तें रामाचें भाषण संपतांच यथेष्ट रूप धारण करणारे वानर आणि ऋक्ष व राक्षस यांचे कळपच्याकळप उड्या टाकीत तेथें आले. "

हा उपक्रम एकदम केला आहे, हें येथील रचनेवरूनच दिसतें. "वाक्यस्य वाक्यान्ते " याचा तर अर्थ लावून घ्यावयाचा आहे. यांत वानरांबरोबर राक्षस असल्याचें सांगितलें आहे हें विशेष आहे. या सर्वांनीं आपण बरोबर येण्याची इच्छा प्रदर्शित केली, व रामानें त्यांना अनुमोदन दिल्याचें सांगितलें असून बिभीषण व मारुती यांच्यापुरती रामाची वेगळी आज्ञा वर दिली आहे. जांबवान्, मैंद व द्विविद यांना अशीच आज्ञा केली असें सांगितलें आहे. ( ३४ ) आणि पुढें लागलींच–

**यावत्कलिश्च संप्राप्तस्तावज्जीवत सर्वदा ॥ ३५ ॥**

" कलियुग आहे तोंपर्यंत तुम्ही जिवंत रहा " असें सांगितलें आहे. कलीची मर्यादा प्रथम सांगितली आहे व त्याच वाक्यांत तिचा भंग करणारा ' सर्वदा ' शब्द आहे. मारुतीला आज्ञा कळल्यावर त्यानें तिला मान्यता दिली व मारुतीचें हें अनुमोदन म्हणजे ३३ वा श्लोक होय. यापुढें:–

**जांबवन्तं तथोक्त्वा तु वृद्धं ब्रह्मसुतं तदा ।**
**मैन्दं च द्विविदं चैव पंच जांबवता सह ॥३४॥**
**यावत्कलिश्च संप्राप्तस्तावज्जीवत सर्वदा ॥३५॥**
**तदेवमुक्त्वा काकुत्स्थः सर्वांस्तानृक्षवानरान् ।**
**उवाच बाढं गच्छध्वं मया सार्धं यथोदितम् ॥३६॥**

हे श्लोक असून तेथें सर्ग समाप्त झाला आहे. ऋक्ष व वानर यांना समागमें येण्यास अनुमोदन दिलें, इतकें शेवटच्या श्लोकांत सांगितलें असून पूर्वींच्या श्लोकांचा आशय वर येऊन गेलाच आहे. जांबवानासह पांचांना वरील आज्ञा केल्याचें ३४ व्या श्लोकांत सांगितलें आहे. श्लोकांत मैंद व द्विविद यांचे स्पष्ट निर्देश आहेत व पांच संख्या पुरी व्हावयाची म्हणजे बिभीषण व मारुती येथें अभिप्रेत आहेत असें दिसतें. अर्थात् वरील विसंगत आज्ञा या पांचांना झाली

असें होत आहे. येथें ' तु ' या शब्दानें आणखी घोटाळा होत आहे. ' तु ' हा शब्द भेददर्शक आहे, तेव्हां जांबवान् वगैरे यांना केलेली आज्ञा भिन्न असली पाहिजे व या दृष्टीनें ३५ व्या श्लोकांत रामाची स्पष्ट आज्ञा दिली आहे; पण आज्ञा भिन्न झाल्या तर पांच या संख्येची भरती कशी करावयाची ? आणि ही संख्या सांगून त्यांना एकच आज्ञा झाल्याचें जें सूचित होत आहे, त्याची संगति कशी लावावयाची ? तसेंच हे तीन श्लोक मिळून एक वाक्य आहे व यांत " तथोक्त्वा " आणि " तदेवमुक्त्वा " अशी द्विरुक्ति झाली आहे. " तदेवमुक्त्वा " यांतील " तत् " यानें काय अभिप्रेत आहे, तें तर मुळींच कळत नाहीं. कलियुगाचा निर्देश तर विचित्र आहे. जीविताची मर्यादा कलियुगाचे आरंभापर्यंत अथवा अंतापर्यंत कोणतीहि घेतां येण्यासारखी आहे. कारण मूळांत स्पष्ट निर्देश नाहीं. रामकथा प्रचलित असण्याची ही मर्यादा रामाच्या तोंडानें येथें सूचित होत आहे, हें चिंत्य होय. बिभीषणाला आज्ञा करितांना तर सूर्य व चंद्र संचार करीत राहतील व रामकथा प्रचलित असेल तोंपर्यंत राज्य करण्यास सांगितलें आहे. ( २६ ) म्हणजे रामकथेचा प्रचार सूर्यचंद्रांच्या संचाराप्रमाणें अक्षय्य असल्याचें ध्वनित केलें आहे. मग कलियुगाची ही मर्यादा त्यानें स्वतां सांगणें संभवनीय आहे काय ? ही आज्ञा प्राप्त झाल्यावर ते परत गेल्याचें कोठें सांगितलेलें नाहीं आणि दुसरे दिवशीं रामाचा सरयूप्रवेश झाल्यावर तर " अयोध्येमध्यें श्वासोच्छ्वास करणारा असा कोणताहि प्राणी राहिला नसल्याचें " ( १०९।२२ ) सांगितलें आहे; तेव्हां सरयूप्रवेशाचे वेळीं हे कोठें होते ? बिभीषणाला " इक्ष्वाकूंचें कुलदैवत " जें जगन्नाथ त्याची आराधना करण्याची येथें रामाची आज्ञा झाली आहे. ( २८ ) कुलदेवतेचा येथील निर्देश हाच पहिला व शेवटचा होय. आपल्या कुलदेवतेची आराधना करण्याचा उपदेश रामानें कुशलवांना केला असता तर शोभला असता; पण यापूर्वी या देवतेचा निर्देश रामायणांत मुळींच नाहीं; आणि ज्याच्या कुलाशीं आपला कांहीं संबंध नाहीं त्याला असा उपदेश करण्यांत अर्थ काय ? व त्यानें आराधना केल्यानें परंपरा अबाधित कशी रहाणार ? " जगन्नाथ " या दैवताची उपासना करणाऱ्या

कोणातरी कवीला आपल्या उपास्य देवतेचा रामापर्यंत संबंध भिडविण्याची इच्छा होऊन त्यानें हा सारा प्रयत्न केला आहे दुसरें काय ?

## उपसंहार.

रामायणाचें शोधकदृष्टीनें अवलोकन केलें असतां कोणते भाग प्रक्षिप्त असा-वेत असें वाटतें, त्याचें येथपर्यंत यथामति विवेचन केलें आहे. ज्या भागांबद्दल आम्हांला संशय उत्पन्न होऊन तो इतर कारणांनीं दृढ झाला त्यांचा मात्र येथें उल्लेख केलेला आहे. कांहींतरी विशेष महत्त्वाचा पुरावा आढळल्याशिवाय कोण-ताहि भाग आम्हीं वाचकांपुढें मांडिलेला नाहीं. वाल्मीकींनीं लिहिलेला भाग कोणता व मागाहून कोणींतरी कवींनीं लिहिलेला भाग कोणता याचा निर्णय होऊन रामायणाचें खरें स्वरूप पहावयास सांपडावें या हेतूनें प्रस्तुत भाग लिहि-ण्यास आम्हीं प्रारंभ केला. केव्हांतरी रामायणाची शुद्ध आवृत्ति निघून ती लोकांपुढें यावी अशी आमची फार दिवसांची इच्छा आहे, ही इच्छा पूर्ण होण्याचा योग कधीं येईल तो येवो; परंतु हें पुण्यमय राष्ट्रीय कार्य करण्याचें जो कोणी विद्वान् गृहस्थ मनांत आणील त्याला या बाबीचा विचार करावा लागेल व तो करितांना या भागाचा उपयोग होऊन या आर्षऋणांतून आमची अंशतः तरी मुक्तता व्हावी अशी आमची परमेश्वरास मनोभावें प्रार्थना आहे.

वरील विवेचन करितांना आम्हीं कांहीं भाग प्रक्षिप्त आहे असें म्हटलें आहे. येथें त्याचा अर्थ मागाहून कोणीतरी घुसडलेला भाग एवढाच आहे. त्यांत सांगि-तलेल्या कथा झाल्या नाहींत, असें आमचें म्हणणें नाहीं. रामायणकालीं झालेली म्हणून जी गोष्ट सांगण्यांत आली ती खरोखर झाली होती किंवा नाहीं याचा निर्णय कोण व कसा करणार ? तथापि रामचरित्राच्या बाबींत वाल्मीकिरामायणाइतका विश्वासार्ह व प्राचीन ग्रंथ एकहि नाहीं. तेव्हां संशयित गोष्टींच्या सत्यासत्यतेचा निर्णय या ग्रंथावर बोट ठेवून त्याप्रमाणें करणें अधिक योग्य आहे. आतां येथें हें सांगून ठेवणें आवश्यक आहे कीं, हा भाग असला निर्णय करण्याकरितां लिहिलेला नाहीं. संशयित भागांचा लेखक कोण एवढ्या प्रश्नापुरता हा वाद आहे. प्रक्षिप्त भागांत जे किरकोळ श्लोक आहेत ते वेगवेगळ्या कवींनीं नवीन

रचून घातले आहेत, यांत शंका नाहीं. या श्लोकांच्या उत्पत्तीसंबंधीं रा. ब. महाजनी यांनीं सुचविलेली कल्पना बरीशी वाटते. ते म्हणतात:—

" कितीएक प्रसंगीं एकाद्या आधुनिक कवीस एकाद्या सर्गांतील श्लोकांचा अर्थ निराळ्या वृत्तांत लिहावा असें वाटून त्यानें ते तसे श्लोक रचून पोथीच्या पृष्ठावर अगर दुसऱ्या एकाद्या पानावर लिहून ठेविले असावे. कालांतरानें या पोथीची प्रत करणाऱ्या लेखकाच्या अज्ञानानें मूळचे अनुष्टुभ श्लोक व तदभिन्नार्थ इतर वृत्तांतले श्लोक विचित्र माल्याभरणाप्रमाणें नवीन प्रतींत एकाच वृत्तांत सारखे गोंविले असावे. क्वचित् रूढीस विघातक गोष्टींना प्रचलित रूप दिलें असावें. "

## रामायणकालीन लोकस्थिति.

आतां जेथें सबंध सर्ग किंवा कथा प्रक्षिप्त आहेत तेथें त्या कोणत्या तरी पुराणांतून उतरून घेतल्या असल्या पाहिजेत, हें उघड आहे. रामायणाची प्रत उतरून घेतांना रामाविषयींच्या इतर पुराणांत असलेल्या त्रोटक कथा एकत्र करावयाच्या हेतूनें लेखकानें त्या उतरून घेतल्या असाव्यात व त्या उतरतांना त्यानें किंवा पुढील लेखकानें त्या कथा रामायणांतील आहे असें भासण्याकरितां क्वचित् दिसणारे फेरफार केले असावे. एकंदरींत असल्या प्रक्षिप्त कथांचें कर्तृत्व वाल्मीकींकडे नसलें तरी त्या इतर पुराणांतून उतरून घेतल्या असल्यामुळें त्या प्रक्षेपकांनीं स्वतां रचिलेल्या नाहींत, असें म्हणावयास हरकत नाहीं. वाल्मीकींनीं लिहिलेलें एवढ्याकरितां त्यावर जो विश्वास वाटणें साहजिक आहे, तो या भागावर वाटणार नाहीं व कालाचा विपर्यास करून ज्या कथा आंत घुसडल्या आहेत त्यांवर तर मुळींच वाटणार नाहीं, हें उघड आहे.

